

# प्रस्तुत लेखकाचे ग्रंथ

१ सुधारणा आणि प्रगति—समाजशास्त्राचे सपूर्ण विवेचन करणारा ग्रथ . . किं. रु. ३–०–०
सदर (गुजराथी भाषातर) . . किं. र. २–०–०
सदर (हिंदी भाषातर) . . किं. र. ३–०–०
२ हिंदी-सुमेरी संस्कृति—या उभय सस्कृतींचे व त्यांच्या आद्यकालस्थलाचें विवेचन करणारा ग्रथ . . . . किं. र. १–०–०
३ इंद्रधनुष्य—विविधविषयक लेखसग्रह . किं. र. २–०–०
४ नीतिशास्त्रप्रवोध—प्राच्य व पाश्चात्य नीतिशास्त्र व त्याचें तुलनात्मक परीक्षण करणारा ग्रथ किं. र. २–०–०
५ सुलभनीतिशास्त्र— . . . किं. र. ०-११-०
६ तत्त्वज्ञानांतील कूटप्रश्न—तात्त्विक कूटप्रश्नाचे विवरण करणारा ग्रथ . किं. र. १–०–०
७ पार्लमेंट—ब्रिटिश पार्लमेंटची रचना, घटना व कार्यपद्धति याचे विवेचन करणारा ग्रथ किं. रु. १–८–०
८ मिराबाई—सत कवयित्रीचें चरित्र किं. रु. ०-१५-०
९ नरसिंह मेहता—सत कवीचें चरित्र . किं रु. ०–६–०
१० श्री. महाराज सयाजीराव गायकवाड (तिसरे) यांचें चरित्र—भाग–१–२–३ किं. रु १०-०-०
११ तत्त्वज्ञानप्रबोध–(अप्रकाशित)—प्राच्य व पाश्चात्य तत्त्वज्ञान व त्याचे तुलनात्मक परीक्षण करणारा ग्रथ . . . ...

बाजारांतील वस्तूप्रमाणें प्रसंग पडताच आपली निकाळ तोंडें उघडून दाखविण्याचें सामर्थ्य त्याच्यात होतें. समुद्रकिनाऱ्यावर इमारतींची एक रेषा दुरून दिसत होती व तींतील इमारतींवर निरनिराळ्या देशाचीं निशाणें फडकत होतीं. किनाऱ्यावर आरब व सोमाली मुलें विक्रीसाठीं आपल्याजवळील चमत्कारिक वस्तूचा संग्रह घेऊन हिंडत होतीं. समुद्रात बुड्या मारून प्रवाशानीं आत टाकलेलीं नाणीं आपल्या दातात धरून बाहेर काढण्याचें वस्तर दाखविण्यात कांहीं उघडींवाघडीं मुलें गुतलीं होतीं. चित्राचीं कार्डे, शहामृगाचीं पिसें, शख, शिंपा, पोंवळ्याचे मणी वगैरे विकणारीं पोरें आपला माल घेऊन बोटीवर हिंडत होतीं व अशा रीतीनें सर्वत्र गडबड उडून गेली होती.

महाराजानीं येथें उतरून त्या वसाहतीसाठीं पिण्याच्या पाण्याची केलेली व्यवस्था पाहिली. त्या शुष्क व वैराण देशात पाण्याची किंमत अमृतापेक्षाहि जास्त असते व म्हणून इजिनिअर लोकानीं आपलें बुद्धिसर्वस्व खर्चून त्यासाठीं केलेली व्यवस्था फार प्रेक्षणीय आहे. तेथें कावसजी दिनशा या पारशी व्यापाऱ्याच्या वखारीस महाराजानीं भेट देऊन ते बोटीवर परत आले. नतर त्याची आगबोट तावड्या समुद्रातून सुवेझला येऊन पोहोंचली. तेथें उतरून महाराज पुढें बेन्डा स्टेशनवर बसून रेल्वेनें इजिप्तची जुनी राजधानी ॲलेक्झाड्रिया येथें गेले. या रेल्वेचा कांहीं भाग सुवेझच्या कालव्याशीं समातर असा असल्यामुळें गाडींतून जाताना त्या ठिकाणीं आशिया व आफ्रिका हीं दोन्ही खडें एकमेकाच्या हातात हात घातल्याप्रमाणें दिसतात ॲलेक्झाड्रिया येथील जुनें आणि नवें बदर महाराजानीं पाहिलें, त्याचप्रमाणें इजिप्तच्या राजघराण्याचा संस्थापक महमदअली याचा अश्वारूढ पुतळा, पॉम्पीचा जयस्तंभ व इजिप्तच्या खेदिवाचा राजवाडा हीं सर्व स्थळें त्यानीं पाहिलीं. हें शहर हिंदुस्थानातील बनारस शहराप्रमाणेंच दिसण्यात असून त्यातील रस्तेहि लहान व घाणीनें भरलेले असत. नतर तेथून बोटीनें महाराज ब्रिंडिसी येथें गेले. हें गाव

# अनुक्रमणिका









ग्रड कनाल—व्हेनिस

अधिक सुंदर करण्याची अमर्याद स्पर्धा लागून तींत अतोनात पैसा खर्च होऊं लागल्यामुळें त्या वेळच्या प्रजासत्ताक राज्यानें ही पैशाची उधळपट्टी थांबविण्यासाठीं सर्व नावांना काळाच रंग देण्याचा हुकूम केला. तेव्हांपासून तीच प्रथा पुढें चालत आली. या गोंदोगच्या आकाराप्रमाणें त्यात एक अथवा दोन माणसें वल्हीं घेऊन तीं हाकारण्याचें काम करितात.

या ठिकाणीं महाराजांनीं प्रथम सेंट मार्कचा प्रचंड राजवाडा पाहिला त्या राजवाड्याच्या दोन बाजूंपैकींच्या दरेकीची लांबी सहाशें फूट आहे त्याचा दर्शनीय भाग फारच सुंदर आहे. याच्या एका टोंकास सेंट मार्कचें मंदिर आहे त्याच्या मध्यभागीं विस्तृत पटांगण असून, त्यात एके ठिकाणीं अनेक पाळीव कबुतरें ठेवलेलीं आहेत आपल्या इकडील दक्षिणें तील पक्षितीर्थीतील पक्ष्याप्रमाणें या कबुतरांना दुपारीं नेमानें खाऊं घालण्यांत येतें त्यांना कोणत्याहि प्रकारची इजा करण्याची कायद्यानें मना केली आहे यामुळें ते सुंदर पक्षी आपली डौलदार छाती काढून ऐटींत चालतांना अथवा उडतांना पाहून मंदिराच्या पवित्र वातावरणाची ही उडती ध्वजाच आहे अशी कल्पना होते मंदिरात गेल्याबरोबर त्याच्या विस्तृत आकारामुळें त्याच्या घाटाची कल्पना एकदम न आल्यानें, तेथील सुंदर व भव्य वस्तूंची खिचडी झाल्याचा प्रथम भास होतो व तें मंदिर नसून एखादें पदार्थसंग्रहालय अथवा अजबखाना असावा, असें प्रथम वाटतें, पण सूक्ष्म निरीक्षणानें त्याच्या घडणीची बरोबर कल्पना येऊन त्यातील कारागिरीच्या कौशल्यानें मन थक्क होऊन जातें हें मंदिर पाहून त्यावद्दलचें वर्णन महाराजांनीं स्वत केलें आहे, त्यात ते म्हणतात —

"या मंदिरातील अत्यंत सूक्ष्म व भरघोस नक्शीकाम पाहिलें, म्हणजे पदोपदीं हिंदुस्थानातील शिल्पकलेची आठवण होते, व इटलीं-तील अशा सर्व नक्शीकामाचें उद्गमस्थान हिंदुस्थानांत असल्याची जाणीव होते कारण पाश्चात्य शिल्पकलेहून हें नक्शीकाम अगदीं

# प्रकरण १७ वें



## विस्तृत जगाचा परिचय

ता ३१ मे १८८७ रोजीं महाराजाची आगबोट मुबई बदर सोडून निघाली महाराजानीं आपल्या पहिल्या पहिल्या सफरींचीं टाचणें स्वत करून ठेविलेलीं आहेत त्यात भिन्न भिन्न स्थलाचें वर्णन व तीं स्थळें पाहून स्वत ला सुचलेले विचार त्यानीं वेळोवेळीं नमूद केलेले आहेत या टाचणावरून त्याच्या या सफरींचें इतिवृत्त व त्याच्या अत करणाच्या भावना वर्णन करण्याची सुदैवानें चागली सोय झाली आहे या अगदीं आरभींच्या सफरींत महाराजाच्या समागमातील मडळींत उखाजीराव काका, दादासाहेब माने, कृष्णराव जाधव, वगैरे आसइष्ट असून, धामणस्कर, समर्थ वगैरे मोठाले अधिकारीहि होते डॉ शमसुद्दीन सुलेमानी हे वैद्यकीय अधिकारी म्हणून बरोबर होते हे गृहस्थ सुदैवानें अजूनहि हयात असून, त्याचें वय सुमारें ८५ वर्षांचें आहे याशिवाय बोटीवर असलेल्या स्त्रीवर्गासाठीं पडद्याची स्वतत्र व्यवस्था करण्यात आली होती त्याच्या खोल्या अगदीं अलग असून तेथें दुसऱ्या कोणास जाऊ न देण्याची व्यवस्था करण्यात आली होती, इतकेंच नव्हे तर त्याच्यासाठीं स्वयपाकाचीहि व्यवस्था निराळी केलेली होती बोटीचा पहिला मुक्काम एडन येथें झाला तेथील डोगराचे कडे बाहेरून साधेसुधे दिसले, तरी स्वसरक्षणासाठीं इग्रज सरकारनें त्याच्या अतर्भागात तयार करून ठेविलेल्या आरमारी सामग्रीमुळे वत्सलास्वयवरातील घटोत्कची मायेच्या

मंदिराच्या आंत प्रवेश केल्यावर मात्र त्यातील उच्च व विशाल छत पाहून, त्यातील सहास्रों एकुणऐंशी पुतळे व संगमरवरी स्तंभाचा चक्रव्यूह पाहून अंतःकरणात असा एक प्रकारचा उदात्त भक्तिभाव उत्पन्न होतो कीं, त्याचें वर्णन करता येणें अशक्य आहे."

या मंदिरात कार्लो बोरोमिओ या साधूचें शव मसाल्यात घालून जसेंच्या तसें ठेविलेलें आहे. त्याचप्रमाणें येशू ख्रिस्तास क्रूसावर चढवितेवेळीं त्याच्या अंगास ठोकलेल्या खिळ्यांपैकींचा म्हणून एक खिळा येथें ठेविण्यात आला आहे व याशिवाय चांदीचें व सोन्याचें व्यास-पीठ व अनेक साधूंच्या प्रतिमा येथें ठेविलेल्या आहेत; त्या सर्व महा-राजांनीं पाहिल्या. याच मंदिरात लिओनार्डो ड व्हिन्सी या विख्यात चित्रकाराचें प्रसिद्ध चित्र—'लास्ट सपर' ( Last supper ) अथवा अखेरचें भोजन—म्हणून ठेविलेलें आहे. येशू ख्रिस्तास त्याच्या बारा शिष्यांपैकीं एकानें विश्वासघात करून पकडविलें, त्यापूर्वी सर्व शिष्या-सहवर्तमान तो जेवणास बसला असताना 'तुम्हांपैकींचाच एक जण मला पकडविणार आहे' असें येशूनें त्याना सांगितल्यावरून दरेक शिष्य इतराकडे मत्सरानें, रागानें व तिरस्कारानें पहात आहे, मात्र त्यातील खरा गुरुद्रोही शिष्य ज्युडास इस्कॅरिएट हा मनातल्या मनात शरमून जाऊन आपला हात जेवणाच्या ताटातून आखडता घेत आहे; तथापि या आगामी संकटाच्या जाणीवेनेंहि येशूच्या मुद्रेवरील गांभीर्य व तेज हें अविकृतच राहिलें आहे, असा अत्यंत सुंदर व भावनापूर्ण देखावा या चित्रात रेखाट-लेला आहे. परंतु पुष्कळ कालामुळें हें चित्र अगदीं खराब झालें असून, त्यातील सौंदर्य आता प्रतीत होण्यासारखें राहिलें नाहीं, असें महाराजांना वाटलें.

मिलनहून महाराज फ्रान्समधील ए ल बेन्स या ठिकाणीं गेले. तेथें एक सुंदर सरोवर, धबधबा व दोन गंधकाचे उष्ण झरे आहेत. तेथें त्यांनीं सुमारें पंधरा दिवस मुक्काम करून, या झऱ्याच्या पाण्यानें आपल्या प्रकृतीस

गलिच्छ होतें व त्यांतील रस्ते अरुंद व समविषम असून, त्यांत भिकारी व उडाणटप्पू लोकांची गर्दी असे. त्या काळीं युरोपचें प्रवेशद्वार म्हणून समजल्या गेलेल्या या शहरावरून तरी युरोपच्या ऐश्वर्याची कांहींहि कल्पना येण्यासारखी नव्हती.

निंडीझीहून महाराज व्हेनिसला गेले. व्हेनिस हें एक शहर आहे असें म्हणण्यापेक्षां तें एक मोठें जलमंदिरच आहे असें म्हटलें तरी चालेल. एकशेंवीस लहान लहान बेटें मिळून या शहराची रचना झाली आहे, व सर्व बेटांतून इकडून तिकडे जाण्यासाठीं तीनशें पंचाहत्तर पूल बांधलेले आहेत. या शहरांत सडका म्हणून कांहीं नसून, रहदारीचे रस्ते म्हणून दीडशें जलमार्ग आहेत. फार प्राचीन काळापासून वाऱ्यानें वाहून आलेल्या रेतीचा एक लांबच्या लांब बांध समुद्राच्या बाजूनें या शहराला असल्यामुळें, तुफानी दर्याच्या हल्ल्यापासून शहराचा बचाव करण्यासाठीं निसर्गानेंच त्या शहराभोंवतीं बांधलेल्या तटाप्रमाणें त्याचा उपयोग झाला आहे. त्यालाच पुढें पक्कें बांधकाम करून, नागरिकांनीं अधिक अभेद्य करून ठेविलें आहे. शहरांतील मुख्य राजरस्ता म्हणजे एक मोठा कालवा असून त्याला 'ग्रॅन्ड कनाल' असें म्हणतात. या रस्त्याच्या दुतर्फा उंच उंच शिखरें असलेलीं सुंदर मंदिरें व प्रचंड घुमट असलेले राजवाडे असून, या कालव्यावर अनेक ठिकाणीं पूल बांधलेले आहेत. दिवसा निरनिराळ्या प्रकारच्या नावांनीं व होड्यांनीं तो गजबजलेला असून, रात्रींच्या वेळींहि जलक्रीडा करणाऱ्या अनेक सदीप नौकांमुळें त्याला अवर्णनीय शोभा आलेली असते. या जलमार्गांतून जाणाऱ्या नौकांना 'गोंदोला' असें म्हणतात. या नौका लांबट आकाराच्या व वजनानें अगदीं हलक्या असून, त्यांच्यांमधल्या रुंद भागांत खोल्या केलेल्या असतात. या सर्व नौकांना काळा रंग दिलेला असतो. सौंदर्याच्या दृष्टीनें हें एक वैगुण्य आहे; तथापि असें सांगतात कीं, पूर्वींच्या काळीं या शहरांतील नागरिकांत आपआपल्या नौका इतरांपेक्षां

भिन्न स्वरूपाचें दिसतें. तिकडील शिल्पकलेचें स्वरूप शुद्ध पण साधें, भव्य पण खोल व विशाल पण अमर्याद अशा स्वरूपाचें असतें. युरोपातील एकदर शिल्पकलेच्या तुलनेनें पाहता या मंदिरातील व इटलीतील इतर ठिकाणच्या नकशीकामाच्या विपुलतेची ही पद्धति तेथें एखाद्या पाहुण्याप्रमाणें भासते. या मंदिरातील ऐश्वर्य, मोहकपणा व भरपूर प्रकाश, त्यात मनमुराद वापरण्यात आलेला संगमरवरी दगड व त्यातील सोनेरी काम, त्यातील लाल, जांभळा व तांबडा हे रंग, व त्याच्या भिंतींवरील चित्रांचा भडकपणा, हे सर्व शिल्पविशेष पौरस्त्य असून, ते पाश्चात्य शिल्पकलेहून तद्दन भिन्न दिसतात."

यानंतर तेथील चित्रमंदिर पाहून महाराजानीं त्यातील चित्राचे गुण-दोष समजून घेतले. त्यानंतर त्यानीं तेथील शस्त्रागार पाहिलें. त्यात लेपँटोच्या लढाईत तुर्की दर्यासारंगापासून हिसकावून घेतलेलें तुर्कस्थानचें रेशमी निशाण, फ्रान्सच्या चौथ्या हेन्रीचें चिलखत, अशा सारख्या राष्ट्रीय महत्त्वाच्या वस्तूंचा संग्रह ठेविलेला होता. यानंतर तेथील सराफकट्टा, रिआल्टो, व चित्रविचित्र म्युरॅनो काचाचा कारखाना हेहि त्यानीं पाहिले. व्हेनिसहून महाराज मिलन येथें गेले. तेथील मुख्य सराफबाजार, बगीचे, नाट्यगृहें, दवाखाने, वाचनालयें वगैरे सर्व प्रेक्षणीय स्थळें त्यानीं पाहिलीं. तथापि तेथील मुख्य प्रेक्षणीय गोष्ट म्हणजे तेथील मंदिर ही होय त्या-बद्दलचें वर्णन महाराजानीं असें केलें आहे —

"त्याचें नकशीकाम पाहून तर मनुष्याची मति गुंग होऊन जाते. त्याचे असंख्य कळस, शिखरें, कोनाडे व त्यातील एकोणीसशें तेवीस पुतळे हे सर्व निःसंशय सुंदर व भव्य आहेत. तथापि या सर्वांच्या रचनेंत एकात्मता आढळून येत नाहीं या सर्व दृश्याचा एकदर परिणाम जरी मनावर अत्यंत विस्मयकारक असा होतो, तरी त्यामुळें चित्ताला शांतता व समाधान प्राप्त होत नाहीं. या

आरोग्यकारक असून निचारचिंतननाश फार अनुकूल आहे. हें स्थळ महाराजाना फार आवडलें व तेथें त्यांनीं महिनाभर मुक्काम केला. युरोपच्या सर्व स्थळात हेंच त्यांना अधिक पसंत पडल्यामुळें याला ते 'माझें आवडतें सेंट मॉरिट्झ्' असें अजूनपर्यंतहि म्हणतात. पिंजलेला कापूस हवेंत उडावा त्याप्रमाणें ऑगस्टच्या अखेरीस तेथें होणारा हिमवर्षापात पाहून सर्व मंडळींना फार मौज वाटली.

तेथून शेजारचीं प्रेक्षणीय स्थळें पहात पहात ते टॅमिना नदीच्या खोऱ्यातील बाड फाफर्स येथें आले. येथें निसर्गाचें अत्यंत प्रशांत व घोर असें रूप पहावयास सापडतें. भर उन्हाळ्यातहि दुर्बल झालेलीं सूर्याचीं किरणें भीत भीत केवळ माध्यान्हीं पृथ्वीवर चोरून येतात, असें तेथें भासतें. इतर वेळीं तर तीं खालपर्यंत पोहोंचतच नाहींत. त्यावरून कदाचित् सूर्यालाहि अतिशय थंडी वाजून त्यानें आपले कर आखडून घेऊन अंबरात ( वस्त्रात ) गुंडाळून घेतले आहेत कीं काय,

सीतसे सताये सूर ।
रख्खे है सिकोटि कर ।
अंबर छिपाई के ॥

असें वर्णन सेनापति नांवाच्या हिंदी कवीनें केलें आहे, त्याप्रमाणें भास होतो. या ठिकाणीं घरीं पोहोचण्यास केवळ अरुंद अशी एक ल्हानशी पायवाट आहे व दोन्हीं बाजूस गगनचुंबी भयंकर कडे असून, ते वाऱ्यानें व पाण्यानें अनतकाळपर्यंत घासले गेल्यानें त्याना भयंकर राक्षसासारखा आकार आला आहे. खालीं पाहिलें असता डोळे फिरतील अशी भयंकर व खोल दरी आहे व तिच्या मागील बाजूनें टॅमिना नदी ही कड्यावरून उड्या मारीत व घोर आवाज करीत जाताना दिसते.

येथून महाराज ल्यूसर्न येथें गेले. तेथील घरें दोन तीनशें वर्षांच्या जुन्या पद्धतीचीं बांधलेलीं असल्यामुळें, विचित्र अशीं दिसतात. या ठिकाणींच फ्रान्समधील सन १७९२ च्या राज्यक्रांतीच्या वेळीं 'ट्इल्‌रीझ्'

आराम होण्यासाठीं त्यात पद्धतशीर स्नानें केलीं. येथून पुढें ते जिनीव्हा येथें गेले. तेथील अनेक स्थलात विशेष पाहण्याजोग्या वस्तू म्हणजे प्रसिद्ध फ्रेंच स्त्रीलेखिका मादाम-द-स्ताएल हिचें राहण्याचें स्थान, नेपोलिअन बादशहाची आवडती राणी जोसेफाईन हिचें वसतिगृह, सुप्रसिद्ध ग्रथकार व्हॉल्टेअरचें गृह, इग्रज कवि बायरन् यानें आपल्या 'चाइल्ड् हॅरल्ड्' या सुप्रसिद्ध काव्याचा तिसरा सर्ग जेथें लिहिला तें स्थान, रूसो या प्रसिद्ध लेखकाचा पुतळा असलेलें बेट, वगैरे होत; त्या सर्व महाराजानीं पाहिल्या. विशेषत येथील वस्तुसग्रहालयाचें त्यानीं फार बारीक निरीक्षण केलें. त्यात म्युसे फाल ( प्राचीनवस्तुसग्रह ), म्युसे राठ ( कलासग्रह ), तेथील विद्यापीठाला जोडून असलेला नॅचरल हिस्टरी म्युझिअम्, म्युसे एरिआना ( चित्रसग्रह ) हे सग्रह प्रमुख होते. यावरूनच पुढें बडोद्याला एक वस्तुसग्रहालय स्थापण्याची स्फूर्ति त्याना झाली. हें शहर घड्याळाच्या कारखान्याविषयीं प्रसिद्ध असून, या कलेचें शिक्षण येथील 'ईकोल-द हॉरॉलजी' या सस्थेंत दिलें जातें. तेथें जाऊन घड्याळ करण्याच्या कृतींतील निरनिराळ्या अवस्था महाराजानीं पाहिल्या. येथून जवळच स्वातत्र्याचे मदिर' म्हणून कवि बायरन्च्या काव्यानें प्रख्यात झालेला 'शियाँ'चा किल्ला आहे, तोहि त्यानीं पाहिला जिनीव्हा सोडण्यापूर्वीं आल्प्स् पर्वतातील शेवटचें स्थान शॅमूनी येथे महाराज जाऊन आले. तेथें हिमनद्याचे तीन प्रवाह एकत्र होऊन एक मोठा हिमसागर 'मर-द-ग्लास' या नावाचा झालेला आहे, तो अत्यत प्रेक्षणीय आहे.

जिनीव्हाहून महाराज आल्प्स् पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या समदन गावापासून तीन मैल दूर असलेल्या सहा हजार फूट उचीच्या सेट मॉरिट्झ् या ठिकाणीं गेले. हें स्थान अत्यत रम्य असून, तें युरोपातील सर्वांत अधिक उचीवरचें गाव आहे. त्याच्या एका बाजूनें उतार असून त्याच्या तळाशीं असलेल्या वृक्षाच्छादित सरोवरापर्यंत तो जाऊन पोहोचला आहे. येथील सृष्टिसौंदर्य फारच मनोहर आहे. या स्थानाची कोरडी हवा अत्यत



बर्न् ( स्विट्झरलण्ड ) येथील नगरदेवता

या राजवाड्यावर पहारा करीत असतांना मारल्या गेलेल्या स्विस् शिपायांच्या तुकडीचें स्मारक म्हणून उभारलेला 'ल्यूसर्नचा सिंह' हा दगडी पुतळा आहे.

युरोपमधील सर्वांत उंच पर्वत आल्प्स् यावरच सबंध स्विट्झरलंड देश वसलेला असल्यामुळे तेथील सर्वच ठिकाणचें सृष्टिसौंदर्य भव्य व प्रशांत असें दिसतें. ल्यूसर्नहून महाराज त्या देशाची राजधानी बर्न येथें गेले. तेथील सुंदर स्थळांत 'घड्याळाचा मनोरा' हा फार प्रेक्षणीय आहे. त्यांत पुरे झालेले तास दर्शविणारे ठोके पडण्यापूर्वी कोंबडा आरवल्यासारखा आवाज होतो. त्यानंतर त्यांत अस्वलांची मिरवणूक निघाल्याचा देखावा दिसून, अखेरीस चिलखत घातलेला एक शिलेदार तासांचे ठोके मारतो, असा देखावा दिसतो. अस्वल हें जनावर या शहराची नगरदेवता मानण्यांत येते. त्यामुळें तेथील म्युनिसिपल प्राणिसंग्रहांत अनेक अस्वलें मोठ्या काळजीने ठेविलेलीं आहेत. या शहरचीं कारंजीं फार प्रसिद्ध असून, तीं चौदाव्या शतकांत बांधलेलीं आहेत. त्यांत राक्षस, धनुर्धर, बगळा, पहिलवान, वगैरे आकारांच्या दगडी पुतळ्यांतून कारंजांचे फवारे उडत असतात. तेथील ट्रॅमगाड्या हवेच्या शक्तीनें चालविण्यांत येतात.

बर्नहून महाराज झ्यूरिक येथें गेले. बर्न ही जरी स्विट्झरलंडची राजधानी असली तरी झ्यूरिक हेंच या देशांतील सर्वांत मोठें शहर आहे. तें लिमा नदीच्या दोन्ही बाजूंला वसलेलें असून, नदीच्या एका बाजूस त्यांतील कारखाने व दुसऱ्या बाजूस तेथील व्यापाराच्या पेठा व विद्यापीठ हीं आहेत. येथील कलाभुवन हें जगद्विख्यात आहे. याचीच लहानशी प्रतिकृति पुढें बडोद्यास महाराजांनीं काढिली, ती येथील कलाभवन होय. त्याचप्रमाणें तेथील पदार्थसंग्रहालय, आंधळ्यांचे आश्रम, शिवाजी महाराजांच्या जन्मापूर्वी स्थापन झालेलें येथील वाचनालय, वगैरे स्थळें अवश्य पाहण्यासारखीं आहेत, तीं सर्व महाराजांनीं पाहिलीं.

येथूनच जवळ असलेल्या 'उत्रेटलीबर्ग' या पर्वतश्रेणींतील अत्युच्च शिखरावर ते जाऊन आले. तेथून आल्प्स् पर्वताचीं पाचशें शिखरें एकदम दिसतात! त्यावरून दृष्टि फिरवीत पलीकडे नेता नेता, अखेरीस 'युगफ्राउ' अथवा 'तरुणी' या नावाच्या शिखरापर्यंत ती जाऊन पोहोंचते.

झ्यूरिकहून महाराज ऱ्हाईन नदीच्या काठीं असलेल्या बॉल शहरीं गेले. हें शहरहि झ्यूरिकप्रमाणेंच नदीच्या दोन्ही काठीं वसलेलें आहे. येथील अनेक प्रेक्षणीय स्थळांत 'हॉल्बीन' या चित्रकारानें केलेलीं मातीचीं चित्रें व टेनियर्स, डयूरर वगैरे सारख्या प्रसिद्ध चित्रकाराच्या चित्रांचा संग्रह हे प्रमुख आहेत. विशेषतः हें शहर व्यापारी उलाढालीबद्दल प्रसिद्ध आहे. त्यामुळें तेथील निरनिराळे कारखाने महाराजांनीं फार बारकाईनें पाहिले.

अशा प्रकारें स्विट्झरलंडांतील स्थळें पाहून झाल्यावर महाराज फ्रान्सची राजधानी पॅरिस येथें गेले. हें शहर पाहिल्याबरोबर एका नवीन सृष्टींत प्रवेश केल्याप्रमाणें त्यांना वाटलें. तेथें पाहण्यासारखीं अनेक स्थळें आहेत, त्यांत प्लास द ला कर्कार्द हें बाराशें चौरस यार्डांचें विस्तृत पटांगण, ऑस्ट्रिया आणि रशिया या देशांवर नेपोलियन बादशहानें मिळविलेल्या अपूर्व जयाचें स्मारक म्हणून त्या त्या लढायांचा देखावा चित्रित करणारीं उठावदार चित्रें खोदलेला व शत्रूच्या काबीज केलेल्या बाराशें पचरसी धातूच्या पत्र्यानें मढविलेला जयस्तंभ उभारलेलें प्लास-वेंदोम हें स्थान, फ्रेंच प्रजासत्ताक राज्याचा भव्य पुतळा व त्या शेजारींच स्वातंत्र्य, समता व बंधुप्रेम या फ्रेंच राज्यक्रांतींतील जयशब्दांच्या कल्पनांच्या प्रतिमा असलेलें प्लास द ला रिपब्लिक हें स्थळ, बारा रस्ते एके ठिकाणीं मिळणाऱ्या जागीं उभारलेली नेपोलियनची जयदर्शक कमान, वगैरे स्थळें फार प्रेक्षणीय आहेत. तथापि पॅरिस शहर कशाविषयीं विशेष प्रसिद्ध असेल, तर तें तेथील वृक्षाच्छादित राजरस्त्यांबद्दल होय. या रस्त्यांना बुलवार्द असें म्हणतात.

त्यांच्या दोन्ही बाजूला विस्तृत पदपथ असून, हे मोठमोठाले रस्ते अगदीं नाकासमोर असे लांबच्या लांबपर्यंत गेलेले असतात. पृथ्वीवरील सर्व स्थळांत नगरसौंदर्याबद्दल पॅरिस हें प्रसिद्धच आहे. त्यांत अनेक ठिकाणीं सुंदर बगीचे केलेले असून, त्यांतून आपला काढवेल तितका काळ येथील नागरिक लोक काढीत असतात. तेथील इमारतींपैकीं 'मॅादलीन' चें मंदिर, 'नोत्र दाम' चें मंदिर, 'सां शापेल' चें मंदिर, वगैरे सुंदर मंदिरें महाराजांनीं पाहिलीं. त्यांतील 'नोत्र दाम' या मंदिराचा बाह्य देखावा इतकासा परिणामकारक नसून, त्याचा अंतर्भाग मात्र फार प्रेक्षणीय आहे. विशेषतः त्यांतील गुलाबी रंगाच्या खिडक्या फारच सुंदर आहेत. तथापि सां शापेल हें मंदिर मात्र सर्वोत्कृष्ट आहे, असें त्यांचें मत झालें. यानंतर तेथील विख्यात मृतवीरांचें समाधिस्थान असलेलें पॅन्थियन हें स्थळ त्यांनीं पाहिलें. नेपोलियन बोनापार्ट कारागृहांत सेंट हेलेना येथें मृत्यु पावल्यावर कित्येक वर्षांनीं त्याच्या अस्थी आणवून, त्यांवर बांधलेलें हें समाधिमंदिर ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें असलें, तरी त्या इमारतीचा लहानपणा तिच्या ऐतिहासिक महत्त्वाच्या व्यस्त प्रमाणांत आहे, असें त्यांचें मत झालें. पॅरिसमधील एक हजार फूट उंचीचा 'आयफेल टॅावर' हा मनोरा शिल्पकलेची परमावधि म्हणून समजला जातो. याच्या शिखरावरून नव्वद मैल व्यासाचा सर्व प्रदेश दृष्टिगोचर होऊं शकतो. याशिवाय येथील लुक्सेंबर्गचा राजवाडा, न्यायमंदिर, लुव्ह्रू येथील चित्रसंग्रह हे महाराजांनीं पाहिले. यापैकींचा उपरोक्त चित्रसंग्रह इतका विशाल आहे कीं, त्यांतील सर्व खोल्यांतून न थांबतां नुसतें चालत गेले तरी त्यास दोन कलाक लागतात! याचप्रमाणें फ्रान्समधील प्रसिद्ध लेखक मुत्सद्दी वगैरे पुरुषांच्या समाधी असलेली 'पेअर ला शेज' ही इमारतहि त्यांनीं पाहिली. हींत ला फॅान्टेन्, मोलिअर, अबेलार्द वगैरे पुरुषांच्या अस्थी संग्रहित केल्या आहेत. येणेंप्रमाणें पॅरिसमधील पाहण्याच्या असंख्य स्थानांपैकीं मुख्य मुख्य पाहून, तेवढ्यानेंच थकून जाऊन महाराजांनीं या खेपेस आपला

इच्छा इतरांच्या अंत.करणांत उत्पन्न झाली तरी, तिचा तादृश उपयोग नसतो; कारण तसे करण्यास लागणारें द्रव्य व सत्ता हीं त्यांच्यांजवळ नसतात. सुदैवानें हीं दोन्ही साधनें महाराजांना उपलब्ध असल्यानें, त्यांनीं त्या साधनांच्या अनुकूलतेनुरूप ज्या कांहीं परदेशांतील सुंदर वस्तूंची व संस्थांची प्रतिकृति बडोद्यास उतरवितां आली, तितकी उतरविण्याचा प्रयत्न केला, व तसे करण्यास त्यांच्या उपयुक्ततादृष्टीची त्यांना मदत झाली. अशा प्रकारें कलादृष्टि व उपयोगितादृष्टि, अशा दोन्ही प्रकारच्या दृष्टी असण्याचें भाग्य फार थोड्यांना मिळतें. सुदैवानें तें महाराजांना मिळाल्यानें, त्यांनीं आपल्या प्रवासाचा सर्वोत्तम फायदा करून घेतला आहे.

लंडन येथील बगीचे व विशेषतः त्यांतील 'हाईड पार्क' हा बगीचा हे महाराजांना पॅरिसमधील बगीच्याहूनहि सुंदर वाटले. पार्लमेन्टची इमारत, वीरसमाधिमंदिर म्हणून प्रसिद्ध असलेली वेस्टमिन्स्टर ॲबेची इमारत, ब्रिटिश म्यूझियम, साउथ केन्सिंग्टन् म्यूझियम, हेंहि त्यांनीं पाहिले. नॅशनल गॅलरीची इमारत मात्र त्यांना अगदीं घाणेरडी वाटली. तिच्याबद्दल ते म्हणतात :—

"इतका उत्कृष्ट चित्रांचा संग्रह इतक्या भिकार इमारतींत ठेविलेला पाहून मनाला धक्काच बसतो. ती इमारत एकंदरीनें पाहतां ट्रॅफल्गार चौकाला गालबोट असल्याप्रमाणें दिसते. याच चौकांतील नेल्सनचा पुतळा तर इतका बेढब दिसतो कीं, विचारूंच नये! या पुतळ्याचा चबुतरा इतका प्रमाणाबाहेर लहान आहे व त्यावरील तो पुतळा इतका उंच आहे कीं, तो पुतळा नसून एखादा बांबूचा शेकाटाच आहे असें वाटतें!"

ब्रिटिश म्यूझियमची इमारतहि या दृष्टीनें टाकाऊच आहे, असें त्यांना वाटलें. क्रिस्टल् पॅलेस हा कांचेचा व लोखंडाचा मिळून बनविलेला भव्य प्रासाद मूळ प्रदर्शनासाठीं म्हणून बांधला होता; तो पुढें तसाच कायम

मोर्चा इंग्लंडकडे फिरविला व कॅले या फ्रेंच बंदरात बोटींत बसून इंग्लिश खाडी ओलांडून ता १ नोव्हेंबर १८८७ रोजीं ते ब्रायटन बंदरीं उतरले तेथील जलचरसंग्रह पाहण्यासारखा आहे, तो पाहून तेथून महाराज पुढें ५ नोव्हेंबरला लंडन येथें जाऊन पोहोंचले.

प्रत्येक प्रवासी मोठ्या शहरीं गेल्यानंतर तेथील प्रेक्षणीय व महत्त्वाचीं स्थळें प्रथम पाहतोच पाहतो त्याप्रमाणें महाराजानींहि लंडनमधील स्थळें पाहिलीं. परंतु सर्वसाधारण प्रेक्षकांच्या व महाराजाच्या निरीक्षणात दोन प्रकारचा मुख्य फरक असे कला अथवा उपयुक्तता या दृष्टीनें प्रेक्षणीय पदार्थांचें अवलोकन करणारे लोक प्रेक्षकात साधारणत फारच क्वचित् असतात, असा अनुभव एखाद्या प्रेक्षणीय स्थळीं जाऊन आपण एका बाजूस उभें राहून सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास आपल्याला दिसून येईल तें प्रेक्षणीय स्थळ आपण पाहिलें इतकें आपल्या मनाचें समाधान होण्यापुरती अथवा तें स्थळ आपण पाहिल्याचें इतराना सागता यावें इतक्यापुरतीच सर्वसाधारण लोकाची दृष्टि असते. प्रेक्षणीय वस्तूचे कलाविशेष ग्रहण होण्याला प्रेक्षकाची दृष्टि जन्मत अथवा संस्कारानें समर्थ व्हावी लागते, तशी फारच थोड्याची झालेली असते त्यामुळें एखादें सुंदर चित्र, एखादी भावनापूर्वक मूर्ति, अथवा एखादें अत्यत नाजुक शिल्प याकडे नुसती ओझरती नजर टाकून पुढें चालू लागणाऱ्या प्रेक्षकाचा वर्गच बहुश सर्वत्र दिसून येतो तशा दृष्टीनें पाहता कारागिरीच्या सौंदर्यापासून आनंद होणारी कलादृष्टि महाराजाना निसर्गत प्राप्त झालेली आहे व ती संस्कारानें वाढली आहे त्यामुळें त्यानीं केलेलें निरीक्षण त्यांना कलानंद देऊ शकें हा त्याच्यातील व इतरातील पहिला फरक होय दुसरा फरक उपयुक्ततादृष्टीचा होय व या फरकास त्याच्या ठायीं असलेला राज्याधिकार व ऐश्वर्य हीं कारणीभूत झालीं आहेत. कोणतीहि एखादी सुंदर वस्तु अथवा उपयुक्त संस्था पाहिली असतां, तिची नकल उतरवून ती आपल्या व आपल्या प्रजाजनाच्यासाठीं उपलब्ध करून घ्यावी, ही

महाराणी व्हिक्टोरिया यांची भेट घेतली. हिंदुस्थानांतील पडद्याच्या पद्धतीचा अंमल सर्वांवर अजूनपर्यंत इतका बळकट होता कीं, बुइंडसर स्टेशनावर महाराजांची गाडी आली, त्यावेळेस 'देशी पद्धतीस मान देण्यासाठीं म्हणून' स्टेशनावर पुरुषांना येण्यास मनाई केली होती. फक्त रेल्वेचे अधिकारी तेवढे नाइलाजानें तेथें हजर होते. नंतर ता. १२ रोजीं प्रिन्स ऑफ् वेल्स् यांना भेटून बारा वर्षांपूर्वीची त्यांची ओळख महाराजांनीं ताजी केली. ता. ३ जानेवारीस त्यांना महाराणींकडून भोजनाचें आमंत्रण आल्यावरून ते भोजनास गेले. महाराणी व्हिक्टोरिया यांनीं या भेटींत स्वहस्तानें जी. सी. एस्. आय्. चें पदक महाराजांना अर्पण केलें.

यानंतर महाराजांनीं एडिंबरो व ग्लॅस्गो या स्कॉटलंडमधील मुख्य शहरांना ओझरती फेरी मारून, ता. ७ जानेवारीला परत येण्यासाठीं लंडन शहर सोडलें. वाटेंत इटलींत कांहीं ठिकाणीं त्यांनीं थोडा मुक्काम केला. पॅलन्झो या गांवीं त्यांना तेथील लोकांत हिंदुस्थानाप्रमाणें असलेले एक दोन रीतिरिवाज आढळले. मृत मनुष्याला अंत्यविधीसाठीं नेतेवेळीं त्यांचे आप्तइष्ट इकडील लोकांप्रमाणें मोठ्यानें प्रार्थना करीत जातात. तसेंच इकडील होळीप्रमाणेंच तिकडे कार्निव्हलचा सण पाळला जाऊन, एका जमिनींत रोंवलेल्या काठीला झाडाची खांदी बांधून ठेवण्याचा रिवाज तिकडे त्यांच्या निदर्शनास आला. यानंतर बोलोना, लुगॅनो, वगैरे ठिकाणीं थोडा थोडा मुक्काम करून, अखेर ब्रिंडिझी येथें बोटीवर चढून ते मुंबई बंदरांत ता. २० फेब्रुवारी रोजीं उतरले व तेथून ता. २१ ला आपल्या राजधानीस आठ महिन्यानंतर परत येऊन पोहोचले.

ही विलायतच्या सफरीची महाराजांची पहिलीच खेप असल्यामुळें, त्यांच्या बडोद्यांतील आप्तेष्टांना ते निघाल्यापासून त्यांच्याबद्दल बरीच काळजी वाटत होती. कित्येकांना असें वाटे कीं महाराज विलायतेस गेल्यावर इंग्रज सरकार तेथेंच त्यांना अटक करून नेपोलियन बादशहाप्रमाणें कोठें तरी बंदींत नेऊन ठेवील. कांहीं जणांना अशी भीति वाटली कीं, तेथें गेल्यावर



टॉवर ऑफ् लडन व लडनब्रिज

त्याना 'फुलाची लढाई' प्रथमत पहावयास सापडली. अनेक खाजगी गाड्या फुलाच्या निरनिराळ्या रचनानीं सुशोभित केलेल्या असून, त्यातील सर्वांत उत्कृष्ट पुष्परचना केलेल्या गाडीस या लढाईत जय मिळाल्याचें मानून बक्षिस देण्यात येत असे. या प्रसगीं इटलीची राणीहि तेथे आलेली होती. नेपल्स् येथील सर्व स्थळें पाहून झाल्यावर व्हेसुव्हियस् या ज्वालामुखी पर्वतावरहि काहीं भाग गाडीनें व काहीं भाग लोखडी तारेवर चालणाऱ्या रेल्वेनें जाऊन, महाराज तो पाहून आले. त्याचें सुदर वर्णन त्यानीं आपल्या प्रवासवृत्ताच्या वाचणात केलें आहे, त्यात ते म्हणतात :—

"पायथ्यापासून काहीं अतरापर्यंत आम्हास द्राक्षाचे वेल, वृक्ष व इतर वनस्पतींची विपुलता दिसली. त्यानतर पुढें फक्त गवतच दिसलें. पण यापुढील प्रदेश थड होऊन घट्ट झालेल्या ज्वालामुखींतील दगडाच्या रसाचा—लाव्हाचा—बनलेला असल्यामुळें, तेथें जीवसृष्टि अगदीं दिसेनाशी झाली. या लाव्हाच्या रगात भिन्न भिन्न छटा दिसत असत. कोठें तो पिंगट दिसे, तर कोठें काळसर व कोठें लालसर असे. त्याचा पृष्ठभाग खडबडीत असून, घट्ट झालेल्या रसाचे मोठमोठे गोळे विचित्र व विक्षिप्त अशा प्राण्याच्या आकाराचे दिसत. यापुढें जसजसे आम्ही वर चढू लागलों, तसतसा दूर चालत असलेल्या लढाईतील तोफाच्या गडगडाटाप्रमाणें प्रचड आवाज आम्हाला ऐकू येऊ लागला, व त्या पर्वताच्या शिखराच्या फटींतून अग्निज्वाळा बाहेर पडून वाऱ्याच्या झोतानें त्यातील उष्णता आमच्याकडे येऊ लागली मधून मधून मेघगर्जनेप्रमाणें भयकर आवाज होऊन त्याबरोबरच मोठमोठाले दगडाचे लाललाल गोळे आतून सू सू करीत बाहेर पडून पाचपाचशें फूट दूर जाऊन पडत येथील शिखराजवळील उष्णता दोनहजार डिग्रीपर्यंत असते असें म्हणतात ! बाहेर पडलेल्या लाव्हावर आम्हीं एक नाणें टाकताच त्याचा ताबडतोब रस होऊन गेला ! या ज्वालामुखीच्या शिखराचा सुळका सुमारें तीनशेंपासून पाचशें फूट उच गेला आहे. या

टेनिंग्यांत आला आहे. या प्रासादांत चित्रमंदिर, वाचनालय, घोड्यांचे हौद, देशांतील प्रमुख इमारतींचे नमुने, चार हजार तीनशें चौऱ्यायशीं नळ्या असलेलें व जलशक्तीनें वाजणारें ऑर्गन, अठीचशें फूट उंच फवारे फेंकणारें पाण्याचें कारंजें, वगैरे अनेक प्रकार केलेले आहेत. लंडनमधील मादाम टुसाद नांवाच्या बाईनें स्थापिलेला मृत व ह्यात प्रसिद्ध पुरुषांचा मेणाचा चित्रसंग्रह हा फार प्रसिद्ध होता. यांत जगांत कोणत्याहि कारणानें प्रसिद्ध असलेल्या स्त्रीपुरुषांची हुबेहूब यथाकार मूर्ति करून ठेविण्यांत येत असे. महात्मा गांधी दुसऱ्या राउंड टेबल परिषदेच्या बैठकीसाठीं गेल्यावेळीं त्यांचाहि पुतळा करून तेथें ठेविण्यात आला होता. त्यानंतर हा वस्तुसंग्रह जळल्याचें प्रसिद्ध झालें. तथापि त्याचा पुन्हां जीर्णोद्धार करण्यांत येत आहे. लंडन शहराच्या आजूबाजूस असलेल्या मुख्य प्रेक्षणीय स्थळांत पोर्टस्मथ् येथील आगबोटींचा कारखाना व ऑक्स्फर्ड आणि केंब्रिज हीं विद्यापीठें होत. या प्रदेशापैकीं आगबोटींच्या गोद्यांनीं मिळून तीनशें एकर जमीन व्यापली गेली आहे. येथील विलक्षण आरमारी तटबंदी व दारूगोळ्याचे व युद्धसामुग्रीचे कारखाने पाहून बुद्धि स्तिमित होते. ऑक्स्फर्डमधील विद्यापीठांत महाराजांचें स्वागत प्रो. नेटलशिप यांनीं केलें. तेथें कित्येक दिवस मुक्काम करून महाराजांनीं तेथील विद्यालयें, बोडेल्अिन लायब्ररी व चित्रांचा आणि नाण्यांचा संग्रह पाहिला. इंग्लंडमधील सर्व शहरांत ऑक्स्फर्ड हें शहर अत्यंत सुंदर असल्याचें त्यांचें मत झालें. जगांतील इतर विद्यापीठें हीं केवळ शिक्षणाचीं साधनें असलेल्या इमारती आहेत, पण ऑक्स्फर्ड हें सर्व शहर म्हणजे एकच विद्यापीठ असून येथील सर्व वातावरण विद्यामय झालेलें आहे, असें महाराजांना वाटे. तिनर्फे केंब्रिज विद्यापीठ त्यांना सुंदर वाटलें नाहीं. यानंतर हॅरो व ईटन येथील गुरुकुलासारख्या शिष्यशिक्षकांत निकट संबंध आणणाऱ्या मोठ्या शाळाहि त्यांनीं पाहिल्या.

ता. २ डिसेंबर रोजीं महाराजांनीं विंड्सर येथें सपत्नीक जाऊन

पहाणें अर्थातच शक्य नसल्यानें, त्यांतील महत्त्वाचीं तेवढीं महाराजांनीं पाहिलीं. याखेरीज पॅन्थिअन्, फोरम्, कलोसिअम्, वगैरे प्रसिद्ध स्थळेंहि त्यांनीं पाहिलीं. पॅन्थिअन् ही एका काळीं रोम शहरांतील सर्वोत्कृष्ट इमारत होती. तिच्या खांबांना संगमरवराचा मुलामा दिलेला असून, वरील छत पंचरसी धातूचें होतें. सांप्रतकाळीं तो मुलामा नाहींसा झाला असून, तें छतहि तोडून टाकण्यांत आलें आहे. तथापि ग्रीक व रोमन या दोन्ही शिल्पपद्धतींचा सुंदर मिलाफ झालेली या इमारतीची रचना अजूनहि अपूर्व आहे. कलोसिअम् हें एक जगड्व्याळ प्रेक्षागृह असून, त्यांत सत्यायशीं हजार लोक बसण्याची सोय करण्यांत आलेली होती. तें इतकें विशाल असूनहि त्याची रचना इतकी सोईची केलेली होती कीं, त्यांत बसणाऱ्या प्रचंड समाजाला आंत जातांना अथवा बाहेर येतांना कोणत्याहि प्रकारची अडचण पडूं नये. या शहरांत भव्य व क्षुद्र अशा दोन्ही प्रकारांची खिचडी झालेली आहे. येथील इमारती सर्व जगांत अप्रतिम अशा आहेत, तर येथील रस्ते अरुंद व गलिच्छ असे असून, एकंदर लोकवस्ति हीन अवस्थेत आहे. या शहरासंबंधानें त्या वेळीं महाराजांचे मत असें झालें कीं,

"युरोपांतील इतर अर्वाचीन राजधान्या पाहिल्या, म्हणजे रोम-बद्दल बिलकुल कौतुक वाटत नाहीं."

रोमहून महाराज फ्लॉरेन्स येथें गेले. हें शहर मध्ययुगांतील कलाकौशल्याचें माहेरघर म्हणून समजलें जातें. तेथील टाऊन हॉल, उफीझी राजवाड्यांतील सर्वोत्कृष्ट चित्रसंग्रह व इतर सर्व इमारती त्यांनीं पाहिल्या. याच शहरीं गॅलिलिओ या प्रसिद्ध ज्योतिष्याचा वेध घेण्याचा मनोरा असून त्यानें वापरलेली दुर्बीण त्या ठिकाणीं ठेविलेली आहे. फ्लॉरेन्स येथेंच सन १८७० मध्यें त्या वेळचे कोल्हापूरचे छत्रपति राजाराम महाराज मृत्यु पावले; म्हणून तेथें त्यांचा अर्धपुतळा उभारलेला असून, त्यावर संस्कृत, मराठी, इंग्रजी व लॅटिन या चार भाषांत त्यांचा मृत्युलेख कोरलेला आहे.

महाराज वाटतील. त्याना वाटे कीं खंडेराव महाराज पूर्वी मुसलमान होण्याच्या अगदीं बेतात आले होते, परंतु त्या वेळीं ते बडोद्यातच असल्यामुळें, त्यांचें मन लोकाना वळवितां तरी आलें; पण विलायतेस महाराजांचें मन कोण वळविणार! इतर कांहींना तर अशी शंका आली कीं, महाराजाना कोणी पळवूनहि नेईल व मग त्यांचा पत्ता लागणेंहि मुष्कील होईल! या सर्व शंकांचें निरसन महाराज सुखरूप परत आल्यावर अर्थातच झालें, व त्यांच्या प्रजेनें त्यांचें मोठ्या समारंभानें स्वागत केलें. त्यामुळें महाराजांचें अंतःकरणहि भरून आलें. त्यांनीं परत आल्यावर व्हाईसरॉय लॉर्ड डफरिन याना पाठविलेल्या ता. १५ मार्च १८८८ च्या पत्रात लिहिलें आहे कीं,

"माझ्या लोकांनीं माझें प्रेमानें मन पूर्वक स्वागत केलें, त्यामुळें त्यांच्या कल्याणासाठीं निरंतर झटण्याकरिता माझी प्रकृति सुधारणें किती अवश्य आहे, याची मला पूर्ण जाणीव झाली."

परत आल्यावर ता. २८ फेब्रुआरी रोजीं महाराज निलगिरी पर्वतांतील उटकमंड या सरकारी हवा खाण्याच्या ठिकाणीं गेले. हें ठिकाण समुद्रसपाटीपासून ८००० फूट उंच असून हवा खाण्याच्या हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणांची 'राणी' मानलें जातें. तेथें कांहीं दिवस राहून महाराज बडोद्यास परत आले. तथापि त्यांचा निद्रानाशाचा रोग बरा झाला नाहीं. त्यामुळें त्यांनीं युरोपची दुसरी सफर करण्याचें ठरवून त्या सालीं ते ता. २६ जून १८८८ रोजीं मुंबईहून निघाले. या खेपेस सुवेझ येथें न उतरता ते त्या कालव्यातून सरळ पुढें गेले. युरोपखंडात उतरल्यावर प्रथम ते नेपल्स् येथें गेले. या शहरामोंवतालचें सौंदर्य फारच उत्कृष्ट आहे. त्याच्या समुद्रकिनाऱ्याच्या बाजूनें ल्हान ल्हान टेंकड्या असून त्यांच्या सभोंवार फलवृक्षांच्या राजी, बगीचे व द्राक्षांचे मळे भरलेले आहेत. टेकड्यांच्या उंचवट्यावर मोठमोठाले वाडे, धार्मिक मठ व ल्हान ल्हान बंगले सर्वत्र विखुरलेले आहेत. नेपल्स् येथें

चित् आला नसता; परंतु सन १८९० च्या डिसेंबर महिन्यात त्यांची प्रकृति डबल न्युमोनियानें बिघडली, ती इतकी कीं, एक वेळीं त्यांच्या जीवाविषयींहि शंका वाटूं लागली होती. परंतु सुदैवानें सन १८९१ च्या मार्चमध्यें त्यांच्या प्रकृतीस आराम पडूं लागला. तथापि त्याच वर्षांत डिसेंबर महिन्यात पुन्हा त्यांची प्रकृति आमाशानें फार बिघडली. या मध्य-तरीच्या मार्च ते डिसेंबरच्या अवधींत न्युमोनियाच्या विकारानंतर क्षीण झालेली तब्येत सुधारण्यासाठीं ते अजमीर, जोधपूर व उज्जयिनी या ठिकाणा-हून जाऊन आले. नंतर दक्षिणेंत विजापूर येथें जाऊन तेथील गोलघुमट, जुम्मा मस्जिद, इब्राहिमचा रोझा, मालिक-ई-मैदान ही चाळीस टन वजनाची सन १५४९ त ओतलेली तोफ, वगैरे प्रेक्षणीय स्थळें व वस्तू त्यांनीं पाहिल्या. तथापि वर म्हटल्याप्रमाणें पुढें हिवाळ्यात त्यांची प्रकृति बिघडल्यामुळें हवापालटासाठीं जलपर्यटन करण्याचा सल्ला त्यांना डॉक्टरलोकांनीं दिला. तरीहि आणखी कांहीं दिवस तरी विलायतेस जाण्याची जरूरी न पडावी या इच्छेनें त्यांनीं यानंतरचा कांहीं काळ लोणावळ्यास काढला. तथापि प्रकृतींत व्हावी तशी सुधारणा न झाल्यामुळें ता. ७ मे १८९२ रोजीं ते मुंबईहून विलायतेस जाण्यासाठीं निघाले व प्रथम लंडन येथें पोंचले. या खेपेस त्यांनीं या शहरातील मागील वेळीं न पाहिलेलीं सर्व ठिकाणें पाहिलीं. नंतर तेथून इटलींत जाऊन ते इंटर-लाकेन या गावीं आले. हें गाव दोन सरोवराच्या मध्यभागीं वसलेलें आहे. येथें एक दुतर्फा अक्रोडाचीं झाडें असलेला फिरावयास जाण्याचा सुंदर रस्ता आहे. येथून आल्प्स् पर्वतातील 'यंग फ्राऊ' या शिखराचा सुंदर देखावा दिसतो. तेथून आजूबाजूचीं कांहीं स्थळें पाहून महाराज परत लंडन येथें आले. येथून बर्मिंगहॅम, लॅंकेशायर, मॅंचेस्टर, लिव्हरपूल वगैरे कारखान्यांच्या प्रसिद्ध शहरीं जाऊन, त्यातील प्रचंड उद्योगधंद्यांची त्यांनीं माहिती करून घेतली. त्याचप्रमाणें शेफील्ड येथील पोलादाचा कारखानाहि त्यांनीं पाहिला.

याप्रमाणें इंग्लंडात कांहीं काळ राहिल्यावर महाराज बेल्जियम् देशाची

शिखरावरून त्याच्या पायथ्याजवळील उपसागराचा देखावा केवळ अप्रतिम भव्य दिसतो."

नेपल्सहून होडीनें जाऊन महाराजानीं Blue Grotto अथवा नील-गुफा पाहिली या गुफेचें द्वार इतकें ठेंगणें आहे कीं, त्यातून होडी आत जाताना तिच्यावरील माणसाना आडवें निजावें लागतें. अतर्भागात या गुफेची उची चाळीस फूट आहे समुद्राच्या निळ्या पाण्यावरील झालेलें प्रकाशाचें परिवर्तन येथें फारच सुदर दिसतें.

यानतर इटलीची राजधानी रोम येथें महाराज गेले. तेथील मार्कस् ऑरेलियस् या बादशाही साधुपुरुषाचा पुतळा त्याना फार आवडला. त्याचीं बोधवचनें महाराजानीं मराठींत सग्रहीत करविलीं आहेत रोम येथें पाहण्याच्या प्रेक्षणीय स्थळात बोर्जिया राजवाड्यातील सहारों अप्रतिम चित्राचा संग्रह फार सुदर आहे यानतर सेंट पीटर्सचें मदिर हें सर्व जगतातील खिस्ती मदिरात अवाढव्य असलेलें मदिर त्यानीं पाहिलें. या मदिरातील प्रत्येक वस्तु विशाल प्रमाणाची बनविलेली आहे. त्यातील दरेक मडप चौसष्ट फूट उच असून एकदर मदिराच्या दीर्घ वर्तुळाचा व्यास आटशें फुटांचा आहे त्यातील खाबाच्या रागेंतील अतर इतकें मोठें आहे कीं, त्यामधून दोन गाड्या एकमेकींच्या शेजारून सहज जाऊ शकतील! मदिराचें पचरसी धातूचें छत नव्वद फूट उच आहे महाराज गेले त्या वेळीं मदिरातील उपाध्याय प्रार्थना करीत होते, ती हुबेहूब आपल्याकडील ब्राह्मणाच्या वेदघोषाप्रमाणें त्याना भासली !

त्यानतर महाराजानीं पोपचा राजवाडा 'व्हॅटिकन्' हा पाहिला ही इमारत इतकी विलक्षण अवाढव्य आहे कीं, तिच्यातील दिवाणखान्याची सख्या ५,००० आहे याशिवाय हिच्यातील ललितकलासग्रह सर्व जगात मोठा असून तेथील वाचनालयहि अप्रतिम आहे

रोम शहरात एकदर पावणेचारशें मदिरें आहेत त्यातील काहीं फार जुनीं असून, एक मदिर तर नवव्या शतकातील आहे. हीं सर्व मदिरें

चित्रविचित्र दिसतात. येथून व्हिएन्नाला जाऊन पुढें महाराजांनीं हंगेरीची राजधानी बुडापेस्ट ही पाहिली. तेथून कार्ल्सबाद या डोंगरावरील ऊन पाण्याच्या झऱ्याच्या गावीं जाऊन, नतर महाराज बव्हेरियाची राजधानी म्यूनिक येथें गेले. त्या शहरातील नॅशनल् म्यूझियम् हा एक प्रेक्षणीय वस्तुसंग्रह आहे. त्यात दरेक शतकातील औद्योगिक, कलात्मक व आरमारी वस्तू कालक्रमानें लाविलेल्या आहेत; त्यामुळें औद्योगिक उन्नतीचा इतिहास शिकविणारी ती शाळाच झाल्याप्रमाणें असून, तींत वस्तुपाठाच्या पद्धतीनें धडे दिल्यासारखें शिक्षण मिळू शकतें. म्युनिकहून महाराज पुढें नॉर्वे या देशात गेले. या सफरींत त्यांच्याबरोबर मुंबईचे प्रसिद्ध पार्शी लक्षाधीश सर कावसजी जहांगीर व त्यांच्या पत्नी या होत्या. ता. १९ जुलै रोजीं ते प्रथम रोम्स्डालजवळील बदरीं उतरले. नॉर्वे या देशाला 'मध्यरात्रींच्या सूर्यप्रकाशाचा देश' असें नाव आहे. मध्यरात्रीं सूर्यप्रकाश ही कल्पना आपल्याला अर्थातच चमत्कारिक व अशक्य वाटते. तथापि हा देश उत्तरध्रुवाच्या जवळ असल्यानें तेथे वर्षांतील काहीं महिने सूर्य आपल्या डोक्यावर धरलेल्या छत्रीच्या काड्याप्रमाणें चाटोळा फिरत असल्यामुळें, दिवसाचे चीस बावीस कलाक तेथे सूर्यप्रकाश मिळू शकतो. खुद्द उत्तरध्रुवावर तर वर्षातील सहा महिने सतत चोवीस कलाक सूर्यप्रकाश व इतर सहा महिने सतत अधार, अशी स्थिति असते. महाराजाना या वेळीं रात्रीं अकरा वाजता सूर्य क्षितिजावर असल्याचा चमत्कार पाहण्यास सापडला. तेथून लोफोटेन बेटास जाऊन, नतर महाराज उत्तरेकडील सर्वांत अखेरचें स्थल हॅमरफेस्ट येथे गेले. येथील लोकसख्या केवळ अडीच हजार असूनहि तेथें विजेच्या प्रकाशाची सोय होती. येथील मुख्य धदा म्हटला म्हणजे देवमासे व कॉडमासे पकडण्याचा होय या गावाच्या आसपास या माशाचे हजारोंचे थवेच्या थवे येतात, ते पकडून परदेशीं पाठविण्याचा येथील लोकांचा उद्योग असतो येथील हवा जरी थड होती, तथापि ती असह्य असेल

फ्लॉरेन्सहून सिंप्लॉन खिंडींतून जाऊन पुढें महाराज झरमॅट या आल्प्स् पर्वतांतील दोन शिखराच्या मधील दरींत असलेल्या लहानशा गांवीं आले. हीं दोन शिखरें मॅटरहॉर्न आणि मॉटी रोझा हीं होत. यापैकीं मॅटरहॉर्न हें पधरा हजार फूट उच असून त्याचा सर्वांत उच भाग एखाद्या कळसाप्रमाणें चार हजार फूट उच असा आकाशांत निमुळता गेला आहे. त्याच्या आजूबाजूस सर्वत्र पांढऱ्या शुभ्र हिमनद्या पसरलेल्या आहेत. यानंतर माईट्हॉर्न या निरंतर वर्फाच्छादित असलेल्या शिखराच्या मार्गांतील अनेक धबधबे ओलांडून महाराज गेले. अगदीं शिखरापर्यंत जाण्यापूर्वी आदल्या दिवशीं रात्रीं एका लहानशा बंगलींत ते राहिले होते, व दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्यावर शिखराची चढण चढू लागून साडेनऊच्या सुमारास ते टॅकाला पोहोंचले. येथील उंची १२००० फुटांची होती. येथून जो भोंवतालचा देखावा दिसत होता, त्याचें वर्णन शब्दांनीं करणें अशक्य आहे.

अशा प्रकारें स्विट्झरलंडमधील देखावे पाहिल्यावर टायरोल्‌ची राजधानी इन्सब्रुक येथें ते आले व तेथील स्थळें पाहून सॉल्झ्बर्ग या शहरावरून ते ऑस्ट्रिया देशाची राजधानी व्हिएन्ना येथें आले. तेथील सेंट स्टीफन्‌चें मंदिर, हॉफ्बर्ग राजवाडा, बादशाही जवाहिरखाना, वाचनालय, वगैरे प्रेक्षणीय स्थळें त्यांनीं पाहिलीं. येथील कॅपुशिन् मंदिरांत आस्ट्रियातील राजपुरुषांचीं थडगीं करण्यांत येत. तेथील लोकसभागृह, विद्यापीठ, कचेऱ्या, कलाभुवन, मराया थेरिसा या राणीचा त्रेचाळीस फूट उंचीच्या चबुतऱ्यावर उभारलेला एकोणीस फूट उंचीचा पुतळा, वगैरे सर्व प्रेक्षणीय स्थळें पाहून झाल्यावर, ते हिंदुस्थानास येण्यासाठीं परतले, व ही सुमारें साडेतीन महिन्यांचीच लहानशी सफर आटोपून ते बडोद्यास ता. ८ ऑक्टोबर रोजीं येऊन पोंचले.

या दुसऱ्या सफरीनें महाराजांची प्रकृति चांगली सुधारली व ती तशीच रहाती, तर पुन्हा लवकर विलायतेस जाण्याचा प्रसंगहि कदा-

तीन मैलांवर यांचीं घरें होतीं, तीं पाहण्यास महाराज गेले. या घरांना दगड, लांकूड, झाडाच्या साली, पानें, फांद्या, गवत वगैरे सर्व प्रकारचा मालमसाला लावलेला असून, त्यांच्या मध्यभागीं छताला एक भोंक पाडलेलें असतें, तेंच त्यांचें धुराडें व खिडकी होय. घरांत विस्तव पेटलेला असून, जमिनीवरच हे लोक आडवे पडतात. यांचें मुख्य धन म्हणजे रेनडिअर हें होय. हिंदुस्थानांतील पूर्वकाळच्या ऋषींच्या गाईच्या जागीं या लोकांना हें जनावर वाटतें. त्याचा उपयोग हिंवाळ्यांत स्लेज नांवाच्या गाड्यांना जुंपण्यासाठीं करतात व माद्यांचें दूध पिण्यासाठीं वापरतात. याखेरीज या जनावरांचें मांस, शिंगें, चामडें वगैरे सर्व भागांचा उपयोग या लोकांना होतो. लॅप् लोकांची एकंदर वस्ती सुमारें १६,००० आहे. येथून वर्जेन या नॉर्वेतील मोठ्या बंदराला महाराज गेले. तेथील जलचरसंग्रहांत निळ्या, हिरव्या, पिंवळ्या व लाल रंगांचे सुंदर मासे ठेविलेले आहेत, ते पाहून तेथून महाराज परतले व दुसऱ्या दिवशीं जर्मनींतील हॅंबर्ग या शहरीं आले. या बंदरीं शहराचा सर्व देखावा अगदीं अर्वाचीन असून, तेथें जुन्या काळच्या पाहण्यासारख्या इमारती फारशा नाहींत. या शहराहून महाराज जर्मनीची राजधानी बर्लिन शहर येथें आले. जर्मनीसारख्या प्रबल राष्ट्राची राजधानी शोभण्यासारखें हें शहर असेल, अशी प्रथम कल्पना होते; परंतु अनुभवांतीं ती खरी होत नाहीं, व एकंदरींत पाहतां टयूटन् लोकांना शिल्पकलेची देणगी निसर्गानें दिलीच नाहीं, असें महाराजांचें मत झालें. अलीकडे व्हिएन्नाप्रमाणें पॅरिसच्या सौंदर्याचें अनुकरण करण्याचा थोडासा प्रयत्न बर्लिननें केला आहे, तथापि त्या अस्सल सौंदर्याची नक्कल करतांना व्हिएन्नामध्यें नुसता बोजडपणा आलेला दिसतो, तर तो बर्लिनमध्यें छिचोरपणासारखा दिसतो, असेंहि महाराजांना वाटलें. या शहरांतील जुन्या इमारतींतहि प्रेक्षणीय भाग फार थोडा आहे.

बर्लिनला थोडे दिवस राहून, महाराज ड्रेस्डेन् येथें गेले. तेथील

राजधानी ब्रुसेल्स् येथें गेले. येथील न्यायमंदिर ही इमारत शिल्पकलेच्या दृष्टीनें जगांतील एक आश्चर्य करण्यासारखी आहे. या इमारतीनें दोन लक्ष सत्तर हजार चौरस फूट जागा व्यापली आहे. इमारतींत आठ मोठाली न्यायासनांची दालनें असून त्याशिवाय इतर खोल्यांची संख्या दोनशें बहात्तर आहे. मुख्य इमारतीच्या घुमटाची उंची तीनशें फूट आहे न्यायमंदिराखेरीज या शहरांतील दुसरी प्रसिद्ध इमारत हॉटेल-द-व्हिए ही होय. तिच्या एका बाजूचा मनोरा तीनशें चौसष्ट फूट उंच आहे. अंतर्भागांत पुष्कळ दालनें असून त्यापैकींचा मेजवानीचा दिवाणखाना दोनशें फूट लांब आहे.

ब्रुसेल्स्मधील बहुतेक सर्व इमारतींसाठीं पॅरिसचा नमुना पसंत केला आहे, व एकंदरींत सर्व बेल्जिअम् देशच फ्रान्सची लहानशी प्रतिकृति आहे, असें महाराजांना वाटलें. ब्रुसेल्स्हून पॅरिसला येऊन तेथून पुढें महाराज कान (Cannes) या गांवीं आले. या शहराच्या उत्तरेस लहान लहान टेकड्या असून, अनेक प्रकारच्या वृक्षलतांची व चित्रविचित्र फुलांची गर्दी येथें पहाण्यास सापडते. कानहून जुगारी लोकांचें प्रसिद्ध शहर मॉंटीकार्लो हें ओझरतें पाहून, रोम व नेपल्स् या शहरांवरून महाराज परत फिरले व आठ महिन्यांच्या अवधीनंतर सन १८९३ च्या वर्षारंभाच्या दिवशीं ते बडोद्यास परत आले

यानंतर पुन्हा ता. ६ मे १८९३ रोजीं ते चौथ्या सफरीसाठीं निघाले. या खेपेस ते ब्रिंडिझीला न जातां ट्रीएस्ट या ऑस्ट्रिया देशांतील बंदरीं उतरून तेथून ऍडेल्स्बर्ग येथें गेले. या गांवापासून अर्ध्या मैलावर मध्ययुगांत प्रसिद्ध असलेल्या कांहीं दगडाच्या गुहा आहेत त्यांची लांबी पांच मैल असून, त्यापैकींचे दोन मैलपर्यंत ट्रॅमगाड्या जाऊं शकतात. या गुहांच्या आंत सर्वत्र वीज खेळविली असल्यामुळें त्यांत भरपूर प्रकाश पडलेला असतो या गुहांतील दगड स्टॅलक्टाईट जातीचा आहे विजेच्या प्रकाशामुळें आंतील खडबडीत दगडाचे आकार फार चमत्कारिक व

मिरवणुकीप्रमाणेंच होती. शहरांत रात्रीं दिव्यांची रोषनाई करण्यांत आली होती. मिरवणुकींत कागदांच्या सुरनळ्या व धान्यांच्या अक्षता फेंकण्यांत येतात, त्यामुळें सर्व रस्ते वर्फानें भरून गेल्याप्रमाणें पांढरे शुभ्र दिसतात. एका काळीं या सणांत आपल्या इकडील होळीप्रमाणेंच सभ्यता व स्वच्छता यांना फांटा देण्यांत येत असे; पण हिंदुसणाप्रमाणेंच या सणांतहि अलीकडे सुधारणा झाली आहे. नीसहून महाराज मॅगिओर, ल्युसर्न्, वगैरे सरोवरें पाहण्यास गेले. लोझान या सुंदर शहरांत पाहण्यासारख्या इमारती बऱ्याच आहेत. या खेपेस स्विट्झरलंडमधील सर्व प्रमुख सरोवरें व त्या भोंवतालचा प्रदेश त्यांनीं पाहिला.

यानंतर महाराजांनीं स्कॉटलंडमध्यें जाऊन तेथील सरोवरांचा प्रदेश मुद्दाम पाहिला. त्या वेळीं तुलनेनें त्यांना असें आढळून आलें कीं, स्विट्झरलंडमधील सरोवरें हीं सृष्टीचें अत्यंत भव्य व अपरिचित रूप व्यक्त करितात, तर स्कॉटलंडमधील सरोवरें तिच्या रम्य व घरगुती रूपाचें दर्शन करवितात. या खेपेस स्कॉटलंडांतील इतर पाहण्यासारखीं शहरें, डोंगर, खाड्या, वगैरे सर्व पाहून महाराज परत फिरले व मध्ययुरोपांतून ते तुर्कस्थानची जुनी राजधानी कॉन्स्टँटिनोपल येथें आले. नेपल्सखेरीज सौंदर्याच्या दृष्टीनें युरोपांत वसविलेलें कॉन्स्टँटिनोपलसारखें दुसरें कोणतेंहि शहर नाहीं. युरोप व आशिया या दोन खंडांची ही संयोगभूमि असून, त्याच्या दोन्ही बाजूस दोन सागर पसरलेले आहेत. शहरांतून 'गोल्डन् हॉर्न' अथवा सुवर्णभृंग नांवाचा समुद्राचा एक फांटा गेलेला आहे. रोम शहराप्रमाणेंच सात टेकड्यांवर मिळून हे शहर वसलेलें आहे. त्याच्या भोंवतीं पांच मैलपर्यंत 'पेरा' या उपनगरांच्या बगीच्यांचा विस्तार झालेला आहे. येथील लोकवस्तींत दोन्ही खंडांतील असंख्य जातींची भेसळ पाहण्यास सांपडते. येथील बंदराजवळील समुद्र खोल व सुरक्षित असल्यामुळें, त्यांत बारारों बोटी एकावेळीं राहूं शकतात. शहरांतील व्यापारी भाग गॅलाटा हा असून, पेरा या उपनगरांत युरोपांतील सर्व राष्ट्रांच्या वकीलांच्या वसाहती

अशी जी कल्पना होते, ती मात्र खरी नव्हे असें महाराजांना आढळून आलें. नॉर्वे देशांतील प्रसिद्ध स्थळें म्हणजे त्यांतील ' फिओर्द ' हे होत. आकाशाला जाऊन भिडणाऱ्या पर्वताच्या दोन प्रचंड कड्यांमधून मैलच्या मैल जलप्रवाह संथपणानें जात असतात, त्यांना ' फिओर्द ' असें म्हणतात. सृष्टीचें अगदीं शांत व स्तब्ध असें स्वरूप येथें पहावयास सांपडतें. दोन्ही बाजूच्या कड्यांच्या अभेद्य भिंतींमुळें, येथें वाऱ्याच्या झोंनाला प्रतिबंध झाल्यानें त्या कड्यांची छाया पडलेल्या या काळ्याच्या नीलवर्ण पाण्याचा पृष्ठभाग हुबेहुब एखाद्या निर्व्यसर काचेप्रमाणें दिसतो. यांतून व्हानशा होड्यांतून कल्याकच्या कल्याक फिरत असतांना पृथ्वीवर इतरत्र जीवसृष्टि असल्याचा भासहि होत नाहीं व त्यामुळें तद्दी लागल्याप्रमाणें मनाची अवस्था होते; तिचा भंग क्वचित् प्रसंगीं सी गल नांवाचे पक्षी पंख फडफडावीत इकडून तिकडे जात असतांना मात्र होतो. तेथून नॉर्थ केप येथें महाराज गेले. येथून मध्यरात्रींच्या सूर्याचा अपूर्व देखावा पहावा म्हणून युरोपांतील सर्वांत उत्तरेचें टोंक असलेल्या मॅगेरो नांवाच्या व्हानशा बेटावर ते गेले. परंतु त्या दिवशीं रात्रीं बारा वाजतां तेथें सूर्यप्रकाश असल्यानें आपला फोटो काढून घेण्याचा लाभ जरी त्यांच्या बरोबरीच्या काहीं मंडळींना मिळाला, तरी धुकें पडल्यामुळें प्रत्यक्ष सूर्यदर्शन मात्र त्यांना होऊं शकलें नाहीं.

येथून परतून महाराज ट्रॉमसो या माशाच्या व्यापाराच्या मुख्य गांवीं आले. येथें लॅप् जातीच्या लोकांच्या विचित्र छावण्या त्यांनीं पाहिल्या. हे लॅप् लोक उंचीनें चार पुटाहूनहि कमी असून, शरीरानेंहि दुर्बळ असतात. त्यांचीं नाकें बसकीं असून, त्यांचे केस पिंगटवर्णाचे व विरळ असतात. त्यांच्या शरीराचा वर्ण तांबडसर पिवळा असा असतो. थंडीमुळें त्यांच्या अंगांत रेनडिअरच्या कातड्याचे दोन कोट घातलेले असून, डोक्याला उंच तांबड्या अथवा काळ्या रंगाच्या मोंगली टोप्या घातलेल्या असतात. त्यांच्या कमरेला रेनडिअरच्या चामड्याचे पट्टे असून, त्याच चामड्याचे निराकार पिशव्यासारखे बूट हे लोक घालतात. ट्रॉमसोहून

तुटून गेलेले आहेत. नुसतें मस्तकापासून धडापर्यंतचे अंतर साठ फूट आहे. अशा प्रकारचा अजस्र पुतळा पांच सहा हजार वर्षांपासून सर्वांना आपल्या जीविताची अशाश्वता दाखवीत तेथे अखंड उभा राहिलेला आहे.

येणेंप्रमाणें इजिप्तमधील प्रेक्षणीय स्थळें पाहून महाराज हिंदुस्थानांत परत येण्यास परत फिरले, ते सन १८९५ च्या फेब्रुआरी महिन्यांत बडोद्यास परत आले. या खेपेस हिंदुस्थानाबाहेर त्यांचे वास्तव्य तेरा महिने झाल्यामुळें, आजपर्यंतच्या त्यांच्या सफरींत हीच सफर सर्वांत दीर्घकालीन झाली.

या पांच सफरी मिळून महाराजांनीं सर्व युरोपभर प्रवास केला. यानंतर जरी त्यांनीं युरोपच्या पुष्कळ सफरी केल्या, तरी त्या केवळ प्रकृतीच्या कारणामुळें केलेल्या असल्यामुळे, प्रवासदृष्टीनें त्यांत नाविन्य फार थोडें होतें. यापुढील सर्व सफरी मागील सफरींच्याच पुनरावृत्ती होत्या. या सफरींत संचार करीत असतांना महाराजांच्या मनांत काय काय विचार आले व त्या विचारांचे चिरकालिक परिणाम कसे झाले, याचें दिग्दर्शन पुढील प्रकरणांत आपण करूं.



अशी जी कल्पना होते, ती मात्र खरी नव्हे असें महाराजांना आलें. नॉर्वे देशांतील प्रसिद्ध स्थळें म्हणजे त्यांतील 'फिओर्द' आकाशाला जाऊन भिडणाऱ्या पर्वतांच्या दोन प्रचंड कड्यांमधून मैल जलप्रवाह संघर्षणानें जात असतात, त्यांना 'फिओर्द' असें तात. सृष्टीचें अगदीं शांत व स्तब्ध असें स्वरूप येथें पहावयास सांपडे दोन्ही बाजूच्या कड्यांच्या अभेद्य भिंतींमुळें, येथें वाऱ्याच्या झोताला प्रति- झाल्यानें त्या कड्यांची छाया पडलेल्या या काळ्याच्या नीलवर्ण पाण्याचा पृष्ठभाग हुबेहुब एखाद्या निर्मळ काचेप्रमाणें दिसतो. यांतून लहानशा होड्यांतून कलाकचे कलाक फिरत असतांना पृथ्वीवर इतरत्र जीवसृष्टि असल्याचा भासहि होत नाहीं व त्यामुळें तंद्री लागल्याप्रमाणें मनाची अवस्था होते; तिचा भंग क्वचित् प्रसंगीं सी गल्ल नांवाचे पक्षी पंख फडफडावीत इकडून तिकडे जात असतांना मात्र होतो. तेथून नॉर्थ केप येथें महाराज गेले. येथून मध्यरात्रींच्या सूर्याचा अपूर्व देखावा पहावा म्हणून युरोपांतील सर्वांत उत्तरेचें टोंक असलेल्या मॅगेरो नांवाच्या लहानशा बेटावर ते गेले. परंतु त्या दिवशीं रात्रीं बारा वाजतां तेथें सूर्यप्रकाश असल्यानें आपला फोटो काढून घेण्याचा लाभ जरी त्यांच्या बरोबरीच्या कांहीं मडळींना मिळाला, तरी धुकें पडल्यामुळें प्रत्यक्ष सूर्यदर्शन मात्र त्यांना होऊं शकलें नाहीं.

येथून परतून महाराज ट्रॉमसो या माशांच्या व्यापाराच्या मुख्य गांवीं आले. येथें लॅप् जातीच्या लोकांच्या विचित्र छावण्या त्यांनीं पाहिल्या. हे लॅप् लोक उंचीनें चार पुटांहूनहि कमी असून, शरीरानेंहि दुर्बळ असतात. त्यांचीं नाकें बसकीं असून, त्यांचे केस पिंगटवर्णाचे व निरळ असतात. त्यांच्या शरीराचा वर्ण तांबडसर पिंवळा असा असतो. थंडीमुळें त्यांच्या अंगांत रेनडिअरच्या कातड्याचे दोन कोट घातलेले असून, डोक्याला उंच तांबड्या अथवा काळ्या रंगाच्या मोंगली टोप्या घातलेल्या असतात. त्यांच्या कमरेला रेनडिअरच्या चामड्याचे पट्टे असून, त्याच चामड्याचे निराकार पिशव्यांसारखे बूट हे लोक घालतात. ट्रॉमसोहून

लिहिल्यास आज चाळीस वर्षांहून अधिक काळ लोटला आहे, व इतक्या दीर्घकालपर्यंत पूर्वीसारखेच व पूर्वी इतकेच राज्यकारभाराचे श्रम ते करू शकतात व करीत आहेत, ही एकच गोष्ट त्याच्या म्हणण्याची सत्यता सिद्ध करीत आहे. या स्वानुभवावरून ज्याना परदेशप्रवास करणें शक्य असेल, त्यानीं प्रकृतिस्वास्थ्यासाठीं तो अवश्य अंगीकारावा असा उपदेश त्यानीं इतरानाहि केला आहे. ता. २९ मार्च सन १९०१ रोजीं मुंबई येथील ग्रँन्ट मेडिकल कॉलेजच्या बक्षिससमारंभाच्या प्रसंगीं भाषण करताना त्यानीं श्रोत्याना सांगितलें कीं —

"अर्वाचीन काळातील वाफेच्या व विजेच्या शोधानीं मनुष्याच्या प्रकृतिस्वास्थ्याच्या बाबतींत पुष्कळ सुधारणा घडवून आणिली आहे. आगगाड्या व आगबोटी याच्या सहाय्यानें भिन्न भिन्न देशातील अंतर कमी झाल्यामुळें, आजारी मनुष्याना आपली प्रकृति सुधारण्यासाठीं परदेशात जाणें सोईचें झालें आहे. आपण अशी आशा करू या कीं जवळ साधन असूनहि रोग्याना परदेशात न पाठविता जागच्या जागींच रखडू देण्याचा काल आपल्या देशात लवकरच नाहींसा होऊन, परदेशगमनाचा लाभ घेण्याची प्रथा पडेल."

याप्रमाणें महाराजाचा मुख्य उद्देश साध्य झाला तरी, तेवढ्यानेंच आपल्या अनेक सफरी फलीभूत झाल्या असें त्याना वाटलें नाहीं. त्याच्यापासून होणारे इतरहि अनेक फायदे त्याच्या निदर्शनास आले. त्यापैकींचा एक मुख्य फायदा म्हणजे धार्मिक व सामाजिक गैरसमजुतींचा निरास हा होय. आपल्या अगदीं पहिल्या सफरीचें या दृष्टीनें मोठें मजेदार वर्णन त्यानीं आपल्या ज्या एका भाषणात केलें आहे, त्यातील युरोपला पोहोंचेपर्यंतच्या बोटीवरील व्यवस्थेचा भाग मागें दिलाच आहे. त्यापुढील वर्णन ते असें करतात —

"आम्ही बंदरावर पोहोंचल्यानंतर आमच्या अडचणी अधिकच वाढल्या ज्या हॉटेलात आम्ही उतरत होतों, तेथें आमच्यासाठीं

तसबिरींचा सग्रह सर्व युरोपात उत्कृष्ट गणला जातो. यानतर तेथील राजवाडा व त्याच्या तळमजल्यावर असलेलें हिरे गोळ छन त्यांनीं पाहिलें. येथें जो मनोरा आहे, त्यात कलाक दर्शविण्याच्या ज्या अनेक चित्रविचित्र पद्धती जर्मनींत दिसून येतात, त्यापैकींची एक आहे. कलाक सपला, म्हणजे साठ मण्याची एक माळ पुरी होते, असें यात दाखविलें आहे. इतर जर्मन शहरापेक्षा या शहरात कलादृष्टि जरा विशेष दिसते. तथापि फ्रान्स, इटली वगैरे देशाच्या तुलनेनें ती उपेक्षणीय असल्यासारखीच भासते, मात्र वर उल्लेख केलेला येथील तसबिरींचा सग्रह अप्रतिम आहे. कलेपेक्षा सुखसोयींकडे या शहरात अधिक लक्ष दिलेलें आहे. जागोजागीं सुदर बगीचे, थोर पुरुषाचे पुतळे व पानगृहें केलेलीं आहेत. सर्व जर्मन शहराप्रमाणें या शहरातहि स्वच्छता व टापटीप पाहण्यासारखी आहे. ट्युटॉनिक वशाची बुद्धि कलेपेक्षा व्यवहाराकडे व उपयुक्ततेकडे जास्त वळलेली असल्यामुळें, ही उपयुक्ततेची दृष्टि सर्व ठिकाणीं अनुभवास येते इतर राजधान्याच्या मानानें आपल्या मुख्य शहरात कलेला बिलकूल अवसर ठेविला नाहीं इतकें वाटू न देण्यापुरतेंच कलेकडे लक्ष दिलें आहे, असें वाटतें ड्रेस्डेन् येथें महाराज विशेष न राहता ते तेथून लगेच हिंदुस्थानास येण्यासाठीं परत फिरले व निघाल्यापासून सहा महिन्यानीं ता २७ ऑक्टोबर १८९३ रोजीं बडोद्यास परत आले तेथें दोनच महिने राहून ता १६ डिसेंबर १८९३ रोजीं आपल्या पाचव्या सफरीस ते निघाले ब्रिंडिझी येथें उतरून ते फिरतफिरत पिसा या गावीं आले. तेथील झुकलेला मनोरा पाहून ते जिनोआ येथें गेले. येथें रेल्वेच्या स्टेशनसमोरच कोलंबसचा पुतळा उभारलेला आहे. जिनोआहून ते मार्सेय येथें गेले या शहराच्या मागील बाजूस टेकड्याचें अर्धवर्तुल असून, बदराची लाबी पाच मैल आहे बदरावर मोठमोठ्या वखारी आहेत. येथून महाराज नीसला गेले तेथें कार्निव्हलचा सण पडला, त्यात दिवव्याची मिरवणूक काढण्यात आली होती ती इकडील मोहोरमच्या

जगात दुसरा कोणताहि चागला देश असू शकेल, असें त्याना त्या वेळीं वाटतच नसे. पण आमच्या दरेक पुढील सफरींत आमच्या लोकाच्या गैरसमजुती कमी कमी होत चालल्या व आज तर त्या वेळची परिस्थिति सर्वस्वी बदलून गेली आहे. विशेषत बडोद्यात या गोष्टीची जाणीव पुष्कळ दिसून येते. येथें आज मराठे व ब्राह्मण, दक्षिणी व गुजराथी, नागर व चित्पावन, प्रभु, पजाबी, मद्रासी, हिंदु, मुसल्मान वगैरे सर्व प्रकारचे लोक एकत्र जमून सहव्यवहार करीत असताना दिसून येतात, व ही गोष्ट नि सशय त्याच्या सूज्ञतेची साक्ष आहे."

इतकें स्थित्यतर शातपणें गाजावाजा अथवा जोरजबरी न करिता केवळ आपल्या उदाहरणानें व लोकानुनयानें महाराजानीं घडवून आणिलेलें असूनहि, या भाषणाच्या प्रसगीं दिवाणानीं त्याबद्दलचें श्रेय महाराजाना देताच, त्यानीं तें विनयानें नाकारून म्हटलें कीं,

"दिवाणानीं माझा उल्लेख हिंदी समाजाचा पुढारी म्हणून केला, तो मला समत नाहीं नेहमींप्रमाणें आजहि मी जें बोलत आहे तें माझ्यापुरतेंच आहे. माझ्या श्रेष्ठ दर्जामुळें माझ्या उद्गाराची किंमत वाढावी, अशी माझी केव्हाहि इच्छा नाहीं ज्या वेळीं कोणी मनुष्य तुम्हास काहीं सागत असेल, त्या वेळीं त्याच्या उद्गाराची किंमत त्याच्या दर्जावर आपण केव्हाहि न ठरविता, ती आपल्या सुविचारानें ठरवावी. युरोपमध्यें हल्लीं केवढी भयकर क्राति घडून येत आहे त्याकडे आपण लक्ष द्या व मग देशभक्त या नात्याने आपल्या समाजातील घटकाचें, त्याच्या चालीरीतींचे व आचारविचाराचें सूक्ष्म परीक्षण आपण करा. त्या परीक्षणाअतीं आपल्या समाजात जें आपल्याला किंमतीचें वाटेल, त्याला अवश्य व जोराने चिकटून रहा; पण त्यापैकीं जें तुम्हाला निरुपयोगी व हानिकारक वाटेल, त्याचा आपल्या देशप्रेमाखातर व आपला समाज बुडून नष्ट न व्हावा या हेतूनें जरूर त्याग करा."

त्यानीं केलेल्या भाषणात सामाजिक सुधारणेच्या मुख्य बाबतींत परदेशगमनाला व प्रवासाला मोकळीक असण्याच्या बाबतींचा उल्लेख केला आहे.

धार्मिक व सामाजिक गैरसमजुतींचा निरास करण्याशिवाय निरनिराळ्या विद्येचा व कलाचा अभ्यास करण्यासाठीं परदेशाला जाणें अवश्य असल्याचें प्रतिपादनहि त्यानीं केलें आहे. सन १९०४ च्या नोव्हेंबर महिन्यात कलकत्याच्या नागरिकानीं महाराजाना दिलेल्या मानपत्राचें उत्तर देताना ते म्हणाले —

> "हिंदुस्थानात शास्त्रीय शिक्षणाची फार उपेक्षा झालेली आहे, म्हणून आपण आपल्या देशातील माणसाना शास्त्र व कला शिकण्यासाठीं परदेशात पाठविलें पाहिजे व तेथील पद्धती शिकून येण्याची संधि त्याना दिली पाहिजे. विशेषत औद्योगिक शिक्षणाच्या बाबतींत ही गोष्ट फार अवश्य आहे."

अशाच अर्थाचें प्रतिपादन त्यानीं सन १९०६ च्या डिसेंबर महिन्यात कलकत्यास भरलेल्या दुसऱ्या भारतीय औद्योगिक परिषदेच्या वेळीं अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणात केलें आहे, त्यात ते म्हणतात —

> "माझ्या अलीकडील युरोप व अमेरिकेंतील प्रवासामुळें मला असें निश्चित वाटू लागलें आहे कीं, आपल्या देशातील उद्योगधंद्याना चालना देण्यासाठीं औद्योगिक शिक्षणाची खास आवश्यकता आहे. परदेशात उद्योगधंद्याची जी अपार वाढ होत आहे, तिचें शिक्षण घेण्याकडे आपण जितकें लक्ष पुरवावें तितकें थोडें आहे."

तथापि याबद्दलचें सर्वोत्कृष्ट विवेचन त्यानीं याच भाषणात पुढें केलें आहे, त्यात महाराज अधिक स्पष्टपणें सागतात कीं,

> "पुढील अनेक वर्षेपर्यंत अथवा पिढ्यापर्यंत आपल्यातील तरुण लोकाना औद्योगिक शिक्षणासाठीं युरोप, अमेरिका, जपान वगैरे सारख्या देशात पाठवावें लागेल. आपल्यातील पूर्वापार चालत आलेल्या

असत. येथील मुख्य इमारतींत अहंमदी मस्जिद, सेंट सोफायाची मस्जिद. व सुलेमानी मस्जिद या पाहण्यासारख्या आहेत. या शहरांत सर्वत्र निरनिराळ्या आकारांचीं कारंजीं पसरलेलीं आहेत. त्या काळीं तुर्कस्थानचा सुलतान येथेंच रहात असे. त्याच्या जवाहिरखान्यांत दोन पृथ्वीमोलाचीं सिंहासनें असून, त्यांतील एकाला सुवर्णाच्या कोंदणांत असंख्य रत्नें बसविलेलीं होतीं आणि दुसरें सिंहासन चंदनाचें असून, त्यांत शिंपा व रत्नें बसविलेलीं होतीं आणि त्याच्या मेघडंबरीला एक सोन्याची साखळी लोंबत ठेविलेली असून, तिला तीन इंच व्यासाचा एकच पाच जडलेला होता.

याप्रमाणें कॉन्स्टँटिनोपल येथील प्रेक्षणीय स्थळें पाहून, महाराज आगबोटीनें ॲलेक्झांड्रिया येथें येऊन, तेथून कायरोला आले. तेथील रस्ते अत्यंत अरुंद असून, शहरांतील घरांत सूर्यप्रकाशाला जितका मज्जाव करतां येईल, तितका करण्यात आला आहे. तथापि शहरात मोकळ्या हवेसाठीं मोठमोठाले चौक केलेले असून, खासगी व सार्वजनिक असे अनेक बगीचे त्यांत आहेत. येथील पाहण्यासारखीं मुख्य स्थळें म्हणजे तेथील जगत्प्रसिद्ध मनोरे हे होत. त्याची संख्या ६९ असून, त्यांतील मुख्य असे तीन मनोरे आहेत. सर्वांत मोठ्या मनोऱ्याला चीऑप्सचा मनोरा म्हणतात. पायथ्यापासून हा मनोरा इतका उंचच उंच बांधण्यांत आला आहे कीं, वर दृष्टि करूनहि त्याच्या उंचीची कल्पना होऊं शकत नाहीं. याची सरळ उंची चारशें एकसष्ट फूट असून पायथ्याशीं दरेक बाजूची लांबी चारशें शहात्तर फूट आहे. मनोऱ्याच्या शिखरावर एक विस्तृत चौक असून, त्यावर तो मनोरा शेवटपर्यंत चढून गेलेल्या लोकांचीं नावें लिहिलेलीं आहेत. या शिखरावरून एका बाजूस इजिप्तचें अफाट वाळवंट दिसत असून, दुसऱ्या बाजूस नाईल नदीचें सुपीक खोरें पसरलेलें दिसतें.

या मनोऱ्याशेजारीं मनुष्याच्या चेहेऱ्याच्या आकाराचा एक अवाढव्य खडक आहे. त्याला (Sphinx) स्फिंक्स् म्हणतात. या मानवी मस्तकाकृती खडकाचा घेर शंभर फूट असून, त्याच्या चेहेऱ्याचे अवयव बहुतेक

देशातील पुरुषाच्या परिश्रमाचें, चिकाटीचें व स्वार्थत्यागाचें अनुकरण करू, तर अजूनहि आपल्या मातृभूमीचें सरक्षण आपण करू शकू. गेल्या कित्येक वर्षांपासून बडोदें राज्यातहि या पद्धतीचा पुरस्कार केला गेला आहे. सरकारी खर्चानें परदेशास पाठविलेले अनेक लोक तेथून विद्यासपन्न होऊन परत आल्यावर त्या राज्यात अथवा इतरत्र उपयुक्त कामें करीत आहेत, व ठराविक मुदतीनें वेळोवेळीं अधिक विद्यार्थी आधुनिक पद्धतीचें शिक्षण घेण्यासाठीं परदेशात पाठविण्याची योजना हल्लीं तेथें तयार करण्यात येत आहे "

वर म्हटल्याप्रमाणें नुसतें औद्योगिक शिक्षण घेण्यासाठींच परदेशात जाणें अवश्य आहे असें नसून, हें शिक्षण मिळवून तयार झालेल्या लोकानीं परदेशात व्यापारी पेढ्या स्थापन करून, हिंदुस्थानच्या आर्थिक सपत्तींत भर घालणें हेंहि अवश्य आहे, असा उपदेश महाराजानीं सन १९०२ च्या डिसेंबर महिन्यात अहमदाबाद येथें भरलेलें औद्योगिक प्रदर्शन उघडताना केला आहे त्या वेळीं ते म्हणाले,

"जर डबक्यातील पाण्याप्रमाणें आपल्याला कुजावयाचें नसेल, तर आपल्या व्यापारी उन्नतीच्या आड येणारा परदेशगमननिषेध आपण दूर झुगारून दिला पाहिजे भाटिया लोकासारखे जमत च व्यापारी प्रतिभा असलेले लोक या वेडगळ विवेकामुळें परदेशाला जाऊ शकत नाहींत, ही अत्यत खेदाची गोष्ट आहे "

हिंदुस्थानातील कोनाकोपऱ्यातहि लक्षाधीश होऊन बसलेले मारवाडी लोक प्रथम लोटा व रस्सी एवढ्या साधनावर आपला उद्योग आरभतात, हें पाहिलें असता व्यापारी बुद्धीची वाण हिंदुस्थानात नाहीं ही गोष्ट सहज दिसून येण्यासारखी आहे तथापि मारवाडातून बगाल्यात अथवा मद्रासेस जाण्यास हरकत नसून ती फक्त हिंदुस्थान ओलाडण्याच्या आड येते, ही गोष्ट किती चमत्कारिक आहे ! वस्तुत अशा वेडगळ समजुती नाहींशा झाल्या पाहिजेत, व तें काम मुख्यत ब्राह्मणांतील पुरोहित

सग्रहालयें, चित्रमदिरें, शिक्षणाचा प्रसार, देशी वाङ्मयाचें सवर्धन, निरनिराळ्या शिल्पपद्धतींची वाढ, अशा एक ना दोन, अनेक गोष्टी त्यानीं परदेशात अभ्यासून त्या आपल्या राज्यात आणिल्या आहेत, व त्याची सख्या अधिकाधिक वाढविण्याचा उपक्रम इतक्या उतारवयातहि अजून अविरत चालविला आहे. या गोष्टी राजेलोकाशिवाय इतराना करणें शक्य नाहीं, या दृष्टीनेंहि हिंदुस्थानातील राजेलोकानीं परदेशप्रवास का व कसा करणें अवश्य आहे, याचें उदाहरण त्यानीं स्वत घालून दिलें आहे.

अशा प्रकारें अनेक दृष्टींनीं आपल्या राज्याचें व प्रजेचें हित करण्याचा प्रयत्न ते करीत असताना त्याच्या कार्यात अडचणी आणण्यास सुरुवात झाली होती. वस्तुत ज्या कृत्यानें आपल्या प्रजेचें कल्याण करता येईल असें महाराजाना वाटलें, त्याच कृत्यानें त्या प्रजेचें अहित होत आहे, असें इतर काहीं लोकाना वाटू लागावें, हें चमत्कारिक आहे! तथापि तसें त्याना वाटू लागलें होतें हें मात्र खास, व म्हणूनच अशा सशयी लोकाच्या या बाबतींतील शकेचें निरसन करण्याचा प्रयत्न महाराजानीं व्हाइसरॉय लॉर्ड लॅन्सडाउन याना लिहिलेल्या पत्रात केला आहे महाराज वारवार व वरचेवर विलायतेस जातात, त्यामुळें त्याच्या राज्यातील राज्यकारभाराला नुकसान पोहोचतें, असा आक्षेप त्याच्याविरुद्ध घेण्यात येऊ लागला. इतकेंच नव्हे, तर युरोपात असताना त्याच्यावर देखरेख ठेवण्याची काहीं तरी व्यवस्था केली पाहिजे, असेंहि काहीं अधिकाऱ्याना या सुमारास वाटू लागलें असावें कारण त्यानी सन १८९३ सालीं महाराजानीं विलायतेस जाताना आपल्याबरोबर एक युरोपियन अधिकारी न्यावा असा बूट काढला. विलायतेंतील इडिया ऑफिसनें महाराजाना एक पत्र लिहून हा आपला हेतु कळविला. या युरोपियन अधिकाऱ्याचा प्रवासखर्च महाराजानीं देऊन, शिवाय त्याच्या खर्चासाठीं म्हणून त्याला दरमहा पगार द्यावा असेहि या पत्रात त्यानीं कळविलें होते या बाबतींत महाराजाचें म्हणणें असें होतें कीं, आम्हाला उपयोग नसलेला असा अधिकारी आमच्या

## प्रकरण १८ वें

## संचार आणि विचार

मागील प्रकरणात वर्णिलेल्या पहिल्या पाच सफरी महाराजानीं सन १८८७ पासून १८९४ अखेरपर्यंतच्या सुमारें सात वर्षांच्या अवधींत केल्या. त्या करण्याचा मुख्य उद्देश अर्थातच प्रकृतीची सुधारणा हा होता. महाराजाना अधिकार मिळाल्यानतरचीं पहिलीं सात वर्षे त्यानीं अविश्रांत परिश्रमात घालविलीं; त्या वेळीं राज्यकारभाराला धोरण लावून दिलेलें नसल्यामुळें क्षुद्र व बारीकसारीक गोष्टींतहि त्याना मन घालावें लागे. या अवस्थेंतून सुव्यवस्थेचा जन्म होईपर्यंत दरेक गोष्टीचा स्वत विचार करून त्यावरील निर्णय त्याना स्वत द्यावा लागला. त्यामुळें त्याची प्रकृति ढासळली व यापुढील काळात तिची सुधारणा करणें अवश्य झाल्यामुळें वैद्यकीय अभिप्रायानुसार त्याना परदेशगमन करावें लागलें. अशा रीतीनें हे प्रवास करण्याचा प्रकृतिस्वास्थ्य हा जो मूळ हेतु होता, तो या सफरींनीं चागल्या प्रकारें पार पडला. सन १८९३ च्या सप्टेंबर महिन्यात महाराजानीं व्हाईसरॉय लॉर्ड डफरिन याना लिहिलेल्या पत्रात या सबधानें ते म्हणतात --

> "एकदरीनें पाहता मी युरोपला आलों हें बरें केलें, असें मला वाटतें. निदान माझ्या प्रकृतीचा विचार करता, हिंदुस्थानापेक्षा माझ्या प्रवासामुळें तींत निःसशय सुधारणा झाली आहे."

हा त्याचा स्वाभिप्राय पुढील काळानेंहि खरा ठरविला आहे. हें पत्र




महाराज व त्यांचे अधिकारी

स्वतंत्र व्यवस्था करावी लागे व त्यामुळें आमचें बिल अतोनात पुगत असे, हें सागणें नकोच. त्या बिलाची तपासणी माझे अधिकारी करीत, परंतु ते स्वतःच या बाबतींत अज्ञानी असल्यामुळें, त्यांच्या अज्ञानाचा फायदा हॉटेलचे मॅनेजर लोक सहज घेऊ शकत. या-नंतरची अडचण म्हणजे खोल्यांतून आंथरलेल्या गालीच्याची. आमची त्याचा निटाळ होईल म्हणून आमच्या बरोबरच्या बायका आपल्याकडे कोणी पहात नाहीं असें पाहून, हातांत घेतलेल्या वाढपाच्या ताटासह हल्केच त्या गालीच्यावरून पलीकडे उडी मारीत, त्या वेळीं त्यांची जी त्रेधा उडे, ती विचारू नये! पुष्कळ वेळा हॉटेलचे मॅनेजर आमच्या पद्धतीप्रमाणें आमच्यासाठीं खास व्यवस्था करण्याचें साफ नाकारीत व आम्ही कितीहि पैसे देऊं केले तरी ते ऐकत नसत. ते आम्हास सांगत कीं आमच्या स्वयंपाकाच्या वासानें इतर गिऱ्हाईकांना फार त्रास होतो व म्हणून आम्हास जागा दिल्यास त्यांचें गिऱ्हाईक बुडण्याचा संभव आहे. परंतु इतर देशांत तर आम्हाला स्वतंत्र घरेंच अतिशय मोठ्या भाड्यानें ठेवावीं लागत. आमच्या नोकरचाकरांच्या वागण्याच्या पद्धतीनें घरमालकाची मिजास इतकी जात असे कीं, त्यापैकींच्या एकानें आमच्याजवळून जमीनीवरील गालिच्यावर डाग पडल्याच्या कारणानें नुकसानीची रक्कम पण उकळली. मात्र पुढें आम्हास असें कळून आलें कीं, त्याच डागाच्या जोरावर आमच्या पूर्वीच्या दोन भाडे-कऱ्याकडूनहि त्यानें अशीच नुकसानी उकळली होती! तथापि जसजसा आम्हास अनुभव येत चालला, तसतसे आम्ही अधिक शहाणे होत चाललों. त्या वेळीं मी आपल्या लोकांना सांगत असें कीं, आपल्या देशाबाहेर सुसंस्कृत असे अनेक मोठमोठाले देश आहेत व त्यांच्या-तील पुष्कळशा चांगल्या गोष्टी आपल्यालाहि घेतां येण्यासारख्या आहेत. परंतु त्या वेळीं या माझ्या म्हणण्यावर विश्वास ठेवण्यास माझे लोक बिलकूल कबूल नसत. आपल्या देशाशीं तुलना करण्याइतका

एक रोजनिशी लिहिली आहे, तींत सकलितरूपानें या प्रश्नाबद्दलचे आपले विचार त्यानीं माडले आहेत, त्यात ते म्हणतात –

"राजाच्या बरोबर साधारणत काहीं अधिकार व दर्जा असलेला एक राजकीय अधिकारी देण्यात येतो व त्याचें काम राजाची व त्याच्या व्यवस्थेची देखरेख ठेवण्याचें असतें असें समजलें जातें. या अधिकाऱ्याच्या सत्तेची मर्यादा व त्याच्या कर्तव्याची उपपत्ति व अधिकार बजावण्याची पद्धति ही त्या राजकीय अधिकाऱ्यावर अवलबून असते त्याचप्रमाणें तो राजा जितपत नरमगरम असेल, त्यावरहि बरेंच अवलबून असतें माझ्या मतें ही खर्चाची बाबत निरुपयोगी असून, तिच्यामुळें राजाच्या मनात जळजळ व अविश्वास मात्र उत्पन्न होतात हा अधिकारी राजाच्या खर्चानें पाठविला जात असूनहि, तो त्याच्या इच्छेविरुद्ध पाठविला जातो व त्यानें राजाला सुख देण्याऐवजीं राजालाच त्याला सुख देणें भाग पडतें हा आक्षेप कोणाहि एका अधिकाऱ्याविरुद्ध व्यक्तिदृष्ट्या केलेला नसून तो या पद्धतीविरुद्ध केलेला आहे या पद्धतींत राजाचा योग्य सन्मान ठरण्यात येत नसून, उलट तिच्यामुळें सर्व शिस्तीचा व आज्ञाधारकपणाचा भग होतो अशा रीतीनें एकदरीनें पाहता ही पद्धति त्रासदायक आहे"

हे उद्गार सन १९०० मध्यें काढलेले आहेत तथापि याच्याहि पूर्वी सन १८८८ पासून ह्या वादाची सुरवात झाली होती या वर्षी विलायतच्या स्वारींत महाराजाचे शिक्षक मि ईलियट यानीं आपल्या बरोबर यावें अशी महाराजाची इच्छा होती, व म्हणून त्यानीं हिंदुस्थान सरकारास तसें लिहिले होतें मि ईलियट हे मूळचे ब्रिटिश नोकर असल्यामुळें अशी परवानगी मागणें अवश्य होतें तथापि आपण मागितलेली परवानगी मिळेल किंवा नाहीं याबद्दल महाराजाना स्वत ला शका वाटत होती असें दिसतें कारण सन १८८८ च्या जूनमध्यें मि ईलियट याना लिहिलेल्या एका पत्रात महाराज म्हणतात –

ह्या भाषणातील पाश्चात्य चालीरीतींतील वाईट गोष्टींचा त्याग करण्या-बद्दल जो उल्लेख आहे, तो केवळ औपचारिक नाहीं. अशा गोष्टी महा-राजाना जेव्हा जेव्हा पाहावयास सापडल्या, तेव्हा तेव्हा त्याचा उल्लेख त्यांनीं केलेला आहे. उदाहरणार्थ, ॲडेल्सबर्ग येथून नायब दिवाण रा आठल्ये याना महाराजानीं लिहिलेल्या एका पत्रात म्हटलें आहे कीं,

"येथील समाज मिश्र स्वरूपाचा आहे. येथें पुष्कळशा सशया-स्पद वर्तनाच्या स्त्रिया दिसून येतात व कित्येक लोक त्याच्या सहवासात मौज करीत असतात. काळ घालविण्याचा त्या लोकाचा हा एक प्रकार आहे, व म्हणून येथील लोकाच्या नैतिक वर्तनाकडे सावध-गिरीनें पहावें लागतें"

परतु नैतिकदृष्ट्या हीन नसलेले मौजेचे सण व त्यातील रीतिरिवाज आपल्या देशांत जुन्या काळापासून चालत आलेले असतील, ते सोडू नयेत असेंहि महाराजाना वाटे व म्हणून इटलींतील कार्निव्हल्च्या सणा बद्दल लिहिताना त्याची आपल्या इकडील होळीच्या सणाशीं तुलना करून महाराज सन १८९४ मधील एका पत्रात लिहितात कीं,

"पाश्चात्य शिक्षणानें आपल्या जुन्या व लोकप्रिय सस्थातील सर्व मौज व आनद नाहींसा होत चालला आहे, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. या बाबतींत बडोदेंहि हिंदुस्थानातील इतर भागाचें अनुकरण करीत आहे, हें फार वाईट आहे आपल्या राष्ट्रीय चाली रीती कायम ठेवण्याचा आपण जरूर प्रयत्न केला पाहिजे अशा चालीरीतींना शेंकडों वर्षांच्या परपरेचा पाठिंबा असून, त्याच्यामागें एक प्रकारचा इतिहास असतो अर्थातच हें माझें म्हणणें मूर्खपणाच्या चालीरीतींसबधानें नाहीं, हें उघड आहे."

या उताऱ्यात महाराजाचें जुन्या चालीरीतींबद्दलचें विचारसर्वस्व साठ-विलेलें आहे व त्याचाच अनुवाद त्यांनीं इतरत्रहि केला आहे सन १९०४ सालीं मुबईस भरलेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेचें उद्घाटन करताना

त्यामुळें ते इग्रज सरकारच्या विश्वासाला पात्र नव्हते, असें म्हणता येणार नाहीं. तथापि बडोद्यास राहिल्यावर त्याचा महाराजावर फार लोभ जडला व महाराजानींहि कृतज्ञतेनें त्या लोभाचा परत अहेर त्याना केला होता. मि. ईलियट याच्या उदाहरणानें व उपदेशानें महाराज राज्यात अनेक प्रकारच्या सुधारणा करण्यास उद्युक्त झाले होते, या गोष्टीचें सर्वांनाच कौतुक वाटून त्यामुळें त्याना आनद व्हावयास पाहिजे होता. परतु तसा तो न होता, उल्ट मि. ईलियट याच्याबद्दलच त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्याची वृत्ति साशक झाली; व महाराजाची विद्यार्थीदशा सपल्यावर पुढें मि. ईलियट यानीं बडोद्यास न राहता इग्रजी नोकरींत परत ह्यावें, अशी तजवीज त्याच्याकडून चालली होती त्यामुळें सन १८८९ च्या मार्च महिन्यात मि. ईलियट यानीं रजा मागितली, त्या वेळीं महाराजानीं त्याना लिहिलेल्या पत्रात म्हटलें आहे कीं,

"काहीं काळ तुम्हीं येथून जाणार, यामुळें मला खेद वाटत आहे. तुम्हीं माझ्या हिताविषयीं आजपर्यंत जें प्रेम दाखविलें, त्याबद्दल मी तुमचा अत्यत आभारी आहे. त्याची फेड मजकडून केव्हाहि होऊ शकणार नाहीं. त्याचप्रमाणें तुम्ही माझ्या प्रजाजनाच्या हिताची आजपर्यंत जी योग्य काळजी घेतली आहे, तिच्यामुळें त्यानाहि तुमच्या जाण्यानें फार वाईट वाटेल. या तुमच्या प्रेमाबद्दल मी तुम्हाला देत असलेल्या आदराचा तुम्ही स्वीकार कराल, अशी मला आशा आहे."

या वेळीं मि. ईलियट याना बडोद्याहून काढण्याची खटपट महाराजाच्या खास आग्रहामुळें थाबली, तथापि त्याचें शल्य मात्र नाहींसें झालें नाहीं कारण यानतर काहीं वर्षांनीं तें पुन्हा सळ लागून, त्याचा अखेर परिणाम मि ईलियट याच्या जाण्यातच झाला. त्यासबधाची हकीकत खुद्द मि. ईलियट यानीं महाराजाना सन १८९५ च्या डिसेंबर महिन्यात लिहिलेल्या पत्रावरून समजते. या पत्रात ते लिहितात –

समजुती व दुराग्रह हे पृथ्वीवरील निरनिराळ्या देशांत जाऊन तेथून नवीन ज्ञान, नवीन कल्पना व नवीन संस्कृती आणण्याच्या कामीं आपल्या आड येऊ न देण्याची खबरदारी आपण घेतली पाहिजे. या सर्वांची हिंदुस्थानाला सांप्रतकाळीं फार जरूरी आहे. परदेशांत प्रवास करून अनेक गोष्टींच्या संबधानें तेथील व आपल्याकडील परिस्थितीची तुलना करण्याचे सुपरिणाम गेल्या पन्नास वर्षांत आपल्याला पुष्कळ दिसून आले आहेत. मी आपला प्रवास आटोपून हिंदुस्थानास परत आलों, त्या वेळीं या बाबतींत माझ्या देशबांधवांच्या मनोवृत्तींत पडलेला फरक पाहून मला फार आनंद झाला. सर्व दर्जाच्या लोकांनीं मजजवळ येऊन परदेशांतील परिस्थितीच्या माझ्या मनावर झालेल्या परिणामाबद्दल मला प्रश्न केले. इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स, वगैरे उद्योगसंपन्न देश अजूनहि परदेशांत आपले विद्यार्थी ज्ञानार्जनासाठीं पाठविण्यास कचरत नाहींत. जपानकडे पाहिल्यास असें दिसून येईल कीं, त्याची आजची थोरवी त्या देशांतून गॉटिंजेन व लाइपझिग् येथील विद्यापीठांत राजकारण व राज्यशासन शिकून आलेल्या विद्यार्थीमुत्सद्यांमुळेंच त्याला प्राप्त झालेली आहे. तो देश आज पौरस्त्य महासागरावर स्वामित्व गाजवीत आहे, याचें कारण त्याच्यांतील नाविक विद्यार्थ्यांनीं आपल्या शिक्षणाचे व आरमारी विद्येचे पाठ ग्रिनिच व पोर्टस्मथ् येथील गोद्यांतून घेतले आहेत, हें होय. त्या देशांतील अर्थशास्त्राच्या अभ्यासूंनीं लंडन व न्यूयॉर्क येथील बँकांतून व सराफकट्ट्यांतून आपली विद्या संपादन केल्यामुळेंच पूर्वेकडील सर्व व्यापार जपाननें आज आपल्या हस्तगत केला आहे. आपल्या मातृदेशाचें वैभवमंदिर घडणाऱ्या या शिल्पकारांहून अधिक उदात्त पुरुष जगांत कोठें सांपडतील ? हिंदुस्थानानें अनुसरण्याजोगें देशभक्तीचें यांहून श्रेष्ठ असें उदाहरण आपल्याला कोठें सांपडणार ? म्हणून आपण आपली राष्ट्रीय व सामाजिक ऐक्यता साधून उपरोक्त

"देशी संस्थानें व त्यांचे नामधारी राजे यांची स्थिति एखाद्या वाजंत्रिण्याच्या ढोलाहूनहि वाईट असते. वाटेल त्या कारणावरून व वाटेल त्या रीतीनें त्यांना दोष देण्यात येतो. जर त्यांनीं आपल्या राज्यात सुधारणा करण्याचा जोरानें प्रयत्न केला, तर ते अंधानुकरण करण्याबद्दल अप्रिय होतात, व जर ते तसेच रखडत मागें राहिले, तर कालमानाप्रमाणें पुढें न जाण्याबद्दल त्यांना दोष देण्यात येतो! ही स्थिति फार चमत्कारिक आहे व हिच्यात योग्य ती सुधारणा झाली पाहिजे."

अशा प्रकारें राज्यपदाच्या गुलाबाभोंवतालचे कांटे बोचत असतानाहि त्या गुलाबाचा सुगंध शक्य तितका घेण्याचा उपक्रम महाराजांनीं चालूच ठेवला होता. युरोपातील सफरींत असताना ज्या ज्या उपयुक्त संस्था अथवा वस्तू त्यांना आढळल्या, त्यांपैकींच्या कोणत्या व किती प्रमाणात आपल्या राज्यात आणितां येतील, याचा विचार नित्य ते करीत असत. अगदीं ल्हानपणापासून 'एक लिखा और सो बका' ही म्हण त्यांनीं पूर्णपणें ध्यानात ठेविली असल्यामुळे, दरेक प्रसंगीं उपयुक्त गोष्टींचें वर्णन व त्यावरून सुचणारे विचार लिहून ठेविण्याची पद्धति त्यांनीं स्वीकारिली होती. त्याचप्रमाणें प्रवासात ज्या ज्या विद्वान् व चांगल्या लोकांशीं त्यांच्या गांठी पडत, त्यांच्याशीं त्यांच्या आवडल्या विषयावर संभाषण करून त्यांच्यापासून माहिती मिळवून त्याबद्दलचीं टाचणेंहि ते तयार करून ठेवीत. इंग्रज राज्यपद्धतींतील सुव्यवस्था, शिस्त व पद्धत यांचे ते फार चहाते होते, व जबाबदार इंग्रज अधिकाऱ्यांशीं ल्हानापासून थोरापर्यंत त्यांचे संबंध सभ्यपणाचे व आदराचे होते. खुद्द महाराणी व्हिक्टोरिया यांचे तर त्यांच्यावर विशेष प्रेम असून, महाराजांच्या घरगुती बाबतींतहि त्यांचा पत्रव्यवहार त्यांच्याशीं चालू असे. अशा प्रकारें देशाटन, पंडितमैत्री व सभासंचार करून त्यांनीं चातुर्य संपादन केलें, व त्याचा सर्व लाभ आपल्या प्रजेला व आपल्या देशबांधवांना

वर्गानें केलें पाहिजे, हें जाणून महाराजानीं सन १९१७ च्या एप्रिल महिन्यात बडोदें येथील राजकीय संस्कृत पाठशाळेच्या बक्षिस समारंभाच्या वेळीं 'अर्वाचीन सामाजिक जीवनातील पुरोहिताचें स्थान व त्याचीं कर्तव्यें' या विषयावर भाषण केलें, त्यात ते म्हणतात —

"पूर्वापार चालत आलेल्या चालीरीतींच्या मुळाशीं धार्मिक-तत्वाचा संबंध कितपत आहे, हें पहाण्याचें काम पुरोहिताचें आहे. युरोप, अमेरिका, जपान वगैरेसारख्या परदेशात ज्ञानार्जनासाठीं व उद्योगव्यापाराच्या अभिवृद्धीसाठीं गेल्याशिवाय आपल्या देशाचा उत्कर्ष होणें शक्य नाहीं हें समजल्यावर परदेशगमनाला धार्मिक सबबींवर प्रतिबंध करणें हें आपल्या समाजाच्या हिताच्या दृष्टीनें कितपत न्याय्य अथवा योग्य आहे, याचा विचार पुरोहितवर्गानें अवश्य केला पाहिजे."

वरील सर्वच भाषण फार अप्रतिम आहे. पुरोहिताना आपल्या कर्तव्याचें, परिस्थितीचें व अधिकाराचें योग्य ज्ञान सकलित स्वरूपानें केलेलें यात जसें सापडतें, तसें अर्वाचीन वाङ्मयात इतरत्र क्वचितच सापडेल

अशा प्रकारें सर्वसामान्य लोकाना परदेशात प्रवास करणें अवश्य आहे, इतकेंच नव्हे तर हल्लींच्या हिंदुस्थानातील राजेरजवाड्यानाहि तें तितकेंच अवश्य आहे, असें महाराजाचें स्पष्ट मत आहे. कारण अधिकार व संपत्ति हीं साधनें अनुकूल असलेल्या राजासारख्या पुरुषाच्या परदेशगमनापासून प्रजेला अनेक प्रकारें फायदे होतात किंबहुना युरोपात जाण्याचा महाराजाचा पहिला हेतु जरी प्रकृतीची सुधारणा हा असला, व त्या हेतूला स्वत ज्ञानार्जन करणें या दुसऱ्या हेतूची जोड मागाहून मिळाली असली, तथापि या प्रवासात आपल्या प्रजेच्या कल्याणासाठीं आपल्या राज्यात काय काय गोष्टी करता येतील, या दृष्टीनें तिकडील परिस्थितीचा अभ्यास करणें हाच त्याच्या पुढील सफरींचा हेतु होऊन बसला. प्राथमिक व सक्तीचें शिक्षण, स्थानिक स्वराज्य, मोफत वाचनालयें, पदार्थ-

# प्रकरण १९ वें



## बापट प्रकरण

कोणत्याहि सुधारकाचा मार्ग सुखाचा नसतो, असा सर्वसाधारण नियम आहे. अर्थात या नियमाला महाराजहि अपवाद होऊ शकले नाहींत. मागील प्रकरणात सागितल्याप्रमाणें त्या अवधींत जरी त्याचा काळ फार सुखाचा गेला, तथापि त्या सुखाच्या पोटींच पुढील त्रासाचा जन्म होता. महाराज विलायतेंत प्रकृतिस्वास्थ्याच्या शोधात असता, त्याच्या मागें बडोद्यास एक निराळाच घाट जमून येत होता. त्यालाच पुढें महत्वाचें स्वरूप आलें, ते बापट प्रकरण या नावानें प्रसिद्ध झालें आहे. या प्रकरणामुळें पुष्कळ काळपर्यंत बडोदें राज्याचें राज्ययंत्र खिळखिळें झाले व त्यामुळें स्वाभाविकपणें महाराजांनाहि पुष्कळ त्रास झाला. त्याची सक्षिप्त हकीकत या प्रकरणात देण्याचें योजिले आहे.

मागें सागण्यात आलेंच आहे कीं, महाराजाना पूर्ण अधिकार मिळाल्यानतर त्यानीं ज्या अनेक सुधारणा करण्याचा उपक्रम सुरू केला, त्यात अत्यत महत्वाची सुधारणा म्हणजे जमीनधाऱ्याच्या पद्धतीची होय. त्याच्या पूर्वींच्या कारकीर्दीत मोठमोठ्या जमीनी व गावेंच्या गावें इनाम, बक्षिस वगैरे निमित्तानीं देऊन टाकण्यात आलीं होतीं. तीं ज्याना देण्यात आलीं, त्यापैकींच्या कित्येकानीं राज्याची पूर्वी कोणतीच महत्वाची कामगिरी केलेली नव्हती; इतकेंच नव्हे, तर कित्येकाना त्या जमीनींच्या अथवा गावाच्या रीतसर सनदाहि दिलेल्या नव्हत्या. अशा स्थितींत सुव्यवस्थेच्या

मर्जीविरुद्ध आम्हांवर लादून, शिवाय त्याचा पगार आम्हांला द्यावयास सांगणें, हें केव्हाहि युक्त होणार नाहीं. त्यांच्या मतें हिंदुस्थानांतील राजाजवळ त्याचे लायक अधिकारी प्रवासांत असले, तर त्याला दुसऱ्या एखाद्या राजकीय ऑफिसरची मुळींच जरूरी नाहीं. असें असूनहि जर हिंदी राजाच्या प्रवासाची व्यवस्था ठेविण्यासाठीं म्हणून एखादा युरोपियन अधिकारी नेमण्याचीच हिंदुस्थान सरकारची इच्छा असेल, तर त्यांनीं तो खुशाल नेमावा; परंतु मग त्याचा खर्च त्यांनीं त्या राजावर न लादतां आपण स्वतः भोगला पाहिजे. त्यांतूनहि जर एखाद्या राजानें अशा पगारी राजकीय अधिकाऱ्याची मागणी केली असेल, तर मात्र गोष्ट निराळी. या अर्थाचे उद्गार महाराजांनीं मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे यांना लिहिलेल्या सन १८९३ च्या जुलैच्या एका पत्रांत काढले आहेत. ते म्हणतात :—

"प्रवासांत असतांना देशी राजांना या राजकीय अधिकाऱ्यानें मदत करावयाची असा समज आहे. परंतु त्यानें कोणत्या बाबतींत मदत करावयाची हें खुद्द त्या राजांना माहीत नसतें ! त्यामुळें त्यांना अज्ञान असलेली ही मदत कोणत्या बाबतींत करावयाची, हें तो राजकीय अधिकारी स्वत.च ठरवितो ! असे कांहीं अधिकारी तर राजांकडून त्यांच्या उतरण्याच्या हॉटेलांचीं नांवें, त्यांतील मुक्कामांची मुदत, तेथून निघण्याच्या तारखा, वगैरेबद्दलच्या माहितीचीहि मागणी करितात. कांहीं अधिकाऱ्यांना राजांच्या खाजगी नोकरांच्या नेमणुकी करण्यासारख्या बाबतींत ढवळाढवळ करणें हेंहि आपलें कर्तव्य वाटतें. अशा कृत्यांमुळें राजेलोकांची सोय अथवा सवड साधली जाते, असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. उलट हे अधिकारीच त्या राजांचे उपरी असल्याप्रमाणें बनून जातात."

या अनुभवावरून महाराजांनीं सन १९०० सालच्या मे महिन्यांत युरोपची सहावी सफर केली, त्या वेळीं बंदोबस्तीच्या तजविजीबद्दल स्वतः

ओझॅनी यानीं महाराजाना लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात :—

"आतापर्यंत तरी बारखली चौकशीमुळें कोणतीहि अडचण उत्पन्न झाली नाहीं, याबद्दल माझी पूर्ण खात्री झाली आहे. लोकाना त्याच्या हक्काची सनद करून देण्याचें आपण कबूल केल्यामुळें, त्याना कृतज्ञता वाटत आहे. मी स्वत अशा काहीं प्रकरणाचा निकाल दिला आहे, व त्या दरेक कामीं लोकानीं माझा निवाडा मान्य केला आहे. फक्त एक दोन कामात अधिक पुरावा मिळविण्यासाठीं त्यानीं मुदत मागून घेतली आहे."

अशा रीतीने या खात्याचें काम आतापर्यंत निनबोभाट चाललें होतें. इतकेंच नव्हे, तर यानतर तीन दिवसानीं त्यानीं महाराजाना पुन्हा लिहिलेल्या एका पत्रात असेहि कळविले आहे कीं,

"बारखली चौकशीसबधानें माझें रेसिडेन्टसाहेबाशीं पुष्कळ वेळ बोलणें झालें व मला आपल्यास कळविण्यास आनद वाटतो कीं, आपण जो मार्ग स्वीकारिला आहे, तो त्याना सर्वस्वीं पसत आहे."

यावरून असें स्पष्ट दिसून येते कीं, बारखली खात्याच्या चौकशी-विरुद्ध मोठेंसें काहूर येथपर्यंत तरी उठलें नव्हतें. परतु पुढें मि ईलियट याची नेमणूक या खात्यावर झाल्यापासून ही स्थिति पालटली. याच सुमारास बडोद्याचे पूर्वींचे रेसिडेन्ट बदलून त्याच्या जागीं नवे रेसिडेन्ट कर्नल बिडुल्फ हे आले. आपल्या जागेवर आल्यापासूनच त्याची वक्र-दृष्टि महाराज व मि. ईलियट याच्याकडे वळली मि ईलियट याचें महा-राजावर अयोग्य वजन असून, ते बऱ्याचशा गोष्टींत महाराजाना प्रोत्सा-हन देतात, असे त्याचें मत झालें होतें व त्यामुळें बारखली खात्याच्या चौकशींत लोकावर अन्याय होत आहे, अशी त्यानीं आपली समजूत करून घेतली बारखली खात्यात मि ईलियट याच्या हाताखालीं त्याचे मुख्य मददनीस म्हणून रा वासुदेव सदाशिव बापट या नावाचे गृहस्थ होते. याचें गाव रत्नागिरी जिल्ह्यात असून, ते घरचे मूळचे फार गरीब

"माझ्याबरोबर कोणता अधिकारी येणार, हें जाणण्याविषयीं मी फार उत्सुक झालों आहे. मी तुमचें नाव सुचविलें आहे व *तुम्हाला परवानगी मिळेल* अशी मला आशा आहे. मी ज्या हेतूसाठीं विलायतेस जात आहे, त्यास तुमच्या बरोबर येण्यानें फार मदत होणार आहे. कदाचित् सरकारनें माझ्याबरोबर दुसरा कोणी अधिकारी पाठविला, तरी तुमची हरकत नसल्यास माझे मित्र म्हणून तुम्हास आपल्याबरोबर न्यावें, अशी माझी इच्छा आहे. तुम्ही मजबरोबर येऊन तुम्हास सोईस्कर वाटेल तेथपर्यंत रहावें, अशी माझी इच्छा आहे. हल्लींचा सर्वच प्रकार अगदीं अनपेक्षित आहे. मला जर त्याची पूर्वी कल्पना असती, तर या प्रवासाचा बेत करण्यापूर्वी मी जास्त विचार केला असता, कारण माझी साप्रतची सफर गैरसोयीची असून ती करण्याची माझी मनापासून इच्छा नव्हती."

या पत्रावरून तत्कालीन परिस्थितीवर बराच प्रकाश पडतो. त्यावरून *निघणारी पहिली गोष्ट ही कीं, महाराज ख्यालीखुशालीसाठीं* विलायतेस जात नसून ज्ञानार्जनासाठीं जात होते. मौजेसाठीं करण्याच्या सफरीचा हेतु मि. ईलियट याच्या बरोबर येण्यानें विशेष साध्य होण्यासारखा होता असें नाहीं, तर ज्यांनीं सात वर्षेपर्यंत प्रेमानें महाराजाना शिक्षण दिलें व पाश्चात्य ज्ञानाची गोडी लावून दिली त्यांचा सहवास या सफरींत महाराजाना ज्ञानसंपादनाच्या कामीं अधिक उपयुक्त होईल, असाच महाराजाच्या लिहिण्याचा आशय असला पाहिजे. दुसरी गोष्ट या पत्रावरून अशी दिसून येते कीं, परदेशाच्या या सफरी महाराजाना पुष्कळ वेळा गैरसोयीच्या वाटत, तथापि काहीं अशीं प्रकृतीच्या कारणानें व काहीं अशीं माहिती मिळविण्याच्या दृष्टीनें त्या ते अंगिकारीत असत. त्याशिवाय या पत्रावरून मि. ईलियट व इंग्रज अधिकारी यांचे संबंध कसे भानगडीचे झाले होते, तेंहि दिसून येतें. वस्तुत मि. ईलियट हे जातीनें इंग्रज असून ब्रिटिश इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील नोकर होते.

१८९३ मध्यें ते बारखळी खात्याचे अॅसिस्टंट कमिशनर झाले, व याच सालांत मि. ईलियट हे रजेवर असतां, त्या खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याचा हवाला त्यांच्याकडे कांहीं दिवस राहिला होता. बापट जसे हुषार होते, तसेच ते तापटहि होते. या त्यांच्या स्वभावामुळें त्यांनीं त्या वेळचे दिवाण मणीभाई जसभाई यांचा तीव्र विरोध संपादन केला होता. अशा स्थितींत या खात्यावर दिवाणांची वांकडी नजर स्वाभाविकपणेंच झाली. मि. ईलियट व बापट हे एकाच खात्यांतले अधिकारी व त्यांपैकींच्या एकावर रेसिडेन्टांची गैरमर्जी व दुसऱ्यावर दिवाणांची इतराजी, यामुळें या खात्याच्या विरोधापुरतें दिवाण व रेसिडेन्ट यांचें ऐकमत्य झालें. तसें झाल्याबरोबर एकदम या खात्याच्या निवाड्यांमुळें नाराज झालेल्या लोकांच्या अर्जांचे पीक येण्यास सुरुवात झाली. महाराज बडोद्यास येईपर्यंत त्यांच्या दबदब्यामुळें या प्रकरणाला रंग चढला नाहीं; परंतु ते आपल्या पांचव्या सफरीसाठीं विलायतेस गेल्याबरोबर, त्यांच्यामागें बडोद्यांत खटपटीला जोरानें सुरुवात झाली व बारखळी खात्याच्या निकालांविरुद्धचे अर्ज रेसिडेन्सींत भराभर जाऊं लागले. वस्तुतः श्री. मल्हारराव यांच्या वेळींच गव्हर्नर जनरलसाहेबांनीं त्या वेळच्या रेसिडेन्टांना लिहिलेल्या खलित्यांत देशी राज्याच्या अंतर्व्यवस्थेतील तक्रारींत रेसिडेन्सीने हात घालूं नये, असा दंडक घालून दिलेला होता. त्या अन्वयें या प्रसंगींहि बारखळी खात्याविरुद्धच्या तक्रारी रेसिडेन्टांनीं ऐकावयास नको होत्या. परंतु रेसिडेन्ट कर्नल बिड्डुल्फ हे या बाबतींत ईरेस चढले, व त्यांनीं एका दगडानें दोन पक्षी मारण्याचा बेत केला.

ता. १३ जून १८९४ रोजीं या बाबतींत रेसिडेन्ट यांनीं दिवाण मणीभाई यांना एक पत्र लिहून बारखळी खात्याचे निवाडे करतांना रा. बापट यांनीं लांच घेतला व जबरीनें लोकांकडून पैसे काढले, अशा मतलबाचे अर्ज आपणांकडे आलेले असून, ते आपण निकालासाठीं दिवाणांकडे पाठवीत असल्याचे लिहिले होतें. त्याचबरोबर 'अहमदाबाद टाईम्स्'

"बहुश लवकरच मी हिंदुस्थान सोडून जाईन. माझी नोकरी बडोदें सरकारास बऱ्याच वर्षांपूर्वी उसनी देण्यात आली होती, व तेव्हांपासून मध्यतरींच्या एका लहानशा अवधीखेरीज ती सनत चालत आली. परतु दोन महिन्यापूर्वी मग हिंदुस्थान सरकाराकडून अशी तार मिळाली कीं 'तुमची नोकरी मुंबई सरकाराकडे सोंपण्यात आली आहे. यासाठीं मी आपल्याला नम्रतापूर्वक विनंति करतों कीं, माझी बदली करण्याचें कारण काय आहे याचा तपास करून मग तें कळविण्याची आपण कृपा करावी. माझ्या ऐकण्यात असें आलें आहे कीं, मजविरुद्ध गतवर्षी रेसिडेन्ट कर्नल बिड्डुल्फसाहेबानीं रिपोर्ट केला आहे. वास्तविक त्या रिपोर्टातील मजकूर मला कळविण्यात आला नाहीं. म्हणून वर म्हटल्याप्रमाणें माझी विनंति आपण मान्य करावी."

या पत्राचें उत्तर महाराजाना पाठविलें त्यात ते लिहितात कीं,

"*तुम्हीं परत येऊन आणखी कांहीं काळपर्यंत काम करावें,* अशी माझी इच्छा आहे. जर मुंबई सरकाराला अधिकाऱ्याची खोटच पडली असेल, तर तुम्ही ब्रिटिश नोकरींतून निवृत्त झाल्यावर माझ्या नोकरींत यावें अशी माझी इच्छा आहे, व अशा रीतीनें तुम्हास येथील नोकरी करण्याची परवानगी देण्यास कांहीं हरकत आहे कीं काय याचा खुलासा मी मागितला आहे."

या पत्रव्यवहारावरून एकदर परिस्थितीची कल्पना येऊ शकते. मि. ईलियट हे महाराजाना अयोग्य सल्ला देत नसून उलट राज्यात अनेक प्रकारच्या प्रजाहिताच्या बाबतींत प्रोत्साहन देत होते. अशा स्थितींत राजा या नात्यानें आपलें कर्तव्य करीत असताहि आपल्यावर व आपल्या विश्वासू सल्लागारांवर सरकारनें सशयदृष्टि ठेवावी याचा महाराजांना स्वाभाविक रीतीनें खेद वाटला. अशा प्रसगावरून त्यानीं एके ठिकाणीं असे उद्गार काढले आहेत कीं,

त्याची नोकरी बडोदे राज्यासाठीं उसनी मागून घेतल्यामुळें ते या राज्यातील सेटल्मेन्ट खात्यातच नोकर होते व त्याना बापटासबधीं फार द्वेष वाटत असे. पुढें बापटावर फौजदारी खटला करण्याचें ठरविल्या-वर कौन्सिलकडून मि. मेकॉनकी यानाच तो खटला चालविण्यासाठीं स्पेशल मॅजिस्ट्रेटची हुकुमत देण्यात आली. इतकें सगळें होत असतानाहि बापट आपल्या अधिकारावरच होते. तथापि दरबारी खटपटीच्या सर्व बातम्या त्याच्या कानावर येत असल्यामुळें व त्याच्या विरुद्ध मोठ्या अधिकाऱ्याचें त्रिकूट जमल्यामुळें त्याना स्वतःच्या सुरक्षित-पणाबद्दल साहजिकच शका वाटू लागली. बडोद्यास सुरू झालेल्या दडप-शाहीमुळे त्याचे मित्रहि त्याना महारोग्याप्रमाणें दूर ठेवू लागले. म्हणून यापुढें बडोद्यास राहणें सुरक्षित नाहीं, अशी त्याची खात्री झाली. त्या-वरून त्यानीं पुण्यास पत्र लिहून आपले स्नेही रा. वासुदेवराव जोशी याना बडोद्यास बोलाविलें. ते आल्यावर ता. १८ जून रोजीं मुबईस जाणारी मेलगाडी बडोदें स्टेशनावर येण्याच्या सुमारास बापट व जोशी हे दोघे स्टेशनावर आले. येताना त्याचेबरोबर फक्त रा. वासुदेवराव जोशी याचेच सामान होतें व बापट केवळ त्याना पोंचविण्यास आल्याप्रमाणें त्याच्या बरोबर आले होते. बापटावर टेहळणी करण्यासाठीं त्याच्यामागें गुप्त पोलिस जवळच उभे होते. गाडी स्टेशनात आल्यावर जोशी आपल्या सामानासह डब्यात बसले. काहीं वेळानें शिटी होऊन गाडी निघण्याची वेळ झाली व ती चालू लागली. इतक्यात गाडीच्या फुटबोर्डावर पाय ठेवून बापट उडी मारून जोशाच्या डब्यात बसले व गाडी वेगानें निघून गेली! या प्रकारा-मुळें गुप्त पोलिस क्षणभर चकितच झाले; पण लगेच त्यानीं धावाधाव सुरू केली. पण तेथपर्यंत गाडी पुष्कळ दूर निघून गेल्यामुळें व रेल्वेच्या हद्दींत बडोद्याच्या दिवाणाचा अधिकार चालत नसल्यामुळे, पोलिसाना आपले हात हालवीत परत यावें लागलें.

परतु बापटाच्या या जाण्यामुळें त्याच्याविरुद्धचा संशय खरा असल्याचें

देण्याचा संकल्प केला. अशा रीतीनें एकंदरीनें महाराजाच्या तारुण्याच्या सुरवातीचा व उत्साहाच्या भराचा यापुढील काळ कौटुंबिक व राजकीय दृष्टीनें पाहता, किरकोळ त्रास वगळला असता, त्यांना फार सुखाचा गेला. त्याबद्दलची हकीकत पुढील एका प्रकरणात निवेदन करण्यात येईल.



करावी. हिंदुस्थान सरकारच्या सन १८५० च्या ३७ व्या कायद्याप्रमाणें या चौकशीचें रूप व ती करणाऱ्या कमिशनराचे अधिकार राहतील. चौकशीच्या अर्ती कमिशनरानीं आपल्यापुढील कामाचें निवेदन व दरेक गुन्ह्यावरील आपला स्वतंत्र निर्णय आणि आरोपी लोकासंबधानें करावयाच्या हुकुमाबद्दलचा आपला अभिप्राय सरकारकडे लिहून कळवावा, म्हणजे सरकारला योग्य व न्याय्य वाटेल तो हुकूम ते करू शकतील."

या कमिशनचें काम ता. २४ सप्टेंबर १८९४ रोजीं सुरू झालें, व तें ता. २४ जानेवारी १८९५ रोजीं संपलें या अवधींत चोवीस रजा पडल्या व एकवीस दिवस कोर्टाचें काम तहकूब राहिले. अशा रीतीनें पंचेचाळीस दिवस वजा जाता प्रत्यक्ष काम ७८ दिवस चालले. त्यापैकींचे ४१ दिवस फिर्यादीतर्फेचे पासष्ट साक्षीदार तपासण्यात गेले. त्यानंतरच्या चौदा दिवसपर्यंत आरोपींनीं लिहून आणलेले आपले लेखी जबान वाचून दाखविले. यानंतरचे दोन दिवस फिर्यादीतर्फेचे अधिक साक्षीदार घेण्यात गेले. त्यानंतरचे दोन दिवसपर्यंत आरोपीतर्फेच्या वकीलाचें भाषण झालें, व शेवटचे आठ दिवस फिर्यादीतर्फेच्या वकीलाच्या भाषणात खर्च झाले.

या चौकशींत फिर्यादीतर्फे प्रथम मि. ( पुढें सर ) फेरोजशा मेथा हे वकील होते परंतु ता. १३ ऑक्टोबर १८९४ ला त्यानीं आपलें अंग या खटल्यातून काढून घेतलें असें म्हणतात कीं, फिर्यादीतर्फेचे पुरावे बनावट असल्याचें कळून आल्यावरून, त्याची फिर्यादीचे सॉलिसिटर रा. भाईशंकर याच्याशीं बाचाबाची झाल्यामुळें, त्यानीं तिटकाऱ्यानें हें काम सोडलें. त्याच्या जागीं पुढें मि ब्रॅन्सन् हे सरकारतर्फे आले आरोपीतर्फे महाराष्ट्रातील त्या काळचे सुप्रसिद्ध वकील रा महादेव चिमणाजी आपटे हे असून, त्याच्या मदतीस मुंबईचे रा. दाजी आबाजी खरे व बडोदे येथील रा. रामचंद्र हरी गोखले हे होते रा आपटे यानीं ता. ८ ऑक्टो-

व राज्याच्या हिताच्या दृष्टीनें या सर्व प्रकरणाची चौकशी करून ज्यांचे हक्क पूर्वापार चालत आलेले असतील, त्यांना त्यांच्या वतनाबद्दल नव्या सनदा करून देणें व जे कोणत्याहि हक्काशिवायच अशा जमीनींचा उपभोग घेत असतील, त्यांच्यावर पुरा जमीनमहसूल आकारणें, हें काम करणें अवश्य होऊन बसलें मुंबई इलाख्यात अशाच प्रकारची चौकशी करण्याकरिता 'इनाम कमिशन' म्हणून नेमण्यात आलें होतें तशाच प्रकारें बडोदें राज्यांत चौकशी करण्यासाठीं 'बारखली खातें' निर्माण करण्यात आलें, व सन १८८२ च्या सुरुवातीस महाराजांच्या शिक्षणाचें काम पुरें झाल्यावर त्यांचे शिक्षक मि ईलियट रिकामे झाल्यामुळें, त्यांच्या अनुभवाचा, माहितीचा व विश्वासाचा फायदा घेण्यासाठीं या खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याच्या जागीं सन १८८३ च्या ऑगस्टमध्यें त्यांची नेमणूक करण्यात आली तथापि राज्यांतील सर्व जमीनीची मोजणी झाल्यावाचून कोणाकडे किती जमीन आहे, हें समजणें शक्य नव्हतें म्हणून सर्व राज्यांतील जमीनीची मोजणी व प्रतवारी या पुढील तीन वर्षांत करण्यात आली त्यानंतर त्या खात्याचे नियम होऊन त्यांना महाराजांची मंजुरी मिळण्यास आणखी तीन वर्षें लागलीं, व सन १८८९ मध्यें बारखली खात्याचें खरें काम सुरू झालें या खात्यामुळें राज्यांतील वतनदार वर्गांत स्वाभाविकच खळबळ उडाली पूर्वींच्या राजवटींत ज्यांना केवळ प्रेममर्जी, खुषमस्करे वगैरे म्हणून इनामें देण्यात आलीं होतीं, अथवा ज्यांच्याकडे योग्य अधिकारावाचून इनामाप्रमाणें जमीनी चालत आल्या होत्या, त्यांच्या हक्कावर बारखली खात्याच्या या चौकशीनें गदा येणारी असल्यामुळें, त्यांचें धाबें या चौकशीनें दणाणून जावें हें अगदीं स्वाभाविक आहे तथापि या खात्यावर मुख्य अधिकारी म्हणून मि ईल्यिट यांच्या गैरहजिरींत जेंकिन्स्, ओव्हेंनी, वगैरे इतर इंग्रज अधिकारी होते त्यांच्या वेळीं या चौकशीमुळें विशेष गवगवा झाला नाहीं उदाहरणार्थ, सन १८८९ च्या डिसेंबर महिन्यांत त्या वेळचे बारखली खात्याचे मुख्य अधिकारी मि.

या निधानाच्या समर्थनासाठीं आरोपीतर्फे गोपाळ पारलेकर, विष्णु टोळ, व हकीम बशरतअल्ली याचा पुरावा देण्यात आला होता. त्यापैकीं शेवटचा साक्षीदार हा सरदार असून, बापटाच्या जातीचाहि नव्हता. असें असता, त्यानें आपल्या जबानींत स्पष्ट सागितलें कीं,

"प्रागजी पोलिस नायब सुभे यानीं मला बोलावून नेलें व आपल्या-बरोबर चलण्यास मला सागितलें. मी विचारिलें, 'कोठें जावयाचें?' तेव्हा त्यानीं सागितले, 'दिवाणाकडे' पुढें आम्हीं दिवाणाकडे गेलो. प्रागजी आत गेले, व मला बाहेर बसविलें. अर्ध्या तासानें प्रागजी आतून परत आले व मला आपल्याबरोबर मेकॉनकीसाहेबाच्या बगल्यावर चलण्यास त्यानीं सागितले. त्यावरून मी मि. मेकॉनकी याना भेटलो. त्यानी मला सागितलें कीं, 'छोटूमिया पोलिस जमादार काय सागतो तें ऐकू व त्याप्रमाणें वाग.' पुढें छोटूमियानें मला सागितलें कीं, 'बापटाना मी लाच दिला असें तू कबूल कर, नाहीं तर तुला तुरुगात जावें लागेल व तुझी अब्रू जाईल' त्यावरून मी त्याला म्हटले, माझ्याविरुद्ध काय पुरावा आहे तो मला साग व मी लाच दिला असे जो म्हणत असेल, त्याची माझी भेट करव त्यावर छोटूमिया बोलला कीं, अशी खटपट करणें तुला शोभत नाहीं बऱ्या बोलानें तू कबूल कर, नाहीं तर तुझें नुकसान होईल"

या नमुन्यावरून फिर्यादीतर्फे लोकाना धाकदपटशा कसा रीतीनें देण्यात येत होता, याची कल्पना येईल. दिवाण मणीभाई व बापट हे अनुक्रमें गुजराथी व दक्षिणी असल्याने व गुजराथी पक्ष त्या वेळीं अधि-कारावर असल्यामुळे दक्षिणी लोकावर फार कटाक्ष ठेवण्यात आला होता, व बापटाना मदत करण्यास कोणी दक्षिणी अधिकारी असू नये या हेतूनें बडोद्यातील सर्व लहान मोठे दक्षिणी अधिकारी बदलून टाकून त्याच्या जागीं गुजराथी लोक आणण्यात आले होते त्यामुळें एका प्रसगीं त्या खटल्यात कशी मौज झाली, त्याची हकीकत रा केळकराना आपल्या

होते. तथापि स्वावलंबनानंतर त्यांनीं नेमनेम बी. ए. पर्यंतचा अभ्यास केला, पण ती परीक्षा पास होण्यापूर्वीच त्यांना तो सोडावा लागला. त्या सुमारास त्यांना ता. १–७–१८७७ मध्यें म्हणजे राजा सर टी. माधवराव यांच्या अमदानींतच बडोदें राज्यांत सेटलमेन्ट कचेरींत यांना शाही चाळीस रुपयांच्या पगारावर कारकुनाची नोकरी मिळाली दहा महिन्यानंतर त्यांचा पगार रुपये ६० झाला व महाराजांना अधिकार मिळाल्याच्या वेळीं त्यांना रुपये ७० पगार मिळत होता. बापट स्वतः फार हुषार मनुष्य होते. त्यांची ती ठेंगणी मूर्ति, कोंकणस्थी घारे डोळे, उंच कपाळ व तरतरीत चेहरा हे कोणाच्याहि नजरेंत भरण्यासारखेंच असत. त्यांनीं आपल्या हुषारीनें व कर्तबगारीनें त्या खात्यातील पुष्कळशी जबाबदारी स्वतः आक्रमिली होती त्यामुळें ते साहजिकच आपल्या उपरी अधिकाऱ्याचा उजवा हात बनले सन १८८८ सालीं त्यांना बाबाशाही पावणेतीनशें रुपये पगार मिळत असून, त्यांच्याकडे स्पेशल ड्यूटी कामदाराचा अधिकार होता. या सुमारास बडोद्यातील नोकरी सोडून जाण्याचा ते विचार करीत असावेत, असें दिसतें. कारण या वर्षीच्या जून महिन्यांत महाराजांनीं मि ईलियट यांना लिहिलेल्या एका पत्रांत त्यांना कळविलें आहे कीं,

"रा बापट यांनीं जावें ही कल्पना मला पसंत नाहीं, असें आपण त्यांना सांगावें कारण बडोद्याची नोकरी सोडून जाण्यापेक्षा तींत राहण्यानेंच ते या राज्याचें अधिक हित करूं शकतील त्यांना आपल्या पुढील उन्नतीविषयीं निराश न होण्यास आपण सांगावें, कारण मला शिक्षण, उत्साह व सहानुभूति असलेले अनेक तरुण लोक बडोदें राज्यांत प्रजेच्या कल्याणाचीं कामें करण्यासाठीं पाहिजे आहेत."

या पत्रावरून बापटांच्या योग्यतेची व उपयुक्ततेची कल्पना येऊं शकते. यानंतर बापट बडोदें सोडून न जातां नोकरींतच राहिले सन

संबधाचे म्हणून रेसिडेन्सीने पाठविलेले व मि. मेकॉनकी याच्यापुढें झालेले जबाब व इतर महत्वाचे कागद कामात रुजू करण्यात आले नाहींत, त्यामुळें आरोपीवर अंधेरात घाला घातल्यासारखी त्याची स्थिति झाली आहे. हे कागद रुजू करण्याबद्दल आरोपीतर्फेचे वकील रा. आपटे यानीं मागणी केल्यावरून कोर्टानें मि. मेकॉनकी याना त्यासबधानें लिहिलेंहि होतें. परतु त्याचा जबाब मि. मेकॉनकी यानीं असा पाठविला कीं, हे कागद रेसिडेन्सीकडून आपल्याकडे गुप्त म्हणून पाठविण्यात आल्यामुळें ते रुजू करणें हें ब्रिटिश सरकारच्या व सस्थानाच्या हिताविरुद्ध होईल, म्हणून ते रुजू करता येत नाहींत ! या उत्तराबद्दल रा. आपटे यानीं तक्रार केली. परतु कोर्टानें असा निर्णय दिला कीं, ज्या अर्थी मि. मेकॉनकी हे कागद गुप्त असल्याबद्दल प्रतिज्ञेवर सागतात, त्या अर्थी ते रुजू करण्याबद्दल फिर्यादीस भाग पाडण्याला कोर्ट असमर्थ आहे.

दुसरी एक महत्वाची तक्रार आरोपीतर्फेनें अशी करण्यात आली होती कीं, त्या वेळचे बारखली खात्याचे मुख्य अधिकारी मि ईलियटसाहेब हे होते, त्यामुळें त्याना त्या खात्यातील सर्व गोष्टींची बारीक माहिती असणार, म्हणून त्याची साक्ष या कामीं अवश्य घेतली पाहिजे. तथापि यासबधानेंहि कोर्टानें नकारच दिला. त्यामुळें खरी वस्तुस्थिति कोर्टापुढें येऊच शकली नाहीं. अशा प्रकारें कोर्टात काम चालू असता, कोर्टाबाहेरहि बापटाविरुद्ध जोरानें मोहीम चालू करण्यात आली होती. सर्व गुजराथी वर्तमानपत्रातून बापटाविरुद्ध व मि. ईलियट याच्याविरुद्ध एकसारखी ओरड करण्यात येऊन, पर्यायानें अशा अधिकाऱ्याना नोकरींत ठेविल्याबद्दल महाराजावरहि शिंतोडे उडविण्यात येत होते. असा प्रकार चालू असता, कमिशनने एकदाचा या कज्जाचा निकाल ता १६ मे १८९५ रोजीं दिला त्यात जबरीनें पैसे काढण्याच्या आरोपासबधानें असा स्पष्ट निर्णय देण्यात आला कीं, 'इडियन पीनल कोडच्या कलम ३८३ प्रमाणें ज्या लोकाच्या कामाची चौकशी सेटलमेंट खात्याकडून

नागाच्या एका वर्तमानपत्रात अशाच अर्थाचा वारखळी खात्याविरुद्ध आक्षेप असलेला मजकूर प्रसिद्ध झाल्याचें कळवून त्याकडे दिवाणाचें लक्ष त्यांनीं वेधिलें. या पत्रावरून पुष्कळशी लिखापढी झाली. महाराज विलायतेस जाताना त्याच्यामागें राज्याचा कारभार चालविण्यासाठीं दिवाणांच्या अध्यक्षतेखालीं एक कौन्सिल नेमून त्याकडे सर्व सत्ता देण्याची व्यवस्था यापूर्वीच झाल्यामुळें, दिवाणाना जवळजवळ राज्याचे अप्राधिकार प्राप्त झाल्यासारखेच होते. यामुळें रेसिडेन्टच्या आग्रहावरून या सर्व प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं एक कमिशन नेमण्याचा ठराव कौन्सिलनें ता. १३ ऑगस्ट १८९४ रोजीं केला. या ठरावाअन्वयें रा. बापट याच्याविरुद्ध कमिशनपुढें जी चौकशी चालविण्यात आली, त्याबद्दलची बरीचशी हकीकत तत्कालीन माहितीवरून रा. न. चिं. केळकर यानीं आपल्या टिळकचरित्रात दिलेली आहे, तिच्यावरून बराच बोध होतो.

परतु या चौकशीपूर्वी सन १८९२–९३ ध्या सालात मिळून वारखळी खात्यावर तीन निरनिराळ्या प्रकारानी आरोप करण्यात आले होते. पहिल्या आरोपात आक्षेपकाना प्रथमच हार खावी लागली, व दिवाणाना आपले शब्द परत घ्यावे लागले. दुसऱ्या आरोपाच्या वेळीं वारखळी खात्यातील अधिकारी बेतालपणें वागतात, असा आक्षेप करण्यात आला होता. परतु त्या खात्याचे मुख्य अधिकारी मि. ईलियट यानीं हा आक्षेप सिद्ध करण्याचे आव्हान करताच, तोहि परत खेंचून घेण्यात आला. तिसऱ्या वेळीं मात्र आक्षेपकाना अनुकूल सधि सापडली. कारण त्या वेळीं महाराज विलायतेच्या सफरींत होते, मि. ईलियट हेहि रजा घेऊन विलायतेस गेले होते, व बापटाना आरोपी करण्याचें ठरविल्यामुळें त्याच्या जागीं मि. मेकॉनकी या ब्रिटिश अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात आली होती. मेकॉनकीसाहेब मुंबई इलाख्यात रत्नागिरी, नाशिक, सोलापूर वगैरे जिल्ह्यात अधिकारी असताना अत्यत दुराग्रही स्वभावाचे असल्याबद्दल त्यांनीं प्रसिद्धि मिळविली होती. पुढें

पाहिजेत. ब्रिटिश सरकारशीं आपले संबंध नेहेमीं खऱ्या राजनिष्ठेनें प्रेरित असे असावेत व त्याच्याशीं कबूल केलेल्या सर्व गोष्टी पार पाडण्याची तत्परता आपण ठेवावी. परंतु आपल्या अधिकारात मात्र त्यांना हात घालूं देऊं नये ...बलिष्ठ सरकाराशीं वागताना त्याच-प्रमाणें आपल्या रयतेपैकींच्या कनिष्ठ व्यक्तीशीं वागताना तुम्हीं नेहेमीं एकसारखेंच न्याय्य व योग्य वर्तन ठेवावें. माझ्या या तीव्र आजारात माझ्या अंतःकरणात केव्हांहि अशा विचाराची झुळुकसुद्धा येऊन गेली नाहीं कीं मी कधीं करूं नये अशी काहीं गोष्ट मी केली आहे. कर्तव्याची जाणीव ही दरेकाच्या कुटुंबातच जन्मजात असते व जे लोक आपल्या कर्तव्याला चुकतात, ते आपल्या स्वतःच्या हीन दुर्बलतेचे प्रदर्शन करतात."

अशा प्रकारची त्याची शारीरिक व मानसिक स्थिति पुढें बऱ्याच काळपर्यंत चालू राहिली होती. त्यातच या बापट प्रकरणामुळें उत्पन्न झालेल्या त्रासाची भर पडली. यामुळे या काळच्या त्यांच्या सर्व पत्रात हीच उद्विग्नतेची छाया सर्वत्र पसरलेली दिसून येते. महाराज पाचव्या सफरींतून सन १८९५ च्या जानेवारींत बडोद्यास परत आले व त्यानंतर फेब्रुआरी महिन्यात कर्नल ब्रिडुल्फ याची बदली होऊन त्याच्या जागीं कर्नल मार्टेली हे रेसिडेन्ट म्हणून आले. याच सुमारास मि. मेकॉननकी हेहि बडोदे सोडून गेले. त्यानंतर थोड्याच दिवसानीं त्याच सालच्या मार्च महिन्यातील एका पत्रात ते लिहितात कीं,

"माझ्या गेल्या सफरींत मला जितका त्रास झाला, तितका यापूर्वी कधींहि झाला नाहीं. येथें बापट प्रकरणासंबंधानें कोणाची काहींहि बोलण्याची हिंमत होत नाहीं. दरेक जण बापटाशीं संबंध ठेवण्यास बाह्यत भीत आहे.'

यानंतरच्या एका पत्रात ते म्हणतात,

'गेल्या बारा महिन्यात येथील लोकामध्यें पडलेल्या फरकानें मला आश्चर्य वाटत आहे. येथील सरकार दुर्बळ झालें आहे, आणि लोकावर

जाहिर करण्यास विरुद्धपक्षाला अनायासेंच फावलें, व कौन्सिलकडून जानेवारी १८९४ च्या अखेरीस त्याना नोकरींतून सस्पेंड करण्याचा हुकुम सोडला गेला. तत्पूर्वी बापटातर्फे कमिशनपुढें हजर राहण्याची परवानगी त्याचे मुंबईचे सॉलिसिटर यानीं मागितली होती, परतु दिवाणानीं ती नाकारली. त्याच्या अगोदर सदर सॉलिसिटर यानीं खुद्द रेसिडेंट मि विड्हल्फ याना भेटूनहि अशी विनति केली कीं, बापट बडोद्यास आल्यास त्याना अटक होणार नाहीं, निदान त्याना जामिनावर तरी मोकळे सोडण्यात येईल, असें आश्वासन मिळावें, म्हणजे ते बडोद्यास येण्यास तयार आहेत. परतु रेसिडेंटसाहेबानीं सॉलिसिटराना तोंड्यानें उत्तर दिलें कीं, 'पळपुट्या आरोपीशीं मी तह करू इच्छित नाहीं' या भेटीचें वर्णन सदर सॉलिसिटर मि गिल्बर्ट यानीं एका पत्रात करताना असें म्हटलें आहे कीं, 'कर्नलसाहेव बापटाविरुद्ध किती तडफडून व द्वेषबुद्धीनें बोलले, याचें वर्णन मी करू शकत नाहीं त्याना उलट बोडून जागच्या जागीं झाडून टाकावें असें मला अनेक वेळा वाटलें, पण मीं आरोपीचा वकील असल्यामुळें गय खाल्ली.' पुढें कमिशनची नेमणूक जाहिर झाल्यावर बापट बडोद्यास येऊन, त्यापुढें हजर झाले हें कमिशन नेमण्याचा हुकूम खालीलप्रमाणें होता –

"ज्या अर्थी श्रीमत महाराजसाहेब याच्या सरकारतर्फे मि मेकॉनकी यानीं केलेल्या तपासावरून वासुदेव सदाशिव बापट याच्याविरुद्ध लाच घेतल्याच्या व जबरीनें पैसे उकळण्याच्या आरोपां सबधानें रीतसर व जाहिर चौकशी करण्यासारखा पुरावा प्रथम दर्शनीय आहे असें दिसून येतें, त्या अर्थी या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं खानबहादूर जमशेटजी अरदेशीर दलाल (अध्यक्ष), रा व गजानन बापूजी घोटारे व श्री गणपतराव गायकवाड याना कमिशनर म्हणून नेमण्यात येत आहे त्यानीं फिर्यादीतर्फेनें मि मेकॉनकी हे आरोपीविरुद्ध ज्या गुन्ह्याची तोहोमत ठेवतील, त्याची चौकशी

टाईम्सच्या अकांत 'Lex' या सहीनें एक पत्र प्रसिद्ध करण्यांत आलें, त्यात म्हटलें होतें कीं :—

"बापट कमिशनचा रिपोर्ट कांहीं दिवसांपूर्वींच तयार झाला असूनहि, तो खास हुकुमानें गुप्त ठेवला जाऊन त्याची खबर फिर्यादी, कौन्सिलचे सभासद व इतर लोक यापैकीं कोणासहि देण्यात आलेली नाहीं. असें असतां, त्याची एक प्रत प्रतिवादीस देण्यांत आली आहे असें समजतें. ही पद्धति इतकी विचित्र व कायद्याच्या तत्त्वाविरुद्ध आहे कीं, ती स्वीकारण्याचा सल्ला कोणीहि शहाण्या मनुष्यानें महाराजाना दिला नसता. असें असून तशी वस्तुस्थिति आहे असें कळतें. ..या व इतर अफवा या खटल्यासंबंधानें उडत आहेत, त्यांवरून असें म्हणणें भाग पडतें कीं, या कामात प्रतिवादीला योग्य न्यायाहून कमी न्याय व वाजवी दयेहून अधिक दया दाखविण्याची प्रबळ इच्छा कोणाला तरी असल्याचें दिसून येतें."

अशाच धर्तीचीं इतर पत्रें 'Onlooker' व 'Gaekwadi' या सहीनें या पत्रांत प्रसिद्ध करण्यात आलीं. इतकेंच नव्हे, तर ता. १ जुलैच्या अंकांत 'Baroda Affairs' या मथळ्याखालीं एक अग्रलेख प्रसिद्ध करण्यांत आला, त्यात 'साप्रत बडोदें राज्यात मराठे लोकाचें वर्चस्व झालें असून, गुजराथी लोकाना मार्गे सारून दक्षिणी लोकाना अधिकाराच्या जागा देण्यात येत आहेत,' असा आक्षेप घेण्यात आला होता. पण त्याहून अधिक विचित्र गोष्ट ही कीं खुद्द महाराजानाहि या वादात ओढलें गेलें होतें.

'But much more than this has to be said as to the attitude which His Highness has assumed lately

'अलीकडे महाराजानीं जी वृत्ति धारण केली आहे, तिच्याबद्दल एकंदर राज्यकारभारातील दोषापेक्षाहि आम्हास अधिक लिहिणें भाग पडत आहे'

वरपर्यंत काम केलें, पण पुढें ते आजारी पडल्यानें, त्यांना काम सोडून जावें लागलें व दुर्दैवानें त्या आजारांतच ता. २२ ऑक्टोबर रोजीं त्यांचा अंत झाला.

या कामीं रा. बापट यांच्यातर्फे खरे व अनिश्रांत परिश्रम करणारी व्यक्ति म्हणजे कै. बाळ गंगाधर टिळक ही होय. यासंबंधानें रा. केळकर यांनीं आपल्या टिळकचरित्रांत म्हटलें आहे कीं —

"बापटकमिशनमध्यें टिळक हे स्वतः जरी आरोपी नव्हते, तरी जणूं काय स्वतः आपणच अपराधी आहोंत अशा भावनेनें त्यांनीं बापटातर्फे अथपासून इतिपर्यंत मुकदम्याचें सर्व काम चालविलें. नांवाला बॅरिस्टर व वकील दुसरे होते. टिळकांचें नुसतें वकीलपत्रहि या कज्ज्यांत दाखल नसेल. तथापि बापटातर्फे हजर राहून काम चालविणाऱ्या बॅरिस्टर व वकील यांच्या वकीली मेंदूचेंच काय, पण वकीली कारकुनाचेंहि काम टिळकांनीं स्वतःचा मोठेपणा विसरून केलें, असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं."

बापटाविरुद्ध फिर्यादीतर्फे तोहोमतनाम्यांत प्रथम छत्तीस गुन्ह्यांचा समावेश करण्यांत आला होता. परंतु बारा गुन्ह्यांबद्दलचा पुरावा दिल्यानंतर, फिर्यादीपक्षानें बाकीच्या गुन्ह्यांबद्दलचे आरोप खेंचून घेऊन आपलें काम पुरें केलें. आरोपीतर्फे थोडासा पुरावा देण्यांत आला. परंतु आरोपीची बाजू सर्व प्रकारें लंगडी होती. त्याबद्दलचें विस्तृत विवेचन बापटातर्फे दिलेल्या लेखी जबानीच्या दहाव्या परिच्छेदांत केलेलें आहे. त्यांत म्हटलें आहे कीं,

"जो जो कोणी बापटाविरुद्ध पुरावा देण्यास कबूल होईल, त्या सर्वांस माफीवचनें व बक्षिसें देण्यांत आलीं, व याच्या उलट ज्यांनीं असें करण्याचें नाकबूल केलें, त्यांना पोलिसच्या अटकेंत ठेवण्यांत आलें, सरकारी नोकरींतून कमी करण्यांत आलें, अथवा दुसऱ्या कांहीं शिक्षेची भीति दाखविण्यांत आली."

आहेच. परतु ज्या राजाच्या सुस्वभावामुळें या खटपटी लोकाना शिक्षा मिळाल्याशिवाय वडोद्यास राहून खुद त्याच्याविरुद्ध खटपटी करणे शक्य झालें व ज्याच्या मेहेरबानीमुळें त्याच्यापैकीं कित्येकाना मोठाले लाभ झाले, त्याच्याविरुद्ध त्यानीं कट करावे हा उघड उघड राजद्रोह नसला, तर निदान कृतघ्नपणा तरी खास आहे.'

असें म्हणून पुढें या उत्तरात असें प्रतिपादन केलें होतें कीं,

"The abuse of the Maharaja, the appeal to the British Resident to interfere .... all go to prove the correctness of our surmise made last year, that the agitation if not checked, will imperil the very existence of the State."

'महाराजाची निंदा व ब्रिटिश रेसिडेन्टानें या कामात पडण्याबद्दल त्याला केलेली विनति, या सर्वांवरून गतवर्षीं आम्हीं केलेलें अनुमानच खरें ठरू पहात आहे कीं, या खटपटीचा वेळींच बीमोड केला नाहीं, तर राज्याचें अस्तित्वच धोक्यात आल्यावाचून रहाणार नाहीं.'

अखेरीस या खटपटीच्या मुळाशीं कोण असावेत, याबद्दलची चर्चा करून या पत्रात म्हटलें होतें कीं,

"It will be impossible to specify them, but the prime movers can still be detected The question that naturally crops up is, why should they be so plentiful and active in the regime of Mr Manibhai and especially when the Maharaja is absent? Who can answer this question satisfactorily but Mr. Manibhai, who was responsible for the good administration during His Highness' absence? Will he do it?"

'या सर्व लोकाचीं नावें सागणें शक्य नसलें, तरी त्यातील मुख्य चालक कोण आहेत, हें सहज जाणता येण्यासारखें आहे. यासबधानें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, या लोकाची सख्या रा. मणी-

पूर्वोक्त पुस्तकांत दिली आहे. ती देण्यासारखी असल्यानें येथें दिली आहे —

"दिगंबर गोपाळ वैशंपायन या नांवाचा एक गृहस्थ वडोदयास होता. तो बापटांचा टाच खाण्याचा हस्तक अशा समजुतीनें त्याला पकडून व कच्च्या अटकेंत ठेऊन, त्याजकडून कबुलीजबाव लिहून घेण्यांत आला, व त्यानंतर त्याची सुटका झाली. अर्थात् योग्य वेळीं साक्षीसाठीं त्याला फिर्यादीतर्फे कमिशनपुढें आणण्यांत आलें सुरवाती-सच कबुलीजबाब साक्षीस दाखवून त्यानें तो करून दिल्याबद्दलचा मामुली प्रश्न त्याला विचारण्यांत आला. तों त्यानें कबुलीजबाब नाकबूल केला. त्यामुळें फिर्यादीचे वकील यांनीं त्याला खोटा पाडण्यासाठीं असलऊ कबुलीजबाब त्याच्यापुढें करून तो त्याला वाचून दाखविला. तेव्हां दिगंबरपंत म्हणाला, 'वाचा, आणखी पुढें वाचा,' फिर्यादी तर्फेचा वकील म्हणाला, 'यापुढें तर अधिक मजकूर कांहीं नाहीं. फक्त तुमची सही आहे.' दिगंबरपंत म्हणाला, 'अहो, तीच तर वाचा, म्हणजे काय आहे तें कळेल' सही मोडींत असल्यामुळें, मोडी जाणणाराला ती वाचण्यास सांगता, त्यानें ती अशी वाचून दाखविली —'दिगंबर गोपाळ वैशंपायन, मी नाकबूल' कबुलीजबाब लिहून घेतेवेळीं पोलिसचे सर्व अधिकारी गुजराथी होते. त्यांना 'मी नाकबूल' हीं अक्षरें दिगंबरनें मोडींत लिहिलेलीं समजलीं नाहींत तथापि नावा-शिवाय कांहीं तरी अधिक लपेट त्यानें मारली आहे अशी कल्पना येऊन त्यांनीं त्याबद्दल दिगंबरास विचारिता, त्यानें 'मेणवलीकर' असें नांवापुढें मी आपलें गांव घातलें आहे असें दडपून दिलें! मराठी अक्षरशून्य पोलिसांना हें खरें वाटलें, व त्यानंतर त्याबद्दल त्यांनीं पुन्हा केव्हांहि विचार केला नाहीं यांप्रमाणें केलेली सही कोर्टांत वाचून दाखविल्याच तेथें जी मौज उडाली ती विचारूं नये."

या कामांत आरोपीतर्फेच्या मुख्य तक्रारी अशा होत्या कीं, गुन्ह्याच्या

आहेच. परतु ज्या राजाच्या सुस्वभावामुळे या खटपटी लोकाना शिक्षा मिळाल्याशिवाय वडोद्यास राहून खुद्द त्याच्याविरुद्ध खटपटी करणें शक्य झालें व ज्याच्या मेहेरबानीमुळें त्याच्यापैकीं कित्येकाना मोठाले लाभ झाले, त्याच्याविरुद्ध त्यानीं कट करावे हा उघड उघड राजद्रोह नसला, तर निदान कृतघ्नपणा तरी खास आहे '

असें म्हणून पुढें या उत्तरात असें प्रतिपादन केलें होतें कीं,

' The abuse of the Maharaja, the appeal to the British Resident to interfere all go to prove the correctness of our surmise made last year, that the agitation if not checked, will imperil the very existence of the State."

' महाराजाची निंदा व ब्रिटिश रेसिडेन्टाने या कामात पडण्या-बद्दल त्याला केलेली विनति, या सर्वांवरून गतवर्षीं आम्हीं केलेलें अनुमानच खरें ठरू पहात आहे कीं, या खटपटीचा वेळींच बीमोड केला नाहीं, तर राज्याचें अस्तित्वच धोक्यात आल्यावाचून रहाणार नाहीं. '

अखेरीस या खटपटीच्या मुळाशीं कोण असावेत, याबद्दलची चर्चा करून या पत्रात म्हटलें होतें कीं,

"It will be impossible to specify them, but the prime movers can still be detected The question that naturally crops up is, why should they be so plentiful and active in the regime of Mr Manibhai and especially when the Maharaja is absent ? Who can answer this question satisfactorily but Mr Manibhai, who was responsible for the good administration during His Highness' absence ? Will he do it ?"

' या सर्व लोकाचीं नावें सागणे शक्य नसले, तरी त्यातील मुख्य चालक कोण आहेत, हें सहज जाणता येण्यासारखें आहे. या-सबधानें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, या लोकाची सख्या रा. मणी-

करण्यात आली होती, त्यांना धमकी दिल्यामुळें त्यांनी रा. वापटांना पैसे दिल्याबद्दलचा आम्हासमोर कांहींहि पुरावा नाहीं व फिर्यादीनेंहि असा पुरावा आणण्याचा अथवा आपल्या अखेरच्या तक्रारींत त्याचा उल्लेख करण्याचा प्रयत्न केला नाहीं, त्या अर्थी वापटावर हा गुन्हा शाबित होत नाहीं ' मात्र त्यावर 'बडोदें राज्यातील सरकारी नोकर या नात्यानें जो कायदेशीर मेहेनताणा घेण्याचा त्यांना अधिकार आहे, त्या व्यतिरिक्त इतर बेकायदेशीर वेतन घेण्याबद्दलचा अपराध शाबीत झाला आहे,' असा निर्णय कोर्टानें दिला यानंतर आरोपीस शिक्षा देण्याबद्दलची शिफारस करताना कमिशननें म्हटलें कीं, 'ज्या वेळीं बारनवळी खात्यात कर्तेगारी, कौशल्य व दृढता या गुणाची जरूर होती, त्या वेळीं त्या खात्यात आरोपीनें मोठ्या सन्मानाच्या जागेवरून वरील गुण व्यक्त केले, तथापि या जागेवर असताना त्यांनीं लाच घेतली असा कामात पुरावा असल्यामुळे, त्यांना सहा महिन्याची साधी कैद व बाबाशाही दहा हजार रुपये दंड, अशी शिक्षा करण्यात यावी '

असा अभिप्राय देऊन हें प्रकरण वर पाठविण्यात आलें. या खटल्याचें काम चालू असताना महाराज विलायतेस होते तेथें त्याची प्रकृति बरीच नादुरुस्त होती, ती युरोपची तिसरी सफर पुरी करून महाराज सन १८९३ च्या ऑक्टोबरच्या अखेरीस बडोद्यास परत आले त्यापूर्वीपासूनच तशी होती या सुमारास महाराजांनीं आपल्या दिवाणास लिहिलेल्या एका मार्मिक पत्रात आपल्या प्रकृतीची हकीकत व आपल्या विचाराचें उद्घाटन फार सुंदर रीतीनें केलें आहे त्यात ते म्हणतात :—

"या खेपेस माझ्या आजाराचा जोर यापूर्वींच्या कोणत्याहि वेळेपेक्षा फार तीव्र होता त्यामुळें मला अतिशय त्रास झाला. माझें दुखणें अधिकच वाढत आहे. माझ्या पायात चालण्याचें सुद्धा सामर्थ्य नाहीं ही गोष्ट मराठ्याच्या हिंमतीला खरोखरीं लांच्छनास्पद आहे. माझ्या राज्याची इभ्रत व त्यातील प्रजेचें सौख्य हीं कायम राहिलीं

आहेच. परंतु ज्या राजाच्या सुस्वभावामुळे या खटपटी लोकांना शिक्षा मिळाल्याशिवाय वडोद्यास राहून खुद्द त्याच्याविरुद्ध खटपटी करणें शक्य झालें व ज्याच्या मेहेरबानीमुळें त्यांच्यापैकीं कित्येकांना मोठाले लाभ झाले, त्याच्याविरुद्ध त्यानीं कट करावे हा उघड उघड राजद्रोह नसला, तर निदान कृतघ्नपणा तरी खास आहे '

असे म्हणून पुढें या उत्तरात असें प्रतिपादन केलें होतें कीं,

"The abuse of the Maharaja, the appeal to the British Resident to interfere all go to prove the correctness of our surmise made last year, that the agitation if not checked, will imperil the very existence of the State."

' महाराजाची निंदा व ब्रिटिश रेसिडेन्टानें या कामात पडण्याबद्दल त्याला केलेली विनंति, या सर्वांवरून गतवर्षीं आम्हीं केलेलें अनुमानच खरें ठरू पहात आहे कीं, या खटपटीचा वेळींच बीमोड केला नाहीं, तर राज्याचे अस्तित्वच धोक्यात आल्यावाचून रहाणार नाहीं. '

अखेरीस या खटपटीच्या मुळाशीं कोण असावेत, याबद्दलची चर्चा करून या पत्रात म्हटलें होतें कीं,

"It will be impossible to specify them, but the prime movers can still be detected The question that naturally crops up is why should they be so plentiful and active in the regime of Mr Manibhai and especially when the Maharaja is absent? Who can answer this question satisfactorily but Mr Manibhai, who was responsible for the good administration during His Highness' absence? Will he do it?"

'या सर्व लोकांचीं नावें सागणें शक्य नसलें, तरी त्यातील मुख्य चालक कोण आहेत, हें सहज जाणता येण्यासारखें आहे या-संबधानें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, या लोकांची सख्या रा. मणी-

अशी एक प्रकारची भीतीची छाया पडली आहे कीं, जिच्यामुळें राज्याचें नुकसान होण्याचा संभव आहे. सगळीकडे खटपट जारी आहे. त्यामुळें जुन्या 'खटपटी बडोद्याचें' कसें चटकन् स्मरण होतें !' अधिकारी वर्गात जोम अथवा विवेक नसल्यामुळें ते राज्याची इभ्रत टिकविण्याचा प्रयत्न मुळींच करीत नाहींत. माझ्या गैरहजिरींत माझे सर्व अधिकार दिवाणाना सोंपून देणें मला भाग पडलें. त्यामुळें राज्याचें फार नुकसान झालें असून, अतस्थ राज्यतंत्र व मध्यवर्ती सत्ता याना धक्का पोहोंचला आहे. लोकाना रेसिडेन्सीचा मोठा आधार वाटू लागला आहे. हें सर्व प्रकरण उभें करून राज्यातील लोकाची दिशाभूल करण्यात कोणी तरी वजनदार अधिकारी होता, असें दिसून येतें. येथे दरेक मनुष्य बापटाचा अथवा फिर्यादीचा पक्षपाती आहे. रेसिडेन्टाचें अस्तित्व यापूर्वी केव्हाहि जाणवत होतें, त्यापेक्षा हल्लीं फार अधिक जाणवतें. अशा स्थितींत माझा आपल्या स्वत वरचा विश्वास उडून गेला आहे व राज्यकारभारात भाग घेण्याचा मला वीट आला आहे."

हे व अशा अर्थाचे अनेक उद्गार त्याच्या या वेळच्या पत्रातून आढळतात. अशा स्थितींत कमिशनचा अभिप्राय आल्यावर त्याचा ते शातपणें व कायद्याच्या दृष्टीनें विचार करू लागले. वस्तुत कमिशनला फक्त अभिप्राय देण्याचाच अधिकार दिला होता व कामाचा अखेर निकाल करण्याची सत्ता महाराजाकडेच होती व म्हणून कमिशननें अभिप्राय दिला तरीहि हें प्रकरण कायद्याच्या दृष्टीनें चालू ( Sub-judice ) असेंच होतें. अशा वेळीं खटल्याच्या हकीकतीवर कोणतीहि जाहिर टीका करणें बेकायदेशीर समजलें जातें. तथापि संस्थानाच्या हद्दीबाहेर हा निर्बंध लागू होणार नाहीं, या गोष्टीचा फायदा घेऊन, बापटाच्या विरोधीपक्षानें वर्तमानपत्रातून विरुद्ध लेखाचा एकसारखा भडिमार चालविला होता. अशा कामीं मुंबईचें 'टाईम्स' पत्र त्याना विशेष उपयोगी पडलें. उदाहरणार्थ ता. २६-७-१८९५ च्या

नसलें, तर त्यांनीं ती गोष्ट महाराजांच्या कानांवर घालावयास हवी होती. तसे न करितां, रेसिडेन्टाच्या सांगण्यावरून अशा प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं कमिशन नेमण्याचा अव्यापारेषु व्यापार करण्याचें त्यांना कांहींच कारण नव्हतें. महाराजांनीं या प्रकरणीं स्वीकारलेली विचारसरणी हीच होती. उदाहरणार्थ ता. १५ जुलै १८९५ च्या एका पत्रांत ते लिहितात कीं,

"बारखळी खात्यांतील लांचलुचपतीच्या व गैरवर्तनाच्या आरोपांचा विचार केला, तर असें दिसतें कीं हे प्रकार पुष्कळ काळापासून चालत आले असले पाहिजेत. असे असून वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं त्याबद्दल मला बिलकूल कळविलें नाहीं. मग अशा गोष्टी मला कळणार तरी कशा?"

दुसऱ्या एका पत्रांत डॉ. नेव्हिन्स् यांना ते लिहितातः—

"बापट केस ही अव्वलपासून अखेरपर्यंत एक मोठी कटकट होती. पण सुदैवानें ती आतां संपली आहे. या कामाचा उगीच गाजावाजा करण्यांत आला. त्यासंबंधानें चीड येण्यासारखी विशेष गोष्ट ही कीं, हा सर्व गाजावाजा सर्वस्वीं निष्कारण होता. जर मला दिवाणांनीं या हकीकतीची नुसती खबर दिली असती, तरी सुद्धां तिची योग्य ती चौकशी करून मी तिचा आनंदानें निकाल दिला असता. पण तसें न करितां, त्यांनीं मला या बाबतीसंबंधानें सर्वस्वीं अज्ञानांत ठेवून, मग माझ्या गैरहजिरींत अविचारानें भलताच मार्ग स्वीकारिला."

आणखी एका पत्रांत याच धोरणानें ते लिहितात कीं,

"बारखळी खात्यांतील गडबडीसंबंधानें मला वेळींच खबर देण्यांत आली असती, तर बापट कमिशनवर विनाकारण झालेला दोन लक्ष रुपयांचा खर्च वांचला असता....देशी संस्थानांचे राजे दुर्गुणी, राक्षसी व दुर्बळ पुरुष असल्याचें चित्र नेहेमीं रंगविण्यांत येतें, परंतु

असें म्हटलें होतें. अर्थात याप्रमाणें खोट्या हकीकती व दूषित टीका प्रसिद्ध झाल्यामुळें तिच्या प्रतिकारार्थहि विरुद्ध बाजूनें लेख प्रसिद्ध करण्यात आले व त्यात या सर्व आक्षेपाना सप्रमाण उत्तरें देण्यात आलीं. विशेषत त्याच सुमारास मुंबई सरकाराविरुद्ध वर्तमानपत्रातून अयोग्य व खोटी टीका झाल्यामुळें तेथील गव्हर्नराची स्थिति मोठी अडचणीची होत असे अशा अर्थाची त्या गव्हर्नरानीं तक्रार केली होती. तिचाच आधार देऊन, देशी राज्याची स्थिति त्याहूनहि अधिक नाजूक असल्यामुळें, त्याच्याविरुद्ध टीका करणें अगदीं गैरवाजवी आहे, असें प्रतिपादन या लेखातून केलें होतें. परतु महाराजानरील या आक्षेपाना दिलेल्या उत्तरापैकीं सर्वांत झण-झणीत उत्तर मुंबईच्या 'Native Opinion' पत्राच्या ता. १८-७-१८९५ च्या अकात देण्यात आलें होतें. त्यात बडोद्यास महाराजाविरुद्ध खटपट करणारी एक टोळी असल्याचें आपणास पूर्वीपासून माहीत असूनहि आपण आजपर्यंत तिला उजेडात आणलें नव्हतें; परतु आता या टोळीनें वर्तमानपत्रात धाव घेऊन खोटी हकीकत जाहिर केल्यामुळें, आपणाला सत्य चव्हाट्यावर आणणें भाग पडत आहे असें सागून पुढें म्हटलें होतें कीं,

"The indiscriminate abuse of a department was bad enough, but to malign the Prince himself, whose good nature alone has made it possible for these malcontents to continue their operations in Baroda so long without being punished, or to plot and to intrigue against the master whose indulgence has benefitted some of them, is the height of ingratitude, if not of rank sedition. If any person were found to do things in British India, which were done by many of these agitators in Baroda, his fate would soon be sealed up, and yet all these practices went on in open day light as it were in Baroda, not only without official check, but under direct encouragement."

'राज्यांनील एखाद्या खात्याची निंदा करणें, हें तर वाईट

करावें लागलें. त्याच्याविरुद्ध जर सरकारी अधिकाऱ्याचा शह लागलेला नसता, तर त्यानीं आपला जो बचाव केला त्याहून तो अधिक बळकट केला असता."

अशा प्रकारें या भानगडीचा एकदाचा निकाल लागला. अर्थात या कामीं दिवाण मणीभाई यानीं आपल्यावरील जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडली नाहीं हें सिद्ध झाल्यामुळें, त्याच्या संबंधाचा विचार करणें महाराजाना भाग पडलें. या वर्षाच्या ऑगस्टमध्यें त्यानीं जनरल वॉटसन् याना लिहिलेल्या पत्रात याबद्दलचे विचार प्रदर्शित केले आहेत. त्यात ते म्हणतात –

"तूर्त दिवाण मणीभाई हे रजेवर आहेत. झाल्या प्रकाराकडे लक्ष देता, त्यानीं आता नोकरींतून निवृत्त व्हावें हे इष्ट आहे. जर ते सूज्ञपणानें वागते, तर ते राज्याला या प्रकरणामुळें झालेल्या त्रासापासून वाचवू शकले असते. या त्रासाचा परिणाम पुष्कळ वेळपर्यंत टिकेल, अशी मला भीति वाटते."

तथापि महाराजाच्या मनात असा विचार आला तरी मणीभाईचा खुलासा घेतल्याशिवाय या बाबतींत कोणतेंहि पाऊल टाकणें इष्ट नाहीं असें वाटल्यावरून, त्यानीं मणीभाईना ता. १८ जून १८९५ रोजीं उटकमंड येथून एक पत्र पाठवून त्यात त्याना लिहिलें कीं,

"बापट प्रकरणासंबधानें म्हणजे त्या प्रकरणाच्या न्यायकोर्टातील दृष्टीशिवाय इतर दृष्टींनीं तुमच्याशीं माझें बोलणें झालें, त्या वेळीं बापट च्या वर्तनासंबधानें तुम्हीं मला पूर्वी का सागितलें नाहीं, अथवा त्याबद्दलची खबर मला का दिली नाहीं, असा प्रश्न मी तुम्हास केला होता. त्या वेळीं तुम्हीं मला असें उत्तर दिलें कीं, आपल्याला त्यासंबधाची माहिती नव्हती व आपल्या कानापर्यंत पोचण्याइतकी त्याची जाहिर चर्चा होत नव्हती. तुम्हाला या प्रकरणाची पहिली खबर मिळाली, ती रेसिडेंटानीं तुमच्याकडे त्यासंबधाचे कागद पाठविले त्यावरूनच

असें म्हटलें होतें. अर्थात याप्रमाणें खोट्या हकीगती व दूषित टीका प्रसिद्ध झाल्यामुळें तिच्या प्रतिकारार्थहि निरुद्ध बाजूनें लेख प्रसिद्ध करण्यांत आले व त्यात या सर्व आक्षेपाना सप्रमाण उत्तरें देण्यात आलीं. विशेषत त्याच सुमारास मुबई सरकाराविरुद्ध वर्तमानपत्रातून अयोग्य व खोटी टीका झाल्यामुळें तेथील गव्हर्नराची स्थिति मोठी अडचणीची होत असे अशा अर्थाची त्या गव्हर्नरानीं तक्रार केली होती. तिचाच आधार देऊन, देशी राज्याची स्थिति त्याहूनहि अधिक नाजूक असल्यामुळें, त्याच्याविरुद्ध टीका करणें अगदीं गैरवाजवी आहे, असें प्रतिपादन या लेखातून केलें होतें. परतु महाराजावरील या आक्षेपाना दिलेल्या उत्तरापेक्षां सर्वात झण-झणीत उत्तर मुबईच्या 'Native Opinion' पत्राच्या ता १८-७-१८९५ च्या अकात देण्यात आलें होतें. त्यात बडोद्यास महाराजाविरुद्ध खटपट करणारी एक टोळी असल्याचें आपणास पूर्वीपासून माहीत असूनहि आपण आजपर्यंत तिला उजेडात आणलें नव्हतें, परतु आता या टोळीनें वर्तमानपत्रात धाव घेऊन खोटी हकीकत जाहिर केल्यामुळें, आपणाला सत्य चव्हाट्यावर आणणें भाग पडत आहे असें सागून पुढें म्हटलें होतें कीं,

"The indiscriminate abuse of a department was bad enough, but to malign the Prince himself, whose good nature alone has made it possible for these mal contents to continue their operations in Baroda so long without being punished, or to plot and to intri gue against the master whose indulgence has benefit ted some of them, is the height of ingratitude, if not of rank sedition If any person were found to do things in British India, which were done by many of these agitators in Baroda, his fate would soon be sealed up and yet all these practices went on in open day light as it were in Baroda, not only without official check, but under direct encouragement.

'राज्यातील एखाद्या सबध खात्याची निंदा करणें, हें तर वाईट

करावें लागलें. त्याच्याविरुद्ध जर सरकारी अधिकाऱ्याचा शह लागलेला नसता, तर त्यानीं आपला जो बचाव केला त्याहून तो अधिक बळकट केला असता."

अशा प्रकारें या भानगडीचा एकदाचा निकाल लागला. अर्थात या कामीं दिवाण मणीभाई यानीं आपल्यावरील जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडली नाहीं हें सिद्ध झाल्यामुळें, त्याच्या सबधाचा विचार करणें महाराजाना भाग पडलें. या वर्षाच्या ऑगस्टमध्यें त्यानीं जनरल वॉटसन् याना लिहिलेल्या पत्रात याबद्दलचे विचार प्रदर्शित केले आहेत. त्यात ते म्हणतात --

"तूर्त दिवाण मणीभाई हे रजेवर आहेत. झाल्या प्रकाराकडे लक्ष देता, त्यानी आता नोकरींतून निवृत्त व्हावें हें इष्ट आहे. जर ते सूज्ञपणानें वागते, तर ते राज्याला या प्रकरणामुळें झालेल्या त्रासापासून वाचवू शकले असते. या त्रासाचा परिणाम पुष्कळ वेळपर्यंत टिकेल, अशी मला भीति वाटते."

तथापि महाराजाच्या मनात असा विचार आला तरी मणीभाईंचा खुलासा घेतल्याशिवाय या बाबतींत कोणतेंहि पाऊल टाकणें इष्ट नाहीं असें वाटल्यावरून, त्यानीं मणीभाईना ता. १८ जून १८९५ रोजीं उटकमड येथून एक पत्र पाठवून त्यात त्याना लिहिलें कीं,

"बापट प्रकरणासबधानें म्हणजे त्या प्रकरणाच्या न्यायकोर्टांतील दृष्टीशिवाय इतर दृष्टींनीं तुमच्याशीं माझें बोलणें झालें, त्या वेळीं बापटाच्या वर्तनासबधानें तुम्हीं मला पूर्वीं का सागितलें नाहीं, अथवा त्याबद्दलची खबर मला का दिली नाहीं, असा प्रश्न मी तुम्हास केला होता. त्या वेळीं तुम्हीं मला असें उत्तर दिलें कीं, आपल्याला त्यासबधाची माहिती नव्हती व आपल्या कानापर्यंत पोंचण्याइतकी त्याची जाहिर चर्चा होत नव्हती. तुम्हाला या प्रकरणाची पहिली खबर मिळाली, ती रेसिडेटानीं तुमच्याकडे त्यासबधाचे कागद पाठविले त्यावरूनच

असें म्हटलें होतें. अर्थात याप्रमाणें खोट्या हकीकती व दूषित टीका प्रसिद्ध झाल्यामुळें तिच्या प्रतिकारार्थहि विरुद्ध बाजूनें लेख प्रसिद्ध करण्यात आले व त्यात या सर्व आक्षेपाना सप्रमाण उत्तरें देण्यात आलीं विशेषत त्याच सुमारास मुबई सरकाराविरुद्ध वर्तमानपत्रातून अयोग्य व खोटी टीका झाल्यामुळें तेथील गव्हर्नराची स्थिति मोठी अडचणीची होत असे अशा अर्थाची त्या गव्हर्नरानीं तक्रार केली होती तिचाच आधार घेऊन, देशी राज्याची स्थिति त्याहूनहि अधिक नाजूक असल्यामुळें, त्याच्याविरुद्ध टीका करणें अगदीं गैरवाजवी आहे, असें प्रतिपादन या लेखातून केलें होतें. परतु महाराजावरील या आक्षेपाना दिलेल्या उत्तरापैकीं सर्वांत झण-झणीत उत्तर मुबईच्या 'Native Opinion' पत्राच्या ता. १८ ७ १८९५ च्या अकात देण्यात आलें होतें. त्यात बडोद्यास महाराजाविरुद्ध खटपट करणारी एक टोळी असल्याचें आपणास पूर्वीपासून माहीत असूनहि आपण आतपर्यंत तिला उजेडात आणलें नव्हतें, परतु आता या टोळीनें वर्तमानपत्रात धाव घेऊन खोटी हकीकत जाहिर केल्यामुळें, आपणाला सत्य चव्हाट्यावर आणणें भाग पडत आहे असें सागून पुढें म्हटलें होतें कीं,

"The indiscriminate abuse of a department was bad enough but to malign the Prince himself, whose good nature alone has made it possible for these malcontents to continue their operations in Baroda so long without being punished or to plot and to intrigue against the master whose indulgence has benefitted some of them is the height of ingratitude if not of rank sedition. *If any person were found to do things* in British India which were done by many of these agitators in Baroda his fate would soon be sealed up and yet all these practices went on in open daylight as it were in Baroda not only without official check, but under direct encouragement.

'राज्यातील एखाद्या सबध खात्याची निंदा करणें, हें तर वाईट

महाराजांनीं आपल्या अधिकाऱ्यांविषयीं रागद्वेष केव्हांहि बाळगला नाहीं. कामापुरतें त्यांच्यांशीं योग्य तें वर्तन ठेविल्यावर, पुढे त्या गोष्टीचा किंतु ते आपल्या मनांत ठेवीत नाहींत, याचें हें एक नमुनेदार उदाहरण आहे. अशीं इतर अनेक उदाहरणें त्यांच्या चरित्रांत आढळतात.

या वापट प्रकरणामुळें महाराजांच्या मनांत अनेक प्रकारचे विचार आले, व त्यांच्या नेहेमींच्या खोंचदार भाषेनें त्यांनीं अनेक दृष्टींनीं तत्संबंधीच्या एकंदर परिस्थितीचें विग्रहपूर्वक विवेचन या नंतरच्या एका पत्रांत केलें आहे. हें पत्र लॉर्ड रे यांना लिहिलेलें आहे. त्यांत ते म्हणतातः--

"देशी राज्यांच्या सांप्रतच्या दुर्बल स्थितीला अनेक प्रकारचीं कारणें आहेत. प्रथमतः आमच्या लोकाचा दुर्बलपणा होय. त्यांच्यांत अनेक जाती, पंथ, भाषा, प्रांत वगैरे कारणामुळें भेदभाव असल्यानें त्यांच्यांत व्यापक स्वरूपाची सार्वजनिक कळकळ व खऱ्या प्रगतीची निर्हेतुक आस्था दिसून येत नाहीं. दुसरें कारण हें कीं, समाजांतील उच्च वर्गांना विशेष प्रकारचे अधिकार असल्यामुळें राज्यपद्धतीचा बोजा सर्वांवर सारखा विभागण्यास अडचण येते. यानंतर सरदार व वजनदार अधिकारी यांचा प्रश्न येतो. ते राज्यांत नेहमीं खटपटी करीत राहतात, व त्यामुळें फार त्रास होतो. याशिवाय जुन्या काळची अधिकारीसत्तेविषयींची सन्मानबुद्धि हल्लीं नाहींशी झाल्यामुळेंहि कित्येक हरकती येतात. पण या सर्व अडचणींच्या अग्रभागीं सांप्रतचें सदोष राज्यतंत्र हें कारण होय. माझे सर्व अधिकार माझ्या गैरहजिरींत दुसऱ्यास सोपून देण्यास मला भाग पाडल्यामुळे या राज्याचें फार नुकसान झालें आहे."

महाराजांच्या या अभिप्रायाला त्याच सुमारास मि. ईलियट यांनीं लिहिलेल्या एका पत्रानें पुष्टि मिळते. मि. ईलियट लिहितात कीं,

"राज्यांतील असलेली पण राज्याचा भाग नसलेली अशी एखादी प्रबळ सत्ता जर राज्याविरुद्धच्या तक्रारी ऐकण्याची तत्परता

भाईच्या दिवाणगिरींत व विशेषत महाराजाच्या गैरहजरींत का पुरावी. या प्रश्नाचें उत्तर खुद्द रा. मणीभाईशिवाय दुसरा कोण देऊ शकेल ? कारण महाराजाच्या गैरहजिरींत राज्याची सुव्यवस्था ठेविण्याची सर्व जबाबदारी मणीभाईवरच होती. ते या प्रश्नाचें उत्तर देतील काय?'

अशा रीतीनें या प्रकरणासंबंधानें टीका प्रतिटीका वर्तमानपत्रांतून चालू होत्या. त्यात खुद्द मि. मेकॉनकी यानींहि भाग घेतला होता. त्यासंबंधानें महाराजानीं एका पत्रात म्हटलें आहे कीं,

"ता. २ ऑक्टोबर १८९५ चें मि. मेकॉनकी याचें पत्र मी वाचलें. तें पत्र त्याच्या स्वभावाला अनुरूप असेंच आहे. त्यात खऱ्या वस्तुस्थितीचा उघड उघड विपर्यास केला असून, अधिकाऱ्याच्या सरळ वर्तनाचें दूषित चित्र रगवून त्या हकीकतीवरून आपल्यास हवीं तीं अनुमानें काढलीं आहेत."

दुसऱ्या एका पत्रातहि असेंच म्हटलें आहे कीं,

"मि. मेकॉनकी याची या संस्थानातील कारभाराबद्दलची आस्था कांहीं विलक्षणच आहे! त्यानीं कालच्या 'Bombay Gazette' पत्रात वस्तुस्थितीचें नेहेमींप्रमाणेंच काल्पनिक चित्र काढिलें आहे. तथापि तो लेख इतका क्षुद्र आहे कीं, त्याकडे लक्ष देण्याचीहि जरूरी नाहीं."

वस्तुत या प्रकरणासबधानें मुख्य प्रश्न हा होता कीं, या बाबतींत रजाचा गज करण्याचें दिवाणाना काय कारण होतें ? राज्याच्या अत र्व्यवस्थेंत एखाद्या खात्यात लाचलुचपतीचा प्रकार दिसून आला, तर त्याचा बदोबस्त करण्याची सत्ता वरिष्ठ अधिकारी या नात्यानें त्याना नव्हती असें नाहीं यदाकदाचित् खात्याविरुद्धचे काहीं अर्ज रेसिडेन्सीकडे गेले असले, तरी ते तेथून दिवाणाकडे परत आल्यावर, त्यांनीं त्याबद्दलची व्यवस्था व बदोबस्त स्वत करावयास पाहिजे होता. कदाचित् मोठाले अधिकारी या प्रकरणात असल्यामुळें स्वत च्या जबाबदारीवर तसें करणें त्याना इष्ट वाटलें

त्यांना केवळ अधिकाऱ्यांच्या खटपटीलाच तोंड द्यावें लागलें, तर यापुढील प्रसंगांत त्यांना दारूगोळा वापरणाऱ्या दंगेखोरांच्या विरुद्ध आपली फौज पाठवून त्यांच्यांशीं झगडावें लागलें. त्या संबंधाची हकीकत या पुढील प्रकरणांत देण्यांत येईल.



त्याच्याविरुद्ध मोठाले अधिकारी कट करून त्याचें नुकसान कसें करितात व त्याच्या चांगल्या कृत्याचा लाभ दुसरे कांहीं लोक कसे घेतात, याबद्दलची खरी हकीकत सांगण्याचा उदारपणा मात्र कोणी दाखवीत नाहींत ! ”

अशा प्रकारें महाराजांवर टीका होत असतांच कमिशनचा निर्णय त्यांच्याकडे आला. त्याचा अनेक कायदेपंडिताच्या सहाय्यानें विचार करण्यांत व त्यांतील सत्य शोधून काढण्यांत त्यांनीं बराच काळ घालविला. त्या वेळचे वरिष्ठ कोर्टाचे न्यायाधीश रा. अंबालाल साराभाई, रा. विनायकराव पंडित, मि. जमशेटजी दोराबजी खंडाळेवाला आणि मुलकी खात्याचे मुख्य अधिकारी रा. जयसिंगराव आंग्रे या भिन्न जातींच्या व भिन्न पक्षाच्या लोकांचे लेखी अभिप्राय त्यांनीं मागविले. त्या सर्वांच्या मतें कमिशनचा निर्णय चुकीचा असून, बापटावर केल्या गेलेल्या आरोपासंबधानें ते निर्दोषी होते. या मताचा विचार करून व स्वतः कामांतील पुराव्याचा बारीक विचार करून महाराजांनीं या प्रकरणाचा अखेर निर्णय ता. ९ ऑक्टोबर १८९५ रोजीं असा दिला कीं,

“ रा. वासुदेव सदाशिव बापट यांना त्यांजवरील सर्व आरोपासंबधानें निर्दोषी ठरविण्यांत येत आहे. तथापि या प्रकरणासंबधाच्या सर्व हकीकतीचा विचार करितां, रा. बापट यांना इतउत्तर या राज्याचे नोकरींत ठेवणें इष्ट नाहीं. म्हणून त्यांना नोकरींतून मुक्त करण्यांत येत आहे.”

अशा प्रकारें या कामाचा निकाल लागल्यामुळें याच सालच्या नोव्हेंबरमध्यें लिहिलेल्या एका पत्रांत महाराज आपल्या शिरावरील एक मोठ्या जबाबदारीचा बोजा उतरून टाकल्याचा निःश्वास सोडल्याच्या भावनेनें लिहितात कीं,

“मी एकदाचा ‘निष्कारण प्रसिद्धि पावलेल्या’ बापट केसचा निकाल केला आहे. केवळ न्याय म्हणून मला बापटांना दोषमुक्त

यानतर एक महिन्यानें ते लिहितात --

"नवीन दिवाण काळजीपूर्वक काम करणारे, सूज्ञ व धूर्त असे आहेत."

ही त्याची परीक्षा खरी ठरली व सस्थानाचा दर्जा कायम ठेवून मागील दिवाणाच्या कारभारातील निस्कटलेली घडी पुन्हा नीट बसविण्याच्या कामीं या दिवाणाचा महाराजाना चागला उपयोग झाला. यापूर्वीच बडोदें राज्याचे हितचिंतक रेसिडेंट कर्नल बिड्डल्फ हे बदलून गेले होते, व त्यानीं स्वत च महाराजाना आपल्या जागीं कर्नल मार्टेली येत असल्याची खबर पत्रानें दिली होती. त्याबद्दल आपल्या उतान्यात त्याचे आभार मानताना महाराजानीं खोंचदार रीतीनें त्याना लिहिलें कीं,

"नवीन रेसिडेंटसाहेब सहानुभूतिपर व थड डोक्याचे असतील अशी मला आशा आहे. बडोद्याला सध्या या जागीं एखाद्या चागल्या ऑफिसराची जरूर आहे."

कर्नल मार्टेली हे महाराजाच्या अपेक्षेप्रमाणें खरोखरीच सज्जन अधिकारी निघाले व ते बडोद्यास तीन वर्षांवर राहिल्यामुळें, मागील रेसिडेंटाच्या अमदानींतील वादळ शात होण्याला त्याची बरीच मदत झाली. त्याच्याविषयीं महाराजानीं लॉर्ड रे याजला आपला अभिप्राय कळविला यात,

"कर्नल मार्टेली हे आनदी स्वभावाचे सद्‌गृहस्थ असून, सरळ रीतीनें काम करण्याविषयीं उत्सुक आहेत."

असें म्हटलें आहे. तथापि मागील भानगडींमुळे घडून आलेली व महाराजाना खेद वाटणारी या सुमाराची गोष्ट म्हटली म्हणजे मि ईलियट याची सेवानिवृत्ति ही होय. त्यासबधानें,

"त्याच्या जाण्यानें मला फार खेद होत आहे. विशेषत त्याना जाणें भाग पाडण्याच्या कारणामुळें माझा अधिकारीवर्ग नेहेमींपेक्षा अधिक भित्रा होऊन माझ्या एकदर नोकरवर्गाची दानत बिघडविण्यासारखा परिणाम झाला आहे. त्याच्या जाण्याचें बाह्य कारण

त्याच्याविरुद्ध मोठाले अधिकारी कट करून त्याचें नुकसान कसें करितात व त्याच्या चांगल्या कृत्याचा लाभ दुसरे काहीं लोक कसे घेतात, याबद्दलची खरी हकीकत सांगण्याचा उदारपणा मात्र कोणी दाखवीत नाहींत ! "

अशा प्रकारें महाराजांवर टीका होत असतांच कमिशनचा निर्णय त्यांच्याकडे आला. त्याचा अनेक कायदेपंडिताच्या सहाय्यानें विचार करण्यांत व त्यांतील सत्य शोधून काढण्यांत त्यांनीं बराच काळ घालविला. त्या वेळचे वरिष्ठ कोर्टाचे न्यायाधीश रा. अंबालाल साराभाई, रा. विनायकराव पंडित, मि. जमशेटजी दोराबजी खडाळेवाला आणि मुलकी खात्याचे मुख्य अधिकारी रा. जयसिंगराव आंग्रे या भिन्न जातींच्या व भिन्न पक्षाच्या लोकांचे लेखी अभिप्राय त्यांनीं मागविले. त्या सर्वांच्या मतें कमिशनचा निर्णय चुकीचा असून, बापटावर केल्या गेलेल्या आरोपासंबधानें ते निर्दोषी होते. या मताचा विचार करून व स्वतः कामांतील पुराव्याचा बारीक विचार करून महाराजांनीं या प्रकरणाचा अखेर निर्णय ता. ९ ऑक्टोबर १८९५ रोजीं असा दिला कीं,

" रा. वासुदेव सदाशिव बापट यांना त्यांजवरील सर्व आरोपासंबधानें निर्दोषी ठरविण्यांत येत आहे. तथापि या प्रकरणासंबधाच्या सर्व हकीकतीचा विचार करितां, रा. बापट यांना इतउत्तर या राज्याचे नोकरींत ठेवणें इष्ट नाहीं. म्हणून त्यांना नोकरींतून मुक्त करण्यांत येत आहे."

अशा प्रकारें या कामाचा निकाल लागल्यामुळें याच सालच्या नोव्हेंबर मध्यें लिहिलेल्या एका पत्रांत महाराज आपल्या शिरावरील एक मोठ्या जबाबदारीचा बोजा उतरून टाकल्याचा निःश्वास सोडल्याच्या भावनेनें लिहितात कीं,

"मी एकदाचा 'निष्कारण प्रसिद्धि पावलेल्या' बापट केसचा निकाल केला आहे. केवळ न्याय म्हणून मला बापटांना दोषमुक्त

होणाऱ्या शेम्याची रक्कम ठरलेल्या 'आंकड्या'हून कमी भरली, तर खुटती रक्कम कांहीं विशिष्ट वर्गाच्या लोकांकडून वसूल करण्यांत येते, व ठरलेल्या 'आंकड्या'हून शेम्याची रक्कम अधिक आल्यास ती या ठाकोर अथवा मतादारांना मिळते. म्हणून त्यांना दर वर्षाच्या अखेरीस जमाखर्चाचा तपशील सरकारांत रुजूं करावा लागतो. वर म्हटल्याप्रमाणें या ठाकोरमतादारांना जमीनींच्या खातेदारांकडून सरकारचा महसूल वसूल करण्याचा जो हक्क दिलेला असतो, त्या व्यतिरिक्त त्या गांवांवर त्यांना दुसरी कोणत्याहि प्रकारची सत्ता नसते. अर्थांत खातेदारांकडून सरकारी वसूल किती घ्यावयाचा हें नक्की करण्याकरितां त्यांच्या जमीनींची मोजणी करणें अवश्य असतें व तशा प्रकारची मोजणी खंडेराव महाराजांच्या कारकीर्दीत करण्यांत आली होती. तथापि ती अगदीं बरोबर अशी नसल्यानें, सन १८९१ सालीं नवीन पद्धतीने मोजणी करण्याचा प्रश्न हातीं घेण्यांत आला व त्यासंबंधानें हुजूर हुकुमानें एक जाहिरनामा काढण्यांत आला. त्यांत अशा गांवांतील जमीनींची मोजणी करण्याचा अधिकार सरकारास असला, तरी पुष्कळ वेळां खातेदारांची अदलाबदल ठाकोर लोक करूं शकतात, त्यामुळें जमीनीच्या मालकीबद्दलचा निर्णय न करतां केवळ सरकारी वसुलाच्या दृष्टीनेंच ही मोजणी करण्यांत यावी, असें स्पष्ट म्हटलें होतें. या अनुरोधानें सन १८९५ मध्यें अशा जमीनींची मोजणी करण्यास सुरुवात झाली, त्या वेळीं ठाकोरमतादारानीं तिला विरोध केला व अशी तक्रार सांगितली कीं, या गांवांतील सर्व जमीनींचा मालकी हक्क आपला असल्यामुळें, आपण आपल्या गांवांची मोजणी करूं देणार नाहीं.

ता. १६ नोव्हेंबर १८९७ रोजीं त्या तालुक्यांतील कांहीं गांवांच्या ठाकोरांनीं सरकारला विरोध करण्यास प्रथम सुरुवात केली व इतर गांवांच्या ठाकोरांनाहि तसें करण्यास चिथविलें. आरंभीं त्यांच्यांशीं तडजोड करण्याचा प्रयत्न सरकारी अधिकाऱ्यांनीं करून पाहिला, परंतु ते लोक

त्यांच्याविरुद्ध मोठाले अधिकारी कट करून त्यांचें नुकसान करतें करितात व त्याच्या चांगल्या कृत्याचा लाभ दुसरे कांहीं लोक करून घेतात, याबद्दलची खरी हकीकत सांगण्याचा उदारपणा मात्र कोणी दाखवीत नाहींत ! "

अशा प्रकारें महाराजांवर टीका होत असतांच कमिशनचा निर्णय त्यांच्याकडे आला. त्याचा अनेक कायदेपंडिताच्या सहाय्यानें विचार करण्यांत व त्यांतील सत्य शोधून काढण्यांत त्यांनीं बराच काळ घालविला. त्या वेळचे वरिष्ठ कोर्टाचे न्यायाधीश रा. अंबालाल साराभाई, रा. विनायकराव पंडित, मि. जमशेटजी दोराबजी खडाळेवाला आणि मुलकी खात्याचे मुख्य अधिकारी रा. जयसिंगराव आंग्रे या भिन्न जातींच्या व भिन्न पक्षाच्या लोकांचे लेखी अभिप्राय त्यांनीं मागविले. त्या सर्वांच्या मतें कमिशनचा निर्णय चुकीचा असून, बापटावर केल्या गेलेल्या आरोपासंबंधानें ते निर्दोषी होते. या मतांचा विचार करून व स्वतः कामांतील पुराव्याचा बारीक विचार करून महाराजांनीं या प्रकरणाचा अखेर निर्णय ता. ९ ऑक्टोबर १८९५ रोजीं असा दिला कीं,

" रा. वासुदेव सदाशिव बापट यांना त्यांजवरील सर्व आरोपासंबंधानें निर्दोषी ठरविण्यांत येत आहे. तथापि या प्रकरणासंबंधाच्या सर्व हकीकतीचा विचार करितां, रा. बापट यांना इतउत्तर या राज्याचे नोकरींत ठेवणें इष्ट नाहीं. म्हणून त्यांना नोकरींतून मुक्त करण्यांत येत आहे."

अशा प्रकारें या कामाचा निकाल लागल्यामुळें याच सालच्या नोव्हेंबर मध्यें लिहिलेल्या एका पत्रांत महाराज आपल्या शिरावरील एक मोठ्या जबाबदारीचा बोजा उतरून टाकल्याचा निःश्वास सोडल्याच्या भावनेनें लिहितात कीं,

"मी एकदाचा 'निष्कारण प्रसिद्धि पावलेल्या' बापट केसचा निकाल केला आहे. केवळ न्याय म्हणून मला बापटांना दोषमुक्त

जोखमीचें असतें, म्हणून अशा प्रसंगीं साधारणतः पोलिसांचा उपयोग करावा हें बरें. तथापि स्थानिक परिस्थितीवरून पोलिसांच्या सहाय्यानें हें काम भागण्यासारखें नाहीं असे वाटल्यास, जरूर तिनकाच फौजेचा उपयोग करावा. परंतु स्थानिक अधिकाऱ्यांच्या मतें पोलिसची मदत अपुरती पडेल असें वाटल्यावरून, त्यांनीं बडोद्याहून अधिक फौजेची मागणी केली. ही हकीकत महाराजांना कळविण्यांत आल्यावर त्यांनीं 'अगदीं जरूरच पडली तर फौजेचा उपयोग करावा, तेथपर्यंत होतां होईतों सामोपचारानें काम घ्यावें,' असा हुकूम दिला. ता. ५ मे ला पायदळाची एक तुकडी, घोडेस्वारांचें एक पथक व दोन तोफा विजापूरला पाठविण्याचा हुकूम झाला. *यापूर्वीं अनेक वेळां दंगेखोरांची समजूत घालण्याचा प्रयत्न सरकारी* अधिकाऱ्यांनीं केला होता. तथापि त्यांचें वर्तन दिवसेंदिवस अधिक तुफानी होऊं लागलें. त्यामुळें अखेरीस ७ व ८ मे रोजीं स्पेशल गाड्यांतून ती फौज बडोद्याहून रवाना करण्यांत आली. तिच्यावर मुख्य अधिकारी म्हणून कर्नल वुइल्कॉक्स् यांची नेमणूक करण्यांत आली होती. इतकें झालें तरीहि, या फौजेचा उपयोग करण्यापूर्वीं अखेरचा एक तडजोडीचा प्रयत्न करून पाहण्यासाठीं म्हणून सरसुभे रा. धामणस्कर यांना विजापूर येथें पाठविण्यांत आलें, परंतु त्यांना यश आलें नाहीं. त्यांनीं दंगेखोरांची संख्या दोन हजारांवर असून ते लढाई करण्याच्या बेतांत आहेत असें कळविलें, व त्यांच्यांविरुद्ध पाठविली गेलेली फौज अपुरी असल्यामुळें, आणखी फौज पाठवावी अशी मागणी केली. त्याप्रमाणें कर्नल निसन यांच्या हाताखालीं ही फौज पाठविण्यांत आली.

इकडे दंगेखोरांनींहि आपल्यापरीनें लढाईची जय्यत तयारी केली. त्यांनीं खंदक खणून गाड्या, पाडलेलीं झाडें व लाकडाचे मोठाले ओंडके यांच्या सहाय्यानें त्या खंदकांची तटबंदी केली. तसेंच त्या गांवाभोंवतीं मोर्चे बांधून दारूगोळ्याची व धान्यसामुग्रीची तरतूद केली, व 'शेर-बच्चा' (वाघाचा बच्चा) या नांवाची एक तोफ आणून ठेविली. अशा

दाखवीत, तर त्याचा परिणाम कायम होईल ! अर्थातच हजारों तक्रारी एकदम येतील व तशा त्या या वेळीं आल्याहि. त्यांपैकींच्या पुष्कळशा धडधडीत खोट्या होत्या व अर्ध्यांहून अधिक तर निव्वळ मूर्खपणाच्या होत्या. उरलेल्यातील मूर्खपणा प्रथमदर्शनीं दिसण्यासारखा नव्हता, तरी तो विचारार्ती कळण्याजोगा होता. या दरेक तक्रारीबद्दल मी योग्य तो खुलासा दिलेला होता. परंतु मला लवकरच कळून आलें कीं, या प्रकरणीं जें काहीं अपेक्षित होतें, तें खुलासे नसून दुसरेंच काहीं होतें. माझी कल्पना अशी आहे कीं, आपण आजपर्यंत जें सुधारणाचें कार्य दृढतेनें केलें, त्याबद्दल आपल्यावर साम्प्रतची टीका होत आहे. आपण वर्षानुवर्षें नुसते कायदे करीत राहिला असता, इमारती व इतर कामें करीत राहिला असता, अथवा वाटेल तितका पैसा अकारणीं खर्च करीत राहिला असता, तरी आपल्याला कोणी दोष दिला नसता. पण आपण इनामपद्धतींतील दोष सुधारण्याचें आणि लष्करी सरदारवर्गाची व वतनदाराची स्थिति सुधारण्याचें काम हातीं घेताच आपल्याविरुद्ध आरडाओरड सुरू झाली."

या प्रकारामुळें महाराज आपल्या पूर्वोक्त पत्रात म्हणतात —

"अशा वेळीं लोक आश्चर्यानें असेंहि विचारू लागतात कीं, आपल्या राज्यात मोठासा सुपरिणाम घडवून आणण्याचें श्रेय न मिळविता निष्कारण कष्ट व त्रास करून घेणाऱ्या हट्टींच्या राजापेक्षा जुन्या काळचे दारू व स्त्रिया यात गर्क असलेले राजे काय वाईट होते ? अशा प्रकारच्या एकदर परिस्थितीमुळें प्रगति करता न आल्यामुळें जुन्या चाकोरीतच पुनः पडण्याची वृत्ति मात्र अंगीं निर्माण होते."

वापट प्रकरणामुळें वारखडी खात्याच्या एका दिव्यातून अशा प्रकारें महाराजाना जावें लागलें; तथापि तेवढ्यानें त्या खात्यानें त्यांची पाठ सोडली नाहीं. त्यांना या खात्याच्या उद्योगामुळें उत्पन्न झालेल्या आणखी एका जास्त मोठ्या अडचणींतून यानन्तर पार पडावें लागलें. वापट प्रकरणात



महाराज व त्यांचे लष्करी अधिकारी

# प्रकरण २० वें



## पिलवाईचा दंगा

मागील प्रकरणीं वर्णन केलेल्या वापट प्रकरणानंतर दिवाण मणीभाई जसभाई हे ता. २१ नोव्हेंबर १८९५ रोजीं नोकरींतून निवृत्त झाले, व त्याच्या जागीं रा. जयसिंगराव आम्रे याची हंगामी नेमणूक करण्यात आली. तथापि ही नेमणूक वोडनचाडून कामचलाऊच होती व ती कांहीं महिने चाडू राहिल्यावर कायमच्या दिवाणाच्या जागेवर रा. श्रीनिवास राघव आयंगार हे ता. १५ जुलै १८९६ रोजीं रुजू झाले. महाराजाच्या कारकीर्दींतील अनेक दिवाणात याची योग्यता वरीच श्रेष्ठ दर्जाची होती. दिवाणाची नेमणूक करणें हें किती जबाबदारीचें काम असतें व आरंभीं चागला वाटणारा दिवाणहि प्रसगविशेषीं पुढें कसा त्रासदायक होऊ शकतो, याची कल्पना नुकतीच महाराजाना आल्यामुळें, ते सन १८९६ च्या मार्चमधील एका पत्रात म्हणतात —

"दिवाणाची निवडणूक करण्याचें काम किती त्रासदायक आहे!"

तथापि यानतर नवीन दिवाण कामावर रुजू झाल्यावर दोन तीन महिन्यानीं महाराजानीं मि. ईलियट याना लिहिलेल्या एका पत्रात नवीन नेमणुकीबद्दल समाधान व्यक्त करताना म्हटले आहे कीं,

"नवीन नेमणुकीसबधानें सध्याच अभिप्राय देणें जरी उतावळीचें होईल–कारण सर्वच गोष्टी नवीन असताना चागल्या दिसतात–तरी पण नवीन दिवाणाची निवडणूक चागली ठरेल, असें वाटतें"

आहे अशा स्थितींत पावसाळा जवळ आल्यामुळे या मोहिमेस किती काळ लागेल हें सांगता येणार नाहीं म्हणून या सर्व गोष्टींचा विचार करून सरकारानें आपला अखेर निर्णय आम्हाला कळवावा ”

परंतु इतक्या थराला गोष्टी गल्यावर सरकारला माघार घेणें शक्य नव्हतें म्हणून ता ३ जून रोजीं दगेखोरावर हल्ला करण्याचा बेत मुक्रर करण्यात आला इतकें झाल्यावरहि रक्तपात टाळण्याच्या महाराजाच्या खास इच्छेमुळें ता ३ जून रोजीं दगेखोरावर हल्ला सुरू करण्यापूर्वी महाराजानीं स्वत सांगितलेल्या शब्दानीं गुजराथी भाषेत लिहिलेला एक जाहिरनामा घेऊन सरसुभे धामणस्कर हे स्वत त्या गावाजवळ गेले व त्यानी तो जाहिरनामा दगेखोराच्या नातलगापैकीं एकाच्या हातीं देऊन त्यास त्याच्याकडे पाठविले तथापि त्याचा काहीं उपयोग न होता दगेखोरानीं सरकारी फौजे- वर प्रथम गोळ्या झाडून लढाइला सुरवात केली, त्याबरोबर सरकारी फौजेला दगेखोरावर फैर करण्याचा हुकूम देण्यात आला थोड्याच वेळात दगेखोराचे बाहेरचे सर्व मोर्चे काबीज करण्यात आले परंतु त्यानतर दगे खोर गावात जाऊन आडोशाला लपून बसून राहिले त्या वेळीं सरकारी हल्याराच्या भरवशावर त्याना जिंकणें कठिण जाऊ लागतें तरी पण गावातील गमु तलावाच्या बाजूनें जाऊन फौजेने दगखोराना वेढिल इतक्यात तोफेच्या काहीं गोळ्यामुळें गावात थोड्या ठिकाणीं आगी लागल्या व त्याना वाऱ्याची अनुकूलता मिळून त्या सर्वत्र पसरल्या व त्यामुळें ते सर्व गाव थोड्याच वेळात जळून भस्मसात् झालें ! गावाला आग लागताच दगेखोर त्यातून पळून गेले व झाडाझुडपाच्या आंत एकटे दुकटे लपून राहिले वास्तविक पाहता पिलवाइ हें गाव लढाईच्या प्रसगीं बचाव करण्याला फार सोइचें आहे व दगेखोराना जर कांहीं युद्धविद्येचे थोडेंसें ज्ञान असतें, तर सरकारी फौजेचें काम या प्रसगीं कठिणच झालें असतें परंतु होळीच्या होळकरासारखे दगेखोर केवळ हुलीनें भरले गेल्यामुळें, त्याना नामोहरम करणें सोपें झालें

म्हणून वापट प्रकरणातील त्याचें वर्णन दाखविण्यात येतें, परंतु हा प्रत्यक्ष परिणाम घडून येण्यापूर्वीपासूनहि माझ्या व त्याच्या सबंधावर कडक नजर ठेविण्यात येत असे."

असें त्यानीं लॉर्ड रे याना पुढें कळविलें

अशा रीतीनें एका पक्षीं मि. ईलियट व वापट व दुसऱ्या पक्षीं रेसिडेंट व दिवाण हे दोघे गेल्यानें दोन्ही पक्षास एकमेकाचा छेद दिला गेला. तथापि या वारखळी प्रकरणाचें शेंपूट पिलवाईच्या दाव्याच्या रूपानें आणखी काहीं काळपर्यंत हालत राहिलें.

बडोदें राज्याच्या कडी प्रातांपैकीं (त्याला हल्लीं मेहसाणा प्रांत म्हणतात) विजापूर तालुक्यात पिलवाई हें एक गाव आहे. हें गाव सरकारी मुलकी दप्तरात 'फिरत्या आकड्याचें गाव' म्हणून नोंदलेलें होतें. मागें सागितल्याप्रमाणें 'फिरत्या आकड्याचें गाव' हें वस्तुत सरकारी गावच असतें, मात्र सरकारी गावात सरकारचा जमीनमहसूल सरकारी मुलकी अधिकाऱ्यावडून वसूल केला जातो, त्या ऐवजीं फिरत्या आकड्याच्या गावातून तो महसूल जमीनींच्या खातेदारावडून एक अथवा अनेक निशिष्ट लोक वसूल करतात व त्याबद्दलचा दर वर्षाकरता अथवा काहीं वर्षांच्या मुदतीकरिता म्हणून सरकार जो एक आकडा वेळोवेळीं नक्की करील, तितकी रकम ते सरकारात भरतात या दृष्टीनें हे लोक सरकारी वसूल करणारे मध्यस्थ होत दर फिरत्या आंकड्याच्या गावाला असा मध्यस्थ एकच असेल, तर त्यास 'ठाकोर' असें म्हणतात व हे मध्यस्थ अनेक असतील तर त्याना 'मतादार' असें म्हणतात त्यानीं सरकारात ठराविक हप्त्यानीं जो वसूल भरावयाचा, त्याबद्दल त्याना सरकारात जामीन द्यावा लागतो व त्यानीं सरकारात वसूल वेळेवर न भरल्यास त्या 'आकड्या' वर सरकारकडून व्याज आकारण्यांत येतें. खातेदारांकडून जमीनींचा जो महसूल वसूल करावयाचा, त्यास 'शेगा' असें म्हणतात व त्याची रकम सरकार निश्चित करतें जर सर्व खातेदारावडून मिळून वसूल

"या सर्व दंग्याचें मुख्य कारण जमीनीची मोजणी करणे, इतकें साधें होते. गावातील लोकाना दिवाणानीं स्पष्ट रीतीने लेखी कळविले होते कीं, गावचा आकडा वाढविण्यापूर्वी तुमचें म्हणणें रीतसर ऐकण्यात येईल; तथापि दंगेखोरानी न ऐकता लढाईची तयारी केली. खुद्द पिल्वाई गावातील भाट लोकानीं गावकऱ्याच्या पूर्वजाचीं रसभरित वर्णने करून, ब्रिटिश सरकारच्या परवानगीशिवाय बडोदें सरकारास एक बदुकहि उचलता येणार नाहीं असें सागून त्याना चिथविलें व आमच्या अधिकाऱ्याच्या दिरगाईमुळे दंगेखोराना अधिकच जोर चढला तथापि सुदैवानें अखेरीस प्रकरण थोडक्यात निभावलें."

पिल्वाईच्या लोकाशीं होता होईपर्यंत झगडा करण्याचें टाळण्याबद्दल महाराजानीं आपल्या अधिकाऱ्याना अनेक वेळा बजावून सागितलें होतें. तथापि उपरोक्त कारणानें दंगेखोर लोकाना सरकारच्या सामर्थ्याविषयीं अविश्वास व स्वतःच्या बळाचा फाजील अभिमान वाटत होता. त्याच्याच जोडीला सरकारी अधिकाऱ्यानाहि अनुभवाच्या अभावामुळें व अपुऱ्या युद्धसामग्रीमुळें स्वतःविषयीं अविश्वास वाटत होता. या दोहोंचा परिणाम म्हणून हें प्रकरण इतक्या थराला पोहोंचलें. हाच निष्कर्ष महाराजानीं या प्रकरणावरून काढला आहे. या सुमारास डॉ. नेव्हिन्स् याना लिहिलेल्या पत्रांत ते कळवितात कीं,

"योग्य रीतीनें कवाईत मिळालेल्या फौजेशिवाय व जरूर त्या शस्त्रास्त्राशिवाय संस्थानिकाना दंगेखोर व तुफानी लोक दाबात ठेवणें किती कठिण आहे, हा एक धडा या प्रकरणावरून शिकण्यासारखा आहे."

देशी राज्याना लढाई करण्याचे फारसे प्रसंग येत नसले, तरी दंगेखोराना भीति वाटेल इतकें लष्करी सामर्थ्य व साधन त्याच्याजवळ असावयास हवें. "निर्विषेणापि सर्पेण कर्तव्या महती फणा!" या म्हणीप्रमाणें दुसऱ्यास

हट्टासच पेटले. थोड्या दिवसानीं ते सर्व लोक मिळून जुनें साढपूर नावाच्या गावीं आपसात मसलत करण्यासाठीं जमल्याची खबर सरकारात आल्यावरून त्याना विजापूर या तालुक्याच्या गावीं बोलाविण्यात आलें. प्रथम हा ना करता, अखेर त्याच्यापैकींचे तीनशें पासष्ट लोक धनुष्यबाण व तरवारी बंदुका घेऊन तेथें हजर झाले. याशिवाय दुसरे चारशें लोक हत्यारें घेऊन विजापुरच्या हमरस्त्यावर जमा झाले. यानंतर लवकरच अशीहि बातमी आली कीं, सरदारपूर या नावाच्या गांवीं आणखी तीन हजार लोक जमून त्यानीं दारूगोळा एकत्र केला आहे. पुढें १४ डिसेंबर रोजीं या लोकानीं सरकारात एक अर्ज करून आपण आपल्या गावचे स्वतंत्र मालक असल्यानें आपल्या गावची मोजणी करण्याचा अधिकार सरकारास नसल्याबद्दलची हकीकत निवेदन केली. ता. २२ डिसेंबरच्या सुमारास पोलिसाकडून असा रिपोर्ट आला कीं, प्रसंग पडल्यास जबरदस्तीनें सरकारी कामास विरोध करण्याचा बेत या लोकानीं केला आहे. तथापि यापुढें आणखी काहीं महिनेपर्यंत यासबंधाची वाटाघाट चालूच होती. नंतर ता. ११ एप्रिल १८९८ रोजीं सरकारनें पिलवाई गावाची मोजणी प्रथम करण्याचें ठरविलें, व त्यासाठीं अनोपराम नावाच्या मोजणीदारास इतर माणसासह तेथें पाठविण्यात आलें. पण त्याला विरोधी लोकाकडून धावदपटशा देण्यात आला. त्यावरून पोलिसानीं त्याला धमकी देणाऱ्या मनुष्याना पकडलें. त्याबरोबर तीनशें सशस्त्र रजपूत लोकानीं चावडीवर हुमला करून तेथील सरकारी नोकरावर काठ्यानीं व तरवारींनीं हल्ला केला व लगेच इतर आकडिया गावचे लोक एकत्र जमून त्यानीं सरकारशीं शेवटपर्यंत लढण्याच्या शपथाआणा घेतल्या. ही हकीकत कळताच त्या प्रांताचे सुभे रा. वणीकर यानीं विजापुरला असलेली ल्हानशी फौज बोलावून घेऊन दंगेखोराविरुद्ध तिचा उपयोग करण्याची परवानगी दिवाणाकडे तारेनें मागितली त्या तारेच्या उत्तरात दिवाणानीं कळविलें कीं, लोकाविरुद्ध फौजेचा उपयोग करणें हें फार

# प्रकरण २१ वें

—•• ••—

## भौतिक व दैविक आपत्ति

पिलवाईच्या दग्याचा प्रतिध्वनि बडोदें राज्यात कोठें शात होत आहे, तोच प्लेगच्या धामधुमीला सुरुवात झाली. त्या गोष्टीला आता लवकरच चाळीस वर्षें पुरीं होतील. या अवधींत तो रोग हिंदुस्थानच्या लोकाच्या इतक्या परिचयाचा झाला आहे कीं, त्यासबधाची हकीकत आता प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकात नमूद करणें म्हणजे विचित्रच वाटणार आहे. तथापि सन १८९६ च्या मे महिन्यात मुबई शहरीं प्रथम जेव्हा प्लेगच्या काहीं तुरळक केसीस झाल्या, त्या वेळीं त्या काळापर्यंत माहीत असलेल्या कोणत्याहि तापाच्या सदरात त्याचा समावेश तज्ज्ञाना करता न आल्या-मुळें, तो एक नवीन व म्हणूनच अधिक भयकर रोगाचा प्रकार लोकाना भासला. आरभीं बडोदें राज्यातील कडी विभागात या रोगाने काहीं रोगी दगावले, परतु तें समजण्यात न आल्यामुळें त्याच्या मृत्यूचें कारण अज्ञातच राहिलें. परतु मुबईस या रोगाची साथ जेव्हा जोरानें पसरली, तेव्हा तेथून पारशी व गुजराथी लोक बडोदें राज्यातील नवसारी, बिलिमोरा, गणदेवी वगैरे आपआपल्या गावीं परत आले. त्याच्याबरोबर ही साथ बडोदें राज्यात आली. नवसारीस प्लेगची म्हणून परीक्षा झालेली पहिली केस ता. १ ऑक्टोबर १८९६ रोजीं झाली. नवसारी प्रातातील बहुतेक तालुक्यात ही साथ लवकरच पसरली व स्थानिक लोकहि तिला बळी पडू लागले. फक्त नवसारी शहरात मात्र तेथील सुभे

रीतीनें ते युद्धास तयार झाले. त्यांना आपल्या यशाची इतकी पूर्ण खात्री वाटत होती कीं, आपला जय झाल्यानंतर आपल्यापैकींच्या नारजी नानाच्या टाकोरास राजा करण्याचें व गभीरजी नांवाच्या दुसऱ्या एकास मुख्य प्रधान करण्याचेंहि त्यांनीं ठरवून टाकिलें !

इतकें झाल्यावरहि धामणस्कर, वणीकर, निंबाळकर वगैरे अधिकाऱ्यांनी त्यांना निरोप पाठवून त्यांच्या भयंकर वर्तनाची जाणीव त्यांना करून दिली, व अजूनहि तुम्ही शरण याल तर सरकार तुमच्यांवर रहीम नजर करील असें कळविलें. तथापि त्या लोकांनीं त्याकडे लक्ष दिलें नाहीं. यामुळें अखेरीस नाइलाजानें त्यांच्यांवर हल्ला करण्याचा हुकुम देण्यांत आला.

कर्नल निसन हे आपल्या फौजेसह ता. २७ मे १८९८ रोजीं विजापुरास जाऊन पोहोंचले. परंतु तेथें गेल्यावर त्यांनीं आपला दारूगोळा तपासला, तो अगदींच हलक्या प्रकारचा असल्याचें त्याच्या नजरेस आलें. त्यावरून त्यांनीं सरसुभे यांजकडे यावद्दल लेखी कळविलें कीं,

> "दंगेखोरांना जिंकण्याइतके लोक आमच्याजवळ असले, तरी आमचीं हत्यारें त्या कामीं अगदींच निरुपयोगी आहेत. आमच्या बंदुका जुन्या व कुचकामाच्या म्हणून रद्दी ठरविण्यांत आलेल्यापैकींच्या आहेत, व त्याचा पल्लाहि अगदीं अपुरता आहे. दंगेखोर उघड्या मैदानावर आले तर ठीक आहे, परंतु ते आश्रयाच्या आड दडून बसल्यास तेथें आमच्या हत्याराचा कांहीं उपयोग होणार नाहीं. यासाठीं सरकारनें आम्हाला योग्य अशा हत्यारांचा व दारूगोळ्याचा पुरवठा केला, तरच आपल्याला जय मिळेल; नाहीं तर यशाबद्दल खात्री देतां येणार नाहीं. अशा प्रसंगीं अपयश आलें तर तें केवळ फौजेलाच नव्हे, तर सरकारालाहि फार घातक होणार आहे. याखेरीज आमच्याजवळ दारूगोळा वाहून नेण्यासाठीं गाड्या, सामानाच्या वाहतुकीस वाहनें अथवा इतर अनुयायी लोक, या सर्व गोष्टींचीच वाण

" प्लेग नाबूद करण्याचे सरकारचे सर्व प्रयत्न लोकांच्या कृतींनीं अधिक कठिण होऊन बसतात लोक प्लेगचे रोगी लपवितात अथवा तपासणीच्या भीतीने त्याना एका ठिकाणाहून दुसरीकडे हलवून रोगाचा नवीन मोहल्यात प्रसार करितात सरकारला तर ते नवीन केस लागल्याची खबर देत नाहींतच, उलट खोटी व भलतीच खबर देतात सरकारच्या हेतूचा व इलाजाचा ते विपर्यास करतात त्याच्या तील जे लोक स्थलांतर करण्याइतके सपन्न असतात, तेहि बहुश या रोगाने एखादा रोगी घरात लागल्यावर अडाणी लोकांप्रमाणेंच वर्तन करितात व त्यामुळे दुसऱ्या गावीं ही साथ पसरवितात एखाद्या ठिकाणीं मृत्यु झाल्यास त्याची खबर ते देत नाहींत व पुष्कळ वेळा मयत इसमाची विल्हेवाटहि ते परस्पर करून टाकितात "

त्या वेळीं या रोगाचा प्रथम प्रसार उदरात होतो व त्याच्यामार्फत तो मनुष्यात होतो, या गोष्टीची माहिती कोणासहि नव्हती प्लेगप्रतिबंधक लशीचा शोध तर तेव्हा लागलेलाच नव्हता, तो यापुढे लागला त्या वेळीं तो प्रयोगावस्थेंत होता प्लेगची लस शोधून काढणारे डॉक्टर हाफ्किन याना ता १६ जानेवारी १८९७ रोजीं हिंदुस्थान सरकारकडे केलेल्या रिपोर्टांत त्यानीं या प्रयोगाची माहिती प्रथम दिली आहे प्लेगची लस टोंचण्याचा प्रयोग इतरावर करण्यापूर्वी डॉ हाफ्किन यानी तो स्वत वर करून पाहिला त्यानतर मुबईतील भायखळ्याच्या तुरुगातील रोग्यावर प्रयोग करता तो साधारणत यशस्वी होतो, असे त्याना आढळून आलें त्यावरून त्याबद्दलची माहिती त्याच्याकडून घेण्यासाठीं बडोद्याहून डॉ चिटणीस याना बडोदें सरकाराकडून मुबईस पाठविण्यात आलें त्यापूर्वीहि बडोदें म्युनिसिपालिटीचे हेल्थ ऑफीसर डॉ कूपर हे याबद्दलची माहिती मिळवून आले होते तथापि ही पद्धति नवीन असल्यामुळें तिचा उपयोग बडोदे सरकारनें फार सावधगिरीने करण्याचे ठरविलें येथेंहि सन १८९८ च्या जानेवारी महिन्यात पाचशें कैद्यावर प्रथम प्रयोग करण्यात आला, त्याचा

गावातून दंगेखोर पळू लागताच सरकारी फौजेनें लढाई बंद केली, व प्रथमतः आग लागलेल्या घरातून वाचविता येईल इतकी मालमिळकत काढण्याच्या उद्योगाला त्यानीं सुरुवात केली. नंतर लगेच आग विझवि-ण्याचा बंब आणून त्याचा उपयोग करण्यात आला.

या एकदर झटापटींत दंगेखोरांपैकींचे एकंदर ११ लोक जागच्या जागीं मारले गेले व जखमी झालेले दोन इसम पुढें दवाखान्यात नेण्यात आल्या-वर मरण पावले. याशिवाय आठ जखमी झालेल्या लोकाची दवाखान्यात व्यवस्था करण्यात आली. सरकारी फौजेपैकीं ५ लोक जखमी झाले. येणें प्रमाणें ही ल्हानशी लढाई समाप्त झाली.

याच्या दुसऱ्याच दिवशीं महाराणी जमनाबाईसाहेब बाईजवळ मेणवली मुक्कामीं होत्या, तेथें त्याना महाराजानीं पत्र लिहून कळविलें कीं,

"पिलवाईच्या तट्याचा शेवट चागल्या प्रकारें झाला. काल रोजीं पिलवाई गाव काबीज केलें."

यानंतर फौजेनें दंगेखोरांपैकीं कित्येकाना कैद केलें व इतराना मागा-हून पोलिसानीं पकडलें व पिलवाई हें गाव ता. ७ जूनच्या जाहिर-नाम्यानें खालसा करण्यात आलें. या पकडलेल्या लोकाची चौकशी करण्यासाठीं रा. ब. शारंगपाणी याची स्पेशल जज्ज म्हणून नेमणूक करण्यात आली व तींत दोषी ठरलेल्या आरोपींना जन्मठेपेपासून उतरत्या दर्जाच्या शिक्षा देण्यात आल्या.

या पिलवाई प्रकरणानिमित्त सरकारास सुमारें पावणे दोन लक्ष रुपयावर खर्च आला.

या एकदर प्रकरणाचा विचार करता हा शोचनीय प्रकार केवळ गैर-समजुतींमुळें व खटपटी लोकाच्या चिथावणीमुळें घडून आला, असें दिसून येतें. ता. २० जून १८९८ रोजीं मि. ईलियट याना लिहिलेल्या पत्रात महाराजानीं यासबंधाची हकीकत कळविली आहे, त्यात ते स्पष्ट लिहितात कीं,

साठीं या स्वतंत्र रोगाचे दवाखाने उघडले गेले व संशयित लोकांसाठीं झोपड्या बांधण्यात आल्या याशिवाय डॉ लाउसन्, मिल्न्, क्लेगहॉर्न्, डायसन्, हार्वे, वगैरे युरोपियन तज्ज्ञ डॉक्टरांना वेळोवेळीं या राज्यात बोलावून आणवून, त्यांच्याकडूनहि वैद्यकीय सल्ला घेण्यात येत होता

सरकारकडून घेण्यात येणारे हे इलाज लोकांना अप्रिय व जाचक वाटले, तरी बडोदे राज्यातील प्रजा साधारणत गरीब स्वभावाची असल्यामुळें, ब्रिटिश राज्यातील काहीं भागाप्रमाणे इकडे दंगेधोपे वगैरे काहीं झाले नाहींत या वेळीं महाराजांना या रोगाच्या प्रतिबंधासाठीं जरूर त्या खर्चाच्या रकमा वेळोवेळीं मंजूर केल्या, इतकेंच नव्हे तर सन हेल्थ कॅंपामधून स्वत हिंडून त्यांनीं लोकांच्या तक्रारी व गैरसोयी जातीनें ऐकल्या गरीब व अनाथ लोकांना या कॅंपातून मोफत खिचडी वाटण्याचा त्यांनीं हुकूम दिला त्या वाळीं प्लेगची जरब लोकांना इतकी बसली होती कीं, प्लेगाच्या कॅंपातून हिंडणें म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूच्या कराटाळ्याप्रमाणें त्यांना वाटत होतें परंतु या रोगाची भीति महाराजांच्या मनास मुळींच शिवली नाहीं

अशा प्रसंगीं आपल्या राज्यातील प्रजेंत असल्या भयंकर रोगाचा प्रसार होऊं नये अशी काळजी खरोखर जर कोणास असावयाची, तर ती तेथील राजासच होय यांत इतरांचा संबंध काहीं येऊं शकत नाहीं असे असता अशा प्रकरणीं सुद्धा ब्रिटिश रेसिडेंटाचा बीचमें मेरा चांदभाई असा प्रकार सुरू झाला वस्तुत बडोदे राज्यातून जर प्लेगचे रोगी ब्रिटिश राज्यात जाऊन तेथें या रोगाची साथ पसरवतील अशी ब्रिटिश अधिकाऱ्यांना भीति वाटली असली, तर त्यांनीं आपल्या राज्यात बाहेरून येणाऱ्या लोकांची तपासणी करण्याचे, त्यांना अटकाविण्याचे वगैरे नियम केलेलेच होते तरीहि बडोदें राज्यात प्लेगप्रतिबंधक उपायांची बजावणी बरोबर होत आहे कीं नाहीं हें पाहण्याची जबाबदारी जणू काय आपल्यावरच आहे अशा समजुतीनें त्यांनीं या बाबतीत साम्राज्यरक्षणाचें मोठें नाव

मारण्याइतकें विष नसलें, तरी त्याना दटाविण्याइतकी फणा असल्यानें सर्पाचें काम भागतें. परंतु राज्याची तिनकीहि स्थिति नसल्यास त्यातील राजसत्ता केवळ नामधारी बनून जाते. वस्तुतः महाराजाच्या दीर्घ कारकीर्दीत दंगेखोराविरुद्ध हत्यार चालविण्याचा हा एकच प्रसंग त्याना आला. यावरूनच त्याच्या राज्यकारभाराच्या मनमिळाऊ धोरणाची खात्री होण्यासारखी आहे. त्यामुळें या दंग्याचा उपयोग आपल्या सत्तेच्या दुर्बलतेची जाणीव त्याना स्पष्ट करून देण्यापुरता मात्र झाला. बरे वाईट अनेक प्रकारचे प्रसंग आल्यानेंच मनुष्याला व विशेषत राज्यकर्त्याला अनुभव येऊन, त्याला आपल्या वर्तनाचें सुकाणू योग्य दिशेस फिरविण्याचें ज्ञान येतें. तसाच प्रकार या वेळींहि घडून आल्यानें महाराजानीं या प्रसंगाचा फायदा घेतला. यामुळें तेव्हापासून सुदैवानें पुढें केव्हाहि त्या प्रकाराची पुनरावृत्ति होण्याचा प्रसंग त्याना आला नाहीं.



व म्हणून त्यांनीं ता. २७ मे या महाराजाच्या राज्यारोहणाच्या दिवशीं शहरात दीपोत्सव करून आपला आनद प्रदर्शित केला.

या काळानतर बडोदें राज्यात आरोग्यविषयक सुधारणा इतक्या जोरानें करण्यात आल्या आहेत कीं, गेल्या अडतीस वर्षांत दोन तीनच वेळा प्लेगाचा प्रादुर्भाव इकडे झाला व त्यावेळींहि तो फार कमी प्रमाणात झाला.

अशा रीतीनें अखिलभारतीय सकटापैकींच्या एका मोठ्या सकटानें बडोद्यास या काळीं आपली पायधूळ झाडली, तरी त्याचा प्रतिकार वेळींच झाल्यामुळें, त्यानें फारसें उग्र स्वरूप धारण केलें नाहीं. परतु त्याच्या मागून त्याचे वडेभाई लवकरच आले, त्यांनीं मात्र सर्व हिंदुस्थानाप्रमाणें या राज्यातहि मोठा कहर करून सोडला. तें सकट म्हणजे सन १८९९–१९०० चा भयकर दुष्काळ हें होय. इकडील वर्षगणना सवतपद्धतीनें होत असल्यानें व या पद्धतीनें तें साल १९५६ हें येत असल्यानें, हा दुष्काळ 'छप्पनिया' या नावानें या भागात प्रसिद्ध झाला आहे.

गुजराथ देश व त्यातलाच भाग असलेलें बडोदें राज्य सुपीक प्रदेश म्हणून प्रसिद्ध आहे. सन १८७७–७८ सालीं हिंदुस्थानच्या दक्षिण भागात पडलेला भयकर दुष्काळ गुजराथेला नुसता चाटूनच गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यामुळें त्याच्या तीव्रतेचें स्मरण या प्रातात फारसें असण्याचें कारण नव्हतें. शिवाय त्या गोष्टीला पुष्कळ काळ लोटून गेल्यामुळें, त्याची स्मृति लोकाना थोडीशी असल्यास तीहि अगदीं अधुक होऊन गेली होती. अशा स्थितींत सन १८९९ सालीं दुष्काळ पडण्यापूर्वी प्रथम सगळीकडे मुसळधार पर्जन्यवृष्टि झाली, त्यामुळें ओला दुष्काळ पडण्याची भीति लोकाना वाटू लागली. परतु पुढें त्याच्या दुसऱ्या वर्षीं ज्या वेळीं पावसाळ्याच्या दिवसात पावसाचें यत्किंचित्हि चिन्ह दिसेना, त्या वेळीं मात्र त्याना खऱ्या कोरड्या दुष्काळाची चिंता वाटू लागली. त्या वर्षाचे जुलै व ऑगस्ट हे महिने ठणठणीत कोरडे गेले. सप्टेंबरमध्यें

कै. गणेशराव जाधव यांच्या परिश्रमामुळे व सावधगिरीमुळे या रोगाचे पाऊल फारसें पुढें पडू शकलें नाहीं. त्यांनीं या विकाराचे रोगी शोधून काढून त्यांना निराळे ठेविण्याची व्यवस्था ताबडतोब केली. त्याचप्रमाणें त्यांनीं शहरांत स्वच्छता ठेऊन, पिण्याच्या पाण्याचा नवीन पुरवठा बापूसाहेबाच्या इलेर्डीतील तार्जे पाणी विहिरींतून पपानें काढून केला. पुढें या रोगाचा प्रसार सर्व राज्यभर झाला, त्या वेळीं या रोगाचा नायनाट करण्यासाठीं उपयोजिण्यांत आलेले सर्व इलाज प्रजेस अप्रिय व त्यांच्या सामाजिक आणि धार्मिक समजुतींना धक्का देणारे असेच होते. घरांतील सर्व सामान काढून टाकून तें धुणें, घरांना चुना देणें, रोग्यांना त्यांच्या आप्तइष्टांपासून दूर नेऊन ठेवणें, अगर या रोगासाठीं स्वतंत्र बांधलेल्या झोंपड्यांतून त्यांची व्यवस्था करणें, बाहेर गांवाहून येणाऱ्या उतारूंपैकीं कोणास या रोगाचा विकार झाला आहे किंवा काय याची परीक्षा करण्यासाठीं त्यांना क्वॉरंटाईनमध्यें दहा दहा दिवस अटकावून ठेवणें व आगगाडींतून जातांना मध्येंच एखाद्या स्टेशनावर सर्व उतारूंना उतरवून त्यांची तपासणी करणें व त्यांचे सर्व कपडे उकळविणें, हे सर्व उपाय सद्हेतूनें अंगीकारलेले असले, तरी त्यांची अमलबजावणी लोकांना अत्यंत दुःसह वाटली. त्यांत तिचा असह्यपणा अमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांवर विशेषच अवलंबून राही. त्या वेळीं बडोदें प्रांतांत डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट कै. वासुदेव महादेव समर्थ हे होते. त्यांचा तो वाघासारखा उग्र चेहरा, त्याहून उग्रतर असा त्यांचा आवाज व त्यांचें कडक वर्तन, यामुळें तर लोकांना फार त्रस्त झाल्यासारखें वाटलें. उलटपक्षीं आपण लोकांच्या कल्याणासाठीं चांगल्या हेतूनें ही सर्व उपाययोजना करीत असतांना लोक आपल्याला मदत करीत नाहींत, इतकेंच नव्हे तर आपल्या मार्गांत आणतां येतील तितक्या अडचणी आणतात, अशी समर्थांची तक्रार होती. ते आपल्या रिपोर्टांत लिहितात कीं,

देण्याबद्दलचे हुकूम त्यांनी सोडले. निर्वाहासाठीं दरेक निराधार व्यक्तीला रु. ३० पर्यंत देण्याचा हुकूम देण्यात आला. इतरत्र सढळ हातानें तगावी-देण्याबद्दल त्यांनीं आज्ञा केली. जुन्या काळच्या ग्यारमी, सदावर्ते, खिचडी वगैरेसारख्या दानधर्माचा ओघ या कामाकडे लावण्याचें त्यांनीं ठरविलें. याप्रमाणें व्यवस्था करून महाराजांनीं प्रथम कडी प्रांतात जाऊन तेथील वस्तुस्थिति आपल्या नजरेखालीं घातली या प्रांतात व यापुढें राज्यातील बाकीच्या प्रांतातहि प्रवास केल्यावर त्याना जी वस्तुस्थिति दिसली, तिचे प्रत्यक्ष वर्णन व तिच्यावरून सुचलेले विचार त्यांनीं स्वतंत्र रूपानें छापवून प्रसिद्ध केल्यामुळें, तत्कालीन पुरावा म्हणून या पुस्तकाचें फार महत्त्व आहे. 'दुष्काळाच्या ठिकाणीं जाऊन गरीब बिचाऱ्या अनाथ लोकाना प्रश्न केल्यावर ते निरागस शेतकरी आपलें पोट उघडें करून आपल्या आयुष्यातील सुखदु खाची व रागद्वेषाची कहाणी मजजवळ मोकळेपणानें सागत,' असा महाराजानी आपला अनुभव त्यात लिहून ठेविला आहे. या फिरतींत त्याच्या अत करणात उद्भवलेल्या विचाराचें व दृष्टोत्पत्तीस आलेल्या हाल्अपेष्टाचें वर्णन कित्येक प्रसगीं डोळ्यातून पाणी आणणारे आहे त्याचें एक उदाहरण येथें देत आहो महाराज म्हणतात —

" आगगाडींतून डभोईजवळ येताच मी खिडकींतून बाहेर पाहिलें, तो त्या गांवच्या ऐतिहासिक व पुराणसशोधनाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या असलेल्या दगडाच्या जाड भिंती माझ्या दृष्टीस पडल्या, व त्याना पाहून त्याचा पूर्वकाल माझ्या नजरेसमोर उभा राहिला त्या वेळीं मजुरी स्वस्त असे, व धान्याची सुबत्ता असे निसर्गच जेव्हा कोपे, तेव्हा अर्थात् त्या वेळींहि पुष्कळ लोक मरत, परतु हल्लींच्या तीव्र वर्गकल्हाच्या काळापेक्षा त्या काळीं लोकात औदार्य अधिक असल्यामुळें निराधाराचे कष्ट पुष्कळसे कमी होत असत वाहतुकीचीं साधनें त्या काळीं कमी असल्यानें नित्याच्या उपयोगाला लागून उरणारें धान्य लोक साठवून ठेवीत, त्याचा दुष्काळाच्या प्रसगीं उपयोग होत असे "

परिणाम अनिष्ट झाल्याचें दिसून आलें नाहीं पुढें फेब्रुआरींत स्वत डॉ हाफ्किन हे बडोद्यास आले व त्यानीं येथील लोकाना त्यासंबंधी माहिती दिली या प्रयोगाचा सुपरिणाम दिसून आल्यावर, हलके हलके लोक त्याचा अवलंब करू लागले. तरीहि शहराखेरीज इतर गावठ्यांतून हा उपाय यापुढें बरींच वर्षेपर्यंत लोकप्रिय झाला नाहीं

या साथीचा प्रसार अटकाविण्याचा सर्वांत सोपा उपाय म्हणजे अशा रोग्याना इतरापासून दूर नेऊन ठेवणें हा होय परंतु लोकाना तो साहजिकच अस्वाभाविक व निर्दयपणाचा वाटला व त्याविरुद्ध अनेक वड्या लोकात पसरल्या कोणी म्हणत कीं, आमचा बंदोबस्त फार चागला आहे असें जगाला दाखविण्यासाठीच सरकार अशा रोग्याना त्याच्या मायेच्या आप्तेष्टातून उचलून खेंचून नेतें, तर कोणी असेंहि म्हणत कीं, या रोगाने लागलेल्या रोग्याना दूर नेऊन त्याना विष पाजून याची वाट लावण्याचा सरकारचा विचार आहे म्हणून प्लेगच्या अधिकाऱ्याना व रोग्याचा तपास करणाऱ्या नोकराना लोक राक्षसाप्रमाणें मानीत डॉक्टरास तर ते यमदूतच समजत

या बाबतींत केवळ लोकच सर्वस्वीं दोषी होते असें नव्हे, तर डॉक्टरासारखे तज्ज्ञ अधिकारी सोडून दिले तर, बाकीचे सरकारी नोकरहि या कामात अनभिज्ञ असल्यामुळें त्यानाहि सरकारी उपायाची बजावणी बरोबर करता येत नसे यामुळें त्याच्या हातून अशा कामीं जोरजबरदस्ती होण्याच्या भीतीनें लोकहि त्याना फसविण्याचा प्रयत्न करीत एके ठिकाणीं अशा भीतीनें मयत झालेल्या इसमास बसता करून, त्याच्याशीं इतर लोक पत्ते खेळत असल्याचा देखावा सजविण्यात आला होता तर दुसऱ्या एका मयताशीं त्याचे नातलग गप्पा मारीत बसले आहेत असा देखावा तयार करण्यात आला होता तथापि सरकारला या वेळीं योग्य वाटली ती व्यवस्था त्यानीं शक्य तितकी चागली केली स्पेशल प्लेग ऑफिसर म्हणून डॉ धुरधर याची योजना करण्यात आली निरनिराळ्या जातीं

पानहि हलत नव्हतें. नील व विशाल आकाशात एखाद्या घारीच्या पखाचें फडफडणेंहि ऐकू येत नव्हतें. शहरात माणसाच्या रहदारीचा गजबजाट मुळींच नव्हता. एखाद्या मंदिरातील घंटेचा नादहि ऐकू येत नव्हता. प्रत्यक्ष परमेश्वरच कोपल्यामुळें त्याचीं घाबरलेलीं अपत्यें विचारीं साधींकोर्दीत दडून राहिल्याप्रमाणें मूक झालीं होतीं. निसर्गाच्या इतर सर्व शक्तींना मार्गे सारून सूर्यानें आपल्या असह्य उष्णतेचा अमल सर्वत्र बसविला होता व पृथ्वी हीनदीन होऊन त्याच्या पायाशीं लोळत पडली होती. लोककल्याणासाठीं आपल्या उदरात निरंतर फलधान्यादि धारण करणारी ती भूमाता आज स्वत च रुक्ष होऊन थोड्याशा उदकासाठीं आतुर झाली होती. चोहोकडे लांबवर दृष्टि फिरविली तरी गवताची एखादी काडी अथवा झाडाचें एखादें पानहि कोठें दिसत नव्हतें. सगळीकडे शुष्क, रुक्ष व पांढराफटक असा तिचा पृष्ठभाग सूर्याच्या तापानें भाजून निघाला होता. फक्त झाडें तेवढीं पर्णहीन असलीं, तरी जर्जर वीराप्रमाणें सूर्याला न जुमानता ताठ उभीं होतीं."

इतक्यात स्टेशनावरील सरकारी अधिकाऱ्यानीं महाराजाचें स्वागत करून त्याना जवळच्या एका अनाथगृहात नेलें तेथील देखावा महाराज असा वर्णन करतात —

"तेथें सुमारें दोनशें मुलें व बायका ठेविलेल्या होत्या. त्याच्या हाडाचे नुसते सापळे बनलेले होते, चामडी सुरकुतून गेली होती, व डोळे निस्तेज होऊन खोल गेले होते. त्यातील पू काढण्याची सुद्धा शक्ति त्याच्यात न उरल्यामुळें, त्यावर हजारों माशा घोंघावून त्याना त्रास देत होत्या. येणाऱ्या जाणाऱ्याच्या अस्तित्वाचें जणू काय या लोकाना भानच नव्हतें. अधिकाऱ्याना मान दर्शविण्याचें काम त्यानीं अधिक निस्तब्ध होण्यानेंच केलें. कदाचित् आपले हात उचलून त्यानीं ते जोडले असते, पण तितकीहि शक्ति त्याच्यात उरलेली

देऊन, त्या प्रकरणीं आपला वरिष्ठ अधिकार गाजवून घेण्यास कमी केलें नाहीं. त्याबद्दल महाराजांनीं सन १८९९ च्या मे महिन्यातील एका पत्रात खोंचदार भाषेनें लिहिलें आहे कीं,

"दुर्दैवानें आमच्या इकडे गेले कांहीं महिने प्लेग जारी होता, तो आता कमी होऊं लागला आहे व लवकरच नाहींसा होईल, अशी आशा वाटूं लागली आहे. तसें झाल्याबरोबर लोकावर नाइलाजानें घातलेले प्रतिबंध आम्ही आनंदानें काढून टाकूं. वास्तविक लोकाना हे प्रतिबंध फार जाचक वाटत आहेत, तरी ते बिचारे सरकारी हुकुमाना इतका मान देतात हें पाहून खरोखर त्यांची कींव येते. रेसिडेंटसाहेब या प्रकरणीं विशेष लक्ष घालीत आहेत, व ही एक साम्राज्यविषयक बाबत आहे असें म्हणून प्लेगाविरुद्धच्या इलाजाची बजावणी बडोदें राज्यात कसून होत आहे किंवा नाहीं हें पाहणें आपलें काम आहे असें त्याना वाटतें. या त्याच्या वृत्तीमुळें मोठी अडचणीची स्थिति प्राप्त होते. त्याच्या सूचनेंत यत्किंचित्‌हि फरक इकडे झाला, तरी कित्येक वेळेला त्याचे परिणाम गंभीर होण्याचा संभव असतो व आमच्या अधिकाऱ्यांना त्याच्याशीं जरासा मतभेद दर्शविला, तरी तसें करणें अयोग्य मानलें जातें. तथापि आम्ही आपल्या परीनें तक्रारीला कोणतीहि सबब न देण्याची काळजी घेत आहोंत."

सुदैवानें बडोद्यातील प्लेग लवकरच ओसरूं लागला व मे महिन्याचा उन्हाळा सुरू होताच, तो झपाट्यानें नाहींसा होण्याच्या मार्गास लागला. पुढें तो संपूर्ण नाहींसा झाल्यावर, लोकांनीं आनंदप्रदर्शनार्थ एक मोठा समारंभ ता. १९ मे १८९८ रोजीं बडोद्यास केला. त्या वेळीं बडोद्याचे नगरशेठ मगनभाई पुरुषोत्तम हरिभक्तिवाले यांनीं अध्यक्षस्थान शोभित केलें होतें. त्या वेळीं महाराजांनीं या कठिण प्रसंगीं दाखविलेल्या प्रजावात्सल्याबद्दल त्याचे आभार मानण्यात येऊन, त्याना लोकांतर्फे मानपत्र देण्यात आलें. इतकें करूनहि लोकांचें समाधान झालें नाहीं

अमरेळी प्रातानतर बडोदे प्राताची तपासणी करून महाराज नवसारी प्रातात गेले. तेथील पाढरपेशा वस्तीबरोबरच 'काळी प्रजे'ची वस्ती तेथें पुष्कळ आहे. या लोकाची स्थिति इतर लोकाहून पुष्कळ भिन्न असून, त्याच्या चालीरीती, कपडेलत्ते, आचारविचारहि अगदीं निराळे आहेत. हे लोक डोक्याला मुडासे कधींहि घालीत नाहींत, बाहेर जाताना एक लहानसा पंचा नेसतात, व घरीं तर फक्त एक लगोटी घाडून डोक्याला एक चिंधी बाधतात. त्याच्यातील स्त्रिया अगात काहींच घालीत नाहींत. गळ्यात काचेच्या मण्याच्या माळा व हातात कोपरापर्यंत पितळेच्या बागड्या घालतात. मुलें तर अगदीं दिगबर स्थितींतच राहतात. या लोकात मत्रतत्र जादूटोणा वगैरेचे वेड फार आहे. मरीआईच्या मिरवणुकीचा दौरा काढून त्यात हे लोक दारू पिऊन दिवसच्या दिवस नाचत राहतात. याच्यात पोटजाती पुष्कळ असून, त्यातील भेदहि फार तीव्र असतात. दुबळे, घाणके, चौधरे, नायकडे, भिल्ल व कोकणी हे याच्यातील मुख्य वर्ग असून, त्याच्या बोलींत मराठी व गुजराथी भाषेचें मिश्रण झालेलें आहे. याचे खाणें अगदीं कनिष्ठ प्रकारचे असून, त्यात कदफळेंमुळे व झाडाचीं पानेंफुलें याचा भाग बराच असतो. या लोकाच्या खाद्यविषयक गरजा मूळच्याच फार कमी असल्यामुळें, इतराच्या मानानें त्याना दुष्काळामुळे कमी त्रास झाला होता. तथापि त्याना अवश्य ती मदत देण्यात आली.

या एकदर प्रवासात पाटबधाऱ्याचीं कामें, विहिरी खणणें, वगैरे प्रकारानीं लोकाना पाण्याची तरतूद करून देण्याची व्यवस्था करण्यात आली, धान्य वाटून त्वरित प्राणरक्षणाची व्यवस्था लावण्यात आली, मजुरीचीं नवीं कामें काढून लोकाना उद्योग पुरविण्यात आला, तगावी देऊन त्याना मदत करण्यात आली, व इतर ज्या ज्या प्रकारानीं लोकाचे हाल कमी करतां येण्यासारखे होते, त्या सर्व प्रकाराचा अवलब करण्यात आला. राजा बोले व दळ हाले अशी म्हणच आहे, त्याप्रमाणें

पावसाचे थोडेसे शिंतोडे आले; परंतु दुष्काळाचें स्वरूप अधिक भीषण करून टाकण्यापलीकडे त्यांनीं कांहीं केलें नाहीं. ऑक्टोबरमध्यें हें स्वरूप फार भयंकर झालें. गुरें हजारोंनीं व माणसें शेंकडोंनीं मरूं लागलीं, व दुष्काळाची पकड सर्व देशभर पुरी बसली.

या संकटाची जाणीव भासूं लागतांच, बडोदें सरकारनें त्याच्या प्रतिकारार्थ तजविजीला सुरुवात केली. ब्रिटिश हिंदुस्थानांत सन १८८० सालीं दुष्काळाचा कायदा करण्यांत आला होता, पण तो अनेक दृष्टींनीं अपूर्ण होता. तरी पण अशा प्रसंगीं करावयाच्या गोष्टींचा कच्चा खर्डा म्हणून त्या वेळीं तोच काय तो उपलब्ध होता. त्यामुळें त्याचाच आधार घेऊन राज्यांत सर्व ठिकाणीं दुष्काळनिवारणार्थ उपाय योजण्यास सुरुवात झाली. या प्रसंगीं प्राप्त झालेल्या संकटाचें भयंकर स्वरूप लक्षांत घेऊन महाराजांनीं आपल्या राज्याच्या चारहि प्रांतांत स्वतः फिरण्याचा निश्चय केला. साधारणतः बडोदें राज्याचा सर्वांत दक्षिणेकडील प्रांत जो नवसारी, त्यांत सर्वांत अधिक पाऊस पडतो व तो क्रमाक्रमानें बडोदें प्रांत, कडी प्रांत, व अमरेली प्रांत यांतून कमी कमी होत जातो. या धोरणानें उत्तरेकडील कडी प्रांताची सर्वांत हलाखीची स्थिति जाणून महाराजांनीं प्रथम या प्रांतांत प्रवास करण्याचें ठरविलें.

ऑगस्ट महिन्यांत दुष्काळाचीं प्रथम चिन्हें जाणवतांच त्यांनीं स्वतः फॅमिन् कोड काळजीपूर्वक वाचून त्याला जरूर तेथें पुरवणी जोडून तो तयार केला, व त्या धोरणानें लोकांना मदत देण्यासाठीं अधिकाऱ्यांचीं स्वतंत्र व्यवस्थामंडळें स्थापिलीं. सरकारी राज्ययंत्र हें जुन्या काळच्या घोड्याच्या ट्रॅमगाडीप्रमाणें प्रथम चालू होण्यास त्रास पडतो, पण एकदां चालू झाल्यावर मात्र तें वहिवाटीच्या लोखंडी रूळांवरून सुरक्षितपणें चालू शकतें. म्हणून दरेक अधिकाऱ्याला आपल्या कर्तव्याचे बारीक नियम समजावून देणारे हुकूम त्यांनीं सोडले. सर्व मुलकी अधिकाऱ्यांना निरंतर आपल्या तालुक्यांतील गांवांतून फिरत राहून जरूर ती मदत लोकांना

प्रमुख आहेत. या उन्हाळ्यात त्याना महाराणींच्या आजारामुळे पुन्हा विलायतेस जावें लागलें आहे. पण आपल्या प्रजेला दुष्काळाच्या पकडींत सोडून जाताना त्याचें मन त्याना आतून खात असेल. अशा वेळीं लोकाना हा चमत्कारिक देखावा पाहण्यास सापडला कीं, परकीय व्हाईसरॉय ( लॉर्ड कर्झन ) आपल्या अनेक कार्यांच्या व्यापातून वेळात वेळ काढून उन्हातान्हात रखडत गुजराथेंतील दुष्काळग्रस्ताची स्थिति पाहत हिंडत आहेत व त्या देशाचा राजा आपल्या त्रस्त झालेल्या प्रजेच्या पैशावर लडन येथे मजा करीत आहे !"

ही वाह्यात् टीका हिंदुस्थानात सर्वांसच नापसत झाली, व तिचा निषेध मद्राससारख्या दूरच्या प्रातातील वृत्तपत्रातूनहि करण्यात आला. उदाहरणार्थ, तेथील 'हिंदु' या पत्रानें पायोनियरला परत टोला मारून म्हटलें कीं,

"राज्यातील मुख्य अधिकारी गैरहजर असता तेथील राज्यकारभार चालविणें हें वाईट तर खरेंच, परतु यासवधीं सस्थानिकाना दोष देताना हिंदुस्थानचे व्हाईसरॉय व त्यातील निरनिराळ्या प्राताचे गव्हर्नर वर्षातील बहुतेक भाग डोगरावरील हवा खाण्याच्या ठिकाणीं घालवितात याचें स्मरण पायोनियरला नसेल ! अशा या गिर्यारोहणामुळेंच मद्रासमधील पाणीपट्टीच्या बिलासारख्या विद्रूप पोराचा जन्म होऊ शकतो. त्याचा जन्म नीलगिरीच्या शीत हवेंतच झालेला असून, त्याचें नामकरण सिमल्याच्या थड वातावरणात झाले आहे ! अशा स्थितींत या अधिकाऱ्याकडे दुर्लक्ष करून आपल्या पत्नीच्या आजारासाठीं परदेशात जावें लागणाऱ्या राजावर टीका करण्यास पायोनियरला काय अधिकार पोचतो."

या भयकर आपत्तीमुळें राजा व प्रजा याचा एकजीव झाला, हें त्यातल्या त्यात दु खातून सुख उत्पन्न झालें. स्वस्थतेच्या वेळीं शासित व शास्ते, भाडवलवाले व मजूर, श्रीमत व गरीब, सुशिक्षित व अशिक्षित, गुजराथी

"या शहराच्या जीर्ण झालेल्या भिंतींना जर वाचा फुटेल, तर त्याचा प्राचीन इतिहास आपल्याला कळून, इतिहासाच्या ज्ञानातील आपलें वैगुण्य त्या योगानें भरून निघेल. अशा अनेक प्राचीन नगराचा मिळून केवढा मोठा चित्रपट आपल्या नजरेसमोर त्यामुळें उभा राहू शकेल! सनोत्तर अकराव्या शतकाच्या वेळच्या या शहराच्या वैभवाचें, त्यातील उद्योगधद्याचें व कलाकुसरींचें, त्यातील लोकांच्या खऱ्या शौर्याला मिळणाऱ्या उत्तेजनाचें, व त्यातील शूर वीरांच्या अनुयायांच्या चित्रविचित्र रणसामग्रीचें किती विलक्षण चित्र आपल्याला पहावयास सापडेल! त्यानंतरच्या मुसलमानी अमदानीतील शूर, गर्विष्ठ, धर्मवेड्या व मूर्तिभंजक लोकांचा व त्यानंतरच्या अल्पकालिक मराठी साम्राज्याच्या अमदानीचा देखावाहि आपल्याला दिसून येईल. येथील मराठ्यांच्या कारभाराचा काळ फार अल्प असल्यामुळें, आपल्या विधायक कर्तृत्वाची छाप या शहरावर बसविण्यास त्यांना पुरेसा अवधीच मिळाला नाहीं या शहराच्या तटाच्या भिंतींच्या आत त्या काळीं दंगे, तुफान, जातिमत्सर, आपसातील यादवी, जन्ममृत्यु, सुखदुःखाचे प्रसंग किती तरी झाले असतील. त्यांचे पडसाद हल्लीं शांत झाले असून, या दगडांत लीन झाले आहेत. नाहीं म्हणावयास सांप्रतच्या भयंकर प्रसंगातील लोकांचे हाल पहात फिरणाऱ्या एखाद्या व्यक्तीच्या अंतःकरणात भावी वैभवाचीं सुखस्वप्नें सुचविण्यास मात्र त्यांचा उपयोग होत आहे."

पण महाराजाच्या या तंद्रीचा भंग त्यांची गाडी डभोई स्टेशनावर थांबताच झाला, व गतकालातीत ती रम्य नगरी, तें सामंतचक्र, व त्या विद्वत् परिषदा इत्यादिकांच्या ऐवजीं त्यांच्या नजरेसमोर जो देखावा दिसला त्याचें चित्रण त्यांनीं खालीलप्रमाणें केलें आहे —

"कडाक्याचें ऊन पडल्यामुळें सर्वत्र निस्तब्धता पसरली होती वाऱ्याची लहानशी झुळूक सुद्धा येत नव्हती, अथवा झाडाचें एखादें

इलाज दुसऱ्या वर्गात येतात. रेल्वे, सडका व इतर वाहतुकीचीं साधनें करविणें हीं या वर्गात येतात. देशातील ज्या भागात दुष्काळ नसेल, अथवा सौम्य स्वरूपाचा असेल, त्या भागातून दुष्काळपीडित भागात धान्य नेता आल्यानें दुष्काळाची तीव्रता पुष्कळ कमी करिता येते. यामुळें अशीं कायमचीं साधनें करून ठेवणें हें अधिक महत्त्वाचें आहे. तथापि सर्वांत अधिक महत्त्वाचें व चिरकालिक साधन म्हणजे, विहिरी खोदणें, पाटबंधाऱ्याचीं कामें करणें, कालवे काढणे, पिण्याच्या पाण्याची योजना करणें, हे होय "

" तथापि या प्रत्यक्ष उपायाखेरीज अप्रत्यक्ष उपायाचाहि विचार केला पाहिजे व त्यात मुख्यत्वें करून आपल्या लोकांच्या मनाची झालेली हीनदीन, दुर्बल व परावलंबी स्थिति सुधारण्याचा विचार येतो. संकटसमयीं हताश होऊन बसण्याच्या या त्याच्या वृत्तीमुळें त्याच्यात उद्योग, मेहनत वगैरेंचा संपूर्ण अभाव दिसून येतो आपल्या देशातील लोकवस्तीचा मोठा भाग ज्याप्रमाणें मुख्यत्वें शेतीवर अवलंबून आहे, तशीच स्थिति रशियासारख्या देशाचीहि आहे तथापि युरोपात उद्योगधंद्याचा उत्कर्ष झाल्यामुळें, त्याची साधनसंपत्ति वाढून, दुष्काळाशीं झगडण्याचें त्याचें सामर्थ्य वाढलें आहे. या संपत्तीच्या साधनानें त्याना परदेशातून धान्य विकत आणता येऊन दुष्काळाशीं टक्कर देता येते त्या देशाइतकी उद्योगधंद्याची व व्यापाराची वाढ आपल्या देशात होणें सांप्रत शक्य नसलें, तरी पण त्या दिशेनें आपली स्थिति सुधारण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे, व तसा प्रयत्न करण्यास उपयुक्त शिक्षण हाच मुख्य उपाय होय. या दृष्टीनें सर्व उपायाच्या मुळाशीं शिक्षण हेंच आहे. सरकारनें आपत्तीच्या प्रसंगीं कितीहि मदत केली तरी ती दिलेली शिधोरी फारशी टिकणार नाहीं. याकरिता शिक्षणानें स्वावलंबी होऊन आपल्या स्वतःच्या पायावर उभें राहण्यास लोकांनीं शिकलें पाहिजे. "

नव्हती. त्यांच्या बरगड्या तर सहज मोजता येत होत्या. मुलें जन्मास आल्या वेळीं असतात, तशींच वस्त्राला पारखीं होतीं. अंगावरच्या घामावर धुळीचीं पुटें बसून तों तसाच वाळल्यामुळें, त्यांच्या सर्व शरीरावर वारूळ चढलें होतें."

हा देखावा पाहून महाराज लिहितात —

"माझ्या साऱ्या जन्मभर या देखाव्याचें विस्मरण मला कधींहि होणार नाहीं. ईश्वर करो आणि असा देखावा पुन्हा केव्हांहि पहाण्याचा प्रसंग न येवो."

याप्रमाणें महाराजांनीं कडी प्रांताची पहाणी करण्याची प्रथम सुरवात करून, नंतर ते अमरेली प्रांतात गेले. हा प्रांत काठेवाडांत असून त्यांतील भाग अगदीं एकमेकापासून अलग झालेले आहेत. येथील लोकांचे चेहरे रेखीव असून, त्यांच्या मुद्रेवरून त्यांची बुद्धिमत्ता सहज दिसून येते. त्यांच्या उजळ वर्णावरूनहि हे लोक गुजरायेतील हिंदु लोकांहून निराळ्या जातीचे असावेत, असें सहज अनुमान करतां येण्यासारखें आहे. त्यांच्या स्त्रियांच्या अंगावरील दागिन्यांच्या प्रकारावरून हे लोक सिंधमधून इकडे आले असावेत, असा तर्क करण्यास जागा आहे. या प्रांतांत गिरासिया वर्गाच्या वतनदार लोकांचा भरणा बराच आहे. मूळच्या चांगल्या स्थितीमुळें या लोकांना उघड मजूरी करण्यास लज्जा वाटे, यामुळें त्यांची स्थिति फारच कष्टप्रद झाली होती. या कारणानें या लोकांना मजूरीवर न लावितां, त्यांना तगावी देण्याचा महाराजांनीं हुकूम केला. या प्रांतांतील ओखामंडळ भागांत त्यांना जातां आलें नाहीं. तथापि तेथील शूर वाघेर लोकांचें त्यांना विस्मरण पडलें नाहीं. या मुलखांत जवळ जवळ दर दोन वर्षांआड दुष्काळ पडतो, मग सांप्रतच्या प्रसंगीं त्यांची हलाखी काय विचारावी? यामुळें त्यांतील कांहीं लोकांना तगावी देऊन, बाकीच्यांचें स्थलांतर करवून त्यांना दुसरीकडे पाठविण्याची तजवीज करण्यांत आली.

कोरडेच गेले. त्यामुळे दुष्काळामागून महर्गतेचें सकट उभें राहिलें. इतकेंच नव्हे, तर त्याच्या पुढील वर्षी तिसऱ्यानेंहि पावसानें फसविलें ! मात्र या वर्षी काहीं ठिकाणीं पुष्कळ पाऊस पडला, तर काहीं ठिकाणीं त्याचे अगदीं नाव नाहीं, अशी स्थिति झाली. या वर्षी जून महिना सबध कोरडा गेला. या तिसऱ्या वर्षीहि पाऊस मुळींच पडला नसता, तर जवळ जवळ सर्व लोकवस्तीच खलास झाली असती ! परतु ईश्वराला अखेर करुणा आली, व लोकाचे डोळे आकाशाकडे लागून राहिले असता त्या करुणेमुळें त्याच्या डोळ्यातून पडलेले अश्रुबिंदू पर्जन्याच्या रूपानें जमिनीवर पडलेले पाहून लोकाच्या डोळ्यातून आनदाचे खरे अश्रू बाहेर पडले. पुढेहि यानतर मात्र पाऊस थेटपर्यंत समाधानकारक पडून लोकाची या सकटातून एकदाची सुटका झाली ! या एकदर काळात केवळ दुष्काळनिवारणार्थ बडोदे राज्याचे एक कोटीवर रुपये खर्च झाले पण हा केवळ प्रत्यक्ष खर्चाचा आकडा होय. या काळात लोकाजवळील सर्वस्व नष्ट झाल्यामुळें या पुढील सालातहि सरकारसारा द्यावयास त्याना त्राण न राहिल्यानें, सर्वास साऱ्याची माफी व तहकुबी त्याना द्यावी लागली. जर महाराजानीं आपल्या कारकीर्दीच्या आरभापासून राज्याच्या जमाखर्चावर पुरी नजर ठेऊन व प्रतिवर्षी काहीं तरी शिल्लक ठेवण्याचा सक्तीचा उपाय अमलात आणून राज्यात कायमची गगाजळी तयार करून ठेविली नसती, तर राज्यावर या सकटाच्या वेळीं काय प्रसग ओढवला असता, त्याची कल्पनाच करवत नाहीं. पण सुगीच्या दिवसात सामग्री साठवून ठेवण्याऱ्या शहाण्या मुगीप्रमाणें त्यानीं पुढील सभाव्य अनर्थाची अगाऊ तरतूद केल्यामुळें, हा प्रसग एवढ्यावरच निभावला.

या दुष्काळातील अनुभवानें महाराजानी फॅमिनकोडची दुरुस्ती करून, तो तारीखतागायत तयार करून ठेविला. लोकानाहि नुकताच हा कटु अनुभव आल्याने, दर वर्षीच्या उत्पन्नातून पुढल्या वर्षासाठीं काहीं तरी तरतूद करून ठेवण्याचा धडा मिळाला. त्यामुळें यानतर पुन्हा

स्वत राजा अशा रीतीनें खेड्यापाड्यातून हिंडून प्रजेच्या कल्याणासाठीं झटू लागल्यावर मग अधिकारी वर्ग आळशी कसा राहणार? लहान थोर अशा सर्वांनीं आपआपल्यापरी शक्य तितकी मेहनत केली. प्लेगाच्या साथीत स्वत अधिकाऱ्यांना देखील आपल्या जीवाची भीति वाटत असल्यामुळें सरकारी हुकुमामुळें जरी त्यांना प्लेगपीडित वस्तींत स्वत हिंडावें लागे, तरी त्यांचीं मनें साशकच रहात. पण तशी स्थिति दुष्काळाच्या संकटाच्या वेळीं नसल्यानें, व अन्नविरहित लोकांची स्थिति सहजत च करुणाजनक असल्यानें, या वेळीं अधिकाऱ्यांकडून कुचराई मुळींच करण्यात आली नाहीं. महाराजांनीहि त्यांच्यापैकीं मनापासून झटून काम करणाऱ्यांच्या मेहनतीची कदर करून त्यांचा गौरव केल्यानें इतरांना त्या योगानें उत्तेजन मिळालें, व अशा रीतीनें राजापासून पाटलापर्यंत सर्वांनीं या वेळीं लोकांच्या कष्ट-निवारणाला हातभार लाविला.

अशा प्रकारें तनुमनधनें लोकांना मदत केली असताहि, या दुष्काळाच्या राक्षसानें बडोदें राज्यांत फार मोठा बळि घेतला. राज्यांतील वीस लक्ष वस्तीपैकीं दोन लाख लोक म्हणजे एक दशांश लोक या वेळीं मृत्युमुखीं पडले. यांतील बरेचसे प्रत्यक्ष अन्नावाचून मेले, तर उरले-सुरलेले दुष्काळामागून येणाऱ्या महामारी, मलेरिया वगैरेसारख्या साथीला बळि पडले. जनावरांची गोष्ट तर विचारूच नये. शेतकरीवर्गाला जनावरें प्राणापेक्षा प्रिय असूनहि जनावरांचा संहार या राज्यांत साडे आठ लाख झाला!

अशा प्रकारें स्वत च्या सुखाची पर्वा न करितां महाराज प्रजेची हलाखी कमी करण्यासाठीं सर्व राज्यभर फिरून अनिश्रांत श्रम करीत असताहि, युरोपियन वर्तमानपत्रकारांनीं त्यांच्यावर चिखल उडविण्यास कमी केलें नाहीं. उदाहरणार्थ, पायोनियर पत्रानें त्यांच्यावर या वेळीं टीका करतांना म्हटलें कीं,

"विलायतेस वारंवार फेऱ्या करणाऱ्या राजांत गायकवाड हे एक

वाढलेल्या द्रव्यशक्तीच्या जोरावर अमेरिकेसारख्या देशातून हवें तेवढे धान्य मागवून दुष्काळास तोंड देता आले अर्थात् 'प्रत्यक्षपरीक्षणैर्व्यक्ति।' या न्यायानें महाराजाच्या उपदेशाचा पडताळा 'याच देहीं याच डोळा।' पाहण्याची संधि मिळाली आहे हिंदुस्थानात उद्योगधंद्याची वाढ व्हावयास पाहिजे हा धडा वरील उपदेशाने मिळाला, तथापि या उद्योग धंद्याच्या निरनिराळ्या प्रकाराना सर्वच ठिकाणीं सारखाच वाव मिळतो असें नाहीं उद्भिज व खनिज मालाचा पुरवठा, रेल्वेसारखीं वाहतुकीचीं साधनें, जकातीच्या माफीसारख्या सवलती व परदेशात माल पाठविण्यासाठीं सोइस्कर बंदराची सोय, इत्यादि अनेक गोष्टींवर उद्योगधंद्याची अभिवृद्धि अवलंबून असणार, हें उघड आहे या दृष्टीनें पाहता बडोदें राज्यात सरकारी खात्यामार्फत व लोकाना मदतीच्या रूपानें उद्योगधंद्याना जितकें उत्तेजन देणें शक्य आहे, तितकें देण्याचा महाराजानीं प्रयत्न केला आहे तथापि त्यासंबंधानें विशेष विवेचन करण्याचे स्थळ हे नाहीं येथें फक्त इतकेंच नमूद करावयाचें आहे कीं, 'आधीं केलें मग सांगितलें।' या नियमाप्रमाणे इतराना उपदेश करताना महाराजानीं स्वत या बाबतींत शक्य तितका प्रयत्न स्वत केला आहे, व लोकानीं अधिक स्वावलंबी बनून आपल्या पायावर उभे राहण्यास तयार व्हावें यासाठीं अवश्य त्या शिक्षणाचा लाभ त्याना करून देऊन प्लेग दुष्काळासारख्या आधिदैविक व आधिभौतिक आपत्तींपासून आपला बचाव करण्याच्या साधनाची तयारी करून ठेविली आहे, इतकी गोष्ट मात्र निर्विवाद आहे तरीहि त्याच्याच शब्दानीं आपण अशीच आशा करू या कीं,

"इश्वर करो आणि १९०० सालासारखा देखावा पाहण्याचा प्रसंग बडोदें राज्यातच नव्हे, तर अखिल भारतवर्षातहि कोणावर न येवो।"



व दक्षिणी, अशा अनेक प्रकारच्या भेदांनीं लोक भरलेले असत, तरी परमेश्वरी कोपामुळें उत्पन्न झालेल्या संकटापुढें सर्वजण सारखेच हीनदीन झाले होते. भगवद्गीतेतील विश्वरूपदर्शनाच्या वेळीं ज्याप्रमाणें सर्व योद्धे

'वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि।'

असा भयंकर देखावा अर्जुनाला दिसला, तसा तो या वेळीं महाराजांना दिसू लागला व त्या देखाव्यानें अर्जुन जसा 'प्रव्यथितान्तरात्मा' झाला, तशीच त्यांचीहि स्थिति झाली.

या कारणानें केवळ सांप्रत आलेल्या आपत्तीचें निवारण करून भागणार नाहीं, तर तिची पुनरावृत्ति केव्हांहि होऊं न देण्याची खबरदारी घेतली पाहिजे, अशी आवश्यकता त्यांना भासली यामुळें त्यांनीं आपल्या मनाशीं दुष्काळनिवारणाच्या अनेक उपायांची चिकित्सा करून, त्यासंबंधीची मीमांसा सन १९०० सालीं बडोदें प्रांतांतील ओरसंग नदीला बंधारा घालून शेतकऱ्यांना अवर्षणासारख्या प्रसंगीं पाण्याची तरतूद करून ठेवण्याच्या योजनेच्या उद्घाटनप्रसंगीं त्यांनीं केलेल्या भाषणांत केली आहे. त्याच्या नेहमींच्या तत्त्वशोधनाच्या दृष्टीनें त्यांनीं प्रथमतः तात्पुरते उपाय व त्याच्या मुळाशीं असलेलीं कायमचीं तत्त्वें यांतील भेद दर्शवून, मुख्य तत्त्वाकडे दृष्टि देण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे. आरंभींच दुष्काळामुळें होणाऱ्या लोकांच्या भयंकर हालांच्या मुळाशीं त्यांचें चिरकालिक, अखंड व सार्वत्रिक दारिद्र्य आहे असें सांगून, नंतर ते म्हणाले --

"दुष्काळाच्या निवारणार्थ उपयोजिण्याच्या इलाजांचे साधारणतः तीन मुख्य वर्ग करितां येतात. पहिल्या वर्गांत तात्कालिक मदत देण्याच्या प्रकाराचा अंतर्भाव होतो. धान्याची मदत देणें, अनाथगृहें उघडणें, नवीन कामें काढून लोकांना तात्पुरतें उद्योगाचें साधन करून देणें, वगैरेसारखे इलाज या प्रकारचे होत. चालू घटकेची भूक शमविणें इतकाच त्यांचा उपयोग होतो. याहून अधिक परिणामकारक

कारभार योग्य रीतीनें चालविणें शक्य नाहीं, असें मला निश्चयानें वाटतें. त्यासाठीं आपल्या गैरहजिरींत आपल्या अधिकाराचें संक्रमण करणें अवश्य आहे. तथापि या बाबतींत शक्य तोंपर्यंत आपल्या इच्छेप्रमाणें व्यवस्था करण्यास मी उत्सुक आहे. विशेषत आपल्या संस्थानाचे राजे म्हणून आपला जो दर्जा व अधिकार आहे, तो जेणेंकरून कमी होईल असे कांहींहि न करण्याची माझी इच्छा आहे. यासाठीं राज्यकारभाराची आपल्या गैरहजिरींत जी कांहीं व्यवस्था करावयाची, ती केवळ आपल्या संमतीनेंच नव्हे तर आपल्या सूचनेवरून करण्यात येत आहे, असें जाहिर करण्यास मला फार आनंद वाटेल."

याच मतलबाचें पत्र स्टेट सेक्रेटरी लॉर्ड किंबर्ले याच्याकडूनहि महाराजाना आलें होतें, व त्याला महाराजानीं उत्तर पाठवून आपल्या गैरहजिरींत आपल्या राज्यातील प्रमुख अधिकाऱ्याच्या मंडळाकडे आपले अधिकार सोंपल्याचें कळविले होतें. तथापि या उत्तरात ' देशी संस्थानाच्या राजाच्या गैरहजिरींत राज्यकारभाराची व्यवस्था कशी असावी, या प्रश्नासंबधानें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा विचार करण्यासारखा आहे ' इतके त्यानीं ध्वनित करून ठेविले होतें. यानंतरच्या काळात महाराजानीं आपल्या दिवाणाकडे दिलेल्या अधिकाराचा उपयोग त्याच्याकडून कशा प्रकारें करण्यात आला, हें बापटप्रकरणावरून दिसून आलेंच आहे. ' ज्याच्याकडून इमानी आणि विश्वासू नोकरीची अपेक्षा करण्याचा मला अधिकार आहे, त्याच्याकडून तशा प्रकारची नोकरी केली गेली नाहीं, ' असा या बाबतींत महाराजानीं आपला स्पष्ट अभिप्राय नमूद केला आहे. मि. ईलियट याना त्यानीं आपला हा अभिप्राय कळविताना म्हटलें आहे कीं, " रेसिडेन्ट × × × यानीं पुष्कळ उपद्व्याप केला व त्याचा परिणाम बराच काळपर्यंत राहील. त्याच्या वर्तनानें माझी सत्ता व माझा दर्जा फार दुर्बळ झाला आहे, व त्यामुळें राज्यात सुव्यवस्था करणें अशक्य नसलें,

या काळच्या महाराजाच्या खासगी पत्रातूनहि या संकटाची छाया पसरलेली दिसून येते. उदाहरणार्थ, देवासच्या महाराजाना लिहिलेल्या सन १८९९ च्या ऑगस्टमधील एका मराठी पत्रात ते म्हणतात :—

"इकडे यंदा पर्जन्य मुळींच नसल्यानें, भयंकर दुष्काळ पडण्याची भीति पडली आहे. गरीब रयतेची स्थिति फार निकट आहे, यावदल आम्हास फार खेद होत आहे. गरीब लोकाना पोटापुरतें अन्न मिळावें, म्हणून रिलीफ कामें राज्यात निरनिराळ्या ठिकाणीं सुरू केलीं आहेत. रयतेची स्थिति फार दीनवाणी व काळजी उत्पन्न करण्यासारखी झाली आहे. दोन प्रहरीं उन्हाळ्याप्रमाणें कडाक्याचें उन्ह पडतें. हवेंत गारवा मुळींच नाहीं. पर्जन्यकाळचे दिवस असून ते चैत्रवैशाखाप्रमाणें वाटतात."

त्याचप्रमाणें डॉ. नेव्हिन्स् याना पाठविलेल्या याच सालच्या डिसेंबरमधील पत्रात ते लिहितात :—

"सांप्रत आम्ही भयंकर दुष्काळाच्या पकडींत आहोंत. हल्लींच्या पिढीच्या हयातींत असा भयंकर दुष्काळ पडल्याचें कोणास आठवत नाहीं. गेल्या केवळ तीन महिन्यात मी लोकाच्या मदतीसाठीं पधरा लाख रुपये मंजूर केले आहेत. या कामीं मला आपल्या सर्व प्रॉमिसरी नोटा विकून टाकाव्या लागतील व वर आणखी कर्जहि काढावें लागेल असें वाटतें, व म्हणून काहीं तरी पैशाची तजवीज करण्याच्या खटपटींत मी आहे."

अशा प्रकारें महाराज चिंतामग्न स्थितींत असता, इकडे दुष्काळाचें रूप अधिकच तीव्र होत चाललें होतें. तथापि दरेक गोष्टीला केव्हा तरी अंत येतो या नियमानें या दुष्काळाला व लोकाच्या हलाखीलाहि अंत यावयास पाहिजेच होता, तसा तो दुसऱ्या वर्षीं तरी येईल अशी लोकाची अपेक्षा होती. परंतु याहि खेपेस निराश होण्याचें दुर्दैव त्याच्यापुढें उभें राहिलें. या वर्षीं जरी जुलै व ऑगस्टमध्यें थोडा पाऊस पडला, तरी त्या पुढील महिने

" लॉर्ड कर्झन यांचें मुंबईस झालेलें आगमन, ही या वर्षांतील प्रमुख गोष्ट होय. दरेक नवीन व्हाईसरॉय हिंदुस्थानात येनात, त्या वेळीं त्याच्या कार्याबद्दल लोकांनीं केलेल्या कल्पनाच्या व अपेक्षाच्या सगीतातच ते वदरावर उतरतात. परतु लॉर्ड कर्झन याच्या आगमनाच्या वेळीं या सगीताचा ध्वनि जितका मोठा होता, तितका त्या पूर्वी केव्हाहि नव्हता. मला वाटते यांचें कारण कर्झनसाहेब हे कीर्तीच्या मेघावरून वाऱ्याने वाहत वाहत इकडे आले, हें असावें. काहीं लोक म्हणतात कीं, ते हिंदुस्थानाच्या अतस्थितींत क्राति घडवून आणतील, तर दुसरे काहीं म्हणतात कीं, ते साम्राज्याच्या मर्यादा अजीबात बदलून टाकून हिंदुकुश पर्वत उचलून हिमालयावर ठेऊन देतील. काहीं कुत्सित लोक असे म्हणतात कीं, यापैकीं काहींहि होणार नाहीं. ते सिंहासारखे आले, तरी बकरीप्रमाणें परत जातील. तथापि लोकाचा सर्वसाधारण अभिप्राय असा दिसतो कीं, ते आजपर्यंत कधीं कोणी ऐकलें नाहीं, असें काहीं तरी करतील. मात्र तसें ते काय करतील, हें आजच सागता येणार नाहीं !"

यानतर महाराज कर्झनसाहेबाना भेटावयास गेले या भेटीच्या वेळीं कर्झनसाहेबानीं हिंदुस्थानाबद्दलच्या आपल्या ज्ञानाचें व कळकळीचें बरेंच प्रदर्शन केले व जणू काय या देशाबद्दलची आपली माहिती व कळकळ त्या देशात निरतर राहणाऱ्या व तेथील लोकाशीं कायमचे सबध असणाऱ्या हिंदी लोकाहूनहि अधिक आहे, असें दाखविण्याचा प्रयत्न केला. अर्थात् अशा प्रकारच्या वृत्तीला प्रत्युत्तर म्हणून 'कोणत्याहि परस्थाला स्थानिक रहिवाश्याहून तेथील लोकाची माहिती व कळकळ अधिक असणें शक्य नाहीं,' असें त्याना स्पष्टपणें तोंडावर सुचविणें महाराजानाहि ओघानेंच प्राप्त झालें. तथापि त्या वेळच्या अनुभवावरून नवीन व्हाईसरॉय 'फार हुषार व व्यवहारदक्ष' असल्याबद्दल महाराजानीं आपल्या पत्रात लिहिलें आहे.

यानतर महाराज सन १९०० च्या मे महिन्यात विलायतची सफर

सन १९०३–१९०४ सालीं जेव्हा अवर्षण पडलें, त्या वेळीं लोकांचे व गुरांचे हाल पूर्वीपेक्षा पुष्कळच कमी झाले. त्यांची मृत्युसंख्याहि पुष्कळ कमी झाली व दुष्काळानंतर साथीचा उपद्रवहि अगदीं अल्प झाला. यानंतर पुन्हा सन १९१०–११ सालीं दुष्काळानें आपलें स्वरूप एकदा दाखविलें, परंतु त्या वेळीं लोकांपेक्षा जनावरांचे हालच अधिक झाले. त्यामुळें चाऱ्यासाठीं लोक आपआपलीं जनावरें घेऊन जंगलांतील झाड पाल्याच्या आश्रयासाठीं जाऊं लागले. वाटेंत तापी नदीला पूर आलेला असल्यानें व जनावरांत पोहून जाण्याचेंहि सामर्थ्य न राहिल्यानें, हजारों जनावरें वाहून गेलीं, व राहिलींसाहिलीं तीं जंगलांतील हिंस्र पशूंच्या भक्ष्यस्थानीं पडलीं. या दुष्काळामुळें अशा प्रसंगीं करावयाच्या इलाजांतील ज्या कांहीं उणीवा समजून घ्यावयाच्या राहिल्या होत्या त्या समजून आल्या व त्या दृष्टीनें फॅमिनकोडांत पुन्हा सुधारणा करण्यांत आली.

हिंदुस्थानासारख्या केवळ पावसावर अवलंबून राहणाऱ्या व पाणी पुरवठ्याचें भरपूर व कायमचें साधन नसलेल्या देशांत दुष्काळाची भीति कायमचीच राहणार. सन १९०० सालीं महाराजांनीं केलेल्या ओरसंग पाटबंधाऱ्याच्या उद्घाटनाच्या वेळच्या भाषणाच्या प्रसंगीं हिंदुस्थानाची तुलना युरोपांतील रशिया देशाशीं करून, आपल्या देशांतील उद्योगधंदे वाढवून या परावलंबी स्थितींत सुधारणा करण्याचा उपदेश केला होता. सुदैवानें त्यांचें प्रत्यक्ष प्रत्यंतर थोड्याच वर्षांत आलें, हा निव्वळ विलक्षण योगायोग होय! रशियांत राज्यक्रांति होऊन तेथें सोव्हियट राज्यपद्धतीचा अमल सुरू झाल्याबरोबर, तेथील सत्ताधाऱ्यांनीं परदेशी तज्ज्ञ लोक आणवून आपल्या देशांत कारखान्यांचें अवाढव्य जाळें पसरिलें. त्यामुळें त्यांची द्रव्यशक्ति वाढली. याचा परिणाम असा झाला कीं, सुमारें तीन चार वर्षांपूर्वी रशियांत अतोनात पीक आल्यामुळें धान्याचे भाव बेसुमार उतरल्यानें, जरूरीहून ज्यास्तीचा धान्याचा नाश करण्याचा तेथें प्रसंग आला. त्यानंतर गतवर्षीच जेव्हां अवर्षणामुळें त्या देशांत दुष्काळ पडला, त्या वेळीं त्यांना आपल्या



महाराज व सौ. महाराणीसाहेब

## प्रकरण २२ वें



### कर्झन सरक्युलर व दिल्ली दरबार

महाराजाच्या विलायतच्या सफरींच्या वेळीं त्याच्या मागें राज्यकारभाराची व्यवस्था कशी रहावी, याबद्दलचा प्रश्न अनेक वेळ इंग्रज सरकारकडून उपस्थित करण्यांत आला होता, व त्याच्या अनुषंगानें महाराजाच्या प्रवासावर नियंत्रण घालण्याची त्या सरकारची इच्छाहि पूर्वीपासूनच डोकावत होती. सन १८९३ च्या नोव्हेंबर महिन्यात व्हाईसरॉय लॉर्ड लॅन्सडाऊन यानीं महाराजाना एक पत्र लिहिलें होतें, त्यात मोठ्या मुत्सद्दीपणानें त्यानीं म्हटलें होतें कीं,

"आपली विलायतची सफर संपवून आपण परत आला आहा व त्या सफरीनें आपल्या प्रकृतीला पुष्कळ लाभ झाला आहे, हें ऐकून आम्हाला आनंद झाला, व आता आपण बऱ्याच काळपर्यंत आपल्या राज्यात रहाल अशी आम्हास आशा होती. अशा स्थितींत स्टेट सेक्रेटरींच्या एका पत्रावरून आपल्या प्रकृतीसाठीं पुन्हा एक वेळ आपल्याला विलायतेस जावें लागेल असें कळलें, त्यामुळें काळजी वाटत आहे. म्हणून आपल्याला पूर्ण प्रकृतिस्वास्थ्य लाभण्यासाठीं आपण जी कांहीं योजना करणार असाल, तिला मी शक्य तितकी मदत करीन. तथापि आपल्या गैरहजिरींत राज्यकारभाराची व्यवस्था कशी ठेवावी, याबद्दल योग्य ती तरतूद करण्याची जाणीव आपल्याला या प्रसंगीं असेलच. दूर अंतरावरून बडोद्यासारख्या मोठ्या संस्थानाचा राज्य

आहे. उत्कृष्ट शिक्षण घेऊन त्यांनीं आपलें भावी कर्तव्य समाधान-कारक रीतीनें करावें, अशी माझी इच्छा आहे. कारण आपलें कर्तव्य सदसद्विवेकबुद्धीला अनुसरून करण्याचें समाधान लाभण्या-पेक्षा आपल्या उद्योगाचे अधिक चांगलें बक्षिस दुसरें कोणतें असणार ?"

अशा प्रकारचें भाषण करून मानपत्र दिल्याबद्दल त्यांनीं सर्वांचे आभार मानल्यावर हा समारंभ पुरा झाला व त्यानंतर महाराज विलायतेस जाण्यासाठीं रवाना झाले. तेथें गेल्यावर ते प्रथम महाराणीसाहेबांच्या शस्त्रक्रियेच्या व्यवस्थेस लागले. ती शस्त्रक्रिया ता. ११-७-१९०० रोजीं डॉ. मिसेस् मेरी शारलिब्ह् यांच्याकडून करविण्यांत आली व ती यशस्वी रीतीनें पार पडली. त्याच दिवशीं रात्रीं महाराणी व्हिक्टोरिया यांनीं एक मोठा खाना दिला होता, त्यासाठीं महाराजांना आमंत्रण देण्यांत आलें होतें, परंतु महाराणीसाहेबांची शस्त्रक्रिया त्याच दिवशीं होणार असल्यानें महाराजांना या खान्याला हजर राहतां आलें नाहीं. तथापि पुढें ते डिसेंबर महिन्यांत वुइंडसर राजवाड्यांत महाराणी व्हिक्टोरिया यांचे पाहुणे म्हणून रहावयास गेले होते.

अशा रीतीनें महाराज विलायतेस महाराणीसाहेबांच्या शस्त्रक्रियेच्या भानगडींत व स्वतःच्या प्रकृतीच्या काळजींत असतांना, त्यांच्या प्रवासाच्या प्रश्नाला पुन्हा चालन मिळालें. हिंदुस्थानांत आल्यावर दरेक नवीन व्हाईस-रॉयनें प्रमुख देशी संस्थानांना एकदां तरी भेट द्यावी, असा संप्रदाय ठरून चुकल्यासारखा झाला होता. त्यास अनुसरून सन १९०० च्या हिंवाळ्यांत लॉर्ड कर्झन गुजराथेंतील दुष्काळाची स्थिति प्रत्यक्ष अवलोकन करण्यासाठीं येणार होते. त्या वेळीं त्यांचा सत्कार करावा अशी सूचना आल्यावरून दिवाणांनीं ती महाराजांना कळविली. परंतु महाराणींच्या नुकत्याच झालेल्या शस्त्रक्रियेमुळें त्यांची प्रकृति इतका लांबचा प्रवास करण्यासारखी दुरुस्त झाली नव्हती, यामुळें हिंदुस्थान सरकारकडून

तरी अत्यन्त कठिण झालें आहे अशा परिस्थितीमुळें राज्यातील अधिकारी भिले झाले असून, लोकांच्या दृष्टीनें त्यांच्या तक्रारींना रेसिडेन्सीचा आधार मिळतो "

हा वाद यापुढेंहि तसाच चालू राहिला सन १८९५ सालीं महाराजांना काश्मीरला जावयाचें होतें, परंतु रेसिडेन्सीच्या हरकतीमुळें त्यांना तसें करता आलें नाहीं पुन्हा सन १८९९ मध्यें महाराजांना दार्जिलिंग येथें जावयाचें होतें, व तसें त्यांनीं रेसिडेन्सीस कळविलेंहि होतें त्यासरशानें त्यांना असें लिहून आलें कीं, या बाबतींत बंगाल सरकारकडे पत्र लिहिलें लागेल यावरून महाराजांनी लिहिलेल्या जबाबात खोंचदार रीतीनें म्हटलें होतें कीं,

"माझ्या दार्जिलिंगच्या जाण्यानें अथवा न जाण्यानें बंगाल सरकारास कोणताहि त्रास होण्याचा संभव नाहीं, व म्हणून मी तेथें जाण्याचें अखेर निश्चित करीन किंवा न करीन, तें त्यांच्यावर अवलंबून राहणार नाहीं "

संस्थानिकांना हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानात कोठें जावयाचें असलें, तरीहि या वेळीं अनेक प्रकारचे निरर्थक प्रश्न त्यांना विचारण्यात येत व त्यांच्या मार्गांत हरकती आणण्यांत येत तथापि सन १८९५ ते १९०० च्या पाच वर्षांच्या अवधींत महाराज युरोपच्या प्रवासाला न गेल्यामुळें या प्रश्नाचा विचार विशेष जोराने करण्यात आला नाहीं

पुढें सन १८९८ सालीं लॉर्ड कर्झन हे हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल होऊन आले ते मुंबइस उतरले, त्या वेळीं त्यांच्या इतमामाप्रमाणें त्यांच्या आगमनाचा मोठा गाजावाजा करण्यात आला पण त्याच वेळीं महाराजांनीं कर्झनसाहेबांचे पौरस्त्य देशावरील ग्रंथ वाचून त्यांच्या भावी कर्तृत्वाचें भविष्यकथन फार मार्मिकपणानें व बिनचूक रीतीनें केलें होतें सन १८९९ च्या मे महिन्यात लेडी ब्रीडेर् यांना लिहिलेल्या पत्रात त्यांनीं लॉर्ड कर्झन यांच्या विषयींच्या लोकमताचें वर्णन फार मजेदार रीतीनें केलें आहे ते म्हणतात —

करण्यासाठीं हिंदुस्थानांत येण्याचे तुम्ही मला सुचविलें, तें योग्यच आहे. कर्झनसाहेबांचा सत्कार करण्यांत मला आनंदच आहे, परंतु महाराणींच्या व माझ्या प्रकृतीमुळें मला स्वतःला तसें करणें जवळ जवळ अशक्य झाले आहे. अशा स्थितींत व्हाईसरॉयांचा सत्कार न करण्याच्या इच्छेचा आरोप माझ्या न येण्यावर लादणे म्हणजे ब्रिटिश सरकाराशीं स्पष्ट विरोध दर्शविणें होय. कोणीहि थोर मनाचा सज्जन असें करील्सें मला वाटत नाहीं. या हिंवाळ्यांत शक्य नसलें, तरी पुढील हिवाळ्यांत व्हाईसरॉयांचा सत्कार मी अवश्य करीन. इतक्यावर यंदाच्या हिंवाळ्यांतच बडोदास येण्याची त्यांनीं मेहेरबानी केली, तर त्यांना साजेल असें त्यांचें स्वागत तुम्ही कराल्च, अशी माझी खात्री आहे."

तथापि पूर्वसंकल्पाप्रमाणे लॉर्ड कर्झन ऑगस्टच्या सुरवातीस गुजराथेंत आले. त्यांचा उद्देश त्या प्रांतांतील दुष्काळाची स्थिति स्वतःच्या नजरेनें अवलोकन करण्याचा होता. ते या प्रांतांत येणार असें कळतांच त्यांना बडोद्यास येण्याचें आमंत्रण दिवाणसाहेबांकडून देण्यांत आलें. परंतु ज्या कार्यासाठीं आपण हा दौरा काढला आहे त्याच्या महत्त्वाकडे लक्ष देतां, या खेपेस बडोद्याचा सत्कार स्वीकारण्याची इच्छा असूनहि आपल्यास तसें करण्यास सवड नाहीं, असे त्यांच्याकडून कळविण्यांत आले. तथापि त्यांची स्वारी बडोदें स्टेशनावर ता. १ ऑगस्ट रोजीं दुपारीं ४-३० वाजतां उतरली, त्या वेळीं त्यांचें स्वागत दिवाणसाहेब व इतर कौन्सिलचे सभासद यांनीं थाटाने केलें. लॉर्ड कर्झन त्याच दिवशीं दोहद येथील दुष्काळी कँप पाहून थकून आले होते, त्यामुळें ते लगेच विश्रांतीसाठीं रेसिडेन्सींत गेले. पुन्हां दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून ते भडोच येथील कँप पहावयास जाऊन दुपारीं ४-३० वाजतां बडोदा स्टेशनवर परत आले. त्या वेळींहि त्यांना दिवाणसाहेबांनीं पानसुपारी, हारतुरे वगैरे दिले. त्या वेळीं बडोदें राज्यातर्फे आपला येथील मुक्काम सुखकर होण्यासाठीं केल्या गेलेल्या परिश्रमाबद्दल कर्झनसाहेबांनीं सर्वांचे आभार

करण्यासाठीं गेले. या खेपेस त्याना तिकडे जाण्याचें तसेंच महत्वाचें कारण होतें. महाराणीसाहेबाना कांहीं पोटातील विकार झाला असल्यामुळें, त्यासाठीं शस्त्रक्रिया करणें अवश्य आहे असा अभिप्राय तज्ज्ञ डॉक्टरानीं दिला. परतु हें ऑपरेशन हिंदुस्थानात करणारी स्त्रीडॉक्टरीण उपलब्ध नव्हती. अशा स्थितीत युरोपमध्यें त्याना घेऊन जाणें अपरिहार्य होतें. त्याच सुमारास राजपुत्र जयसिंहराव हेहि तापानें आजारी झाले होते, यामुळें त्याना वरें वाटल्यावर त्याची प्रकृति सुधारण्यासाठीं त्यानाहि युरोपात नेण्याचें ठरविण्यांत आलें. जाणाऱ्या मडळींचे दोन भाग करून प्रथम राजपुत्र जयसिंहराव व धैर्यशीलराव, राजकन्या इदिराराजा, डॉ बदुकराम व रा. सरदेसाई वगैरे मडळी गेली व त्यानतर महाराज, सौ. महाराणीसाहेब, राजपुत्र शिवाजीराव, श्रीमत सपतराव वगैरे मडळी रवाना झाली. जाण्यापूर्वीं ही मडळी मुंबईस आली, त्या वेळीं त्याचा मुक्काम दादाच्या बगल्यात होता. तेथें मुंबईतील नागरिकातर्फे महाराजाना थाटानें मानपत्र देण्यात आलें. त्या समारभाला न्यायमूर्ति रानडे, सर फेरोजशहा मेथा, सर जमशेटजी जिजीभाई, सर जॉन कॉटन्, डॉ. डिमक वगैरे सुप्रसिद्ध लोक हजर होते. त्या वेळीं मानपत्राला उत्तर देताना महाराजानीं भाषण केलें त्यात ते म्हणाले कीं,

"सद्गृहस्थहो, माझे देशबधू साप्रत दुष्काळाच्या तडाक्यात सापडले असताना मी युरोपच्या प्रवासाला जाणें योग्य नव्हे, असें मला स्वतलाच वाटत आहे. मी आपल्या परीनें या आपत्तींत माझ्या प्रजेचे हाल कमी होतील अशा प्रकारचे शक्य ते सर्व उपाय घेण्यास कमी केलें नाहीं. तथापि या वेळीं माझ्या प्रवासाचें मुख्य कारण म्हणजे महाराणींची नादुरुस्त प्रकृति हें होय. त्याच्यासाठीं तज्ज्ञ वैद्यकीय अभिप्राय व मदत घेण्याचा आग्रह येथील डॉक्टरानीं केल्यामुळेंच मला तिकडे जावें लागत आहे. त्यावरोबरच युवराजाच्या शिक्षणाची व्यवस्था लावणें, हाहि माझ्या जाण्याचा दुसरा हेतु

करण्यासाठीं हिंदुस्थानात येण्याचे तुम्ही मला सुचविलें, तें योग्यच आहे. कर्झनसाहेबाचा सत्कार करण्यात मला आनंदच आहे, परंतु महाराणींच्या व माझ्या प्रकृतीमुळें मला स्वत: ला तसें करणें जवळ जवळ अशक्य झाले आहे. अशा स्थितींत व्हाईसरॉयाचा सत्कार न करण्याच्या इच्छेचा आरोप माझ्या न येण्यावर लादणें म्हणजे ब्रिटिश सरकाराशीं स्पष्ट विरोध दर्शविणें होय. कोणीहि थोर मनाचा सज्जन असे करील्सें मला वाटत नाहीं. या हिंवाळ्यात शक्य नसलें, तरी पुढील हिंवाळ्यात व्हाईस-रॉयाचा सत्कार मी अवश्य करीन. इतक्यावर यदाच्या हिंवाळ्यातच बडोद्यास येण्याची त्यानीं मेहेरबानी केली, तर त्याना साजेल असें त्यांचे स्वागत तुम्ही कराल्च, अशी माझी खात्री आहे."

तथापि पूर्वसंकल्पाप्रमाणें लॉर्ड कर्झन ऑगस्टच्या सुरुवातीस गुजराथेंत आले. त्याचा उद्देश त्या प्रातातील दुष्काळाची स्थिति स्वत:च्या नजरेनें अवलोकन करण्याचा होता. ते या प्रातात येणार असे कळताच त्याना बडोद्यास येण्याचें आमंत्रण दिवाणसाहेबाकडून देण्यात आलें. परंतु ज्या कार्यासाठीं आपण हा दौरा काढला आहे त्याच्या महत्त्वाकडे लक्ष देता, या खेपेस बडोद्याचा सत्कार स्वीकारण्याची इच्छा असूनहि आपल्यास तसें करण्यास सवड नाहीं, असे त्याच्याकडून कळविण्यात आलें. तथापि त्याची स्वारी बडोदें स्टेशनावर ता. १ ऑगस्ट रोजीं दुपारीं ४-३० वाजता उतरली, त्या वेळीं त्याचें स्वागत दिवाणसाहेब व इतर कौन्सिलचे सभासद यानीं थाटानें केले. लॉर्ड कर्झन त्याच दिवशीं दोहद येथील दुष्काळी कॅंप पाहून थकून आले होते, त्यामुळें ते लगेच विश्रांतीसाठीं रेसिडेन्सींत गेले पुन्हा दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून ते भडोच येथील कॅंप पहावयास जाऊन दुपारीं ४-३० वाजता बडोदा स्टेशनावर परत आले. त्या वेळींहि त्याना दिवाणसाहेबानीं पानसुपारी, हार-तुरे वगैरे दिले. त्या वेळीं बडोदें राज्यातर्फे आपला येथील मुक्काम सुखकर होण्यासाठीं केल्या गेलेल्या परिश्रमाबद्दल कर्झनसाहेबानीं सर्वांचे आभार

सुचविलेल्या वेळीं कर्झनसाहेबाचा सत्कार करण्यासाठीं बडोद्यास येणें महाराजाना शक्य नव्हतें, व म्हणून त्यानीं तशी वस्तुस्थिति दिवाणाना लिहून कळविली. परतु इसापनीतींतील लांडगा व मेंढरू या गोष्टीप्रमाणें खऱ्या वस्तुस्थितीचाहि विपर्यास होऊन कर्झनसाहेबाचा सत्कार न करण्याच्या हेतूनें महाराज हिंदुस्थानास परत येत नाहींत, अशी शंका त्यासबधानें घेण्यात आली त्याचें तावडतोब निराकरण करणें जरूर होतें, तें महाराजानीं आपल्या दिवाणाना लिहिलेल्या एका पत्रात केलें आहे. त्यात ते म्हणतात —

" महाराणींच्यावर ता. ११ जुलै रोजीं शस्त्रक्रिया करविली. ती फार गभीर स्वरूपाची होती, व म्हणून मला तिच्याबद्दल फार काळजी वाटत होती. पण सुदैवानें ती डॉ. मिसेस् शारलिव्ह यानीं यशस्वी रीतीनें केली. या शस्त्रक्रियेमुळें महाराणींना अजून आपल्या खोलींतून उठून बाहेर येण्याची देखील शक्ति आली नसल्यानें, माझ्या स्वत च्या प्रकृतीसाठीं चागल्या हवेच्या कोठल्याहि ठिकाणीं मला जाता येत नाहीं आता आपल्या ता. २० जुलैच्या पत्रासबधानें असें कळवावयाचें कीं, वरील अनिश्चित परिस्थितीमुळें आम्हाला हिंदुस्थानात परत केव्हा येता येईल, तें आज काहीं सागता येत नाहीं. तथापि कोणाचेंहि मन न दुखविता इतकें मात्र लिहावेंसें वाटतें कीं, आमच्या विलायतच्या प्रवासाबद्दलचा निर्णय करताना आमच्या प्रकृतीकडे व सुखदु खाकडे काडीइतकेंहि लक्ष दिलें जात नाहीं. माझ्या गैरहजिरींत राज्यकारभार माझ्या इच्छेप्रमाणें सुरळीत रीतीनें चालेल असा विश्वास जर मला असता, तर महाराणींना या दुखण्यात जितका त्रास झाला तितका मी कधींहि होऊ दिला नसता. परतु या मानसिक अस्वस्थतेमुळेंच विलायतेस जाऊन महाराणींना उपचार करण्याचें मी लाबविलें. त्याचा परिणाम मात्र असा झाला कीं, त्याच्यावर गभीर स्वरूपाची शस्त्रक्रिया करावी लागली. येत्या नोव्हेंबरमध्यें कर्झनसाहेबाचें स्वागत

स्टेट सेक्रेटरींना ता. २३ मार्च १८९९ रोजीं लिहिलेल्या पत्रावरून स्पष्ट होतें. या नियमाला इंदूरचे श्री. शिवाजीराव होळकर हे मात्र एकटे अपवाद आहेत, असें त्यांना वाटे. 'इंग्रज सरकारचे स्पष्ट हुकूम धाब्यावर बसविण्यांत त्यांना एक प्रकारचा विशेष आनंद वाटे,' असें कर्झनसाहेबांचें मत होतें. सन १९०० च्या भयंकर दुष्काळांत आपल्याबरोबर मोठा परिवार घेऊन ब्रिटिश मुलुखांतून श्री. शिवाजीराव होळकर यांनीं हिंडूं नये असें कर्झनसाहेबांनीं त्यांना स्पष्ट रीतीनें कळविलें असतांहि व्हाईसरॉयांची स्वारी अजमीर, अहमदाबाद, मुंबई वगैरे ठिकाणीं गेल्याबरोबर, त्यांच्या मागून श्री. शिवाजीराव यांनीं त्याच शहरांतून आपली स्वारी काढिली! त्यामुळें लॉर्ड कर्झन चिडून गेले व त्यांनीं होळकरांना कोठेंहि स्पेशल ट्रेन न देण्याबद्दल हुकूम सोडला. तेव्हां श्री. शिवाजीरावांनीं शंभर तिकिटें काढून पॅसेंजर गाडीने प्रवास केला! तेव्हां मात्र कर्झनसाहेबांनीं हात टेकले व म्हटलें कीं 'अशा माणसाचे कोणी झालें, तरी काय करणार'![1]

परंतु कर्झनसाहेबांनीं याहि माणसाचें कांहीं तरी केलेंच, व तें म्हणजे त्यांच्याकडून खुषीच्या सक्तीचा जाहिरनामा लिहून घेतला! याचा साध्या भाषेंतील अर्थ म्हणजे त्यांना पदच्युत केलें. परंतु यानंतर कर्झनसाहेबांना परत अहेर करण्याची संधि श्री. शिवाजीरावांना लवकरच मिळाली. लॉर्ड कर्झन व लॉर्ड किचनेर यांचा पुढें ज्या वेळेस तटा झाला, त्या वेळेस लॉर्ड कर्झन यांची बाजू लंगडी पडून त्यांना आपल्या श्रेष्ठ अधिकाराचा श्री. शिवाजीरावांप्रमाणेंच राजीनामा द्यावा लागला. त्या वेळीं विलायतेस परत जाण्यासाठीं म्हणून ते मुंबईस आले असता, तेथें त्यांना बंदरावर श्री. शिवाजीराव होळकरांकडून आलेली तार मिळाली, तींत असा मजकूर होताः—

'I deposed, greet you deposed.'[2]

१ लॉर्ड रोनाल्डशे कृत कर्झनचरित्र, भाग २.

२ 'The Princes of India' by Sir William Barton, p. 174.

सुचविलेल्या वेळीं वर्झनसाहेबाचा सत्कार करण्यासाठीं बडोद्यास येणें महाराजांना शक्य नव्हतें, व म्हणून त्यांनीं तशी वस्तुस्थिति दिवाणांना लिहून कळविली. परंतु इसापनीतींतील लांडगा व कोंकरूं या गोष्टीप्रमाणें खऱ्या वस्तुस्थितीचाहि विपर्यास होऊन वर्झनसाहेबाचा सत्कार न करण्याच्या हेतूनें महाराज हिंदुस्थानास परत येत नाहींत, अशी शंका त्यासंबधानें घेण्यात आली. त्याचें तात्काळ निराकरण करणें जरूर होतें, तें महाराजांनीं आपल्या दिवाणांना लिहिलेल्या एका पत्रात केलें आहे. त्यात ते म्हणतात —

" महाराणींच्यावर ता. ११ जुलै रोजीं शस्त्रक्रिया करविली. ती फार गंभीर स्वरूपाची होती, व म्हणून मला तिच्याबद्दल फार काळजी वाटत होती. पण सुदैवानें ती डॉ. मिसेस् शारलिब् यांनीं यशस्वी रीतीनें केली. या शस्त्रक्रियेमुळें महाराणींना अजून आपल्या खोलींतून उठून बाहेर येण्याची देखील शक्ति आली नसल्यानें, माझ्या स्वत:च्या प्रकृतीसाठीं चांगल्या हवेच्या कोठल्याहि ठिकाणीं मला जाता येत नाहीं. आता आपल्या ता. २० जुलैच्या पत्रासंबधानें असें कळवावयाचें कीं, वरील अनिश्चित परिस्थितीमुळें आम्हाला हिंदुस्थानात परत केव्हा येता येईल, तें आज कांहीं सांगता येत नाहीं. तथापि कोणाचेंहि मन न दुखविता इतकें मात्र लिहावेंसें वाटतें कीं, आमच्या विलायतच्या प्रवासाबद्दलचा निर्णय करताना आमच्या प्रकृतीकडे व सुखदु:खाकडे कोडीइतकेंहि लक्ष दिलें जात नाहीं. माझ्या गैरहजिरींत राज्यकारभार माझ्या इच्छेप्रमाणें सुरळीत रीतीनें चालेल असा विश्वास जर मला असता, तर महाराणींना या दुखण्यात जितका त्रास झाला तितका मी कधींहि होऊं दिला नसता. परंतु या मानसिक अस्वस्थतेमुळेंच विलायतेस जाऊन महाराणींना उपचार करण्याचें मी लांबविलें. त्याचा परिणाम मात्र असा झाला कीं, त्यांच्यावर गंभीर स्वरूपाची शस्त्रक्रिया करावी लागली. येत्या नोव्हेंबरमध्यें वर्झनसाहेबाचें स्वागत

करमणुकीचीं साधनें म्हणून क्षम्य असले, तरी त्याचें खरें राजकर्तव्य त्याच्या प्रजाजनात राहूनच त्यानीं केलें पाहिजे. निदान मी तरी याच दृष्कानें त्याची परीक्षा करीन व याच कसोटीनर त्याचें अस्तित्व राजकीय सस्था या नात्याने पारखिलें जाऊन तें चालू राहील अथवा नष्ट होईल."

या बाह्यत निरपवाद दिसणाऱ्या भाषणात फार खोल अर्थ भरलेला होता. वाह्यत निरपद्रवी दिसणाऱ्या अश्वत्थवृक्षात ज्या प्रमाणें गुप्तरूपानें अग्नि वास करतो, त्या प्रमाणें प्रजादक्षतेच्या उपदेशाच्या बाह्यस्वरूपानें नटविलेल्या या भाषणात अतस्थ सतापाची धग पेटलेली होती तिचीच ज्वाला पुढें 'कर्झन सरक्युलर'च्या रूपानें बाहेर पडली.

ता २० जुलै १९०० रोजीं हें सरक्युलर हिंदुस्थान सरकारचे सेक्रेटरी मि. कनिंगहॅम याच्या सहीनें निघालें व तें ता २५ ऑगस्टच्या हिंदुस्थान सरकारच्या गॅझेटमध्यें प्रसिद्ध करण्यात आलें. त्यात

"देशी सस्थानातील राजानीं युरोपात सफर करण्यापूर्वी हिंदुस्थान सरकारची परवानगी घेण्याचा रिवाज आजपर्यंत चालू असला, तरी त्यासबधानें निश्चित लेखी धोरण घालण्यात आलेलें नाहीं, म्हणून तसें धोरण घालणें इष्ट असल्यामुळे, हें सरक्युलर काढिलें आहे,"

अशी प्रस्तावना करून पुढें तिची कारणमीमासा केली आहे, तींत म्हटलें आहे कीं,

"देशी सस्थानातील राजाचें प्रमुख व प्रथम कर्तव्य त्याच्या स्वत च्या राज्यातील प्रजेबद्दलचें होय, असें हिंदुस्थान सरकारचें ठाम मत आहे. वरिष्ठ सरकारच्या सरक्षणामुळें व सत्तेमुळें जगातील कोणत्याहि देशातील राजाना आपल्या उच्चस्थानाबद्दल जितकी सुरक्षितता मिळू शकते, तिच्याहून अधिक देशी सस्थानिकाना मिळत आहे. तिचा भग फक्त त्याच्या दुराचरणानें अथवा अशाच दुसऱ्या एखाद्या गभीर स्वरूपाच्या गुन्ह्या-

मानले, व महाराणीसाहेबाच्या प्रकृतीची चौकशी करून त्याना लौकरच आरोग्य प्राप्त व्हावें, अशी इच्छा प्रदर्शित केली. बडोदें राज्यातील दुष्काळामरवानेंहि त्यानीं चौकशी केली. याप्रमाणें केलेल्या अनौपचारिक स्वागताचा स्वीकार करून, कर्झनसाहेब ता. ३ रोजीं सकाळीं अहमदाबादकडे रवाना झाले.

अशा प्रकारें कर्झनसाहेबाचें स्वागत महाराजाच्या गैरहजिरींत केलें गेलें, त्याबद्दल त्यानीं आपली औपचारिक कृतज्ञता दिवाणाजवळ व्यक्त केली, तथापि त्याना अंतःकरणातून ही गोष्ट रुचली नसावी असें वाटतें. कारण यानंतर लौकरच त्यानीं देशी संस्थानातील राजाच्या विलायतेंतील सफरींचा प्रश्न धसाला लावण्याचें ठरविलें.

लॉर्ड कर्झन स्वतःला ब्रिटिश साम्राज्याचा आधारस्तंभ मानीत. हिंदुस्थानात ब्रिटिशाना उज्वल भविष्यकाल आहे, असा त्याचा ठाम भरवसा होता. या उज्वल भविष्यकालाचें रूपांतर वर्तमानकालात त्वरित करण्यासाठीं देशी संस्थानातील राजाचे ब्रिटिश सत्तेशीं असलेले संबंध अधिक दृढ करण्याचा त्यानीं संकल्प केला होता, व तो पार पाडण्याचा त्याचा मार्ग अगदीं सुलभ होता. तो असा होता —

> 'He felt certain that they *i e* the Ruling Chiefs, were to be won by a *little* personal courtsey '[1]
>
> 'या राजेलोकाना थोडासा मान दिला कीं, ते वश झालेच म्हणून समजावे.'

अशी त्याची खात्री होती व या खात्रीला स्टेट सेक्रेटरीसाहेबाचाहि दुजोरा होता जणू काय आपल्या राज्याचें कल्याण व आपले अधिकार याचा विचार देशी संस्थानिकाच्या मनास शिवतच नसून, ते 'थोड्याशा व्यक्तिविषयक सन्मानानें' हुरळून जाण्यासारखे पोकळ डोक्याचे होते! तथापि कर्झनसाहेबाचें असें मत होतें, हें मात्र त्यानीं

१ Life of Lord Curzon by Lord Ronaldshay, Vol. II.

कदाचित् तसा फरक वास्तविक आहे असे मानिलें, तरी संस्थानिकाची खाजगी म्हटलेली मिळकत ही सुद्धां अशी सोवळी मानता येणार नाहीं कीं तिचीं त्याना हवी तशी उधळपट्टी करतां येईल."

याप्रमाणें मीमासा करून हिंदुस्थान सरकारनें आपला निर्णय असा जाहिर केला कीं,

"संस्थानिकाचें वारंवार परदेशीं जाणे हें त्याचें योग्य वर्तन म्हणून समजलें न जातां, तें त्याचा कर्तव्यभंग म्हणून समजलें जाईल. यासाठीं संस्थानातील प्रजेच्या कल्याणाच्या कारणाशिवाय संस्थानिकांना प्रांतिक सरकारानीं परदेशीं जाण्याची परवानगी देऊ नये, असें फर्मान काढण्यात येत आहे. प्रसंगविशेषीं अशी परवानगी देण्यात येईल, तेव्हांहि परदेशातून संस्थानिक परत आल्यावर पुन्हा ते तिकडे जाण्यापूर्वी मध्यतरीं योग्य तितका काल गेला आहे, अशी खात्री प्रांतिक सरकारानी करून घेऊन, मगच त्यानीं मागितलेली परवानगी द्यावी. अखेर, प्रांतिक सरकाराना असा इषारा देण्यात येत आहे कीं, परदेशगमनाने संस्थानिकाच्या स्वभावावर व संवयींवर काय परिणाम होतात, याचें सूक्ष्म अवलोकन करून त्याची त्यानीं नोंध करून ठेवावी, म्हणजे तत्वाच्या दृष्टीने भविष्यकालीं त्याना परवानगी देताना या नोंधीचा उपयोग करिता येईल."

याप्रमाणें कर्झनसाहेबानीं सरक्युलर काढलें, ते सरकारी गॅझेटमध्यें जाहिर रीतीनें प्रसिद्ध करण्यात आलें. त्यावरोवर त्यावर अनेक बाजूनीं टीका करण्यात आली. लॉर्ड कर्झन याचे चरित्रकार लॉर्ड रोनाल्डशे यानी स्वत अशी कबूली दिली आहे कीं, विलायतेंत कर्झनसाहेबाच्या स्वतच्या कॉन्झरव्हेटिव्ह पक्षातच या सरक्युलरला प्रतिकूल असें मत पडलें, व त्यापासून होणाऱ्या दुष्परिणामाची भीति व्यक्त करण्यात आली. इतकेंच नव्हे तर हें सरक्युलर जाहिर रीतीनें प्रसिद्ध करण्याचा मूळचा हेतु नसून तें वृत्तपत्रांतून चुकून प्रसिद्ध करण्यात आलें, अशीहि

'मी पदच्युत झालोंच आहे. आता आपणहि पदच्युत झाला आहां; म्हणून मी आपलें अभिनंदन करतों.'

असो. वर म्हटल्याप्रमाणें देशी संस्थानांतील राजाच्या प्रवासाच्या संबधानें आपलें धोरण जाहिर करण्याचा कर्झनसाहेबांनीं जो संकल्प केला होता, त्याचा पहिला उपक्रम त्यांनीं ग्वाल्हेर संस्थानाला सन १८९९ च्या नोव्हेंबर महिन्यात दिलेल्या भेटीच्या वेळीं केला. या भेटीच्या प्रसंगीं त्यांच्या स्वागतार्थ जो बडा खाना देण्यात आला, त्या वेळीं कर्झन-साहेबांनीं एक महत्वाचें भाषण केलें, त्यात या प्रश्नावरील आपले विचार व्यक्त करताना त्यांनीं म्हटलें कीं,

"आमच्या राजनीतीच्या धोरणामुळें हिंदुस्थानातील देशी संस्थानाचे राजे हे भारतीय साम्राज्ययंत्राचे प्रमुख घटक बनले आहेत. म्हणून व्हाईसरॉय अथवा लेफ्टनंट गव्हर्नर याच्याइतकेच तेहि या देशातील राज्यकारभाराबद्दल जबाबदार आहेत. अशा स्थितींत एका पक्षीं ते ब्रिटिश साम्राज्याचे राजनिष्ठ घटक राहून, दुसऱ्या पक्षीं बेजबाबदार व स्वैर असे जुलमी राजे म्हणून राहू शकणार नाहींत त्याना मिळालेल्या सत्तेचा ते दुरुपयोग करीत नसून सदुपयोग करीत आहेत, अशी त्यांनीं साम्राज्य सरकारची खात्री पटविली पाहिजे. त्यांनीं स्वतःला आपल्या प्रजेचे धनी न समजता, नोकर समजलें पाहिजे व आपल्या राज्याचें उत्पन्न हें स्वतःच्या खाजगी सुखासाठीं नसून प्रजेच्या कल्याणासाठीं आहे, हा धडा त्यांनीं शिकला पाहिजे. त्याच्या राज्याची अंतर्व्यवस्था ज्या मानानें अधिक प्रामाणिकपणाची असेल, त्या मानानें तिच्यात हात घालण्याची जरूरी वरिष्ठ सरकारास कमी भासेल त्याची गादी ही स्वतःची विषयलालसा तृप्त करण्याचें साधन नसून ती कर्तव्याचें गंभीर आसन आहे, हें त्यांनीं ध्यानात ठेविलें पाहिजे. त्याचें दर्शन केवळ पोलोच्या मैदानावर, घोड्याच्या शर्यतीच्या रंगणावर अथवा युरोपमधील हॉटेलांत होऊन भागणार नाहीं. हे प्रकार केवळ

वाटण्याइतका दीर्घकालीन होत नाहीं, तेथपर्यंत अशा प्रवासापासून त्या संस्थानिकाचा फायदाच होण्यासारखा आहे "

हें सरक्युलर प्रसिद्ध झाल्यावर त्यासंबधानें काय करावें हा प्रश्न महाराजापुढे स्वाभाविकच उपस्थित झाला हा विचार दोन दृष्टींना करिता येण्यासारखा होता एका पक्षीं असें म्हणता येण्याजोगें होतें कीं, ज्या अर्थी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें तें सरक्युलर कोणत्याहि संस्थानिकाला उद्देशून काढिलेलें नव्हते, त्या अर्थी त्यासंबधानें आपली असंमति दर्शविण्याचें कांहींहि कारण महाराजाना नाहीं त्यानीं विलायतेस जाण्यापूर्वी आपल्या गमनाची वर्दी हिंदुस्थान सरकारास दिलेली होती तिला विरोध केला गेला नसल्यानें 'मौनं संमतिलक्षणम्।' या न्यायानें त्याची तिला संमति होतीच असें मानण्यास हरकत नाहीं व म्हणून महाराजाच्या संबधानें सरक्युलरात गूढ उल्लेख केला असण्याचा संभव नव्हता शिवाय बरेचसे राजे सरक्युलरात म्हटल्याप्रमाणें विलायतेत अनिष्ट सवयी लावून घेऊन येतात, ही गोष्टहि जरी नाकारता येण्यासारखी नव्हती, तथापि त्याना अपवाद म्हणून कांहीं राजे परदेशगमनानें आपलें ज्ञानाचे क्षेत्र विस्तृत करून त्याचा लाभ आपल्या प्रजेस देतात, असेंहि त्या सरक्युलरात कबूलच केलें होतें व हें वर्णन जर कोणास लागू पडण्याजोगें असेल, तर तें महाराजानाच होते म्हणून त्याना या सरक्युलराविरुद्ध तक्रार करण्याचें कारण नव्हते खरें, असें सरक्युलर काढण्याची सत्ता हिंदुस्थान सरकारास आहे किंवा नाहीं असा प्रश्न उपस्थित झाला, तरी त्याचा अखेर निर्णय देण्याची सत्ता त्याच्याकडेच असल्यामुळे, तो प्रश्न उपस्थित करूनहि काय फायदा होणार होता!

ही या प्रश्नाची एक बाजू झाली दुसऱ्या बाजूनें असेंहि म्हणता येण्याजोगें होतें कीं, हें सरक्युलर संस्थानिकाच्या दृष्टीनें अनेक प्रकारें आक्षेपार्ह असल्यानें त्याचा प्रतिकार करिता न आला तरी त्याबद्दलची आपली असंमति तरी त्यानीं अवश्य व्यक्त केली पाहिजे, नाहीं तर तें सरक्युलर सर्वांना मान्य आहे असें अनुमान त्याच्या मौनावरून काढता येईल

मुळें होतो. त्यामुळें वरिष्ठ सरकाराकडून मिळत असलेल्या या लाभाचा मोबदला म्हणून संस्थानिकांनीं आपला काळ ख्यालीखुशालींत व परदेशातील मौजेंत न घालविता त्यांनीं आपली सर्व बुद्धि व शक्ति आपल्या प्रजेच्या कल्याणासाठींच खर्च केली पाहिजे, असा मोबदला मागण्याचा हिंदुस्थान सरकारास हक्क आहे. संस्थानिकाच्या या उपरोक्त कर्तव्याशीं त्यांचें वारवार परदेशीं जाणें हें सर्वस्वीं विसगत आहे, मग ते परदेशगमन ज्ञानार्जनासाठीं अथवा सरकृतीसाठीं अंगिकारल्याचा बहाणा कोणी कसाहि करो ! ज्या मानानें संस्थानिकाला परदेशी आवडींची चटक लागेल, त्या मानानें तो बहुतांशीं आपल्या प्रजेला निकटचा वाटण्याऐवजीं दूरचाच वाटेल. क्वचित् प्रसगीं परदेशगमनानें एखाद्या बुद्धिमान संस्थानिकाचें ज्ञानाचें क्षेत्र वाढून त्याला पाश्चात्य राज्यशासनाच्या अनुभवाचा फायदा आपल्या राज्यातील शासनसंस्थाना देता आल्यामुळें, त्या संस्थानात राजा व प्रजा या उभयताचा फायदा होण्याचा संभव आहे व अशा सुपरिणामाचे थोडेसे दाखले उपलब्धहि आहेत तथापि असे दाखले फारच अल्प असून, त्याच्या उलट परदेशात गेल्यामुळें युरोपीय समाजाच्या मोहानें पौरस्त्य लोकांच्या मनावर बदललेल्या परिस्थितीचा दाब पडून त्याना उधळेपणाच्या व अस्वस्थतेच्या सवयी लागण्याचा संभवच अधिक आहे, व याचा परिणाम त्याच्या राजवाड्यात फाजील किंमतीचे निरुपयोगी सामानसुमान येणें व त्याच्या मनाच्या वृत्तींत अनिष्ट फरक होणें या रूपानेंच दिसून येणारा आहे अशा सफरींपासून राजकीय अथवा सार्वजनिक कामाची हौस व सामर्थ्य प्राप्त झाल्याचें दाखले क्वचितच आहेत बरें, या सफरी आपल्या खाजगी खर्चातून हे राजेलोक करतात असें म्हणून कदाचित् त्यांचें समर्थन करण्यात येईल, तर तेंहि खरें नव्हे, कारण देशी संस्थानात खाजगी व सरकारी मिळकत यामधील फरक केवळ नावाचाच असतो. यदा-

सारखें होतें. शिवाय तीं कारणें युरोपात जाणाऱ्या सर्वच राजाच्या बाबतींत लागू होण्यासारखीं नव्हतीं, असें खुद्द त्या सरक्युलरातच म्हटलें होतें मग त्याच्या बाबतींत तरी परवानगीची अपेक्षा ठेविली नसती तर काय बिघडलें असतें? यदाकदाचित् प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें त्याना विलायतेस जावयाचें असलें, तर त्याच्याकडून प्रकृति बरोबर नसल्याबद्दलचें एखाद्या डॉक्टराचें सर्टिफिकेट मागण्यात यावें, ही गोष्ट संस्थानिकाच्या अपमानाची कमाल मर्यादा दाखविण्यास पुरेशी होती त्याचा अर्थ असा होत होता कीं, ज्या राजाला असलें सर्टिफिकेट देणाऱ्या डॉक्टराच्या योग्यतेचे छप्पनशें नोकर ठेविण्याची योग्यता आहे, त्याच्या शब्दापेक्षा तशा डॉक्टराच्या शब्दाला अधिक किंमत असणार! संस्थानिकाना आपल्या बायकामंडळींच्या प्रकृतीसाठीं उपचाराकरिता जावयाचे असलें तरी खानगी स्वरूपाची व प्रकट न करण्यासारखी माहितीहि संस्थानिकानीं पुरविली पाहिजे, तरच त्याला जाण्याची परवानगी मिळणार, म्हणजे या बाबतींत एखाद्या कारकुनापेक्षाहि या राजाची स्थिति अधिक अनुकंपनीय झाली होती. एकंदरींत ज्याच्याशीं इंग्रज सरकारनें दोस्तसरकार म्हणून बरोबरीच्या नात्यानें तह केले होते, त्याची अवस्था या सरक्युलरानें येणेंप्रमाणें होणार होती

याखेरीज या सरक्युलराविरुद्ध आणखी एक महत्त्वाचा आक्षेप असा होता कीं, तें ज्यांच्याविरुद्ध काढण्यात आलें होतें, त्याना त्याबद्दलची वार्ताहि कळू देण्यात आली नव्हती, मग त्याचें म्हणणे ऐकून घेणे तर दूरच राहिलें! कोणताहि नवा कायदा करण्यापूर्वी त्याच्यायोगानें ज्या वर्गाच्या हितसंबंधावर परिणाम होण्यासारखा असतो, त्या वर्गाच्या प्रतिनिधींच्या तक्रारी ऐकून घेऊन, त्याबद्दलची चर्चा करण्यास त्याना अवसर देण्यात येतो व्यापारी लोक, वृत्तपत्रकार, धंदेवाले, फार काय रस्त्यातून भीक मागणारे भिक्षेकरी, याच्यासंबधानें करावयाचे कायदेहि टीकेसाठीं अगोदर प्रसिद्ध करण्यात येऊन नंतर त्यावर चर्चा करण्यात येते, व

त्याची तरफदारी करण्यात आली. यावरून हें सरक्युलर ज्यांना उद्देशून काढण्यात आलें, त्यानाच केवळ नव्हे, तर कर्झनसाहेबाच्या पुढ्यातील त्याच्या पक्षपात्यानाहि आवडलें नाहीं, असें स्पष्ट दिसून येतें. फार काय, खुद्द बादशहा सातवे एडवर्ड यानाहि कर्झनसाहेबाचें हें सरसहा धोरण पसंत पडलें नाहीं, असें त्यानंतर सन १९२७ सालीं मि सिड्ने ली यानीं लिहून प्रसिद्ध केलेल्या त्या बादशहाच्या चरित्रावरून स्पष्ट झालें आहे. सदर चरित्रात मि सिड्ने ली यानीं म्हटलें आहे कीं,

> "Lord Curzon, who was Viceroy at the King's accession kept the King well informed of the character and conduct of Indian Princes He viewed with disfavour their growing practice of absenting themselves from the States on long visits to Europe, but the King, as he wrote to Lord Curzon on the 11th of July 1901, deemed it a very difficult matter to lay down any hard and fast rule on the subject. There is no doubt that visits to England by Native Princes are useful as long as they are not by their lengthened absence from the States over which they rule, undesirable "[१]

> " बादशहा सातवे एडवर्ड याच्या राज्यारोहणप्रसंगीं लॉर्ड कर्झन हे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय होते. ते हिंदुस्थानातील राजाच्या स्वभावाची व वर्तनाची हकीगत बादशहाना नेहमीं कळवीत असत. लॉर्ड कर्झन याच्या मतें हिंदी संस्थानिकाची दीर्घकालपर्यंत विलायतच्या सफरी करण्याची वाढती प्रवृत्ति अनिष्ट होती, परंतु यासंबंधानें बादशहानीं लॉर्ड कर्झन याना पाठविलेल्या ता ११ जुलै १९०१ च्या पत्रात आपला अभिप्राय असा कळविला कीं या बाबतींत सरसहा असा एक नियम घालून देणें कठिण आहे जेथपर्यंत संस्थानिकाचा युरोपातील प्रवास त्याच्या गैरहजेरीमुळें त्याच्या राज्यास अनिष्ट

१ Sidney Lee's King Edward VII a Biography Vol II p. 365

distinctly cordial, his relations with the Gaekwar of Baroda were by no means on such a happy footing and provided one of the numerous matters of disagree ments between the Viceroy and the Home Govern ment. In 1905, the Gaekwar proposed to absent himself from India during the Prince of Wales' tour, an absence that would appear to be a slight on the heir to the British throne Lord Curzon took what was perhaps an unduly severe view of the Gaekwar's desire to leave India, but the King, while regretting the Gaekwar s absence, strongly held that his liberty should not be hampered by Viceregal action."[1]

" बादशहाच्या परिचयाच्या कित्येक देशी राजाच्यासबधानें लॉर्ड कर्झन यानीं कडक शब्द वापरले होते. जरी हिंदुस्थानातील वऱ्याचशा राजेलोकाशीं त्याचे सबध प्रेमाचे होते, तरी गायकवाड सरकारशीं मात्र त्याचे खडाष्टक होते, व त्यामुळें व्हाईसरॉय व इग्लडातील सरकार याच्यामध्ये अनेक वेळा तीव्र मतभेदाचे प्रसग उत्पन्न झाले होते. सन १९०५ मध्ये त्या वेळचे प्रिन्स ऑफ वेल्स् हिंदुस्थानात येणार होते, त्या वेळीं हिंदुस्थानाबाहेर जाण्याचा बेत गायकवाड सरकारनीं केला होता लॉर्ड कर्झन याच्या मते असें करणें म्हणजे इग्लडच्या गादीच्या भावी अधिपतीचा अपमान करण्यासारखे होतें. वस्तुत लॉर्ड कर्झन याचा हा अभिप्राय विनाकारण कडक असा होता त्या वेळीं बादशहानीं आपले मत स्पष्टपणें असें दिलें कीं, जरी गायकवाड सरकारची गैरहजिरी खेदजनक असली, तरी त्याच्या कार्यक्रमावर व्हाईसरॉयाचे नियत्रण बिलकूल नसावें असें मला ठाम वाटतें "

अशा प्रकारें कर्झनसाहेबाच्या सरक्युलराचा मुख्य रोख कोणावर होता हे आता स्पष्ट झालें आहे. पण त्या वेळींहि तें स्पष्ट कळलें नसलें तरी

१ Sydney Lee s King Edward VII, a Biography, p 365

प्रथमतः हें सरक्युलर ज्या शब्दांत व ज्या रीतीनें प्रसिद्ध करण्यांत आलें, तीं दोन्हींहि अयोग्य होतीं. राजेलोकांना कोणताहि सल्ला द्यावयाचा असला, तरी तो खाजगी रीतीनें व त्यांच्या इभ्रतीला धक्का पोहोंचणार नाहीं अशा पद्धतीनें देण्याचा आजपर्यंतचा रिवाज असून, त्याविरुद्ध या प्रसंगीं तो जाहिर रीतीनें व डंका वाजवून देण्यांत आल्यानें त्यांची निःसंशय मानहानि झाली होती. दुसरें असें कीं, हें सरक्युलर काढल्यानें विशेष फायदा कोणता होणार होता? हिंदुस्थानांतून कधींहि बाहेर न गेलेल्या कित्येक दुर्व्यसनी राजांपेक्षां परदेशीं गेलेले कोणते राजे अधिक बिघडल्याचें दाखविता येण्याजोगें होतें? हिंदुस्थानांतच राहून दारूंत व स्त्रियांत बेहोष झालेले राजे त्या वेळीं नव्हते काय? त्यांना सुधारून प्रजेच्या कल्याणाविषयीं तत्पर करण्याला काय उपाय योजिण्यांत आले होते? या देशांतच राहून ख्यालीखुशाली करणारे व विलायती समाजांत आपल्या प्रजेचे लाखो रुपये खर्च करणारे राजे आढळण्यांत येत नव्हते काय? आपल्या राजधानींत राहूनहि इंग्रजी अगर इतर युरोपियन स्त्रियांशीं लग्न करणारे राजे हिंदुस्थानांत कोणी नव्हतेच कीं काय? कायदेकानू झुगारून देऊन प्रजेवर जोरजुल्म करणारे राजे हिंदुस्थानांत उपलब्ध होण्यासारखे नव्हतेच कीं काय? बड्या इंग्रज अधिकाऱ्यांच्या स्वागतासाठीं पिण्याच्या व उडविण्याच्या दारूपायीं हजारों रुपयांचा चुराडा करणारे राजे नजरेंत येतच नव्हते काय? सबंध आयुष्यभर आपल्या प्रजेपैकीं कोणाचेंच काय पण खुद्द आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचेंहि मुखावलोकन न करणारे राजे दिसत नव्हते काय? मग हिंदुस्थानांत राहूनहि जर वरील सर्व कृत्यें करतां येत होतीं व तीं करणाऱ्यांवर कोणत्याहि प्रकारचा आक्षेप घेण्यांत आला नाहीं, तर परदेशांत जाणाऱ्या राजांनींच असें काय पाप केलें होतें कीं, त्यांच्यांवरच या सरक्युलराच्या शस्त्राची धार चालवावी? तेव्हां हें सरक्युलर काढण्यासाठीं दाखविलेलीं कारणें केवळ अडाणी जनतेच्या डोळ्यांत धूळ फेंकणारीं होतीं हें सहज समजण्या-

येणार नाहीं. कारण या पैशाचा उपयोग त्याच्या संस्थानाना कांहीं-इतकाहि होणारा नाहीं. अशा संस्थानिकाच्या उधळपट्टीचें उदाहरण गायकवाडानीं गिरविलें नाहीं, हा त्याचा मोठा दोष आहे असें म्हणता येणार नाहीं. त्याना आपल्या प्रजेच्या हिताची पूर्ण जाणीव आहे; म्हणूनच असें म्हणावें लागतें कीं त्याच्या टीकाकाराना त्याच्यावर हल्ला करण्याची कांहीं तरी संधि हवी होती, तशी संधि या सरक्युलराच्यामुळें त्याना मिळाली, इतकेंच. वस्तुत महाराज आपल्या पत्नीच्या आजारासाठीं उपचार करण्याकरिता सहा वर्षांनीं युरोपात गेले आहेत, व तेहि आपल्यामागें राज्यकारभाराची व्यवस्था वरिष्ठ ब्रिटिश नोकरशाहीपैकींच्या अत्यंत हुषार व विश्वासू अशा दिवाणाच्या हातात देऊन गेले आहेत. या सर्वांचें तात्पर्य इतकेंच आहे कीं, कांहीं मतलबी लोकाच्या हातात मेणाहून मऊ होण्याला गायकवाड सरकार कबूल नाहींत, म्हणून त्याच्यावर टीकेचा हा भडिमार करण्यात येत आहे."

येणेंप्रमाणें या सरक्युलराचा रोख सर्वस्वीं नसला, तरी बहुतांशीं महाराजावर आहे असें सर्वत्र मानण्यात येत होतें. अशा स्थितींत त्या सरक्युलरातील कारणात दर्शविलेल्या आक्षेपाना उत्तर न देणें म्हणजे पर्यायानें तें आपल्याला मान्य असल्याची कबूली देण्यासारखें होतें. म्हणून या सरक्युलराला उद्देशून आपले स्पष्ट मत व्हाईसरॉयसाहेबास कळविण्याचा महाराजानीं विचार केला. तथापि कोणतीहि गोष्ट धिमेपणानें व पूर्ण विचारांतीं करण्याच्या त्याच्या स्वभावाप्रमाणें त्यानीं त्या बाबतींत उतावीळ केली नाहीं.

हें सरक्युलर निघालें त्या वेळीं महाराज विलायतेत होते तेथें त्याचा 'नॉर्थब्रुक सोसायटी' या नावाच्या वजनदार संस्थेतर्फे सन्मान करण्यात आला. त्या प्रसंगीं महाराजाच्या राज्याभिषेकाचे वेळीं गव्हर्नर जनरल असलेले लॉर्ड नॉर्थब्रुक यानीं स्वत अध्यक्षस्थान सुशोभित केलें होतें व

तींत ज्या विधायक वा विनाशक सूचना बहुमतानें मजूर करण्यात येतील, त्याचा समावेश करून दुरुस्त केलेल्या स्वरूपात ते कायदे अमलात येतात. परतु हिंदुस्थानात ज्यानीं स्वतत्र राज्यें कमाविलीं व चालविलीं, त्याच्या वशजाना मात्र यापैकीं कशाचाहि लाभ न देता, त्याच्यावर या सरक्युलराची तलवार निरतर लटकत ठेवण्यात येत होती. याचा परिणाम एकच होण्यासारखा होता कीं, कर्झनसाहेबानीं आपल्या सरक्युलरात जे काहीं राजे 'ज्ञानार्जनासाठीं युरोपात जाऊन तेथील सुधारलेल्या राज्यपद्धतीची माहिती मिळवून तिचा लाभ आपल्या राज्यातील स्थानिक सस्थाना देतात,' असें कबूल केलें होतें, त्यानाहि या सत्कार्यासाठीं परवानगी मागण्याकरिता ब्रिटिश अधिकाऱ्याजवळ आपलें तोंड वेंगाडावें लागणार होतें. अशा स्थितींत त्याच्यात स्वाभिमान, स्वतत्रवृत्ति, उल्हास, व्यवस्थितपणा व राज्यकारभाराची हौस उत्पन्न कशी व्हावी? ब्रिटिश राज्याच्या फायद्यासाठीं सस्थानिकाकडून काहीं लाभ करून घ्यावयाचा असेल, त्या वेळीं मात्र त्याची मुक्तकठानें प्रशसा करण्यात येते; परतु त्या वेळीं जर या सस्थानिकानीं हो म्हणण्यापूर्वी एखादा गैरसोईचा प्रश्न विचारिला, तर मात्र त्याना ताबडतोब तबी देण्यात येते. अशा स्थितींत नवीन सरक्युलर म्हणजे स्थानिक पोलिटिकल अधिकाऱ्याच्या हातात दिलेलें कोलीत होतें. या सर्व कारणामुळे तें सरक्युलर जितकें अनावश्यक, तितकेंच अस्थानीं व जितकें निरुपयोगी तितकेंच उपद्रवी असें होतें.

हें सरक्युलर काढताना कर्झनसाहेबाचा रोख कोणावर होता हें त्या वेळीं जरी केवळ अनुमानानें ताडण्यासारखें होतें, तरी तें अनुमानच खरें होतें असें अलीकडे प्रसिद्ध झालेल्या मि. सिड्ने ली याच्या बादशहा सातवे एडवर्ड याच्या पूर्वोक्त चरित्रावरून स्पष्ट होतें. ते लिहितात —

'The Viceroy was strong in his expressions regarding certain Native Princes who were personally well known to the King . . Although with the greater number of Indian Princes the Viceroy's relations are

करणे सरकारच्या जीवावर येते, तसाच प्रकार याहि प्रसंगीं झाल्याने हें सरक्युलराचें प्रकरण बराच काळपर्यंत तसेंच रेंगाळत राहिलें त्यामुळें सन १९०३ सालीं महाराजानीं बडोद्याचे रेसिडेंट कर्नल मीड याना एक पत्र लिहून आपलें हृद्गत त्यात खुलें केलें या पत्रात विलायतच्या प्रवासामुळे राज्यकारभारात कदाचित् अव्यवस्था होत असेल, या शंकेच्या निरसनार्थ त्यानीं लिहिले होतें कीं,

"देशी राज्यातील कारभार साम्प्रतच्या काळीं चाकोरींतून चालल्या प्रमाणे सरळ व बिनअडचणीचा असा असल्यावर, त्यासबधाने अनास्तव काहूर उठविण्यात काय अर्थ आहे! निदान माझ्या राज्यातील कारभारासबधानें मी इतकें म्हणू शकेन कीं, त्याच्यात जरी काहीं दोष असले, तरी त्याला अशी सुव्यवस्थित पद्धति लावून देण्यात आली आहे कीं, त्यात आता कोठेंहि हरकत अथवा खटका येण्याचा सभव नाहीं चालू कामाचा निकाल, नवीन धोरणाचा आरभ व राज्यातील खर्च वगैरे सर्व बाबतींत नियम घालून देण्यात आले असून, त्यासबधानें दरेक ऑफिसराचे अधिकार नक्की करण्यात आले आहेत त्याखेरीज इतर कोणतेहि महत्त्वाचे प्रश्न तूर्त उत्पन्न होण्याचा सभव नाहीं लढाई अथवा तह, नवीन कामाचा उपक्रम अथवा रेल्वेसारख्या नवीन जबाबदाऱ्या सध्या उत्पन्न होण्याची शक्यता नाहीं, व असली तरी आजपर्यंतच्या अनुभवावरून मला राज्यकारभाराची जी सपूर्ण माहिती झाली आहे, तिच्या सहाय्यानें मी राज्यात नसलो तरी या प्रश्नाचा निकाल सहज करू शकेन अशा स्थितींत सस्थानिकाना विनाकारण व निरर्थक त्रास देण्याचा परिणाम इतकाच होईल कीं, निराशेनें ते आपलीं राज्यें सोडून देतील व अखेर तीं ब्रिटिश मुलुखात सामील करण्यात येतील हल्लींचीं देशी राज्ये निस्तब्धित होण्याच्या मार्गास लागलींच आहेत व साम्प्रतच्या राजनीतीनें तो परिणाम अधिक लवकर घडून येईल!"

हिंदुस्थानात सार्वत्रिक अनुमान तेंच होतें, व विलायतेंतील वर्तमानपत्रांनीं तर त्याचा मुख्य कटाक्ष महाराजांवरच आहे, असें समजून त्यासंबंधी स्पष्ट लेखहि लिहिले. उदाहरणार्थ, 'लंडन टाईम्स्'च्या सिमल्याच्या बातमीदारानें पाठविलेलें एक पत्र त्या वर्तमानपत्राच्या ता. २५ ऑगस्टच्या अंकात प्रसिद्ध झालें, त्यात उघड उघड म्हटलें होतें कीं,

" बडोद्याचे गायकवाड व कपुरथळ्याचे महाराज याना आपल्या संस्थानाचा कारभार दिवाणावर सोंपवून वारंवार युरोपास जाण्याची चटक लागलेली आहे; त्याच्यावर या सरक्युलराचा चांगला परिणाम होईल."

या बातमीदाराच्या मताचाच अनुवाद 'टाईम्स्' पत्रानें ता. २७ च्या अंकाच्या अग्रलेखात करून आपल्या बातमीदाराच्या मताला पुष्टि दिली. यावरून विलायतेंतील मुत्सद्यातहि सरक्युलराचा रोख मुख्यत महाराजांवरच असल्याची समजूत होती हें स्पष्ट दिसून येतें हीच समजूत हिंदुस्थानातहि प्रचलित झाली होती, व इकडील वृत्तपत्रकारापैकीं एकानें लंडन टाईम्स्च्या सिमल्याच्या बातमीदारानें या सरक्युलराचा रोख गायकवाडावर आहे असें का लिहिलें याच्या कारणाचा जरा खोल विचार करून म्हटलें कीं,

"गायकवाडावर टीका करून ग्वाल्हेर, जयपूर, बिकानेर वगैरे संस्थानाच्या महाराजांनीं या दुष्काळाच्या प्रसंगीं आपल्या राज्यात राहून काम केलें, याचा गौरव या सिमल्याच्या बातमीदारानें केला आहे. त्याचा विचार करता या विरोधाची कल्पना मोठी सूचक आहे, असें दिसून येईल. गायकवाडांनी आपल्या प्रजेच्या पैशातील वीस लाख रुपये एखादें हॉस्पिटल जहाज बांधण्याकरिता दिले नाहींत, अथवा ब्रिटिश मुलुखातील दुष्काळी कायमनिधीसाठीं दिले नाहींत, हा त्यांचा मोठा गुन्हा आहे! वस्तुत आमच्या मतें जयपूर, बिकानेर वगैरे संस्थानिकांनीं आपल्या राज्यातील लाखों रुपये अशा कामाकरिता देऊन टाकिले, हें त्यांचें मोठेंसें सत्कृत्य म्हणता

हे इंग्लंडच्या गादीवर बसण्याबरोबरच हिंदुस्थानचे बादशाह झाले असल्यामुळें त्यांना बादशहा म्हणून जाहिर करण्यासाठीं एखादा दरबार भरविण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. उलट असा दरबार भरविल्याने अशी गैरसमजूत होण्याचा संभव आहे कीं, बादशहाचें बादशाहपण हें या दरबारावर अवलंबून आहे. ही झाली सनदशीरपणाची अडचण. परंतु कर्झनसाहेबांच्या विरोधकांना वाटणारी खरी अडचण निराळीच होती. लॉर्ड कर्झन हे बुद्धिमान व कर्तबगार असले, तरी अत्यंत घमेंडखोर, गर्विष्ठ व भपक्याचे आतुर असल्यामुळें त्यांच्याविषयीं त्यांच्या पक्षातील सहकाऱ्यामध्येंहि प्रेम नसे. त्यामुळें परकीय पैशानें आपल्या स्वतःचा बडेजाव मिरविण्याचा त्यांचा दरेक उपक्रम या सर्वांना दुःसह होई. या कारणानें कर्झनसाहेबांच्या या दरबाराच्या सूचनेला त्यांनीं कसून विरोध केला. लॉर्ड कर्झन यांचे चरित्रकार लॉर्ड रोनाल्डशे यांनीं ही गोष्ट स्पष्टपणें कबूल केली आहे. ते म्हणतात कीं,

> "दरबाराचें महत्त्व वाढविण्याच्या नवीन सूचना जो जो कर्झनसाहेब करूं लागले, तों तों त्या दरेक सूचनेला विलायतेतील मंत्रीमंडळानें अधिकाधिक विरोध केला."

हाच विरोध पुढें वाढत जाऊन तो अखेर कर्झनसाहेबांच्या पदच्युतीला कारण झाला. तथापि कर्झनसाहेबांची ही कल्पना एडवर्ड बादशाहांनीं पसंत केल्यामुळे दरबाराचा बेत अखेर निश्चित करण्यात आला

हा दरबार सन १८७७ च्या दरबारापेक्षा फार मोठ्या प्रमाणावर करण्याचा आपला बेत असल्याचें कर्झनसाहेबांनीं यासंबंधीं लिहिलेल्या एका वचनात आरंभींच नमूद करून ठेवलें आहे. ते आपली स्वतःची बडेजावाची हौस या प्रसंगीं पुरवून घेणार असल्यानें दरबाराचा थाट जितका अधिक भव्य, तितकें त्याचें महत्त्व अधिक अशी त्रैराशिकाची स्थिति असल्यामुळें, या प्रसंगीं हिंदुस्थानचा पैसा पाण्यासारखा खर्चण्यास त्यांनीं बिलकुल मागेंपुढें पाहिलें नाहीं. या प्रसंगीं मिलिटरीच्या हालचालीसाठीं

लॉर्ड रिपन, लॉर्ड हॉब्हाउस, लॉर्ड हॅरिस्, सर रिचर्ड टेंपल, सर जेम्स् फर्ग्युसन् हे माजी व्हाईसरॉय व गव्हर्नर जनरल, तसेंच इतर अनेक वजनदार राजकारणी इंग्रज पुरुष आणि रा. दादाभाई नौरोजीसारखे हिंदी सद्गृहस्थहि या समारंभास हजर होते. या वेळीं महाराजाच्या गौरवपर अनेक भाषणें करण्यांत आलीं. असाच दुसरा समारंभ वेमन्सफील्ड येथें घडवून आणण्यात आला. त्या प्रसंगीं महाराजांनीं आपली राजनिष्ठा व्यक्त करून म्हटलें कीं,

"ज्या ज्या वेळीं साम्राज्याला चीनमध्यें अथवा इतर कोठेंहि कांहीं अडचण येईल, त्या वेळीं साम्राज्याच्या सेनेला मी तत्पर आहे."

परंतु ही राजनिष्ठाहि अँग्लो इंडियन वर्तमानपत्रकाराच्या पोटांत दुखूं लागली ! या भाषणावर टीका करताना पायोनिअरनें म्हटलें कीं,

"गायकवाडाचे हे उद्गार वाचावयास सुंदर आहेत. परंतु इकडे हिंदुस्थानांत आम्हाला माहीत आहे कीं, महाराजांनीं साम्राज्याच्या रक्षणासाठीं आतापर्यंत कांहींहि केलेलें नाहीं."

या टीकेचा उल्लेख करण्याचा हेतु इतकाच कीं, त्या काळीं इंग्रजी समाजांत महाराजाविरुद्ध वातावरण जाणूनबुजून कसें दूषित करण्यांत येत होतें, याची कल्पना यावी.

पुढें महाराज विलायतेंतून परत आल्यावरहि दोन वर्षेंपर्यंत थांबून या गोष्टीचा पूर्ण विचार करून नंतर त्यांनीं कर्झन सरक्युलरला भारदस्त भाषेंत, पण स्पष्ट शब्दांनीं जबाब देऊन तो व्हाईसरॉयाकडे पाठविला. त्याचा त्या वेळीं तरी कांहीं अनुकूळ परिणाम होईल अशी अर्थातच अपेक्षा नव्हती व त्याप्रमाणें तो झालाहि नाहीं. त्यामुळें या पुढील पांच वर्षें ते हिंदुस्थानांतच राहिले. तथापि महाराजाच्या जबाबांत दिलेल्या कारणाचा अखेर परिणाम हिंदुस्थान सरकारावर झाल्यावाचून राहिला नाहीं व कर्झनसाहेबाच्या नंतर हें सरक्युलर मृतप्राय झालें. तरी पण स्वतः केलेली कोणतीहि गोष्ट चुकीची असल्याचें आढळून आल्यावरहि इज्जतीच्या सबबीवर ती रद्द

हा जबाब मिळाल्यावर मग महाराजाना सदर मिरवणुकींत सामील होण्याचा आग्रह करण्यात आला नाहीं, व म्हणून दिल्ली दरबारचे अधिकृत हकीकतकार मि व्हीलर यानीं या मिरवणुकीचें वर्णन करताना व्हाईसरॉय याच्या हत्तीमागून चालणाऱ्या निजामसाहेबाच्या हत्तीचें वर्णन करून आपली लेखणी एकदम म्हैसूरचे महाराज व त्यानतर त्रावणकोरचे महाराज याच्या हत्तींकडे वळविली आहे. यानतर दरबारासाठीं महाराज दिल्लीला जाण्यापूर्वीहि असाच एक दुसरा मानापमानाचा प्रश्न उत्पन्न झाला. बडोदें राज्यातील दरबारी नोकराचा पोषाख अनेक वर्षांपासून लाल रगाचा आहे तथापि दिल्ली दरबारासाठीं कर्झनसाहेबानीं आपल्या नोकरानाहि लाल रगाचे डगले दिल्यामुळें, सार्वभौम सरकार व त्याचे अकित सस्थानिक याच्यामधील फरक स्पष्ट दिसण्यासाठीं लाल डगल्याचा पोषाख इतर कोणीहि आपल्या नोकराना देऊ नये असा हुकुम कर्झन-साहेबानीं सोडला. याहि प्रसगीं महाराजानीं या हुकुमाविरुद्ध तक्रार केली, व तिच्याबद्दल बरीच घाटाघाट होऊन महाराजाना आपल्या नोकराचे लाल डगले बदलावे लागले. या गोष्टीवरून सस्थानिकाची राजनिष्ठा कायम असूनहि वरिष्ठ इग्रजी अधिकाऱ्याच्या लहरी हुकुमाप्रमाणे वागण्यास त्यानीं जराहि नाखुषी दर्शविताच त्याच्यावर एकदम अराजनिष्ठेचें काहूर कसे उठविण्यात येतें, हें दिसून येईल परतु अशा सर्व प्रसगीं महाराजानीं राजनिष्ठा व शिष्टाचार याचा त्याग न करिता, आपला दर्जा व अधिकार कायम ठेवण्याचा शक्य तो प्रयत्न केला. हें करताना त्याना वरिष्ठ अधिकाऱ्याची व त्याचे हस्तक जे अँग्लोइडियन लोक याची गैरमर्जी सपादन करावी लागली. परतु आपलें कर्तव्य सचोट रीतीनें करीत असल्याबद्दल त्याचें मन त्याना सागत असल्यानें, त्यानीं या गैरमर्जीला फारशी किंमत दिली नाहीं.

या दरबाराला जाण्यासाठीं महाराज बडोद्याहून ता. ३१ डिसेंबर १९०२ रोजीं निघून दुसऱ्या दिवशीं दिल्लीस पोहोचले तेथे त्याची छावणी फार विशाल व थाटाची तयार करण्यात आली होती. ती शकरपूर या

अशा उद्वेगाच्या स्थितींत महाराज असतानाच त्याना कर्झनसाहेब दिल्लीस भरविणार असलेल्या दरबाराचें आमंत्रण आलें. सन १९०० सालीं महाराज विलायतेस गेल्यावेळीं त्याचा पाहुणचार महाराणी व्हिक्टोरिया यानीं स्वत केल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. ती सफर सपवून महाराज बडोद्यास परत येतात, तोंच थोड्या दिवसानीं महाराणी व्हिक्टोरिया यांचें देहावसान झाल्याची खबर आली. ती कळताच महाराजानीं बडोद्याच्या रेसिडेन्टाना जें पत्र पाठविलें, त्यावरून या वार्तेनें त्याना किती खेद झाला याबद्दलचे त्याचे विचार दिसून येतात. ते लिहितात –

"ही दु खकारक वार्ता ऐकून मला किती वाईट वाटलें, हें दर्शविण्यास मजजवळ पुरेसे शब्द नाहींत विशेषत महाराणी साहेबानीं मजवरील प्रेमाचा मला अनेक वेळा अनुभव आणून दिला असल्यामुळें, मला अधिकच वाईट वाटत आहे. मी त्याना नुकत्याच पाहिल्या असल्यामुळें त्याची स्मृति माझ्या मनात अगदीं ताजी आहे "

महाराणी व्हिक्टोरियानतर त्याचे चिरंजीव एडवर्ड प्रिन्स ऑफ वेल्स् हे सातवे एडवर्ड म्हणून गादीवर आले. तेव्हा तो प्रसग एका दरबाराच्या रूपानें मोठ्या थाटानें साजरा करून त्यात आपण स्वत नवीन बादशाहाचे प्रतिनिधि म्हणून मिरवून घ्यावें, अशी मनीषा कर्झनसाहेबांच्या मनात उत्पन्न झाली बहुश ही कल्पना महाराणी व्हिक्टोरिया याच्या मृत्युपूर्वींहि त्याना सुचली असावी, कारण महाराणींच्या मृत्यूची खबर कळल्यापासून अट्ठेचाळीस कलाकाच्या आतच कर्झनसाहेबानीं सर फ्रॅन्सिस् नोल्स् या नवीन बादशाहाच्या प्रायव्हेट सेक्रेटरींना लिहिलेल्या पत्रात बादशाहाच्या अभिप्रायासाठीं ही कल्पना कळवून टाकिली! तथापि इग्लडात कर्झन साहेबाच्याच पश्चात् या कल्पनेला विरोध करण्यात आला तो दोन प्रकारचा होता त्याच्या विरोधकाचें एक म्हणणें असें होतें कीं, एडवर्ड बादशाहा



दिल्ली दरबार ( सन १९०२ ) च्या प्रसंगाची महाराजांची छावणी

होणारा पैसा वगळून, केवळ इतर खर्च तीस लाख रुपये झाला, असें सांगून त्यांनीं लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें मोठ्या तोऱ्यानें सवाल टाकला कीं, तेतीस कोटि लोकसंख्येच्या मानानें हा खर्च अधिक आहे असें कोण म्हणेल ?

अर्थात् अशा प्रचंड दरबारांत आपण स्वत: मिरवितांना आपल्या बरोबर हिंदुस्थानांतील मांडलिक राजांचें प्रदर्शन करून आपलें वैभव फुगवून दाखविण्याची संधि ते कशी दवडतील ? यामुळें त्यांनीं सर्व संस्थानिकांच्या अग्रभागीं स्वत: राहून संस्थानिकांची एक जंगी हत्तीवरील मिरवणूक या प्रसंगीं काढण्याचें ठरविलें व हा आपला बेत सर्व संस्थानिकांना कळवून त्याबद्दल त्यांचे स्पष्ट अभिप्राय मागविले. त्यावरून महाराजांनीं आपला अभिप्राय रेसिडेंटांना कळविला कीं, हत्तीवरील मिरवणुकींत भाग घेणें आपल्याला गैरसोयीचें होईल. परंतु या उत्तरानें वरिष्ठ अधिकाऱ्यांना बरें वाटलें नाहीं व महाराजाच्या अभिप्रायानें वरिष्ठ सरकारचा अपमान होतो असें त्यांना कळविण्यांत आलें. तेव्हां महाराजांनीं उत्तरांत लिहिलें कीं,

" आमचा स्पष्ट अभिप्राय कळविण्याबद्दल सांगण्यांत आलें असतां तो अभिप्राय कळविल्यानें जर आपला अपमान होत असेल, तर मग स्पष्ट अभिप्राय मागविण्यांतच कां आला ? वस्तुत: असा अभिप्राय देण्यांत हिंदुस्थान सरकारास नाराज करण्याचा आपला हेतु मुळींच नसून या प्रकरणीं स्वत:ला प्रामाणिकपणें जें वाटतें तेंच फक्त कळविलें आहे. अशा स्थितींत या अभिप्रायानें बादशाहाचा अपमान होत आहे असा अर्थ केला जात असल्यास आपण आपला नकार परत घेऊन मिरवणुकींत सामील होण्यास तयार आहों, पण मग नाइलाजानें केलेलें हें आपलें वर्तन खुषीनें व स्वयंस्फूर्तीनें केल्याचा देखावा तरी करण्यांत येऊं नये ! बादशाहाचा अपमान करण्याची कल्पनाहि आपल्या मनांत येणें शक्य नाहीं. पण जर कांहीं गोष्टी कर्तव्य म्हणून बादशाहाच्या नांवानें करण्याचें सांगण्यांत आलें, तर त्या गोष्टी खुषीनें नव्हेत, पण कर्तव्य म्हणूनच केल्या जातील "

दाखविण्यांत आला व त्यानंतर व्हाईसरॉय यांनीं जमलेल्या मंडळींना उद्देशून भाषण केलें. यापुढें या समारंभासाठीं आलेल्या संस्थानिकांची व्हाईसरॉयसाहेबांशीं भेट करून देण्याचा विधि करण्यांत आला. त्यांत प्रथम निजामसाहेबांची भेट झाल्यावर महाराजसाहेब आपल्या जागेवरून उठून व्हाईसरॉयसाहेबांजवळ गेले, व त्यांनीं बादशाहांच्या राज्यारोहणा-निमित्त आपण त्यांचे करीत असलेलें अभिनंदन व नूतनवर्षाबद्दलची शुभेच्छा, ही त्यांना कळविण्याबद्दलचा संदेश व्हाईसरॉयसाहेबांस निवेदन करून ते परत आपल्या जागीं येऊन बसले. यानंतर इतर संस्थानिकांच्या भेटीचा समारंभ झाल्यावर दरबार समाप्त झाला. पुढें कांहीं दिवस दिल्लीस काढल्यानंतर महाराज ता. १५ जानेवारीस बडोद्यास परत आले, याहि वेळीं सन १८७७ सालाप्रमाणें दिल्लीच्या मुख्य दरबाराची छोटी आवृत्ति बडोद्यास ता. २४ जानेवारी रोजीं काढण्यांत आली. त्या प्रसंगीं बादशाही जाहिरनामा वाचून दाखविल्यावर रेसिडेंटसाहेबांच्या हस्ते महाराजांना सुवर्णपदक व कै. युवराज फत्तेसिंहराव यांस रौप्यपदक समर्पण करण्यांत आले.

अशा रीतीनें दिल्ली दरबाराची समाप्ति झाली. त्यानंतरहि कांहीं दिवस-पर्यंत कर्झन सरक्युलराचा वाद चालूंच होता, परंतु पुढें कांहीं वर्षानीं हिंदुस्थान सरकारनें या वादाचें मूळच काढून टाकिलें. त्यामुळें परदेशांत जाण्यासाठीं राजेलोकांना परवानगी मागण्याचें कारण न राहिल्यानें, उभयपक्षीं बराच काळपर्यंत अप्रिय झालेला हा वाद एकदांचा कायमचा मिटला.



दिल्लीच्या पश्चिमेस चार पाच मैल असलेल्या एका लहानशा गावाजवळील विस्तीर्ण मैदानात असून तिचें क्षेत्रफळ एक लाख चौरस वार होतें दिल्ली दरबारचा सरकारी हकीकतकार तिचें वर्णन असें करतो कीं,

"तिचा देखावा फारच सुंदर असून, तिच्या आत सर्व अर्वाचीन सुखसोयींची तजवीज केलेली होती. त्यावरून तिचा मालक फार सुसंस्कृत पुरुष असावा, अशी कल्पना सहज होण्यासारखी होती. या छावणींत महाराजासाठीं एक खास लाकडी चौकटीचा बंगला बडोद्यास तयार करवून तो दिल्लीस आणून जुळविण्यांत आला होता. त्याचा मधला घुमट पन्नास फूट उंच असून, तो कित्येक मैलावरून दिसत असे छावणीच्या दाराशीं छप्पन फूट उंचीची भव्य कमान उभारली होती व तिच्यावर आणि सर्व छावणीभर विजेच्या दिव्यांच्या रोषनाईची व्यवस्था केली असल्यामुळें, रात्रीच्या वेळीं तेथील देखावा अत्यंत सुंदर दिसे"

या दरबारासाठीं महाराजाच्या बरोबर सौ. महाराणीसाहेब, युवराज फत्तेसिंहराव, राजपुत्र शिवाजीराव व धैर्यशीलराव, राजकन्या इंदिराराजा आणि दिवाण व इतर मोठे अधिकारी, मित्र आणि दीडशें फौज व चारशें नोकर इतका परिवार गेला होता

मुख्य दरबारासाठीं अर्धचंद्राकृति भव्य मंडप तयार करण्यात आला होता. त्यात एकंदर सोळा हजार लोक बसतील अशी व्यवस्था करण्यात आली होती. व्हाईसरॉयाच्या उजव्या हाताला दुसऱ्या विभागात प्रमुख संस्थानिकांची सोय करण्यात आली होती त्यात प्रथम हैद्राबादचे निजाम व त्याचे चिरंजीव-हल्लींचे निजाम-हे असून, त्याच्या उजव्या हातास तेथील रेसिडेंट होते. त्याचे शेजारीं महाराजसाहेबांची जागा होती व त्याच्या उजव्या हातास युवराज फत्तेसिंहराव बसले होते. दरबाराची सुरुवात होताच व्हाईसरॉयसाहेब आल्याबरोबर तोफांची सलामी झाली त्यानंतर बादशहाच्या राज्यारोहणानिमित्त काढलेला जाहिरनामा वाचून

अशी मागणी करण्याकरितां कर्झनसाहेबांनीं सर्व प्रमुख संस्थानिकांना सन १९०४ सालीं पत्रें पाठविलीं. त्यातच गायकवाड सरकाराकडेहि एक पत्र ता. २७–४–१९०४ रोजीं पाठवून, त्यांत बडोद्याच्या महाराजांनीं साम्राज्याच्या संरक्षणासाठीं आपल्या राज्याच्या उत्पन्नाचा कांहीं ठराविक भाग खर्च करण्यास तयार व्हावें असें कळविलें. यामुळें या प्रश्नाला त्या वेळीं विशेष चालना मिळाली असली, तरी वस्तुतः हा प्रश्न नवीन नसून बऱ्याच वर्षांपासून उपस्थित झालेला होता. म्हणून त्याचें स्वरूप चांगल्या रीतीनें समजण्यासाठीं त्याचा पूर्वीचा इतिहास येथें देणें अवश्य आहे.

सन १६०० सालीं ईस्ट इंडिया कंपनी स्थापन होऊन ती व्यापारासाठीं हिंदुस्थानांत आल्यावर, कांहीं काळपर्यंत तिचें व्यापारी स्वरूप कायम राहिलें. पण पुढें येथील राज्यांतील आपआपसांतील लढायांमुळें आपल्या मालाच्या वखारींना धोका पोहोंचण्याचा संभव आहे व म्हणून त्याच्या संरक्षणाची तजवीज करणें आपल्याला अवश्य आहे, अशा सबबीवर कंपनीनें आपल्या पदरीं फौज ठेवण्यास सुरवात केली. क्रमाक्रमानें ही फौज तिनें अधिक बलवान केली व नंतर येथील राज्यांतील आपसांतील भांडणाचा लाभ घेऊन, त्यांपैकीं एकास हातीं धरून त्या फौजेच्या मदतीनें दुसऱ्यास कमकुवत करण्याचा उपक्रम तिनें सुरू केला. कंपनीची फौज कवायती शिस्तीची असून, तिच्याजवळ नवीन पद्धतीचीं शस्त्रास्त्रें व युद्धसामग्री असल्यामुळें, अर्थातच एतद्देशीय फौजेविरुद्धच्या लढायांत तिची सरशी होत गेली. कंपनीच्या स्थापनेच्या वेळीं हिंदुस्थानांत मोंगलाचें राज्य चालू होतें, पण पुढें मराठ्यांनीं त्यांना हतबल करून आपलें साम्राज्य स्थापन केल्यावर, कंपनीनें त्या साम्राज्यांतील फुटीचा व यादवीचा लाभ घेतला व प्रथम रघुनाथराव पेशव्यास हातीं धरून त्या वेळच्या गादीवरील पेशव्याविरुद्ध मोहीम सुरू केली. त्या प्रकरणीं कंपनीचे कलकत्त्याचे अधिकारी व मुंबईचे अधिकारी यांच्यांत कधीं कधीं मतभेद झाले, तरी एकंदरीनें कंपनीचें मुख्य धोरण कायमच राहिलें.

दिल्लीच्या पश्चिमेस चार पाच मैल असलेल्या एका लहानशा गावाजवळीऴ विस्तीर्ण मैदानात असून तिचें क्षेत्रफळ एक लाख चौरस वार होतें दिल्ली दरबारचा सरकारी हकीकतकार तिचें वर्णन असें करतो कीं,

"तिचा देखावा फारच सुंदर असून, तिच्या आत सर्व अर्वाचीन सुखसोयींची तजवीज केलेली होती. त्यावरून तिचा मालक फार सुसंस्कृत पुरुष असावा, अशी कल्पना सहज होण्यासारखी होती. या छावणींत महाराजांसाठीं एक खास लाकडी चौकटीचा बंगला बडोद्यास तयार करवून तो दिल्लीस आणून उभारण्यात आला होता. त्याचा मधला घुमट पन्नास फूट उंच असून, तो कित्येक मैलावरून दिसत असे छावणीच्या दारार्शी छप्पन फूट उंचीची भव्य कमान उभारली होती व तिच्यावर आणि सर्व छावणीभर विजेच्या दिव्यांच्या रोषनाईची व्यवस्था केली असल्यामुळें, रात्रीच्या वेळीं तेथील देखावा अत्यंत सुंदर दिसे"

या दरबारासाठीं महाराजांच्या बरोबर सौ. महाराणीसाहेब, युवराज फत्तेसिंहराव, राजपुत्र शिवाजीराव व धैर्यशीलराव, राजकन्या इंदिराराजा आणि दिवाण व इतर मोठे अधिकारी, मित्र आणि दीडशें फौज व चारशें नोकर इतका परिवार गेला होता.

मुख्य दरबारासाठीं अर्धचंद्राकृति भव्य मंडप तयार करण्यात आला होता. त्यात एकंदर सोळा हजार लोक बसतील अशी व्यवस्था करण्यांत आली होती. व्हाईसरॉयाच्या उजव्या हाताला दुसऱ्या विभागात प्रमुख संस्थानिकांची सोय करण्यात आली होती त्यात प्रथम हैद्राबादचे निजाम व त्यांचे चिरंजीव–हल्लींचे निजाम–हे असून, त्यांच्या उजव्या हातास तेथील रेसिडेंट होते. त्यांचे शेजारीं महाराजसाहेबांची जागा होती व त्यांच्या उजव्या हातास युवराज फत्तेसिंहराव बसले होते. दरबाराची सुरवात होताच व्हाईसरॉयसाहेब आल्याबरोबर तोफांची सलामी झाली. त्यानंतर बादशहाच्या राज्यारोहणानिमित्त काढलेला जाहिरनामा वाचून

तथापि असा बचाव करण्याचा प्रयत्न कपनीनें त्या काळीं केला व तो येथील देशी राजाना स्वत च्या दुर्बल परिस्थितीमुळे मान्यहि करावा लागला. परतु या पद्धतीमुळे देशी राज्यें अगदीं निर्माल्यवत् झालीं. लॉर्ड वेल्स्ली या गव्हर्नर जनरलनें स्वत कबूल केलें आहे कीं,

> "The subsidiary system had paralysed the native ruler and made him dependent entirely on British support "
>
> " तैनाती फौजेच्या पद्धतीनें सस्थानिकाना पक्षघात झाल्याप्रमाणें होऊन ते सर्वस्वीं ब्रिटिशाच्या मदतीवर अवलबून राहिले."

सन १८०० सालीं बडोद्याचे राजे गोविंदराव गायकवाड मृत्यु पावले व त्याचे वडील पुत्र आनदराव हे त्याच्या जागीं गादीवर आले. ते बुद्धीनें दुर्बल असल्यामुळें, त्याचा अनौरस सावत्र भाऊ कान्होजी यानें गादी बळकाविली. तेव्हा आनदराव महाराजाचा कारभारी रावजी आप्पाजी यानें कान्होजीवर स्वारी करून त्याचा पराभव केला व त्यास पदच्युत केलें. तथापि कान्होजीच्या मदतीस कडीकर गायकवाडापैकींचा मल्हारराव हा आला. त्यावरून आनदराव महाराजातर्फे त्याचा कारभारी रावजी आप्पाजी यानें कपनीपाशीं फौजेची मदत मागितली, व त्याच वेळीं उलट बाजूनें मल्हाररावानेंहि कपनीजवळ अशीच मदत मागितली. तेव्हा या दोघापैकीं कोणास मदत द्यावी, याचा निर्णय करण्यासाठीं कपनीनें आपल्यातर्फे कर्नल वॉकर याची नेमणूक केली व त्यानें ती आनदराव महाराजाना देण्याचें ठरविलें. या करारानुसार गायकवाड सरकारनें कपनीकडून दोन हजार पायदळ व एक युरोपियन व हिंदी लोकाची मिळून बनलेली मिश्र तोफखान्याची तुकडी मदतीस घेऊन आपल्या पदरीं ठेवावी व या फौजेच्या खर्चासाठीं दरमहा रुपये पासष्ट हजार अथवा वार्षिक रुपये ७,८०,००० निंमतीचा मुलुख, दोन्ही सरकाराच्या सोयीस येईल त्याप्रमाणें, कपनीला तोडून द्यावा असें ठरविण्यात आलें. या ठरावाप्रमाणें सन १८०२

## प्रकरण २३ वें



### साम्राज्यसंरक्षणाची योजना

मागील प्रकरणात उल्लेखिलेलें सरक्युलर काढण्यापूर्वी कर्झनसाहेबांनीं ग्वाल्हेर दरबारच्या सरकारी खान्याचे वेळीं जें भाषण केलें, त्यांत त्यांनीं हिंदुस्थानांतील संस्थानासंबधानें अशा प्रकारचे गौरवपर उद्गार काढिले होते –

"या हिंदुस्थान देशांत आमच्या मुलखाच्या शेजारीं व कांहीं ठिकाणीं आमच्या मुलखाला वेढून असलेलीं देशी संस्थानें आहेत त्याच्यांतील राज्यव्यवस्था, त्याचीं प्राचीन काळापासून वंशपरंपरेनें चालत आलेलीं राजघराणीं व त्यांतील स्वाभिमानी राजे, त्याच्यांतील भिन्न भिन्न वर्गांची प्रजा व ब्रिटिश राज्याच्या उदाहरणानें त्याच्यांत परिणामीं यत चाललेली एकविधता, या चित्रविचित्र देखाव्याकडे पाहिलें असतां, तो एक सब जगताच्या इतिहासांत अपूर्व असा देखावा आहे असें दिसून येईल "

याप्रमाणें संस्थानांचें वर्णन करून कर्झनसाहेबांनीं त्यांतील राजाचा दर्जा असा दर्शविला होता कीं, 'ते माझे सहकारी मित्र व भागीदार आहेत ' अर्थात् हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराच्या भागीदारीतील सर्व भागी दारांनीं तिच्या हिताच्या संरक्षणासाठीं झटावें, अशी अपेक्षा मुख्य भागी दारानें करावी हें ओघानेंच आलें, व म्हणून त्या दृष्टीनें ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणासाठीं संस्थानिकांनींहि आपला खर्चाचा हिस्सा द्यावा,

लाखांनीं कमी येते. यावरून करारप्रमाणें ठरविलेले उत्पन्न पुरें होण्यासाठीं म्हणून आणखी जरूर तेवढा मुलुख कंपनीला देण्यांत आला.

यानंतर सन १८१२ सालीं मुंबई सरकारने अशी एक सूचना केली कीं, तैनाती फौज पूर्वीप्रमाणें कायम ठेवून तिच्या खर्चाबद्दल जो मुलुख गायकवाड सरकारने कंपनीकडे लावून दिला होता, तो मुक्त करून त्याच्याबद्दल उधड रकम एक कोटि रुपये गायकवाड सरकाराकडून घ्यावी व वसईच्या तहानें जो मुलुख मिळालेला आहे तो गायकवाडांना मक्त्यानें देण्यांत यावा. परंतु या सूचनेला हिंदुस्थान सरकारची संमति न मिळाल्यानें ती निष्फळ झाली.

पुढें सन १८१७ सालीं पेशव्यांचा पराभव कंपनीने केल्यावर जो तह त्यांच्यांशीं करण्यात आला, त्यांत असें ठरले कीं पेशव्यांनीं गायकवाड सरकाराविरुद्धचे आपले सर्व हक्क सालीना चार लक्ष रुपये घेण्याचें कबूल करून सोडून द्यावे. पण त्याच्याच पुढील वर्षी म्हणजे सन १८१८ सालीं खुद्द पेशव्यांचे राज्यच खालसा करण्यांत आल्यामुळें, ही वार्षिक हप्ताखंडणीहि आपोआप रद्द झाली. याशिवाय या सन १८१७ च्या तहाने पेशव्यांनीं स्वतः वार्षिक साडेचार लक्ष रुपये घेऊन अहमदाबाद हद्दींतील मुलुख गायकवाड सरकारकडे मक्त्यानें लावून देण्याचें कबूल केलें व कंपनीच्या तैनाती फौजेच्या मदतीसाठीं आपल्या पदरीं पांच हजार स्वार व तीन हजार पायदळाची कॉन्टिंजंट तुकडी ठेवून तिच्या खर्चासाठीं गुजराथेतील आपला इतर सर्व मुलुख व काठेवाडांतील सर्व खंडणी कंपनीला लावून देण्याचेंहि त्यांनीं कबूल केले.

हा तह झाल्यावर त्या वेळचे गव्हर्नर जनरल लॉर्ड हेस्टिंग्ज् यांनी गायकवाड सरकारच्या राज्यांतील प्रांत एकमेकांपासून अगदीं अलग असल्यानें त्यांना राज्यकारभाराच्या कामीं जी अडचण येत असे, तिच्याबद्दलचा फेरविचार करून त्यांचा मुलुख सलग कसा करितां येईल, अशी कांहीं योजना करण्याचें मनांत आणले होतें. कारण त्यांनीं कंपनीच्या

पुढें पेशवे व त्याचे सरदार संस्थानिक, यांच्यांतील भांडणाचा लाभ घेऊन कंपनीनें पेशवाई हस्तगत केली व शिंदे, होळकर व नागपूरकर भोंसले यांच्याशींहि युद्धें करून त्यांना आपले अंकित बनविलें. या ल्ढायांत इंग्रजांनीं स्वतः एक बाजू म्हणून भाग तर घेतलाच, पण त्यानंतरच देशी राजांच्या आपआपसांतील लढायांच्या वेळींहि एका पक्षाला आपलें सैन्य पुरवून त्याचा मोबदला अथवा भाडें म्हणून रोख रकमा अथवा मुलूख मागण्याचा क्रमहि कंपनीनें चालू ठेविला. या दृष्टीनें भाडोत्री अरब, रोहिले वगैरे लोक व इंग्रजी पल्टणी यांत कांहींच फरक नव्हता. उलट 'ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी' हा नियमहि या भाडोत्री इंग्रजी फौजा पाळीत नसत. कारण आज एक पक्षाला पैशासाठीं मदत केली, तर उद्यां दुसऱ्या पक्षानें तीच मदत मागितली असता त्यालाहि ती देण्यास या फौजा नाखुष नसत. पुढें कालांतरानें मराठी साम्राज्याचे सर्व अवयव आपल्या मुठींत आणल्यावर, त्याच्या कायमच्या संरक्षणाची जबाबदारी कंपनी सरकारनें आपल्या अंगावर घेतली व त्यासाठीं संस्थानानीं आपल्या राज्यांत आपल्या स्वतःच्या खर्चानें पाळलेली, पण कंपनीच्या अधिकाराच्या हुकमतींत राहणारी फौज ठेवण्याची पद्धति कंपनीनें सुरू केली या पद्धतीच्या फौजेस तैनाती फौज अथवा सबसिडियरी फौज म्हणतात. मराठी साम्राज्याच्या ल्यानंतर त्याचे प्रमुख घटक भाग संस्थानें म्हणून ठेविण्यांत आलीं. त्या सर्वांनी अशी तैनाती फौज आपल्या पदरीं ठेविली. त्यांपैकीं गायकवाडाखेरीज इतरांना कंपनीनें जिंकून त्यांना तसें करण्यास भाग पाडलें. गायकवाडानीं मात्र कंपनीशीं युद्ध न करिता तिच्याशीं तह केला व त्या तहाअन्वयें अशी फौज आपल्या पदरीं ठेविली. या तैनाती फौजेचें वर्णन लॉर्ड सॉल्सबरी या इंग्लंडच्या मुख्य प्रधानानीं एके ठिकाणीं मोठ्या मजेदार रीतीनें केलें आहे. ते म्हणतात —

"ही तैनाती फौजेची पद्धति म्हणजे मगळ ब्रह्मावरून पृथ्वीवर येणाऱ्या हल्ल्याचा चंद्रावरून बचाव करणें होय."

लाखानीं कमी येते. यावरून कराराप्रमाणे ठरविलेले उत्पन्न पुरें होण्यासाठीं म्हणून आणखी जरूर तेवढा मुलुख कंपनीला देण्यात आला.

यानंतर सन १८१२ सालीं मुंबई सरकारनें अशी एक सूचना केली कीं, तैनाती फौज पूर्वीप्रमाणें कायम ठेवून तिच्या खर्चाबद्दल जो मुलुख गायकवाड सरकारनें कंपनीकडे लावून दिला होता, तो मुक्त करून त्याच्याबद्दल उघड रकम एक कोटि रुपये गायकवाड सरकाराकडून घ्यावी व वसईच्या तहानें जो मुलुख मिळालेला आहे तो गायकवाडाना मक्त्यानें देण्यात यावा. परंतु या सूचनेला हिंदुस्थान सरकारची संमति न मिळाल्यानें ती निष्फळ झाली.

पुढे सन १८१७ सालीं पेशव्याचा पराभव कंपनीनें केल्यावर जो तह त्याच्याशीं करण्यात आला, त्यांत असें ठरलें कीं पेशव्यानीं गायकवाड सरकाराविरुद्धचे आपले सर्व हक्क सालीना चार लक्ष रुपये घेण्याचें कबूल करून सोडून द्यावे. पण त्याच्याच पुढील वर्षी म्हणजे सन १८१८ सालीं खुद्द पेशव्याचें राज्यच खालसा करण्यात आल्यामुळे, ही वार्षिक हप्ताखंडणीहि आपोआप रद्द झाली. याशिवाय या सन १८१७ च्या तहानें पेशव्यानीं स्वतः वार्षिक साडेचार लक्ष रुपये घेऊन अहमदाबाद हद्दींतील मुलुख गायकवाड सरकारकडे मक्त्यानें लावून देण्याचें कबूल केलें व कंपनीच्या तैनाती फौजेच्या मदतीसाठीं आपल्या पदरीं पांच हजार स्वार व तीन हजार पायदळाची कॉन्टिंजंट तुकडी ठेवून तिच्या खर्चासाठीं गुजराथेंतील आपला इतर सर्व मुलुख व काठेवाडांतील सर्व खंडणी कंपनीला लावून देण्याचेंहि त्यानीं कबूल केलें.

हा तह झाल्यावर त्या वेळचे गव्हर्नर जनरल लॉर्ड हेस्टिंग्ज् यानी गायकवाड सरकारच्या राज्यांतील प्रांत एकमेकापासून अगदीं अलग असल्यानें त्याना राज्यकारभाराच्या कामीं जी अडचण येत असे, तिच्याबद्दलचा फेरविचार करून त्याचा मुलुख सलग कसा करिता येईल, अशी कांहीं योजना करण्याचें मनात आणलें होतें. कारण त्यानीं कंपनीच्या

साठीं उभय सरकारामध्यें एक छोटी करार करण्यांत येऊन गायकवाड सरकारनें वरील निश्चित केलेल्या रकमेपैकीं रु. ७,३०,२०० वसनीस रोग घासेत व रु. ५०,००० वार्षिक उत्पनाचा मुलुख घावा असें ठरलें. त्यानंतर सन १८०३ साठीं रोग घासयाच्या रकमेबद्दलहि आणखी मुलुखच कपनीला देण्याबद्दल नवा करार करण्यांत आला. त्या वेळीं या मुलखाबद्दलच्या ज्या सनदा कपनीस करून देण्यांत आल्या, त्यांवरून हा मुलुख कायमचा दिल्याचें दिसून येत नाहीं. यानंतरच्या पुढील सालांत या तैनाती फौजेंत आणखी एक हजार लोकांची वाढ करण्यांत आली, व या अधिक फौजेच्या खर्चासाठीं आणखी कांहीं मुलुख लावून देण्यांत आला; त्याचें उत्पन्न साठीना जवळ जवळ तीन लाख रुपये होतें. याशिवाय काठेवाडांतून गायकवाड सरकारला मिळणाऱ्या खंडणीपैकीं रुपये एक लाखाची रकम परभारें कपनीला देण्याचें ठरविण्यांत आलें. अशा रीतीनें एकंदर जवळ जवळ बारा लक्षाचा मुलुख गायकवाड सरकारनें तैनाती फौजेसाठीं म्हणून कपनीला लावून दिला. यामुळें त्या राज्याला आपल्या मोठ्या भागाला मुकावें लागलें; इतकेंच नव्हे तर त्या राज्याचे अलग अलग असे तुकडे पडले.

यानंतर सन १८०५ सालीं या उभयतांच्यामध्यें मागील सर्व करारांना निश्चयात्मक स्वरूप देणारा एक तह करण्यांत आला. त्या तहाअन्वयें गायकवाड सरकारनें कपनीकडून कमींत कमी तीन हजार पायदळ, युरोपियन तोफखान्याची एक तुकडी व त्या तोफखान्याच्या मदतनीस सैनिकांच्या दोन तुकड्या व दारूगोळा आणि इतर लष्करी सामग्री मागवून घेऊन ही फौज बडोद्यास ठेवावी असें ठरलें व या सर्व फौजेच्या खर्चासाठीं पूर्वी ठरविलेला सर्व मुलुख कपनीकडे रहावा, असें त्या वेळचे राज्यकर्ते आनंदराव महाराज यांनीं कबूल केलें.

यानंतर तीन वर्षांनीं असें आढळून आलें कीं, या लावून दिलेल्या मुलखाचें जितकें उत्पन्न अपेक्षित होतें, त्यापेक्षां तें दोन पावणे दोन

पायदळ, एक हजार स्वार व हिंदी आणि युरोपियन लोकाची मिश्र तोफखान्याची एक तुकडी, इतकी तैनाती फौज झाली व तिच्या खर्चासाठीं म्हणून वेळोवेळीं लावून दिलेल्या मुलखाचें उत्पन्न जवळ जवळ साडे चोवीस लाख इतकें झाले !

सन १८०५ च्या तहाच्या चौथ्या कलमात ही तैनाती फौज ठेवण्याचे मुख्य उद्देश 'बडोद्याच्या राज्यकर्त्याचें व त्याच्या वारसाचें शरीरसरक्षण करणें, राज्यातील तुफानी व बडखोर लोकाचें दमन करणें व राज्यातील कर व खडणी न देणाऱ्या लोकाना जरब देणें,' असे दर्शविले होते. याशिवाय हिंदुस्थानात कोठें लढाई उपस्थित झाल्यास राज्याच्या सरक्षणासाठीं जरूर तेवढी फौज ठेवून बाकीची फौज लढाईसाठीं पाठविण्याचेंहि त्यात ठरलें होतें, व अखेर या तहाच्या पधराव्या कलमाप्रमाणें कपनीच्या मुलुखात काहीं दगातुफान झाल्यास, त्याच्या शमनासाठीं ही फौज पाठविण्याचा ठराव करण्यात आला होता. हींच कलमें सन १८१७ च्या तहात कायम करण्यात आलीं असून, त्याशिवाय मागील एका प्रकरणात उल्लेख केलेली कॉन्टिंजट फौज बडोदे सरकारनें ठेवण्याचा करार त्यांत करण्यात आला ही तैनाती फौज ठेवण्याच्या वरील उद्देशाकडे पाहिल्यास तिच्या कार्याची यथार्थ कल्पना येईल. या फौजेला हिंदुस्थानाच्या बाहेर कोठेंहि मोठ्या लढायात जावयाचें नसल्यामुळे तिच्याजवळील दारूगोळा शस्त्रसामग्री वगैरे यथातथाच असे व ती स्थानिक गरजासाठीं पुरेशी इतकीच असे. पण कपनी सरकारची अपेक्षा मात्र ती फौज अगदीं अर्वाचीन पद्धतीनें सज्ज असली पाहिजे अशी होती यामुळें प्रत्येक वेळीं कपनीकडून या बाबतींत तक्रारी करण्यात येत उलट पक्षीं गायकवाड सरकारकडून असे सागण्यात येई कीं, या फौजेचा उपयोग मूळ कराराच्या विरुद्ध कपनीकडून गायकवाड सरकारच्या माडलिकाचे मुलखात शातता ठेविण्यासाठीं पोलिसाप्रमाणें करण्यात येत आहे, ते बरोबर नव्हे. शिवाय या फौजेच्या तयारींत सुधारणा करण्याचा एक वेळ प्रयत्न करण्यात आला, त्या वेळीं फौजेंत

डायरेक्टराना तारीख ४ सप्टेंबर १८१७ रोजीं पाठविलेल्या एका पत्रात असें कळविलें होतें कीं,

"गुजरायेंतील मुलखातून पेशव्याची दरम्यानगिरी अजीबात काढून टाकून त्यात आता फक्त कंपनी व गायकवाड या दोघाचाच अधिकार राहिल्यानें त्या मुलखाला शातता व भरभराट प्राप्त होईल अशी मला खात्री वाटते. या कारणानें या दोघा सरकाराना येथून पुढें आपल्या राज्याचा मुलुख सलग असल्याचा व त्याच्या सरहद्दी निश्चित असल्याचा लाभ मिळावा हें योग्य आहे; कारण अशा प्रकारच्या योजनेच्या अभावीं दोघानाहि साप्रत अडचण होत आहे."

वर उल्लेखिलेल्या सन १८१७ च्या तहाअन्वयें पेशव्याकडून अहमदाबाद प्राताचा कायमचा मक्ता गायकवाड सरकारास सोंपल्याबद्दलची सनद त्या सालच्या जून महिन्यात देण्यात आली. परतु हा व्यवहार जरी कंपनीनें स्वत घडवून आणिला होता, तरी तिच्याच पोटात या तहाच्या शर्तींच्या योगानें गायकवाडाना होणाऱ्या फायद्यामुळें दुखू लागलें. अहमदाबादची सनद बडोद्यास आल्याबरोबर मुंबई सरकारनें असें म्हणण्यास सुरवात केली कीं,

"या तहामुळें लाभाचा मोठा हिस्सा मेहेनतीशिवाय गायकवाड सरकारास मिळाला आहे, यासाठीं त्याचा मोबदला म्हणून त्यानीं अधिक तैनाती फौज आपल्या पदरीं ठेवावी."

यावरून एक हजार पायदळाची आणखी एक पलटण व स्वाराच्या दोन पलटणी गायकवाडानीं आपल्याजवळ ठेवाव्या, अशी मुंबई सरकारनें सूचना केली. त्या वेळीं आनदराव महाराजाचे प्रतिनिधि म्हणून फत्तेसिंहराव काम पहात असत त्यानीं ती सूचना मान्य केली, व या फौजेच्या खर्चासाठीं (काठेवाडातील खडणी यापूर्वीच पेशव्याकडे लावून दिली असल्यानें ती वगळून) अहमदाबाद जिल्ह्याच्या मक्त्याचे पेशव्याकडून मिळालेले सर्व हक्क कंपनीस लावून दिले. हा पुरवणी तह १८१७ च्या नोव्हेंबरमध्यें ठरण्यात आला त्यामुळें या सालअखेर बडोदें सरकारजवळ चार हजार

above all this, the Gaekwar in 1820 lost his position as Suzerein of his numerous tributaries in Kathiawar and in the hilly country east of Baroda, who formerly owed allegiance to the Baroda ruler. The tribute is paid, but most of the prestige has gone."[१]

"लष्करी संरक्षणाच्या निमित्तानें बडोदे राज्यानें ब्रिटिशांना फार विस्तृत मुलुख दिला आहे. त्याचें क्षेत्रफळ ४००० चौरस मैल असून तो गायकवाडांच्या मूळच्या राज्याच्या तिसऱ्या भागाइतका आहे. या मुलखाच्या उत्पन्नाखेरीज बंदरावरील जकातीच्या रूपानें जी रक्कम बडोदें राज्याला इंग्रजांना द्यावी लागते, तिचा विचार केल्यास असे दिसून येईल कीं, लष्करी बचावासाठीं म्हणून बडोद्यानें दिलेली मदत त्याला झालेल्या फायद्याच्या मानानें व न्यायाच्या दृष्टीनें फार अधिक आहे. व ही परिस्थिति बडोदें सरकारास इंग्रजांनीं लढाईत कधीं जिंकलें नसतांहि प्राप्त झाली आहे. या उपरांत काठेवाडांतील व बडोद्याच्या पूर्वेकडील डोंगराळ मुलखांतील अनेक मांडलिक संस्थानांवरील बडोदें सरकारचे सार्वभौमत्वाचे अधिकार सन १८२० पासून नाहींसे झाले, हे निराळेंच. त्यांना सांप्रत खंडणीची रक्कम मिळते ही गोष्ट खरी आहे, पण त्यांची इज्जत मात्र बहुतेक नष्ट झाली आहे."

या फौजेच्या मूळ उद्देशापुरती म्हणजे बडोदें राज्यातील शांततारक्षणापुरती ती फौज समर्थ असली, तरी तिला नवीन योजनेप्रमाणें कराव्या लागणाऱ्या कामाला ती अगदीं निरुपयोगी ठरली असती. अशा स्थितींत मूळ उद्देशांबाहेरचें काम तिच्या गळ्यांत बांधून तिला नवीन शस्त्रास्त्रांनीं सज्ज केल्यावर तिच्या प्राथमिक स्वरूपांत तिच्या खर्चासाठीं म्हणून लावून दिलेला मुलुख आतां इंग्रज सरकारला आपल्याकडे ठेवण्यास वस्तुतः कसलाच आधार नाहीं व म्हणून मूळच्या तैनाती फौजेसाठीं दिलेला मुलुख बडोदें सरकारास परत मिळावा, अशी त्यांनीं मागणी केली. सन

१ 'Princes of India' by Sir William Barton, pp 175-176.

दगा होण्याचा संभव उत्पन्न झाला होता व फौजेचे अधिकारी युरोपियन असल्यामुळें, तो शांत करण्याचें साधन बडोदें सरकारच्या हातात राहिलें नव्हतें. अशा प्रकारें या तैनाती फौजेची स्थिति अनेक दृष्टींनीं असमाधान-कारक असे परंतु एकदाच ही अडचण दूर झाली, कारण सन १८३० साली ही फौज अजीनात नष्ट करण्यात येऊन, ती वायव्य सरकारच्या नवीन लष्करी योजनेप्रमाणें उत्तर विभागाच्या सैन्यात सामील करण्यात आली यामुळें त्या सालापासून त्या फौजेचें स्वतंत्र अस्तित्व अजीनात नाहींसें झालें व हल्लीं फक्त आठशें लोकांची एक पायदळाची तुकडी बडोद्याच्या कँपमध्यें ठेवण्यात येते या स्थित्यंतरामुळें महत्त्वाचा परिणाम असा झाला कीं, पूर्वी सन १८०५ च्या तहाअन्वयें या तैनाती फौजेचा उपयोग वर निर्दिष्ट केलेल्या कार्यापुरताच जो करण्यात येत होता, त्याच्याऐवजीं आता ती फौज एकंदर इंग्रजी सैन्यात सामील केली गेल्यामुळें, तिचा उपयोग युद्धप्रसंगीं हिंदुस्थानाबाहेरहि करण्यास प्रत्यवाय उरला नाहीं

अशा रीतीनें तैनाती फौज नाहींशी झाल्यावर तिच्या खर्चासाठीं म्हणून लावून दिलेला मुलूख बडोदें सरकारास परत मिळणें वास्तविक होतें हा मुलूख किती विस्तृत आहे व तो दिला गेल्यानें बडोदें सरकारचें कसें व किती नुकसान झालें आहे याची कल्पना हिंदुस्थानच्या राजकीय खात्यातून निवृत्त झालेल्या सर वुइल्यम् बार्टन यानीं नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या ग्रंथातील खालील उताऱ्यावरून येईल बार्टनसाहेब म्हणतात —

"The State has paid heavily in cessions of territory for the benefit of military protection having handed over to the British an area of about 4000 square miles, almost a third of its original territory It is obvious that in recent years, with the heavy contribution in sea customs added to the revenues from the ceded territories, Baroda has paid a far larger proportion than is equitably due from its share in the cost of military defence. And be it observed that the British never defeated Baroda in the field! Over and

गिरीच्या अखेरीस बडोद्याची कॉन्टिंजंट फौजहि मोडून टाकण्यांत आली. तरी तिच्या खर्चाबद्दल म्हणून सालीना पावणेचार लक्ष रुपये इंग्रज-सरकारास देण्याचे त्यांनीं कबूल केलें, याबद्दलचा उल्लेख मागें केलाच आहे. याहि बाबतींत मूळ कारणच नष्ट झाल्यावर त्याच्या खर्चाबद्दलची म्हणून रकम घेत रहाणे असमर्थनीय होतें.

पुढें सन १८८५ सालीं हिंदुस्थानावर रशिया स्वारी करील अशी भीति इंग्रज सरकारास वाटूं लागून, त्यासाठीं सैन्याची तयारी करण्याची आवश्यकता त्यांना भासूं लागली. अशा वेळीं वस्तुतः आपले खडें सैन्य अधिक वाढवून व युद्धसामग्रींत भर घालून ती तयार करण्याचा मार्ग त्यांना मोकळा होता. परंतु त्याशिवाय ब्रिटिश साम्राज्याचे भागीदार जे संस्थानिक, त्यांनाहि या साम्राज्यसंरक्षणाच्या बाबतीस हातभार लावण्यास भाग पाडण्याचें ठरवून, इंग्रज सरकारनें 'इंपीरिअल सर्व्हिस ट्रुप्स्'ची नवी योजना काढली. हिंदुस्थानांतील कायमच्या खड्या सैन्याशिवाय ही एक विशेष प्रकारची फौज उभी करण्याचा बूट त्या वेळीं निघाला, तेव्हां कित्येक संस्थानिकांनीं आपल्या तर्फेनें ब्रिटिश सरकारास मदत देण्याचें कबूलहि केले. या फौजेचा मुख्य हेतु असा होता कीं, यदाकदाचित् हिंदुस्थानावर परदेशाची स्वारी येण्याचा प्रसंग आला, तर तिच्या प्रतिकाराचें साधन सर्वांच्या मदतीनें मिळून तयार केलेलें असावें. या दृष्टीनें पाहतां तिच्या उभारणीसाठीं संस्थानांनीं द्यावयाच्या मदतीचे स्वरूप करारमदारानें दिलेल्या वचनाच्या परिपूर्तीचें नसून, ते वैयक्तिक व आपखुषीचें असे होतें, ही गोष्ट सन १८९० सालीं त्या वेळचे व्हाईसरॉय लॉर्ड लॅन्स्डाऊन यांनीं पतियाळा येथें केलेल्या भाषणावरून स्पष्ट होते. त्या भाषणांत ते म्हणाले कीं,

"The essence of the whole scheme is that there should be no compulsion in the matter and that only those States should be singled out which are not only willing but anxious to bear their part with us in

१८४१ सालीं मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स् कारनॅक यांनीं इतकें कबूलहि केलें होतें कीं,

"गेलीं कित्येक वर्षे गायकवाड सरकारनें कंपनीला दिलेल्या मुलखाचें उत्पन्न त्याच्या पदरीं असलेल्या तैनाती फौजेच्या खर्चापेक्षा सहा सात लाख रुपये अधिक आलेलें असून, पुढें तर तें बारा लाख रुपयापर्यंत अधिक येईल."

अर्थात हा वाढावा घेण्याचा तरी कंपनीला व तिच्यानंतर तिच्या जागीं येणाऱ्या इंग्रज सरकाराला कोणत्याहि प्रकारचा अधिकार पोहोंचत नाहीं. यामध्यानें यदाकदाचित् वरिष्ठ सरकाराकडून जर असें म्हणण्यात आलें कीं, हिंदुस्थानच्या संरक्षणाची जबाबदारी इंग्रज सरकाराप्रमाणेंच त्याच्या साम्राज्यांतील भागीदार संस्थानिकांवरहि पडते व म्हणून त्यांनीं त्यासाठीं लष्करी खर्चाचा आपला हिस्सा दिला पाहिजे, तर त्याला बडोदें सरकारचें असें उत्तर आहे कीं, ही जबाबदारी प्रमाणशीर असली पाहिजे व म्हणून सैन्याच्या एकदर खर्चाच्या हिस्सेरशीप्रमाणें आपल्या भागास येणारी रक्कम रोखरूपानें आपल्याजवळून घेऊन, इंग्रज सरकारनें आपल्याकडून घेतलेला सर्व मुलुख आपल्यास परत दिला पाहिजे. याप्रमाणें वाटाघाट चालू असता, खंडेराव महाराजाच्या कारकीर्दींत सत्तावन सालच्या धामधुमीच्या वेळीं त्यांनीं ब्रिटिश सरकारला मदत केली म्हणून गुजराथ घोडेस्वाराच्या पलटणीबद्दल बडोदें राज्याकडून घेण्यात येणारी वार्षिक तीन लाख रुपयाची रक्कम माफ करण्यात आली; तथापि तैनाती फौज अजीबात रद्द करण्यात आल्यामुळें तिच्या खर्चासाठीं म्हणून दिलेला मुलुख परत देण्याचा विचार त्या वेळीं मुळींच केला गेला नाहीं. शिवाय या मध्यंतरींच्या काळात या मुलखापैकींच्या अहमदाबाद शहराची व्यापारामुळें अतोनात वाढ व भरभराट झाल्यामुळें, अशी मोठ्या उत्पन्नाची कामधेनु कोण परत देणार?

यानंतर सन १८८१ सालीं राजा सर टी. माधवराव याच्या दिवाण-

करावयाचा. या प्रकारची योजना ज्या सस्थानाना पसंत असेल, त्यानीं तशी सूचना हिंदुस्थान सरकारास करावी व ती सूचना त्या सरकारनें कबूल केली तरच ही योजना अमलात यावयाची, असें थोडक्यात या योजनेचें सार होतें.

यानतर हा प्रश्न पुन्हा सन १८९८ सालीं उद्भवला. त्या वेळीं महाराज नुकतेच एका गभीर आजारातून बरे होऊन हवाफेर करण्यासाठीं इजिप्तमध्यें जाण्याकरिता निघण्याच्या वेतात होते. त्या वेळीं महाराजानीं साम्राज्यसरक्षणासाठीं एक उटावरील स्वाराची तुकडी देण्याचा विचार केला होता, परतु इम्पीरिअल सर्व्हिस ट्रुप्सची ठरविलेली सख्या त्या वेळेपर्यंत पुरी झाल्यामुळें आता अधिक मदतीची जरूर नाहीं, असें इग्रज सरकाराकडून महाराजाना कळविण्यात आलें. त्यामुळें या नवीन योजनेला अनुसरून जरी मदत करणें शक्य नसलें, तरी अन्य प्रकारें जरूर पडेल त्या वेळीं मदत करण्याची आपली इच्छा त्यानीं त्याच वेळीं प्रदर्शित केली. त्यानतर या प्रकरणाच्या आरभीं उल्लेख केल्याप्रमाणे सन १९०४ सालीं कर्झनसाहेबानीं हा प्रश्न पुन्हा जोरानें उपस्थित करून, त्यावर सस्थानिकाचीं मतें मागविलीं. या पत्रात त्यानीं या योजनेच्या मुळाशीं असलेल्या तत्त्वाचें विवेचन करिताना म्हटलें होतें कीं,

"हीं पथकें सस्थानिकानीं आपखुषीनें व स्वसतोषानें आजपर्यंत दिलेलीं आहेत. त्यातील सर्व सैनिक हे त्या त्या सस्थानातील रहिवासीच असल्यामुळें, या पथकाच्या द्वारे सस्थानातील प्रजेपैकींच्या चागल्या लोकाना पराक्रम करण्याला एक सुदर सधि मिळेल. यापैकीं बऱ्याच पथकाचें पुढारीपण स्वत सस्थानिकानीं घेतलेलें असून, त्याच्या हाताखालील मुख्य अधिकारी हे त्याचे नातेवाईक अथवा त्याचे सरदार ठाकूर अगर इतर सद्‌गृहस्थ असत. या पथकाबरोबर ठेविलेल्या ब्रिटिश अधिकाऱ्याना त्या पथकावर कोणत्याहि प्रकारची हुकुमत दिलेली नसून, ते फक्त शिक्षक अथवा सल्लागार म्हणून

defending the Empire in the hour of need We are not seeking to levy an Imperial defence-cess upon the Native States and for the same reason I have discouraged several very well-meant proposals which have, from time to time been put forward "

" या योजनेचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, या बाबतींत कोणावरहि कोणत्याहि प्रकारची सक्ती नसावी. या योजनेनें आम्ही संस्थानिकावर साम्राज्यसंरक्षणासाठीं एखादा नवीन कर बसवीत नसून, फक्त ज्या संस्थानिकाची अंतःकरणपूर्वक साम्राज्यास मदत करण्याची इच्छा असेल, त्याच्या मदतीचा आम्ही स्वीकार करणार आहों. तथापि त्या मदतीमुळें त्याच्या संस्थानावर खर्चाचा फाजील बोजा पडता कामा नये. यामुळेंच नित्येक जणांकडून या बाबतींत सदिच्छेनें देऊ केलेल्या मदतीच्या योजनाचा स्वीकार आम्हीं केला नाहीं. "

ही नवीन योजना अशा प्रकारची होती कीं संस्थानांनीं आपल्या फौजेच्या संख्येंत नवीन वाढ न करिता पूर्वी असलेल्या फौजेपैकींचाच काहीं भाग नवीन प्रकारच्या व अधिक सामर्थ्याच्या शस्त्रांनीं व कवायतीनें तयार करून, तो जरूर त्या प्रसंगीं इंग्रज सरकारच्या मदतीला पाठवावयाचा. याप्रमाणें ही फौज तयार करण्यासाठीं इंग्रज सरकारनें आपले अधिकारी मुदतबंदी पद्धतीनें संस्थानिकास द्यावे, तथापि ते त्या संस्थानाचे नोकर समजले जाऊ नयेत. अशा रीतीनें ही फौज तयार करण्यासाठीं लागणारा सर्व खर्च, त्याचप्रमाणें लढाईचा प्रसंग पडेल त्या वेळीं ही फौज स्वारीवर निघेल त्या स्वारीचा सर्व खर्च, ज्या त्या संस्थानिकानीं सोसावयाचा. अर्थात् या योजनेप्रमाणें दरेक संस्थानानें आपल्या सैन्याचा जो भाग अशा रीतीनें साम्राज्यासाठीं तयार करावयाचा, त्या व्यतिरिक्तच्या त्या संस्थानांतील फौजेला पूर्वीप्रमाणेंच जुनीं शस्त्रें व युद्धसामग्री कायम रहावयाची असून, त्यात मुळीच फेरफार करावयाचा नाहीं व तिचा उपयोग फक्त त्या संस्थानाच्या गरजापुरताच

नकार देणारें उत्तरच मला अधिक पसंत पडेल."

हे पत्र आल्यावर त्याचीं उत्तरें निरनिराळ्या संस्थानिकांनीं पाठविलीं. तीं अर्थातच भिन्न भिन्न प्रकारचीं असण्याचा संभव असल्यामुळे, या प्रश्नाचा सर्वांनीं मिळून एकत्र विचार करण्यासाठीं व्हाईसरॉयसाहेबांनीं त्या सर्वांची अजमीर येथे एक परिषद बोलाविली.

व्हाईसरॉयसाहेबांच्या या पत्राचें विस्तृत उत्तर महाराजांनीं तारीख १ ऑगस्ट रोजीं पाठविलें. तत्पूर्वी त्यांनीं हिंदुस्थान सरकारास अडचणीच्या वेळीं वाटेल ती मदत करण्याची आपली तयारी दर्शविली होती. परंतु या नवीन योजनेनें त्या मदतीला कायमचें रूप येण्याचा संभव असल्या मुळें, त्यांनीं आपल्या पत्रांत या योजनेसंबधानें आपली स्पष्ट नापसंती दर्शविली. कर्झनसाहेबांच्या इच्छेनुरूप या बाबतींत स्वतःचें प्रामाणिक मत त्यांनीं मोकळेपणानें आपल्या उत्तरांत कळविलें. महाराजांनी या प्रश्नाचा सांगोपांग विचार केला, त्याच्या पूर्वेतिहासाचें विवेचन केलें, त्याचीं साधक-बाधक प्रमाणें परीक्षिलीं व मग आपला निर्णय त्यांना कळविला.

या प्रश्नाचा विचार सोपपत्तिक रीतीनें करतांना असें दिसून येईल कीं, संस्थानाकडून मागितल्या जाणाऱ्या अशा प्रकारच्या मदतीला मुख्यतः चार कारणें संभवू शकतात, तीं अशीं —

(१) इंग्रज सरकार व देशी राज्यें यांच्यामध्यें पूर्वी झालेल्या करारा-अन्वयें संस्थानावर पडणारी निश्चित जबाबदारी,

(२) कृतज्ञतेच्या व राजनिष्ठतेच्या भावनेनें संस्थानांनीं आपण होऊन देऊं केलेली मदत,

(३) वरिष्ठ सरकार व संस्थानिक यांच्यामध्यें एक प्रकारचा नवीन संबंध घडवून आणण्यासाठीं केलेल्या योजनेनुरूप संस्थानांनीं अंगिकारिलेली जबाबदारी, व

(४) साम्राज्याचे घटक या नात्यानें संस्थानावर येणारी नैतिक जबाबदारी

ठेविलेले असत. या पयकांवरील प्रत्यक्ष हुकुमत खुद्द संस्थानिकांची असे व त्यांना लष्करी बाबतींत योग्य तो अनुभवाचा सल्ला ब्रिटिश अधिकाऱ्यांकडून देण्यांत येत असे. अशा पयकांपैकीं कांहींनीं चीनमध्यें व सोमालीलँडमध्यें दिलेली मदत महत्वाची आहे. खुद्द संस्थानांतूनहि या पयकांचा अनेक प्रकारें उपयोग होऊन, त्यांच्यामुळें संस्थानांतील इतर बिनकवायती फौज कमी करून लष्करी खर्चांत काटकसर करण्याची सवड होऊं शकली आहे."

"अशा प्रकारें देशी संस्थानांचे राजे व प्रजा यांना ब्रिटिश मुलुखांतील प्रजेप्रमाणें इंग्रजी राज्यापासून व इंग्रजी सैन्यापासून लाभ झाला आहे, या निर्विवाद विचारसरणीच्या आधारावरच 'इम्पीरिअल सर्व्हिस ट्रुप्स्'च्या योजनेची शिफारस करण्यांत येत आहे. कारण संस्थानें व ब्रिटिश प्रजा, या उभयतांना ज्या सैन्यामुळें सारखाच लाभ मिळतो, त्या सैन्याचा सर्व खर्च एकट्या इंग्रज सरकारनें सोसावा याला कांहीं योग्य कारण नाहीं. केवळ इंग्रजी सैन्यामुळें प्राप्त झालेल्या सुरक्षिततेच्या कारणानेंच कित्येक संस्थानांचें उत्पन्न गेल्या शतकांत दुप्पट, तिप्पट व क्वचित् प्रसंगीं दसपटहि झालें आहे."

अशा रीतीनें या पद्धतीची आरंभींच तरफदारी करून, नंतर लॉर्ड कर्झन यांनीं संस्थानिकांचे या बाबतींत खरे व स्पष्ट अभिप्राय मागवितांना म्हटलें कीं,

"अशा प्रकारच्या सूचना या पत्रद्वारें मी आपणांस विश्वासपूर्वक करीत आहे; त्यांचा आपण सर्व बाजूंनीं विचार करावा. आपण आपल्या भरंवशाच्या मंत्र्यांचा, त्याचप्रमाणें आपल्या दरबारीं असलेल्या ब्रिटिश प्रतिनिधींचाहि या बाबतींत सल्ला घ्यावा. माझी अशी इच्छा आहे कीं, जितक्या मोकळेपणानें मी आपल्याला हें पत्र लिहीत आहे, तितक्याच मनमोकळेपणानें आपण त्याचें उत्तर पाठवावें. या बाबतींत आपले खरे विचार मुत्सद्देगिरीच्या भाषेंत लपवून ठेवून पाठविलेल्या संदिग्ध अथवा भ्रामक उत्तरापेक्षां असंदिग्ध व प्रामाणिक

अवलबून राहिली पाहिजे; कारण लॉर्ड लॅन्स्डाऊन याच्या पूर्वी उल्लेख केलेल्या उद्गारात दर्शविल्याप्रमाणें स्वयस्फूर्ति हेंच इम्पीरिअल सर्व्हिस ट्रुप्सच्या योजनेचे मुख्य तत्व आहे. अशा वेळीं 'सव घोडे बारा टके' या म्हणी-प्रमाणें सर्व सस्थानाकडून मिळणाऱ्या मदतीच्या स्वरूपाचा एकच साचा इग्रज सरकार तयार करील, तर त्याच्या चौकटींत सर्व सस्थानाना बसता न आल्यास तो त्याचा दोष मानता येणार नाहीं, अथवा त्यावरून त्याच्या मदतीची आस्थाहि मापता येणार नाहीं

तिसऱ्या कारणाचा विचार करिता वरिष्ठ सरकार व सस्थानिक याच्या-मध्यें अधिक सघटन घडवून आणण्यासाठीं एखादी नवीन योजना वरिष्ठ सरकाराकडून सुचविण्यात येईल, तर त्या योजनेला समति देणें, हें अर्थातच त्या योजनेच्या गुणावगुणावर अवलबून राहील

अखेरचे कारण म्हणजे नैतिक स्वरूपाच्या जबाबदारीचें होय या ठिकाणीं दरेक सस्थानाची नैतिक भावना ही भिन्न स्वरूपाची असणें शक्य आहे एखाद्या सस्थानानें आपल्या भावनेप्रमाणें विशिष्ट स्वरूपाची मदत केली, म्हणून तशीच मदत सर्वांनीं केली पाहिजे असे म्हणता येणार नाहीं या नैतिक भावनेचें पृथ करण केल्यास तिच्यात तीन गोष्टींचा अतर्भाव झाल्याचे दिसून येईल प्रथमत या नैतिक भावनेला आधार म्हणून असें सागता येईल कीं, सस्थानात साप्रत काळीं जी शातता, सुरक्षितता व भरभराट दिसून येत आहे, त्या सर्वांचें कारण इग्रज सरकारचें सामर्थ्य हें असल्यामुळें, त्याचा मोबदला म्हणून सस्थानावर वरिष्ठ सरकारास मदत करण्याचें बधन असलें पाहिजे परतु याला असे उत्तर देता येईल कीं सस्थानाना मिळणाऱ्या या शाततेचा, सुरक्षिततेचा व भरभराटीचा मोबदला म्हणून त्यानीं यापूर्वीच आपल्या स्वतत्रतेचें व सार्वराष्ट्रीय योग्यतेचें दान करून टाकून आपला दर्जा गौणत्वाचा करून घेतला आहे म्हणून सस्थानाना मिळणाऱ्या वरील फायद्याचा मोबदला यापूर्वीच देण्यात आलेला आहे. याशिवाय तैनाती फौजेच्या खर्चाच्या रूपानेंहि इग्रज सरकाराच्या सामर्थ्या-

या चार कारणाचा क्रमानें विचार करिता त्यातील पहिल्या कारणा संबंधानें असें दिसून येईल कीं, बडोदें सरकारच्या इंग्रज सरकारशीं झालेल्या तहान्वयें ज्या वेळीं एखादी लढाई उपस्थित होईल, त्या वेळीं त्या सरकारच्या मदतीस आपल्या सर्व फौजेनिशीं व साधनानिशीं जाण्यास बडोदें सरकार बांधलेलेंच आहे ही जबाबदारी निश्चित स्वरूपाची असून ती पार पाडण्याची तयारी त्या सरकारनें पूर्वीपासून नेहेमींच दर्शविलेली आहे सन १८१७ सालीं कॅ कारनॅक यानें असा स्पष्ट अभिप्राय दिला होता कीं,

> It was universally admitted that of all the armies of Native States in alliance with the British Government none have ever manifested when tried, a better inclination to serve with fidelity and devotion than the troops of the Gaekwar in active operation with the forces of the Company

> "ब्रिटिश सरकारशीं दोस्ती असलेल्या संस्थानापैकीं गायकवाडा खेरीज दुसऱ्या कोणत्याहि संस्थानाच्या सैन्यानें प्रसंग आला असता, इतक्या एकनिष्ठेनें व इमानानें कंपनीच्या फौजेबरोबर लढण्यात सहकार केला नाहीं, ही गोष्ट सर्वमान्य आहे "

हीच परंपरा त्यानंतर पुढेंहि चालू ठेविण्यात आली आहे गेल्या महायुद्धात बडोदें सरकारनें इंग्रज सरकारास दिलेल्या मदतीची प्रशंसा सर्वांनी मुक्तकंठानें केलेली आहे त्या वेळीं आपली सर्व फौज बडोदें सरकारनें देऊ केली होती अर्थात् तिचा उपयोग इंग्रज सरकारास होणें, हें त्या फौजेच्या शस्त्रास्त्र व तयारीवर अवलंबून राहणार जर या फौजेचा कमाल उपयोग व्हावा अशी इंग्रज सरकारची इच्छा असेल, तर ती फौज जय्यत तयारीच्या स्थितींत ठेवण्याचें काम त्याचें आहे

यानंतर दुसऱ्या कारणाचा विचार करिता आपखुषीनें वरिष्ठ सरकारास संस्थानानीं जी मदत करावयाची, ती अर्थातच त्याच्या इच्छेवर व साधनावर

मस्थानासस्थानात अशी विषमता नसल्याने, निदान त्याच्यात आपआपसात तरी या खर्चाच्या बाबतींत प्रमाण असलें पाहिजे, व म्हणून ज्या सस्थानाचा खर्च या दृष्टीने कमी असेल, त्यानीं तो वाढवून इतराच्या बरोबरीला आणून ठेविला पाहिजे या म्हणण्याला असा जबाब देता येतो कीं, हिंदुस्थानातील सस्थानाशीं इग्रज सरकाराचे जडलेले सबध अत्यत भिन्न भिन्न स्वरूपाचे आहेत काहींना इग्रज सरकारनें जिंकून त्याच्याशीं तह केले आहेत व काहींशीं दोस्तीच्या नात्याने तह केले आहेत तसेंच या तहाच्या वेळच्या परिस्थितीप्रमाणे या तहातहि अत्यत विविधता दिसून येते काहीं सस्थानें उत्पन्नाच्या व आकाराच्या दृष्टीनें पहिल्या वर्गात येत असूनहि त्याना इग्रज सरकारास खडणी द्यावी लागते, तर इतर काहींना दुसऱ्या अनेक सस्थानाकडून खडणी मिळत असते अशा प्रकारें वरिष्ठ सरकाराशीं भिन्न भिन्न प्रकारच्या सबध असलेल्या सस्थानात लष्करी खर्चाच्या बाबतींत सारखेपणाची अपेक्षा कशी करता येईल ?

परतु हीं कारणें बाजूस ठेविलीं, तरी या योजनेच्या मूळ तत्त्वावरहि कित्येक आक्षेप घेण्यासारखे होते लॉर्ड लॅन्सडाऊन यानीं सन १८८५ सालीं या योजनेचे मुख्य तत्त्व आपखुषी म्हणून सागितलें होतें, त्याला दरेक सस्थानानें आपल्या उत्पन्नाचा ठराविक भाग लष्करी खर्चासाठीं तोडून देण्याच्या मागणीनें हरताळ फासला जाणार होता कारण, मग त्यात एक प्रकारची सक्ति ओघानेंच येत होती खुद्द लॉर्ड कर्झन यानींहि आपल्या पत्रात या बाबतींत खुला व प्रामाणिक अभिप्राय मागितला होता, यावरून त्याच्याहि मनात सस्थानानीं लाजेकाजेनें आपल्या योजनेला हो म्हणावें असें नव्हतें, हें स्पष्ट होत होतें अशा स्थितींत सस्थानी खर्चाचा ठराविक भाग देण्याचें सस्थानिकानीं कबूल करणें, म्हणजे केवळ सरकारच्या भिडेखातर हो म्हणण्यासारखेंच होतें

दुसरा असाहि एक आक्षेप या योजनेवर घेण्यासारखा होता कीं, ।

मुळें प्राप्त होणाऱ्या स्वास्थ्याचा मोबदला संस्थानांनीं अनेक वर्षेपर्यंत दिलेला आहे. इंग्रज सरकारच्या वसाहतींनाहि शांतता, सुरक्षितता व भरभराट यांचा लाभ मुख्य सत्तेच्या लष्करी सामर्थ्यामुळेंच मिळत असून, त्यांना साम्राज्याच्या मदतीसाठीं इम्पीरिअल सर्व्हिस ट्रूप्ससारखी एखादी फौज ठेविण्यास केव्हांहि सांगण्यांत येत नाहीं व असें असूनहि साम्राज्या-वरील संकटाच्या प्रसंगीं त्या वसाहती आपल्या नैतिक भावनेला जागून मुख्य सरकारला आपल्या फौजेनिशीं मदत करण्यास तयार असतातच. हेंच धोरण संस्थानाच्या बाबतींतहि राहिलें पाहिजे व म्हणून नैतिक भावनेमुळें खडी फौज ठेवण्याची जबाबदारी संस्थानावर पडते, असें म्हणतां येणार नाहीं.

नैतिक भावनेचा दुसरा आधार असा सांगण्यांत येईल कीं, इंग्रज सरकार व संस्थानिक यांच्या आकाराच्या व उत्पन्नाच्या मानानें देशाच्या संरक्षणा-साठीं होणाऱ्या खर्चांत प्रमाणबद्धता राहिली पाहिजे. यासाठीं संस्थानांनीं इम्पीरिअल ट्रूप्स् आपल्या पदरीं ठेऊन अधिक खर्च करण्यास तयार झालें पाहिजे यांचें उत्तर असें देतां येतें कीं, इंग्रजी राज्य व संस्थानिक यांच्यांत अनेक बाबतींत फरक असून इंग्रजी राज्याची स्थिति अधिकाराच्या दृष्टीनें संस्थानांपेक्षा फार श्रेष्ठ आहे. यामुळें त्या दोघांतील विषमतेचें समी-करण या नवीन योजनेनें करणें बरोबर होणार नाहीं. सर्वच बाबतींत या दोघांत सारखेपणा असता, तर मग तो संरक्षणाच्या खर्चाच्या बाबतीं-तहि राहिला पाहिजे असें म्हणणें वाजवी झालें असतें. परंतु इतर सर्व दृष्टींनीं या दोघांत असलेल्या विषमतेच्या परिस्थितींत एखाद्या एकच बाबतींत प्रमाणाची अपेक्षा करणें सयुक्तिक होणार नाहीं.

नैतिक भावनेचा तिसरा आधार असा सांगण्यांत येईल कीं, वरील परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें इंग्रज सरकार व संस्थानिक यांच्या परि-स्थितींत विषमता असल्यामुळें त्या दोघांत लष्करी खर्चाच्या बाबतींत प्रमाणाची अपेक्षा करणें बरोबर नाहीं हें म्हणणें खरें मानलें, तरी युद्

संकल्पित धोरणांप्रमाणें त्यांचा उपयोग साम्राज्याला फक्त संकटकाळीं करावयाचा असून, इतर प्रसंगीं ते संस्थानी फौजेचे भाग म्हणूनच रहावयाचे होते; परंतु अशा इतर प्रसंगीं राज्यांतील पिळवाईसारखा दंगा-धोपा शमविण्याच्या कामीं या 'ट्रुप्स्'चा उपयोग संस्थानानें करावयाचें योजिल्यास, तें काम या 'ट्रुप्स्'च्या योग्यतेच्या व तयारीच्या मानानें कमी दर्जाचें समजून, तशा उपयोगाला ट्रुप्सच्या इंग्रजी अधिकाऱ्यांकडून हरकत घेतली जाण्याचा संभव येणार. अर्थात् असे प्रसंग त्या अंमलदारां-च्या व हिंदुस्थानसरकारचीं राज्यसूत्रें हातांत असणाऱ्या मुख्य अधि-काऱ्यांच्या स्वभावावर अवलंबून राहतील. जर हे अंमलदार व अधिकारी संस्थानांच्या खऱ्या अडचणींबद्दल सहानुभूति बाळगणारे असले, तर वरील अडचणी उद्भवणार नाहींत. परंतु असे सुस्वभावी अंमलदार व अधि-कारी नेहमींच येतात, असें थोडेंच आहे! व तसे ते नसले, तर विना-कारण भानगडी उपस्थित होऊन, त्यांचे परिणाम संस्थानाच्या दृष्टीनें गंभीर होण्याचा संभव आहे. या व अशाच प्रकारच्या इतर कारणांमुळें ही नवीन योजना अव्यवहार्य आहे, व म्हणून त्या योजनेऐवजीं जरूर त्या प्रसंगीं कांहीं वेतन घेऊन कामाला येणारें स्वयंसेवकदल ठेवण्यासारखी एखादी योजना केली, तर ती अधिक उपयुक्त व सुलभ होण्यासारखी होती.

तथापि साम्राज्यसंरक्षणाच्या बाबतींत लष्करी सुधारणेपेक्षां राजकीय सहकार्याचीच योजना अधिक परिणामकारक होईल, असें महाराजांचें मत होतें. व्हाईसरॉयांनीं या कामासाठीं जर्मन लष्करी सहकार्याचें उदाहरण दिलें, तथापि पाहिलें तरी जर्मन साम्राज्यांतील संस्थानांत केवळ लष्करी दृष्टीनेंच एकीकरण झालेलें होतें असें नसून, साम्राज्यविषयक व सर्व प्रकारच्या अंतस्थ, परराष्ट्रीय वगैरे प्रश्नांत राइक्स्टॅगच्या द्वारें एकीकरण झालेलें होतें. या शिवाय साम्राज्याचें धोरण व राजनीति ठरविण्याच्या कामीं

संस्थानिकांजवळून घ्यावयाची ही आर्थिक मदत कराच्या अथवा पट्टीच्या रूपाची असल्यामुळें, एकदा हें कर देण्याचें तत्त्व कबूल केलें, कीं त्या कराची वाढ करण्याची इच्छा जर पुढें वरिष्ठ सरकारास झाली, तर त्या वेळीं तिला संस्थानांना हरकत घेता येणें शक्य नाहीं. ब्रिटिश मुलुखांत इंग्रजी प्रजेवर ज्याप्रमाणें कर लादल्यावर त्याच्या वाढीला त्यांना हरकत घेण्याचा अधिकार कायद्यानें रहात नाहीं, तीच स्थिति संस्थानिकांची होणार व अशा करवाढीनें त्या संस्थानांच्या आर्थिक स्थितींतहि चळविचळ होण्याचा संभव राहणार.

लॉर्ड कर्झन यांनीं आपल्या पत्रांत हिंदुस्थानांतील सर्व संस्थानांनीं मिळून करावयाच्या साम्राज्यसंरक्षणाच्या योजनेला त्या वेळच्या जर्मनींतील संयुक्त संस्थानांचें उदाहरण दिलें होतें. परंतु तें उदाहरण या देशांत लागू होऊं शकण्यासारखें नाहीं. जर्मनींतील संस्थानी फौजा या जर्मन लष्कराचे स्वतंत्र व स्वयंपूर्ण घटक असून, त्यांना आपआपल्या संस्थानांच्या फौजांचेंहि काम हिंदुस्थानांतील संस्थानी फौजेप्रमाणें करावें लागत नव्हतें. हे 'सर्व्हिस ट्रुप्स्' संस्थानी फौजेबरोबरच राहिल्यानें, इंग्रजी लष्करी अधिकाऱ्याच्या हाताखालीं त्यांना देण्याच्या शिक्षणांत व्यत्यय येण्यासारखा होता व एकदा हे 'ट्रुप्स्' अगदीं अर्वाचीन पद्धतीप्रमाणें तयार असले पाहिजेत अशी अपेक्षा ठेवून त्या धोरणानें त्यांना शिक्षण देण्यास सुरुवात केली, म्हणजे त्यांच्यातील अंतर व इतर संस्थानी फौजेंतील अंतर अधिकच वाढत जाऊन हे 'ट्रुप्स्' मुख्य फौजेचे भाग आहेत या म्हणण्यांत फारसा अर्थ राहणार नव्हता. शिवाय या 'ट्रुप्स्च्या' तयारीची लष्करी अधिकाऱ्याची कल्पना दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत गेल्यानें, संस्थानी खर्चाचा बोजाहि त्या प्रमाणानें वाढत जाऊन तो असह्य होण्याचाहि संभव राहणार. याखेरीज या 'ट्रुप्स्'वरील इंग्रजी अधिकारी व एकंदर संस्थानी फौजेचे वरिष्ठ अधिकारी यांच्यांत घर्षण होण्याचा संभव या योजनेनें नेहेमींच राहणार, तें निराळेंच. या 'ट्रुप्स्' संबंधाच्या

तसेंच उभय सरकाराच्या संबंधाबद्दलच्या नियमांना निश्चितता नसल्यामुळें संस्थानिकांच्या कृतीला पक्षघात झाल्यासारखा होतो, व अशा रीतीनें त्यांचा उत्साह व आस्था हीं नाहींशीं होऊन त्यांच्या हातून कांहींहि सत्कार्य होऊं शकत नाहीं. ही स्थिति नाहींशी करण्यासाठीं म्हणून जर संस्थानांना आपल्या राज्यांतील अंतर्व्यवस्थेंत पूर्ण स्वातंत्र्य व साम्राज्याच्या सल्लामसलतींत भाग घेण्याचा अधिकार दिला, व त्यांना साम्राज्याच्या नुसत्या बोजांतच नव्हे, तर त्याच्या लाभांतहि हिस्सा दिला, तर त्याचा सुपरिणाम झाल्यावाचून राहणार नाहीं. निदान त्यांच्यावर पडणारी ही नवीन जबाबदारी त्यांनीं आनंदानें पत्करावी अशी इच्छा असल्यास, त्याला हा एकच अनुरूप व समाधानकारक मार्ग दिसतो."

महाराजांनीं सुचविलेल्या या दृष्टिकोणाचें रहस्य याच पत्रांतील एका वाक्यांत त्यांनीं असें सांगितलें आहे कीं,

"If the Government of India desires to institute a policy of military co operation, the first condition of success is the substitution for distrust of trust, not partial and qualified as now, but entire and ungrudging. Otherwise an impression is likely to be created of a kind, for the formation of which even in error or ignorance it is undesirable that any ground should be given, it would appear as if without any sufficient reason for the distinction, the Imperial Service troops were trusted and favoured, while the States troops proper were not."

"जर हिंदुस्थान सरकाराला आपल्याशीं संस्थानांनीं लष्करी सहकार्य करावें अशी इच्छा असेल, तर त्यांनीं प्रथमतः संस्थानांवरील सांप्रतच्या अविश्वासाच्या राजनीतीच्या ऐवजीं विश्वासाचें—संपूर्ण व निःसंदेह विश्वासाचें—धोरण स्वीकारलें पाहिजे; तरच संस्थानांच्या

या सर्वांना भाग घेतां येतो व म्हणून त्यांना साम्राज्यसंरक्षणासाठीं लष्करी मदत करण्यास उत्साह वाटतो. तसा उत्साह हिंदुस्थानांतील संस्थानांना वाटण्यासाठीं राजकीय दृष्ट्याहि ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें यांचें संघटन व्हावयास पाहिजे. ही संयुक्त राज्यपद्धतीची कल्पना महाराजांच्या मनांत फार दिवसांपासून घोळत असून हिंदुस्थानच्या राजकारणांतील पुष्कळसा घोटाळा त्यानें कमी होण्यासारखा आहे, असें त्यांना वाटत होतें. यानंतर कांहीं वर्षांनीं महाराजांनीं इंग्रज सरकारास सर्व हिंदुस्थानाला लागू पडेल अशा संयुक्तराज्यपद्धतीचा एक मसुदा करून देऊन, त्याचा विचार करण्याची विनंति केली होती. तिचा त्या वेळीं जरी उपयोग झाला नाहीं, तरी सांप्रत मंजूर झालेल्या नवीन राजकीय सुधारणेच्या कायद्यांत हेंच संयुक्तघटनेचें तत्त्व आधार म्हणून धरलेलें आहे, हा महाराजांच्या दूरदर्शित्वाचा मोठाच सन्मान झाला असें म्हणतां येईल. महाराजांनीं कर्झनसाहेबांना पाठविलेल्या पत्रांत यासंबंधाचा स्पष्ट उल्लेख केला आहे. त्यांनीं म्हटलें आहे कीं,

"संस्थानांवर टाकल्या जाणाऱ्या या नवीन जबाबदारीचा मोबदला म्हणून संस्थानांना साम्राज्यांतील सल्लामसलतींत भाग घेण्याचा हक्क मिळाला पाहिजे. संस्थानांनीं हिंदुस्थान सरकारास लष्करी मदत देण्याच्या योजनेचा हा स्वाभाविक परिणाम आहे व या परिणामानेंच संस्थानांवर टाकल्या जाणाऱ्या या नवीन बोजाचें समर्थन करतां येईल. म्हणून जर संस्थानांच्या सहकार्याची अपेक्षा केली जात असेल, तर त्याच्या व ब्रिटिश सरकारच्या मधील राजकीय संबंधाची पुनर्घटना करणें अवश्य आहे. अशा पुनर्घटनेनें लष्करी सहकार्याचा पायाहि सुस्थिर होईल, त्याचप्रमाणें सांप्रतच्या राज्यपद्धतींतील दोषहि नाहींसे होतील. हल्लींच्या राज्यपद्धतींत सर्व बाबतींचा निर्णय एकाच पक्षाच्या मर्जीप्रमाणें केला जातो व त्यामुळें संस्थानिकांचें महत्त्व नाहींसें होऊन त्यांच्या भावनांना व हितास वैगुण्य येतें, व त्यांच्या स्वतंत्र कर्तृत्वाला प्रतिबंध होतो.

"सांप्रत काळीं रशियाच्या चढाईच्या धोरणामुळें हिंदुस्थानांतील राजे व प्रजा यांच्याकडून दर्शविल्या जाणाऱ्या सार्वत्रिक व स्वयंस्फूर्त राजनिष्ठेच्या भावनेच्या अवस्थेंतून आपण जात आहोंत. ही भावना प्रामाणिकपणाची आहे, असें माझेंहि मत आहे. तथापि हल्लीं-सारख्या काळीं सर्वांनीं सशस्त्र होण्याची जी उतावळ दर्शविली आहे, तिच्यावरून केवळ आम्हांला मदत करण्याचाच त्यांचा हेतु दिसून येत नसून, असंतोषामुळें उद्भवणाऱ्या कोणत्याहि चढाईच्या अथवा बचावाच्या प्रसंगीं आपली तयारी ठेवण्याचा आमच्या मांडलिकांचा हेतूहि त्यावरून दिसून येतो, ही गोष्ट आपण विसरतां कामा नये. सांप्रतची भावना ही केवळ निःस्वार्थीपणाची नाहीं; म्हणून हिंदुस्थानां-तील सैन्य व संस्थानें यांच्यासंबंधानें आपण ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, नोकर हा कितीहि स्वामिनिष्ठ असला, तरी तो धनी होण्यास कधींहि नाखुष असणार नाहीं."

असे म्हणून ब्राऊन्स्लो इम्पीरिअल सर्व्हिस् ट्रुप्स्च्या योजनेचा निष्कर्ष असा काढतो कीं,

"To add to their (State) troops and to encourage their martial ardour, would make them an anxiety and possibly a danger, notwithstanding the perplexing march of time and events. We cannot disregard historical precedents or the question of colour."

"संस्थानिकांच्या फौजेची वाढ करणे व त्यांच्या लढाऊ वृत्तीला उत्तेजन देणें, म्हणजे आपल्या स्वत.ला एक काळजीचें व कदाचित् संकटाचेंहि कारण उत्पन्न करून ठेवणे होय. पूर्वीपेक्षां हल्लींच्या काळीं परिस्थितींत बदल झालेला असला, तरी इतिहासाचे मागील दाखले व वर्णभेदाचा विचार यांकडे आपल्याला दुर्लक्ष करतां येणार नाहीं."

महाराजांनीं सन १९०४ सालीं कर्झनसाहेबांच्या पत्राच्या जबाबांत

लष्करी सामर्थ्याचा उपयोग त्यांना करून घेता येईल. नाहीं तर असा एक समज होण्याचा संभव आहे कीं इम्पीरियल सर्व्हिस् ट्रूप्स्चें पथक मात्र विश्वासाला पात्र असून संस्थानाची नेहमींची फौज त्याला अपात्र आहे. अशा प्रकारचा समज चुकीनें वा अज्ञानानेंहि होऊं देणें अनिष्ट आहे."

या वाक्यांत महाराजांनीं वरिष्ठ सरकारच्या ज्या अविश्वासाच्या धोरणाचा उल्लेख केला, तें धोरण पूर्वीपासून चालत आलेलें होतें, यासंबंधीचा पुरावा कोणास हवा असल्यास तो लेखी मिळण्यासारखा आहे. उदाहरणार्थ, फील्ड् मार्शल ब्राऊन्स्लो या इंग्रज सेनापतीनें लिहिलेल्या 'Stray Notes' अथवा 'संकीर्ण टाचणें' या नावाच्या पुस्तकांत पृष्ठ १०३–१०४ वर रशियाच्या हिंदुस्थानावरील स्वारीच्या उठलेल्या हुलीच्या वेळीं संस्थानिकांनीं हिंदुस्थान सरकारास राजनिष्ठेनें देऊं केलेल्या लष्करी मदतीबद्दल म्हटलें आहे कीं,

"We are now passing through an emotional stage with regard to the spontaneous and universal out burst of loyalty on the part of the Princes and the people of India, in face of the aggressive attitude of Russia I believe the expression of feeling to have been thoroughly genuine but we must not forget that a rush to arms at such a time implies not only the desire to help us, but also to streng then the *raison de etre* of the oft threatened forces of our Feudatories and to prepare themselves for any eventualities, offensive or defensive, that war or dissatisfaction may give rise to The feeling therefore is not one al together devoid of self interest, and in respect of the army as well as the aristocracy of India, we ought not to allow our emotions to blind us to the fact, that a servant however loyal, is never unwilling to become a master"

(अ) प्रत्यक्ष लढाईवर पाठवितां येईल अशा प्रकारचें शिक्षण व साधनें असलेली फौज,

(ब) वरील फौजेला मदत करणारी व लढाईंत तिच्या मागून जागा घेऊं शकणारी फौज,

(क) राज्यांतील अंतर्व्यवस्थेसाठीं लागणारी फौज.

(३) वरील कलमांतील (अ) वर्गाच्या फौजेसाठीं व (ब) वर्गीतील कायमच्या फौजेसाठीं हिंदुस्थानांतील लष्कराला पुरविण्यांत येणाऱ्या नमुन्याचीं हत्यारें संख्येच्या प्रमाणांत पुरविण्यांत येतील.

(४) (ब) वर्गांतील हंगामी फौजेसाठीं हिंदुस्थानांतील राखीव फौजेला दिल्या जाणाऱ्या नमुन्याचीं हत्यारें देण्यांत येतील.

(५) संस्थानांतील फौजेला लष्करी शिक्षण अथवा सल्ला देण्यासाठीं ब्रिटिश अधिकाऱ्यांची उसनवार तरतूद करून देण्यांत येईल; त्याचप्रमाणें संस्थानांतील लष्करी अधिकाऱ्यांना ब्रिटिश लष्करी शाळा व कॉलेजें यांमधून शिक्षणाची सोय करून देण्यांत येईल.

या नवीन योजनेला बडोदे सरकारनें आपली संमति दिली आहे. तथापि या प्रकरणांत या लष्करी योजनेचा इतिहास देणे हा मुख्य उद्देश नसून, महाराजांनीं या बाबतींत आपल्या संस्थानाचे राजकीय हक्क कायम ठेविण्यासाठीं वेळोवेळीं जो प्रामाणिक स्पष्टवक्तेपणा दाखविला, त्याचा उल्लेख करणें हा होय. पथ्यकर पण अप्रिय भाषण करणारा वक्ता व श्रोता दुर्लभ असतो, अशा अर्थाचें एक वचन संस्कृतांत आहे. तथापि *या दोहोंतहि असा श्रोता मिळण्यापेक्षां वक्ता मिळणें अधिक दुर्लभ असतें;* कारण अप्रिय बोलणाऱ्या वक्त्याचा प्रतिकार ऐकणाऱ्या श्रोत्याला करितां येतो, पण अशा वक्त्याला मात्र आपल्या मतस्वातंत्र्याबद्दल पुष्कळ वेळां त्रास सहन करावा लागतो. तसा त्रास महाराजांना अर्थातच सोसावा

संस्थानिकांवरील अविश्वासाच्या धोरणाऐवजीं विश्वासाचें धोरण स्वीकारण्या बद्दल वरिष्ट सरकारास सल्ला दिला. त्यानंतर गेल्या महायुद्धात संस्थानिकांनीं साम्राज्याला तनुमनधनेंकरून निनमोल मदत दिली व साम्राज्यातील श्रेष्ठ व जबाबदार पुरुषांनीं तिचा कृतज्ञतापूर्वक उल्लेखहि केला. तथापि सन १९२८ सालीं सर शिवस्वामी अय्यर या अनुभवी व सुप्रसिद्ध राजकारणी पुरुषानें लिहिलेल्या Indian Constitutional Problems या पुस्तकाच्या १०१ पृष्ठावर इंग्लंडच्या या बाबतींतील साम्प्रतच्या धोरणाबद्दल असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे कीं,

"The policy followed by England with regard to the military organisation of India, has been based upon a distrust of the people and the Princes of India, and the one dominating motive has been how to maintain her hold on India, in the event of a general rising among the people.'

" हिंदुस्थानच्या लष्करी घटनेमबधानें इंग्लंडचें धोरण हिंदी लोकांच्या व संस्थानिकांच्या अविश्वासावर आधारलेलें आहे, व इंग्रजाचा त्या धोरणातील मुख्य हेतु एकच असून तो हा आहे कीं, हिंदुस्थानातील लोकांनी यदाकदाचित् उठाव केला, तर त्या देशावरील आपली पकड कायम कशी ठेविता येईल "

महायुद्धाच्या वेळीं कर्झनसाहेबाच्या 'इम्पीरिअल सर्व्हिस् ट्रुप्स्'च्या योजनेची खरी परीक्षा होऊन तींत ती निरुपयोगी ठरली म्हणून तिच्या ऐवजीं एक नवीन पद्धति साम्प्रतकाळीं स्वीकारली गेली आहे तिचीं मुख्य तत्वें येणेंप्रमाणें आहेत —

(१) आजपर्यंत चालत आलेली इम्पीरिअल सर्व्हिस् ट्रुप्स्ची योजना रद्द करण्यात आली आहे

(२) संस्थानिकांनीं खालील उपयोगासाठीं किती फौज ठेवण्याचा आपला विचार आहे त्याबद्दलची वरिष्ठ सरकारास माहिती द्यावी —

# प्रकरण २४ वें



## आर्थिक गुंतागुंत

हिंदुस्थानातील देशी संस्थानाचा ब्रिटिश मुलखाच्या सापेक्षतेनें जरी एकत्र निर्देश करण्यात येतो, तरी त्याच्यात जितकी अनेक प्रकारची विविधता आहे, तितकी जगातील इतर कोणत्याहि राज्यमधात आढळणार नाहीं अशा विविधतेपैकीं संस्थानाच्या अतर्व्यवस्थेतील भिन्नताचा उल्लेख येथें विवक्षित नसून, कायदेशीर दृष्टीनें त्याच्या इग्रज सरकारशीं असलेल्या संबधाचाच निर्देश प्रस्तुत आहे यासंबधानें प्रथमत असें दिसून येईल कीं, या संस्थानाच्या इग्रजाशीं जडलेल्या संबधाचीं कारणें अत्यत विविध आहेत त्यापैकींचीं काहीं संस्थानें जिकलीं गेलेलीं आहेत, तर काहीं लढाई केल्याशिवाय केवळ दबाणानें अकित केलीं गेलीं आहेत, काहीं ब्रिटिश राज्याचें वाढतें सामर्थ्य पाहून स्वत च्या लाभाच्या दृष्टीनें त्याला येऊन मिळालेलीं आहेत, तर कांहींनीं आपल्या शत्रूच्या विरुद्ध इग्रजाची मदत मागताना तीं त्याना सामील झालेलीं आहेत यानतरची विविधता या संस्थानाच्या भौगोलिक परिस्थितीमुळें उत्पन्न झालेली होय काहीं संस्थानें समुद्रकिनाऱ्या लगत आहेत, तर काहीं चारहि बाजूनीं जमीनीनें वेष्टिलेलीं आहेत, काहीं रेल्वेनें जोडलेलीं आहेत, तर काहींना अजून रेल्वेचा स्पर्शहि झालेला नाहीं यापुढील भिन्नता या संस्थानाच्या कमीअधिक राजकीय सत्तेमुळें उत्पन्न झालेली आहे काहीं संस्थानाना फक्त इग्रज सरकारशीं येणाऱ्या संबधाखेरीज इतर बाबनींत अत स्वातंत्र्य आहे, तर

लागला. विशेषत कर्झनसाहेबासारख्या अभिमानी सत्ताधाऱ्याना त्याचें वर्तन दुःसह झालें. तथापि स्वतःचें प्रामाणिक मत निर्भयपणें व्यक्त करण्याचें आपलें व्रत महाराजांनीं केव्हाहि सोडिलें नाहीं.



दिवाणगिरींत बडोदें राज्याच्या काहीं महत्वाच्या हक्कावर पाणी कसें सोडण्यात आले, यासबधाची हकीकत पहिल्या खडाच्या दहाव्या प्रकरणात निवेदन केलीच आहे. हिंदुस्थानातील इतर देशी राज्याप्रमाणेंच बडोदे राज्याचाहि हिंदुस्थान सरकारशीं दोन प्रकारचा सबध येतो. देशी राज्याच्या अतर्व्यवस्थेसबधानें देखरेख करण्याचा हक्क हा त्यापैकींचा एक प्रकार होय व दुसरा प्रकार म्हणजे हिंदुस्थान सरकार व सस्थानें याच्यामधील सामान्य हितसबधाच्या बाबतींत असणारा वरिष्ठ सरकारचा हक्क व त्याला अनुसरून त्या सरकारने केलेल्या हुकुमाचा विचार हा होय. या दुसऱ्या प्रकारात येणाऱ्या सामान्य हितसबधाच्या बाबतींत देशाचें सरक्षण, जकात, हुडणावळ, अफू, मीठ, रेल्वे, पोस्ट व तारायत्र, टाकसाळ वगैरे बाबती येतात. हिंदुस्थानातील सस्थानावर इग्रज सरकारचें सार्वभौमत्व स्थापन झाल्यापासून या सामान्य हितसबधाच्या बाबतींचे अखेरचे निर्णय सस्थानाना विचारिल्याशिवाय अगर त्याची सल्लामसलत घेतल्याशिवाय वरिष्ठ सरकाराकडून परस्परच करण्यात येत व त्यामुळें सस्थानाना त्यासबधींचें आपलें म्हणणें वरिष्ठ सरकारापुढें सामुदायिक रीतीनें माडण्याची सधि कधींहि मिळत नसे. दरेक सस्थानाशीं या बाबतींत स्वतत्र पत्रव्यवहार होत असे व त्याचा अखेरचा निर्णय नेहमीं इग्रज सरकारकडेच रहात असे यामुळें या सामान्य हिताच्या बाबतींसबधानें सस्थानाची तक्रार नेहमीं चालूच राही. अशा तक्रारीच्या बाबतींपैकींच्या मीठ, अफू, दारू वगैरे बाबतींच्या हकीगतीचें सूत्र सर टी. माधवराव याच्या कारकीर्दीपर्यंत मागील खडात आणून सोडिले आहे. त्याचाच धागा पुढें चालवून व काहीं नवीन बाबतींचा सूत्रपात करवून या उभय सरकारामधील आर्थिक गुतागुतीची उकल करण्याचें या प्रकरणात योजिलें आहे.

प्रथमत आपण मिठाची व त्याच्याशींच सलग्न असलेली जकातीची बाबत घेऊ सन १८७८ सालीं राजा सर टी. माधवराव यानीं या बाबतींत इग्रज सरकारशीं जो करार केला, त्यामुळें उत्पन्न झालेली परिस्थिति

काहींचे सर्व व्यवहार रेसिडेंट अगर पोलिटिकल एजंट यांच्या मर्जीवर अवलंबून ठेविलेले आहेत; काहींना आपल्या राज्यांत आपलें स्वतंत्र चलन व पोस्ट ऑफिसें ठेवण्याचा अधिकार आहे, तर काहीं या सर्व बाबतींत इंग्रजी बनून गेलेली आहेत. यानंतर संस्थानांतील कायद्याच्या दृष्टीनेंहि या संस्थानांत फरक आहेत. काहीं संस्थानांत त्यांचे स्वतःचे स्वतंत्र व ब्रिटिश कायद्याहून भिन्न असे कायदे आहेत, तर काहींनीं ब्रिटिश कायदे जसेच्या तसे उचलून घेऊन ते आपले म्हणून स्वीकारले आहेत; काहीं संस्थानांतील कोर्टांचे हुकुमनामे जणू काय ब्रिटिश हद्दींतील कोर्टांत झालेले हुकुमनामे आहेत असें समजून त्यांची बजावणी ब्रिटिश कोर्टां-मार्फत केली जाते, तर काहींच्या बाबतींत असे करार न झाल्यामुळें त्यांच्या कोर्टांतून झालेले हुकुमनामे बजावणीच्या दृष्टीनें ब्रिटिश मुलखांत निरर्थक समजले जातात. याशिवाय फौजदारी गुन्हे एका हद्दींत करून दुसऱ्या राज्याच्या हद्दींत पळून जाणाऱ्या आरोपींना पकडून देण्याबद्दल अरसपरस करार काहीं संस्थानांचे इंग्रज सरकारशीं व आपआपसांशीं झालेले आहेत, तर काहीं संस्थानांच्या बाबतींत असे करार झालेले नसल्यानें, एका मुलखांत गुन्हे करून दुसऱ्या मुलखांत राजरोस वावरणाऱ्या गुन्हेगारांमुळें धुमाकूळ उडून राहतो. यानंतरची विविधता या संस्थानांच्या राजकीय दर्जाच्या दृष्टीनें आढळण्यांत येते. काहीं संस्थानांना इतर लहान लहान संस्थानांपासून स्वतःच्या जुन्या सार्वभौमत्वाच्या आधारानें खंडणी वसूल करण्याचा हक्क आहे, तर याच्या उलट इतर काहीं संस्थानांना त्यांच्याहून वरिष्ठ संस्थानांना खंडणी द्यावी लागते. अशा रीतीनें या संस्थानांत अनेक प्रकारची कायदेशीर दृष्ट्या भिन्नता आहे. तीमुळें या संस्थानांचे आपसांत एकमेकांशीं व विशेषतः इंग्रज सरकाराशीं अनेक प्रकारचे गुंतागुंतीचे संबंध येतात. त्यांपैकींचे राजकीय संबंध वगळले, तरी त्यांहून अधिक गुंतागुंतीचे संबंध आर्थिक स्वरूपाचे आहेत. त्यांतील काहींचा विचार करितां महाराजांच्या अज्ञानावस्थेंत बडोदें राज्याची धुरा धारण करणारे सर टी. माधवराव यांच्या

प्रातातून मिठाची खासगी पैदास बद केली आहे व त्याच मतलबाचे करार व तह इतर सस्थानाशींहि केले आहेत. त्याअन्वयें सस्थानाना मीठ पिकविण्याची व विकण्याची मनाई करण्यात आली आहे. याविरुद्ध सस्थानाची तक्रार अशी आहे कीं, हे करार व तह जबरीने करण्यात आले असून, मिठाच्या उत्पन्नाच्या नुकसानीबद्दल सस्थानाना जो मोबदला देण्यात आला, तोहि अगदीं अल्प आहे. परतु कमिटीचा अभिप्राय असा आहे कीं, या बाबतींत झालेल्या करारात फरक करण्याचें काहीं कारण नाहीं. हिंदुस्थान सरकारनें मिठाचा सपूर्ण मक्ता स्वत कडे घेण्यासाठीं पुष्कळ खर्च केला आहे व म्हणून या बाबतीचें उत्पन्न घेण्याचा अधिकारहि त्याना प्राप्त होतो. यदाकदाचित् या मक्त्यामुळें काहीं सस्थानाना नुकसान आल्याबद्दलच्या किरकोळ तक्रारी असल्या, तर त्याच्यापुरता सहानुभूतिपूर्वक विचार व्हावा "[1]

अशा रीतीनें या प्रश्नाची वासलात लावण्यांत आली.

यानतरचा प्रश्न बदरें व जकाती याच्या सबधाचा होय. या प्रश्नाचें स्वरूप खालील प्रकारचें आहे. परदेशातून हिंदुस्थानात जो माल आणण्यात येतो, त्यावर या देशात जकात आकारण्यात येते व ती जकात निरनिराळ्या प्रकारच्या मालावर निरनिराळ्या प्रमाणात आकारण्यात येते. यापैकींचा काहीं माल सस्थानात आणण्यात येऊन तेथें तो विकला जातो, व इतर काहीं माल फक्त या सस्थानातील वहातुकीच्या रस्त्यानें नेण्यात येऊन ब्रिटिश मुलखात उतरविण्यात येतो व तेथें तो विकला जातो. या दोन प्रकारापैकीं पहिल्या प्रकारात म्हणजे परदेशातील माल सस्थानात खपविला जातो त्या वेळीं या मालावर जितकी जकात आकारण्यात येते, तितकी त्या मालाची किंमत वाढविण्यात येऊन त्या वाढलेल्या किंमतीच्या रूपानें तो माल घेणारे लोक सरकाराला अप्रत्यक्ष करच देत असतात. म्हणून या प्रकारच्या आकारणीला जकात असें

१ डेव्हिडसन् कमिटी रिपोर्ट

बदद्ल घेण्याकरितां त्याच्यानंतरच्या दोन दिवाणांच्या कारकीर्दींत प्रयत्न करण्यात आला परंतु त्याला यश न येता, हिंदुस्थान सरकारनें ता २८ एप्रिल १८८७ रोजीं केलेल्या निर्णयानें हा प्रश्न त्या वेळीं तरी निकालांत काढल्यासारखा झाला यानंतर सन १९०६ सालीं महाराजांनीं लॉर्ड मोर्ले हे हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी असतांना त्यांना एक पत्र पाठवून आपल्या संस्थानासंबंधच्या तक्रारी बाबतींचें लोण त्यांच्यापर्यंत नेऊन पोहोंचविलें. या पत्रांत सन १८७८ सालीं झालेला मिठासंबंधचा करार रद्द करण्याबद्दल महाराजांनीं मागणी केली होती परंतु त्या प्रकरणाचें घोंगडें तसेंच भिजत पडून सन १९११ सालीं महाराजांना असें कळविण्यात आलें कीं, या बाबतींत आता काहीं कमी अधिक करणें हिंदुस्थान सरकाराला योग्य वाटत नाहीं त्यानंतर पुन्हा सन १९२३ सालीं महाराजांनीं हा प्रश्न उपस्थित केला व इंग्रज सरकाराशीं बडोदें राज्यानें केलेल्या तहाच्या कलमाचें विस्तृत विवेचन करून आपली मागणी कशी वाजवी आहे, याबद्दलची खात्री पटविण्याचा आणखी एक प्रयत्न केला तथापि त्यातूनहि काहीं निष्पन्न झालें नाहीं अखेर अलीकडे चालू असलेल्या हिंदुस्थानातील राजकीय सुधारणाच्या योजनेंत ब्रिटिश प्रजा व संस्थानें यांची संयुक्त राज्यपद्धति स्थापन करण्याचा बूट काढण्यात आला, त्या वेळीं या प्रश्नाला पुन्हा चालना मिळाली त्या वेळीं ब्रिटिश सरकार व संस्थानें यांच्यामधील आर्थिक प्रश्नाचा विचार करण्यासाठीं एक खास कमिटी नेमण्यात आली, तिच्यापुढें दरेक संस्थानानें आपल्यापुरती कैफियत मांडली, त्या प्रसंगीं बडोदें सरकारनें हा प्रश्न पुन्हा उपस्थित केला तथापि या बाबतींत कमिटीनें दिलेल्या अभिप्रायात या मागणीला वाटाण्याच्या अक्षताच दिल्या या अभिप्रायांत कमिटी म्हणते कीं,

"इंग्रज सरकारनें मोंगल बादशहाजवळून हिंदुस्थानचें स्वामित्व हिरावून घेतल्यापासून उत्पन्नाची एक बाबत म्हणून मीठ बनविण्याचा संपूर्ण अधिकार त्यानीं आपल्याकडे घेतला असून, तत्प्रीत्यर्थ त्यानीं सर्व

इंग्रज सरकारनें हिंदुस्थान देशातील प्रवासी कर 'Transit duties' रद्द करवून घेतले असल्यानें, परदेशातून आलेला माल ब्रिटिश हिंदुस्थानातून संस्थानाच्या हद्दीत जात असताना त्यावर जकात आकारण्याचा अधिकार इंग्रज सरकारास मिळू शकत नाहीं. परदेशात व ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागात चालू असलेल्या रिवाजाप्रमाणें पाहताहि, परदेशातून आलेला माल ब्रिटिश मुलखातून संस्थानात जाताना त्यावर आकारल्या जाणाऱ्या जकातीची माफी त्या मालाला मिळाली पाहिजे.

वरील कलमात म्हटल्याप्रमाणे परदेशातून संस्थानात येणाऱ्या मालाला जकातीची माफी तरी मिळाली पाहिजे, अथवा निदान त्या मालावरील जकातीच्या उत्पन्नाचा कांहीं भाग संस्थानातील लोकसंख्येच्या, उत्पन्नाच्या अथवा खर्चाच्या मानानें त्या संस्थानास तरी मिळावयास पाहिजे.

परदेशातून उतरलेला माल ब्रिटिश हिंदुस्थानातून संस्थानात येताना त्यावर आकारल्या जाणाऱ्या जकातीमुळें संस्थानातील प्रजेची कर देण्याची शक्ति कमी होते व त्यामुळें त्या प्रजेपासून राज्याला कराचे जितकें उत्पन्न मिळावयास पाहिजे तितकें न मिळाल्यानें त्या राज्याचें एकदरीनें परिणामीं नुकसानच होते.

वरील मुद्याखेरीज बडोदे सरकारचें विशेष म्हणणें काय होतें, तें समजण्यापूर्वी थोडीशी अगोदरची हकीकत येथे दिली पाहिजे.

बडोदें राज्याचे पाच मुख्य भाग असल्याचें मागें सांगितलेंच आहे. त्यापैकींचे नवसारी, बडोदें व कडी हे भाग गुजराथेत असून, बाकीचे अमरेली व ओखामंडळ हे भाग काठेवाडच्या द्वीपकल्पात समाविष्ट झालेले आहेत. गुजराथेतील कडी प्रांताच्या सर्व बाजूस जमीनच आहे, पण नवसारी प्रांतातील नवसारी व गणदेवी हे महाल आणि अमरेली व ओखामंडळ हे काठेवाडातील भाग समुद्रालगत आहेत. बडोदें प्रांताचा

त्या अर्थानें म्हणता येईल. याच्या उलट दुसऱ्या प्रकारात परदेशातील माल फक्त एखाद्या देशातून दुसऱ्या देशात जातो, त्या वेळीं त्यावर आकारलेली लागत ही केवळ प्रवासी कर (Transit duties) अशा स्वरूपाची असते. अशा प्रसंगीं ही लागत निरर्थक आकारली जाते व म्हणून ती सर्वत्र काढून टाकण्यात यावी, अशा प्रकारचा सार्वराष्ट्रीय ठराव एका जागतिक परिषदेंत 'Barcelona Convention' (बारसिलोना कन्व्हेन्शन्) या नावानें सन १९२१ सालीं करण्यात आला आहे. सदर ठरावाचीं कलमे २ व ३ यात याअन्वयानें स्पष्ट म्हटलें आहे कीं —

Cl. 2 "The measures taken .... for regulating and forwarding traffic across their territory shall facilitate free transit by rail or water way

Cl. 3 "That traffic in transit shall not be subject to any special dues in respect of transit (including entry and exit )"

कलम २ "एका देशातून दुसऱ्या देशात नेल्या जाणाऱ्या मालाच्या नियमनासाठीं व सुलभतेसाठीं रेल्वेनें अगर जलमार्गानें विना लागत तो माल जाऊ दिला जावा."

कलम ३ "अशा प्रकारें केवळ प्रवासात असलेल्या मालावर आगमनाच्या अथवा निर्गमनाच्या प्रसंगीं जकात आकारली जाऊ नये."

या निर्बंधाना व त्यातील तत्त्वाना अनुसरून ब्रिटिश राज्यातून देशी संस्थानात माल जाताना त्यावर ब्रिटिश सरकाराकडून लागत बसविण्यात येता कामा नये, असें संस्थानाचें म्हणणें आहे. या बाबतींत ब्रिटिश हिंदुस्थानात न खपणाऱ्या व केवळ संस्थानात खपणाऱ्या मालावर हिंदुस्थान सरकारला जकातीची लागत आकारण्याचा अधिकार नाहीं. परदेशातून कोणत्याहि राज्यात येणाऱ्या मालावर आकारली जाणारी लागत मुख्यत त्या मालाच्या खपावर आकारलेल्या कराच्या स्वरूपाची असते व असा कर आकारण्याचा अधिकार तो माल ज्या देशात खपतो, त्या देशाच्या सरकारासच फक्त आहे.

सन १८६५ च्या सनलतीला करार म्हटले, तरी त्यानतर सन १९१७ साली या दोनहि सरकारात पुन्हा एक पुरवणी करार होऊन त्यात असें ठरलें आहे कीं, सन १८६५ च्या आपसातील समजुतीमुळें इग्रज सरकारच्या आर्थिक हितसबधास नुकसान येतें असें दिसून आल्यास त्या समजुतीचा फेरविचार करण्याचा अधिकार त्या सरकारनें आपल्याकडे राखून ठेविला आहे. यामुळे त्या दृष्टीनें पाहताहि सन १८६५ च्या करारावर विशेष भिस्त ठेविता येत नाहीं, व अलीकडे तर बडोदे सरकारनें ओखाबदर नवीन उघडल्यानें तेथें उतरणाऱ्या मालावर आकारल्या गेलेल्या सुमारें दहा लाख रुपयाच्या उत्पन्नानें हिंदुस्थान सरकारच्या तिजोरीस मोठा चट्टा बसत आहे, यामुळें या जकातीची माफी देण्यास तें सरकार तयार नाहीं, व यासाठींच विरमगाव येथे त्यानीं सन १९२७ सालीं पुन्हा जकातनाकें बसविलें. शिवाय सन १८६५ सालच्या कराराचा विचार केला, तरी त्यात जलमार्गानें येणाऱ्या मालावरील जकातीची दिलेली माफी वर म्हटल्याप्रमाणें खुष्कीच्या रस्त्यानें येणाऱ्या मालाला लागू होऊ शकत नाहीं ”

वरील परिच्छेदात खुष्कीच्या रस्त्याने येणाऱ्या मालावरील जकातीचा उल्लेख केला आहे, तो प्रश्न उपस्थित होण्याचें कारण भौगोलिक होते. बडोदें राज्याचे अमरेली व ओखामडळ हे प्रात ज्या काठेवाडच्या द्वीपकल्पात आहेत, त्यात अनेक सस्थानें असून त्याच्या हद्दींतील बदरात पुष्कळ माल उतरतो. तो पुढें जमीनीवरून हिंदुस्थानाच्या सर्व भागात आणण्यात येतो. काठेवाड द्वीपकल्प ज्या ठिकाणीं हिंदुस्थानास जोडलें गेलें आहे, तो भाग निमुळता व अरुद असून त्याच्या मध्यावर विरमगाव हें स्टेशन असल्यामुळें, त्या ठिकाणीं इग्रज सरकारनें आपलें जकातीचें मुख्य नाकें बसवून, तेथें काठेवाडातून हिंदुस्थानात आणिल्या जाणाऱ्या सर्व मालावर आपली जकात बसविण्यास सन १९०३ मध्यें सुरवात

कोणताहि भाग समुद्र किनाऱ्यापर्यंत पुढें आलेला नाहीं, पण त्यांतील कांहीं ठिकाणीं मही नदीच्या मुखाशीं खाडी असल्यानें, त्या ठिकाणापर्यंत समुद्राच्या भरतीचें पाणी येत असल्यामुळें तेथें बंदरें करण्यासारखी सोय आहे

या सर्व भागापैकीं काठेवाडचा विचार प्रथम करितां, वडोदें सरकारचें म्हणणें असें होतें कीं, इंग्रज सरकारशीं सन १८१७ सालीं झालेल्या तहाअन्वयें या उभय सरकाराच्या प्रदेशामध्यें व्यापार, नौकानयन वगैरेंची मोकळीक उभयतांना सारखीच ठेवलेली आहे याननर पुन्हा सन १८६५ सालीं झालेल्या कराराअन्वयें वडोदें राज्यांतील बंदरांत उतरणाऱ्या परदेशी मालावर ब्रिटिश बंदरांत आकारल्या जाणाऱ्या जकातीहून कमी जकात न आकारण्यास बडोदें सरकार बांधलें गेलें आहे, व यामुळें हें सरकार एका प्रकारें जमनींतील संस्थानाच्या जकातसंघा ( Zollverein ) प्रमाणें भारतीय जकातसंघाचें सभासद झालें आहे ह्या कारणानें जेथपर्यंत वडोदें सरकार परदेशांतून येणाऱ्या मालावर ब्रिटिश सरकारच्या जकातीहून कमी लागत न आकारण्याचा करार पाळीत आहे, तेथपर्यंत बडोदें राज्यांत येणाऱ्या मालावर जकात आकारण्याचा अधिकार हिंदुस्थान सरकारास प्राप्त होत नाहीं हा अधिकार केवळ बडोदें सरकारालाच असून आपल्या राज्यांतील बंदराची वाढ करून त्यांत उतरणाऱ्या मालावर आकारलेल्या जकातीनें आपल्या राज्याचें उत्पन्न वाढविण्याचा पूर्ण हक्क त्यांनाच आहे

बडोदें सरकारचें हें म्हणणें हिंदुस्थान सरकारास कबूल नव्हतें, यामुळें त्याला त्याचा जबाब असा होता कीं,

"सन १८६५ सालीं झालेली व्यवस्था ही वस्तुतः कराराच्या स्वरूपाची नसून, ती एक प्रकारची बडोदें सरकारास दिलेली सवलत होती त्या व्यवस्थेमुळें समुद्रमार्गानें बडोदें राज्यांतील बंदरांतून ब्रिटिश हद्दींत येणाऱ्या मालाला जकातीची माफी देण्यांत आली असली, तरी ती माफी खुष्कीच्या रस्त्यानें येणाऱ्या मालाला मिळू शकत नाहीं याशिवाय

विण्याच्या वेळीं संस्थानाचें मत घेण्यात आलेलें नव्हते. हल्लीं या संस्थानातील प्रजेला या जकातीमुळें परदेशातून येणाऱ्या मालाची किंमत अधिक द्यावी लागते. किंबहुना त्याना त्यावर दुहेरी जकात द्यावी लागल्यानें त्याचें कर देण्याचें सामर्थ्य कमी होत आहे. ही संस्थानाची तक्रार वाजवी असल्यामुळें त्याना या बाबतींत सवलत मिळणें अवश्य आहे, असें आमचें मत आहे. म्हणून जर या जकातीच्या उत्पन्नाचा काहीं हिस्सा आपण त्याना दिला, तर मग हिंदुस्थानातील इतर बोजातहि भाग घेण्यास त्याना आपल्याला सांगता येईल."

यावरून संस्थानाचे म्हणणें कसें साधार आहे हें दिसून येईल व म्हणून मूळ तत्वाच्या आधारावर नाहीं, तर निदान कमिटीच्या अभिप्रायाप्रमाणें तरी या प्रश्नाचा विचार झाला पाहिजे, असें बडोदें सरकारचें म्हणणें आहे.

या तक्रारीचा निकाल लावण्यासाठीं जर्मनींतील 'Zollverein झोलव्हेराईनसारखा एखादा जकातसंघ हिंदुस्थानात निर्माण करावा; त्या संघानें खुष्कीच्या मालावरील जकात रद्द करून समुद्रमार्गें येणाऱ्या मालावरील जकातीचे दर ठरवावे; ते सर्वांनाच लागू असावेत व तसे ते ठरविल्यावर त्यात आपआपल्या राज्यातील लोकसंख्येच्या प्रमाणानें त्या जकातीच्या उत्पन्नाचे हिस्से पाडून सर्वांनीं वाटून घ्यावे, अशी सूचना बटलर कमिटीनें केली आहे.

यानंतरची आर्थिक गुंतागुंतीची बाबत अफूची होय. सर टी. माधव-राव याच्या कारकीर्दींत या उत्पन्नासंबधाने जो करार करण्यात आला, त्याचें विवेचन यापूर्वीं करण्यांत आलेंच आहे. त्यानंतर सन १९१२ सालीं इंग्रज सरकारनें हिंदुस्थानातून अफूची निर्यात करण्यास अजीबात बंदी केली व त्याला असें कारण दर्शविलें कीं, अफूचें सेवन हें नैतिक दृष्ट्या अधोगतीला नेणारें असल्यामुळें, त्या व्यसनाचें समूळ उच्चाटन करण्यासाठीं ज्या देशांत अफूचा मुख्यत खप होतो, त्या चीन देशात व

केली ती कांहीं वर्षे चालू ठेविल्यावर काठेवाडांतील संस्थानांच्या तक्रारी-वरून पुढें ती काढून टाकण्यांत आली; परंतु सन १९२७ सालापासून ती पुन्हा बसविण्यांत आली अशी जकात बसविण्याचा अधिकार हिंदुस्थान सरकारास आहे, असें त्या सरकारचें म्हणणें आहे

परंतु सन १८६५ च्या कराराचा हा अर्थ बडोदें सरकारनें मान्य केला नाहीं त्या कराराअन्वयें ज्या अर्थी बडोदें सरकारनें ब्रिटिश बंदरांत आकारल्या जाणाऱ्या जकातीहून कमी जकात न आकारण्याचें कबूल करून आपलें नुकसान करून घेतलें आहे, व त्याचा मोबदला म्हणून ब्रिटिश सरकारच्या बंदराप्रमाणेंच बडोदें राज्यांतील बंदरें मानलीं जातील असें आश्वासन इंग्रज सरकारकडून मिळविलें आहे, त्या अर्थी बडोदें राज्यांत उतरलेला माल इंग्रजी बंदरांत उतरला, असेंच मानलें पाहिजे, व म्हणून तो उतरण्याच्या वेळीं त्यावर एक वेळ जकात आकारल्यानंतर, समुद्रमार्गें अथवा खुष्कीच्या रस्त्यानें तो ब्रिटिश हिंदुस्थानांत येतांना त्यावर पुन्हा जकात आकारली जाता कामा नये संस्थानाच्या या म्हणण्याला बटलर कमिटीनेंहि प्रत्यक्ष रीतीनें नसली तरी अप्रत्यक्ष रीतीनें कबूली दिली आहे इंग्रज सरकारला जकात बसविण्याचा अधिकार आहे हें तत्त्व जरी त्या कमिटीनें स्वीकारलें आहे, तरी त्या तत्त्वामुळें संस्थानाचें नुकसान झालें आहे, ही गोष्टहि तिनें कबूल केली आहे या संबधानें कमिटी आपल्या रिपोर्टांत म्हणते —

"या बाबतींत संस्थानांना कांहीं तरी सवलत मिळण्याचा त्यांचा हक्क मान्य केला पाहिजे, असें आम्हास वाटतें सन १९२१–२२ पूर्वी जेव्हा समुद्रमार्गें येणाऱ्या मालावर किंमतीच्या प्रमाणांत शेंकडा पांच टक्के जकात आकारली जात असे व अशा जकातीचें उत्पन्न सालीना पांच कोटीपर्यंत येत असे, तेव्हा संस्थानांना फारसें नुकसान होत नसे पण या सालापासून ही जकात पुष्कळच वाढविण्यांत आली आहे, त्यामुळें जकातीचें उत्पन्न हल्लीं पन्नास कोटींवर गेलें आहे ही जकात वाढ

या प्रश्नासंबधानें बडोदें सरकारचें म्हणणें असे आहे कीं, बडोदें राज्यात ओढण्याच्या कामीं अफूचा बिलकुल उपयोग करण्यात येत नाहीं. उलट या राज्यात सन १८६२ सालापासून अफू ओढणें हें गुन्हाईत कृत्य मानण्यात येत असल्यामुळें, या बाबतींत ब्रिटिश मुलखापेक्षा अगर इतर काहीं संस्थानापेक्षा बडोदें राज्याचें पाऊल पुढें पडलेलें आहे. आता अफूच्या लागवडीचा विचार करता असे दिसून येईल कीं, सन १८७८ सालीं सर टी. माधवराव यांनीं ब्रिटिश सरकारशीं केलेल्या कराराची बजावणी बडोदें सरकाराकडून योग्य रीतीनें होत असून, प्रतिवर्षीं या राज्यातील अफूच्या लागवडीचें क्षेत्र कमी कमी होत चाललें आहे. या राज्यात अफूचा साठाहि अधिक करण्यात आलेला नाहीं व येथें पैदा होणारी अफू रगानें, जाडीनें व घटकानें इतर ठिकाणच्या अफूहून भिन्न असल्यामुळे, ती ब्रिटिश मुलखात चोरून नेऊन विकली जाण्याचा संभवहि मुळींच नाहीं. शिवाय तिच्या पैदाशीवर व वाहतुकीवर ठिकठिकाणीं अनेक प्रकारचीं कडक नियंत्रणें ठेवण्यात आलेलीं असल्यामुळें तिचा गुप्त मार्गानें प्रसार होण्याची भीतीहि बिलकुल नाहीं. या सर्व उपायामुळें या राज्याचें अफूचे उत्पन्न सालीना वीस लाखावरून कमी होत होत हल्लीं पाच लाखापर्यंत येऊन ठेपलें आहे. अशा स्थितींत हिंदुस्थान सरकारनें सुचविलेली नवी योजना स्वीकारून आपल्या उत्पन्नात याहून अधिक नुकसान सोसण्यास बडोदें सरकार राजी नाहीं. शिवाय हें नुकसान सोसण्याचें कारण तरी काय सागण्यात येतें, तर तें हें कीं, त्यायोगें चीन देशातील लोकाचें अफूचें व्यसन कमी व्हावें! हें कारण वाचताना मागें उल्लेखिलेल्या लॉर्ड सॉल्सबरी याच्या तैनाती फौजेच्या वर्णनाची आठवण होते. चीन देशातील अफूचें व्यसन कमी होण्यासाठीं इग्लंडच्या सरकारनें हेग येथें केलेल्या कबूलातीअन्वयें हिंदुस्थान सरकारनें काढलेल्या हुकुमावरून बडोदें सरकारनें आपल्या राज्यातील अफूचें उत्पन्न बुडवावें, हें म्हणणें म्हणजे चद्रलोकावरून पृथ्वीवर केल्या जाणाऱ्या

इतरत्रहि हिंदुस्थानातून अफूची निर्यात बद केली पाहिजे. हा ठराव युरोपात हेग येथें भरलेल्या राष्ट्रसंघाच्या परिषदेंत केला जाऊन त्याची वजावणी इंग्रज सरकारनें हिंदुस्थानात सरकारी हुकुमानें केली. ह्या हुकुमामुळें हिंदुस्थान सरकारच्या अफूवरील उत्पन्नात पुष्कळ बूड आली; तथापि ती आपण नीतिदृष्ट्या सहन करीत आहोंत असें त्या सरकारचें म्हणणें असल्यामुळें, त्यानीं यासबधीच्या आपल्या ठरावाला 'आत्मनियम करणारा ठराव' (Self-denying ordinance) असें नाव दिलें. या ठरावाची वजावणी होण्यासाठीं अर्थातच संस्थानाची मदत त्यांना पाहिजे होती व म्हणून संस्थानानीं आपलें स्वत चें अफूच्या कराचें उत्पन्न बुडवून ही मदत सरकारास करावी, अशी मागणी हिंदुस्थान सरकाराकडून त्याच्याकडे करण्यात आली. यासबधानें सन १९२६, १९२७ व १९३० या सालात हिंदुस्थान सरकारनें अफू-परिषदा भरविल्या. त्यात अध्यक्ष या नात्यानें व्हाईसरॉय लॉर्ड आयर्व्हिन् यानीं भाषणें करून हिंदुस्थानात अफूचें व्यसन कसें कमी कमी होत चाललें आहे, याचें वर्णन केलें व या देशातून या व्याधीचें निर्मूलन करण्याच्या कामीं केलेल्या प्रयत्नामुळें अफूचा खप किती कमी झाला आहे, याचे आकडे दिले. त्याप्रमाणें पहाता सन १९१८ ते १९२८ या दहा वर्षांत ब्रिटिश हिंदुस्थानात अफूचा खप दर दहा हजार माणसाना मिळून प्रतिवर्षी ११.२० शेराइतका झाला असून त्यापूर्वीच्या दहा वर्षांत तो १८.८३ शेर इतका होता; म्हणजे प्रतिवर्षीं दर दहा हजार माणशीं ७.६३ शेराप्रमाणें तो कमी झाला आहे, असें दिसतें व यापुढील दहा वर्षांत तो खप औषधाला लागणाऱ्या प्रमाणाइतका कमी करण्याचा आपला सकल्प असल्याचें लॉर्ड आयर्व्हिन् यानीं जाहिर केलें. अशा रीतीनें ब्रिटिश हिंदुस्थानात होणाऱ्या प्रयत्नाना संस्थानानींहि मदत करून मनुष्यजातीला कलकभूत असलेल्या या व्यसनाचें, स्वत च्या उत्पन्नाची झीज सोसूनहि, कायमचें निर्मूलन करण्याची विनति त्यानीं त्या परिषदेला जमलेल्या सर्व प्रतिनिधींना केली.

इंग्रज सरकारनें ही खडणी बडोदें सरकारासाठीं स्वत वसूल करून ती त्याना देण्याची पद्धति सुरू केली. ही पद्धति तात्पुरती असून कायमची नसल्याबद्दल त्या वेळेपासून ठरलेलें आहे, त्या अर्थी इंग्रज सरकारनें आपली दरम्यानगिरी आता काढून घेऊन ही खडणी परस्पर बडोदें सरकारास वसूल करू द्यावी, असे त्याचें म्हणणें आहे. उलट पक्षीं सस्थानातील हा श्रेष्ठ-कनिष्ठ दर्जा नाहींसा करून ही खडणी अजीबात बद करावी, व इंग्रज सरकारहि या धोरणानें मोठाल्या सस्थानाकडून स्वत घेत अस-लेली खडणी सोडून देण्यास तयार आहे, असें सागण्यात येत आहे. ज्या वेळीं सर्व सस्थानाच्या व हिंदुस्थान सरकारच्या सहमतानें सर्वच खडण्या रद्द करून त्यांचा बदला अन्यरूपानें देण्याची काहीं नवीन योजना घडली जाईल, त्या वेळीं या प्रश्नाचा कायमचा निकाल लागेल; तेथपर्यंत तो वादग्रस्तच राहील असें इंग्रज सरकारचें म्हणणें होतें.

अशा प्रकारें या अनेक बाबतींत उभय सरकाराच्या तक्रारी चालू असता त्याचा लवकर निकाल उभयताना समाधानकारक अशा रीतीनें होईल अशी कोणाचीच कल्पना नव्हती. परतु फेडरेशनच्या नवीन राज्यघटनेमुळें हा अनपेक्षित चमत्कार घडून आला, व या सर्व प्रश्नाचा बहुताशीं उभयसमत असणारा निर्णय लावणारा करार या दोन्ही सरकारामध्यें करण्यात आला. यामुळे या सर्व प्रश्नासबधापैकींच्या बऱ्याच प्रश्नामुळें होत असलेली जळजळ कमी झाली आहे. या सबधाचें विशेष विवेचन तिसऱ्या खडात केलेलें आहे. तूर्त येथें इतकें सागावयाचें कीं, आर्थिक गुतागुतीच्या या अनेक बाबतींच्या तक्रारी चालू असताना, महाराजानीं आपली बाजू दरेक वेळीं निर्भयपणें, सरळपणें व उघडपणें पुढें माडली. तसें करिताना त्यानीं कोणाच्याहि भीडमुर्वतीची पर्वा केली नाहीं. मग त्यामुळें कोणास बरें वाटलें असो वा वाईट वाटलें असो ! या त्याच्या धोरणाबद्दल कदाचित् परिणामाच्या दृष्टीनें मतभेद होण्याचाहि सभव आहे. नित्येकास या खडतर मार्गापेक्षा इंग्रज अधिकाऱ्याना खुष ठेवून आपलें कार्य साधून घेण्याचा

इतरत्रहि हिंदुस्थानातून अफूची निर्यात बंद केली पाहिजे. हा ठराव युरोपात हेग येथें भरलेल्या राष्ट्रसंघाच्या परिषदेंत केला जाऊन त्याची बजावणी इंग्रज सरकारनें हिंदुस्थानात सरकारी हुकुमानें केली. या हुकुमामुळें हिंदुस्थान सरकारच्या अफूवरील उत्पन्नात पुष्कळ तूट आली; तथापि ती आपण नीतिदृष्ट्या सहन करीत आहोंत असें त्या सरकारचें म्हणणें असल्यामुळें, त्यानीं याकरवीच्या आपल्या ठरावाला 'आत्मसंयम करणारा ठराव' (Self-denying ordinance) असें नाव दिलें. या ठरावाची बजावणी होण्यासाठीं अर्थातच संस्थानाची मदत त्याना पाहिजे होती व म्हणून संस्थानानीं आपलें स्वत चें अफूच्या कराचें उत्पन्न बुडवून ही मदत सरकारास करावी, अशी मागणी हिंदुस्थान सरकाराकडून त्याच्याकडे करण्यात आली याकरितां सन १९२६, १९२७ व १९३० या सालात हिंदुस्थान सरकारनें अफू–परिषदा भरविल्या. त्यात अध्यक्ष या नात्यानें व्हाईसरॉय लॉर्ड आयर्विन् यानीं भाषणें करून हिंदुस्थानात अफूचें व्यसन कसें कमी कमी होत चाललें आहे, याचें वर्णन केलें व या देशातून या व्याधीचें निर्मूलन करण्याच्या कामीं केलेल्या प्रयत्नामुळें अफूचा खप किती कमी झाला आहे, याचे आकडे दिले त्याप्रमाणें पहाता सन १९१८ ते १९२८ या दहा वर्षांत ब्रिटिश हिंदुस्थानात अफूचा खप दर दहा हजार माणसाना मिळून प्रतिवर्षी ११.२० शेराइतका झाला असून त्यापूर्वींच्या दहा वर्षांत तो १८.८३ शेर इतका होता, म्हणजे प्रतिवर्षी दर दहा हजार माणशीं ७ ६३ शेराप्रमाणें तो कमी झाला आहे, असें दिसतें व यापुढील दहा वर्षांत तो खप औषधाला लागणाऱ्या प्रमाणाइतका कमी करण्याचा आपला संकल्प असल्याचें लॉर्ड आयर्विन् यानीं जाहिर केलें. अशा रीतीनें ब्रिटिश हिंदुस्थानांत होणाऱ्या प्रयत्नाना संस्थानानींहि मदत करून मनुष्यजातीला कलंकभूत असलेल्या या व्यसनाचें, स्वत च्या उत्पन्नाची झीज सोसूनहि, कायमचें निर्मूलन करण्याची विनंति त्यानीं त्या परिषदेला जमलेल्या सर्व प्रतिनिधींना केली.

# प्रकरण २५ वें



## सामाजिक स्थित्यंतर

बडोदें राज्यातील एकदर लोकसख्येपैकीं शेंकडा ८९ इतके लोक हिंदुधर्माचे व तत्सदृश जैनधर्माचे अनुयायी आहेत. अर्थात् राज्यातील लोकवस्तीचा फार मोठा भाग त्याचाच आहे. यामुळें या राज्यातील समाजविषयक तपासणी करू गेलें असता, हिंदुसमाजाकडेच प्रमुखत लक्ष द्यावें लागेल. या हिंदुसमाजाची परपरा हजारों वर्षांपासून चालत आलेली आहे व त्या धर्माचें नावहि सनातन धर्म असें पुष्कळ ठिकाणीं दिलेलें आढळतें. तथापि मूलभूत तत्वाच्या दृष्टीनें जरी सनातन हें नाव या धर्माला अनुरूप असलें, तरी त्यातील समाजाची घटना आरभापासून आजपर्यंत सनातन अथवा अविकृत अशीच राहिली आहे, असें अर्थातच कोणी म्हणणार नाहीं. सुमारें चार पाच हजार वर्षांपूर्वी या धर्माचा प्रचार करणारे पूर्वज हिंदुस्थानच्या वायव्य खिंडीतून ज्या वेळीं या देशात प्रथम आले, त्या वेळीं ते येथील तत्कालीन रहिवाश्याहून अगदीं भिन्न वर्णाचे, सस्कृतीचे व धर्माचे असे होते. त्याच्यातील स्त्रीपुरुषापासूनच केवळ हल्लींची हिंदुधर्माची प्रजा झालेली नाहीं. ते लोक प्रथम येथें आल्यावर नवीन देश जिंकण्याच्या साहसकर्मांत उद्युक्त झाल्यामुळें, त्याना आपल्याबरोबर बायकाचें लटांवर नेता आलें नसल्यास त्यात फारसें आश्चर्य नाहीं. यामुळें त्याचा जसजसा दूर देशात प्रसार होत गेला, तसतशी येथील मूळच्या रहिवाश्यांपैकींच्या जातींच्या स्त्रियाशीं लग्नें करण्याची प्रवृत्ति त्याच्यात वाढली. ही प्रवृत्ति

मार्ग अधिक श्रेयस्कर वाटेल. परंतु महाराजांनीं आपलें स्वतःचें धोरण आपल्या एका पत्रात नमूद केलें आहे. त्या पत्रात ते म्हणतात —

> "माझें धोरण नेहमीं इंग्रज सरकारचें मित्रत्व राखून, आपल्या प्रजेचें पित्याप्रमाणें रक्षण करून, माझ्या राज्याची इभ्रत, हक्क व स्वाभिमान यांचें रक्षण करण्याचें आहे."

या धोरणानुसार त्यांचें वर्तन नाहीं, असें कोण म्हणू शकेल ?



व सामाजिक आचारविचारांना बद्ध करून टाकिल्या गेल्यामुळें, त्याची प्रगति खुंटली

प्राचीन काळीं समाजात कायद्याचें उद्गमस्थान राजा हा मानिला गेला नसून, स्वत समाज हाच त्या कायद्याचें मूळ म्हणून समजला जात असे हिंदुधर्मशास्त्राचे मूलाधार म्हणून

'श्रुति स्मृति सदाचार स्वस्य च प्रियमात्मन ।
सम्यक्संकल्पज कामो धर्ममूलमिद स्मृतम् ॥

या श्लोकात सागितल्यापैकींचे श्रुति व स्मृति हे दोन शब्दप्रमाण आधार वगळले, तर या दोहोंच्याहि पूर्वीपासून असलेले जे दुसरे आधार दिले आहेत, ते म्हणजे सदाचार अथवा सज्जनात चालू असलेला आचार व आत्म्याला कल्याणकारक असणाऱ्या बाबतींतील सद्धेतुमूलक सुखाचे मार्ग, हे होत यावरून कायदा हा समाजाच्या बदलणाऱ्या आचाराप्रमाणें स्वत बदलणारा असतो, हें सिद्ध होतें पण पुढें पुढें मात्र हें त्याचे लक्षण बदलून, तो कायम ठशाचा झाला, व त्यामुळे आचार व कायदा या दोहोंचेंहि पाऊल पुढें पडेनासें झाले

वर वर्णिलेली स्थिति साधारणत सर्व हिंदुसमाजाला एकसारखीच लागू असती, तरी देशपरत्वें ती थोडी थोडी भिन्न आहे ब्लन्टस्ली या विद्वान शास्त्रज्ञानें भौगोलिक परिस्थितीचा समाजावर कसा परिणाम होतो, यासंबधानें आपल्या ' Theory of the State या पुस्तकात विवेचन केलें आहे त्यात तो म्हणतो —

In cold countries it is difficult for men to live in society, because they cannot procure food or fuel near at hand and so struggle for life is too hard there to allow men to busy themselves with higher interests Hot countries on the other hand produce indolence only relieved by violent outbursts of the passions The inhabitants of cold zones are inde pendent, but are wanting in the power of political

थोरापासून हलक्यापर्यंत सर्व दर्जाच्या आर्यलोकांत रूढ होती. अर्जुनाचा नागकन्येशीं झालेला विवाह, श्रीकृष्णाचा जांबुवतीशीं म्हणजे ऋक्षकन्येशीं झालेला विवाह वगैरे उदाहरणें या गोष्टीचींच प्रत्यन्तरें होत यांप्रमाणें विवाहाच्या पद्धतीमुळें जशा मूळच्या अनार्यजाती आर्य झाल्या, तशाच त्याच्यातील व केवळ त्याच्यातीलच नव्हे तर शक, यवन, हूण, किरात, काम्बोज, बर्बर, चीन, पृथु, पर्शव वगैरे हिंदुस्थानांत बाहेरून येऊन येथें कायमची वस्ती करणाऱ्या समाजातील अनेक जातीहि सबधच्या सबध आर्य करून घेण्यांत आल्या, असे अनेक निर्विवाद ऐतिहासिक दाखले आहेत मागील एका प्रकरणांत वर्णिलेली अग्निकुलाची उपपत्ति ही याचाच पुरावा आहे. अशा अनेक रीतींनीं जेव्हा आर्यांची संख्या वाढत गेली आहे. खाणेंपिणें, आचारव्यवहार, लग्नकार्य, वेषभूषा, शास्त्ररिवाज इत्यादि सर्व बाबतींत या समाजांत स्थित्यंतरें घडून आलेलीं आहेत, तीं इतकीं कीं सांप्रतच्या एकमेकाहून अगदीं भिन्न असलेल्या दोन धर्मांच्या लोकांतहि इतकें अंतर आढळून येणार नाहीं! तथापि या आर्यसमाजाच्या धर्मतत्त्वांत व त्याशीं निगडित असलेल्या मुख्य मुख्य चालीरीतींत इतकें विलक्षण साम्य आहे कीं, हीं तत्त्वें व त्या चाली जवळजवळ आजच्या म्हणून वर्णितां येतील. उदाहरणार्थ, ऋग्वेदांतील विवाहसूक्त अगदीं थोड्या फरकानें आजच्या धार्मिक विवाहपद्धतीचें यथातथ्य वर्णन म्हणून देतां येईल त्या काळचे जन्ममृत्यूच्या प्रसंगींचे विधी व इतर अनेक संस्कार आजहि जसेच्या तसे चालू आहेत. त्यांत जो कांहीं बदल झाला आहे, तो केवळ लौकिक व स्थानिक प्रकारचा आहे. अशा प्रकारें साम्यवैषम्याचें विचित्र मिश्रण या सनातन, आर्य अथवा हिंदु म्हणविणाऱ्या धर्मांत आढळून येतें. तथापि ऐतिहासिक दृष्ट्या इतकें म्हणतां येतें कीं, हा समाज सुमारें शकोत्तर तिसऱ्या चौथ्या शतकापर्यंत वर्धिष्णु व प्रगमनशील होता, पण त्यानंतर मात्र तो स्थिर होऊन त्यांत सुधारणा होण्याचें बंद झालें या काळांत स्मृत्यांच्या रूपानें धार्मिक

विचार याच्या वृद्धीला फार अनुकूल असते; कारण हे लोक जहाजें बांधून व कालवे खणून या प्रवाहाचा फायदा घेतात, व त्यायोगें आत्मविश्वास आणि संपत्ति यांची प्राप्ति करून घेतात व यामुळें त्यांच्यांत साहस व व्यापार हे वाढतात."

"*डोंगराळ देशांतील वस्तीचा परिणाम तेथील लोकांच्या स्वभावावर* व मनोविकारांवर फार प्रबळ होतो. गगनचुंबी पर्वतश्रेणीचें विविध वैभव व अमर्याद महासागराचें भीषण सामर्थ्य यांचा परिणाम तेथें राहणाऱ्या लोकांचीं मनें श्रेष्ठ व कणखर बनविण्यांत होतो. यामुळेंच अनेक खिंडी तुटलेल्या डोंगराच्या रांगांवरून व त्यांतील दऱ्याखोऱ्यांतून रहाणाऱ्या लोकांत स्वातंत्र्याची कडवी भावना व पारतंत्र्याचा प्रतिकार करण्याची वृत्ति हीं प्रबळ असतात."

"सर्वांत वाईट स्थिति समुद्रापासून फार दूर असलेल्या सपाट प्रदेशांतील लोकांची असते. अशा लोकांत जुलमाला मान वाकविण्याची मूर्खपणाची प्रवृत्ति अतिशय बळावते."

वरील उताऱ्यांत वर्णन केलेला अनुभव सर्व ठिकाणीं येवो, तसा तो हिंदुस्थानांतहि येतो. वायव्येकडील डोंगरांतील शूर व साहसी अफगाण, आफ्रिडी, बलुची वगैरे जाती व सह्याद्रीवरील मराठे लोकांची कणखर व स्वतंत्र वृत्ति, त्याचप्रमाणें कॉरोमांडल व मलबार किनाऱ्यावरील दर्यावर्दी लोकांनीं हजारो वर्षेंपर्यंत परदेशाशीं चालविलेल्या व्यापारावरून दिसून येणारी त्यांची साहसी व उद्योगी वृत्ति, हीं ज्याप्रमाणें या देशांत अनुभवास येतात, त्याचप्रमाणें गुजराथ, बंगाल वगैरे उष्ण व सपाट प्रदेशांत अनेक शतकें रूढ असलेली परकीय सत्ता हीहि याचेंच निदर्शक आहे. यामुळें शांततेनें व जमावानें रहाण्याची वृत्ति गुजराथेंत पूर्वीपासून विशेष दिसून येते, तसाच अहिंसा व जीवदया या तत्वांविषयींचा आदरहि या लोकांत फार आढळतो. याच कारणानें जैनधर्म हा जरी स्वतंत्र धर्म म्हणून मानला गेला आहे, तथापि तो हिंदुधर्माचीच एक शाखा म्हणून समजला

union, while those of the hot zones are readier to bear with despotism than to defend their rights or develope a free state."

"Life on a great stream is specially adapted to the early development of man's powers and thought. As he builds ships and cuts canals and makes the streams serve him, man gains confidence and wealth, and life upon water developes the love of commerce and adventure."

"Mountain-countries have a peculiarly strong influence on character and feeling. The varied grandeur of the mountains, no less than the awful power of the ocean elevates and strengthens men's minds. Thus the broken character of a mountain country with its many secluded valleys favours the rise of communities which grow up in sturdy independence and are firm in resisting invasion."

'Worst of all, however is the position of plateaus far removed from the sea. In such countries, despotism has always found stupid and unresisting obedience.'

"थंड देशांतील लोकांना साहानें राहणें कठिण होतें, कारण त्यांना अन्न व सरपण यांचा पुरवठा करण्यास मिळू शकत नाहीं व त्यामुळें त्यांचा जीवनकलह अधिक तत्पर झाल्यामुळें त्यांना श्रेष्ठ प्रकारच्या बौद्धिक व्यवसायांत गुंतण्यास सवड मिळत नाही. याच्या उलट, उष्ण देशांतील लोकांत आळस फार वाढतो, मात्र या लोकांचे मनोविकार तीव्र असल्यामुळें, मधून मधून त्यांचा भडका होतो. थंड देशांतील लोक स्वतंत्र वृत्तीचे असतात, पण त्यांच्यांत राजकीय ऐक्यवृत्तीची उणीव असते. याच्या उलट उष्ण देशांतील लोक आपल्या हक्काचें संरक्षण अथवा देशस्वातंत्र्याचें जतन करण्याऐवजी जुलूम सहन करण्यास अधिक तयार असतात"

"मोठ्या जलप्रवाहाच्या सन्निधची वस्ति ही मानवी कर्तृत्व व

सन १८२७ सालीं लिहून ठेविलें आहे व सन १९०१ च्या खाने-सुमारींत केलेल्या तपासावरून गुजराथेंत आपआपसात खाणेपिणें व लग्न-व्यवहार न होणाऱ्या जातींची संख्या ३१५ असल्याचें नमूद केलें आहे! एकट्या ब्राह्मण जातींत ४०—५० तरी पोटजाती आहेत. अशाच पोट-जाती इतर वर्णांतहि असतात; पण सर्वांत विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, या जातींना दरेक गावाच्या चार दरवाज्याचें भौगोलिक बंधन असतें! उदाहरणार्थ, कोणत्याहि गावांतील एका जातीचा दुसऱ्या गावांतील त्याच जातीशीं बेटीव्यवहार होऊं शकत नाहीं. अशा रीतीनें एका गावातील मर्यादित केलेल्या लोकवस्तीला गोळ अथवा एकडा असें म्हणतात. व एका गावातील बांधलेल्या गोळातील अथवा एकड्यातील लोक तशाच जातींतील दुसऱ्या गावच्या गोळातील अथवा एकड्यातील लोकांहून लग्न-व्यवहाराच्या दृष्टीनें भिन्नजातीय लोकांप्रमाणें समजले जातात. या एकदर प्रकारामुळें त्या गावातील एकड्याची एक स्वतंत्र जात बनते, व अशा रीतीनें एकदर प्रांतात असंख्य जाती निर्माण झाल्या आहेत. त्यांतील काहीं तर एकमेकाच्या हातचें अन्नहि ग्रहण करणार नाहींत. अर्थात् या पद्धतींत काहीं फायदेहि असतात. त्यापैकीं चांगल्या वाईट प्रसंगीं सर्वांची एकमेकास मदत होणें हा फायदा विशेष असतो. जातीं-तील भोजनाच्या प्रसंगीं यजमानाकडे फक्त पैसे खर्च करण्याचें काम असतें, व खटपट मेहनत वगैरे इतर सर्व कामें त्याच्या घरीं जातींतील इतर लोक येऊन करतात. मृत्युप्रसंगींहि त्या जातींतील दरेक कुटुंबातून एकेक पुरुष तरी आलाच पाहिजे असा निर्बंध असतो. जातीच्या कार्यासाठीं समायिक वाड्या अथवा इमारती असतात व त्यातून जातीच्या उपयोगासाठीं भांडीकुंडीं वगैरे जरूर तें सामान जातीच्या खर्चानें साठ-विलेलें असतें. *अशा प्रकारें या योजनेपासून फायदे असतात, तसे उलट* बाजूनें काहीं तोटेहि असतात. या पद्धतींत व्यक्तिस्वातंत्र्याला वाव अगदीं थोडा रहातो व जातीचें बंधन दरेक व्यक्तीवर इतकें कडक असतें कीं,

जाऊन, या दोहोंत पूर्ण प्रेम व सलोखा नांदत आला आहे. वस्तुत बौद्ध व जैन हे धर्म हिंदुधर्माचेच सुधारणेचे पथ म्हणून काढले गेले, व या दृष्टीनें त्या दोहोंच्या मूलतत्त्वात कोणताहि फरक नाहीं. फक्त वेदानिर्णयींची प्रामाण्यबुद्धि या दोन धर्मांना मान्य नसल्यानें, ते स्वतंत्र मानले जाऊ लागले. या एका गोष्टीशिवाय या तिन्ही धर्मांत इतर बहुतेक बाबतींत साम्य आहे. तें इतकें कीं, नवरा व बायको या दोहोंपैकीं एकाचा धर्म हिंदु व दुसऱ्याचा जैन असा प्रकार अनेक ठिकाणीं सापडतो. यावरून खानेसुमारीच्या अहवालातूनहि जैनधर्माची लोकसंख्या हिंदुधर्मांतच दाखविली आहे. जैनधर्माच्या सर्व धार्मिक विधींच्या प्रसंगीं ब्राह्मण पुरोहितच उपाध्यिक करितात हिंदुधर्माच्या पोटशाखांपैकीं या लोकांचाच भरणा हिंदुसमाजात अधिक असून, बौद्ध, आर्यसमाजी, ब्राह्मो वगैरे इतर शाखांच्या लोकांची संख्या हिंदुस्थानात अगदींच अल्प असल्यामुळें, ती विचारात घेण्यासारखी नाहीं. जैनधर्मानें आरंभीं आरंभीं आपले स्वतंत्र देव कल्पिले असले, तरी नंतर ब्रह्मा, विष्णु, महेश ही त्रिमूर्ति व गणपति वगैरे इतर काहीं देव, यानाहि ते मानू लागले. त्याचप्रमाणें दसरा, दिवाळी, अक्षयतृतीया, होळी वगैरे मूळचे निव्वळ हिंदुसणहि त्यांनीं आपलेसे केले आहेत. अशा रीतीनें या दोन्ही धर्मांचें व्यवहारदृष्ट्या तरी मिश्रण झाल्याप्रमाणें आहे.

तथापि गुजराथेंत समाजदृष्ट्या भेददर्शक तत्त्व धर्म हें नसून, जाति हें तसे तत्त्व आहे, असें समजलें जातें. समाजातील दरेक मनुष्य धर्माच्या दृष्टीनें आपल्या नित्याच्या धार्मिक व्यवहाराचा विचार करीत नसून तो जातीच्या दृष्टीनें करतो, हें गुजराथचें वैशिष्ट्य आहे. हिंदुस्थानातील इतर प्रांतातहि जातिभेद चालू आहेत, तथापि गुजराथेइतका जातींनीं व पोटजातींनीं ग्रासलेला प्रांत हिंदुस्थानात दुसरा कोणताच नाहीं. ज्याच्यात बेटीव्यवहारच काय, पण रोटीव्यवहारहि होत नाहीं, अशा असंख्य पोटजाती एकेका प्रांतात असतात. उदाहरणार्थ, एकट्या सुरत शहरात आपसांत लग्नें होत नसलेल्या २६० जाती असल्याचें मि. बोरोडेल यांनीं

म्हणजे दरेक जातीची पचायत होय. ही पचायत जातिनियमाच्या उल्लघनाबद्दलची फिर्याद स्वीकारते, व तिची चौकशी करून उल्लघन शाबीत झाल्यास अपराध्यास शिक्षा करिते. या शिक्षा सामान्य अपराधा-बद्दल दडाच्या, जातीच्या फायद्यासाठीं काहीं गोष्टी आपल्या खर्चानें करण्याच्या, अथवा सबध जात जेवू घालण्याच्या स्वरूपाच्या असतात. पण फार घोर अपराधाबद्दल मात्र बहिष्काराची शिक्षा सुनविण्यात येते व ती शिक्षा झाल्यास अपराध्यास आपला ऐहिक मृत्यु झाल्याप्रमाणेंच होते.

या सर्व जातींतून समायिक कुटुंबपद्धति हीच चालू असते हिच्यापासून होणाऱ्या नफानुकसानींच्या बाबतींचें विवेचन येथें करण्याची आवश्यकता नाहीं; कारण त्या बाबती सर्व हिंदुसमाजाला सामान्य आहेत.

इतर प्रातातील हिंदूप्रमाणेंच गुजराथेंतील हिंदूतहि खालच्या जातींत पाट अथवा नातरें होऊ शकते. परतु वरच्या जातींत विधवाविवाहाला या काळीं कायद्याप्रमाणें प्रतिबंध असे. नातरें होणाऱ्या जातींत काडी मोडण्याची अथवा 'छेडाछुटक्या'ची पद्धति चालू आहे व तिचे विधीहि फार सोपे असतात. गोले, घाची वगैरे लोकात नवरा अथवा बायको यापैकीं कोणालाहि जातीच्या पचायतीच्या परवानगीने काडी मोडून घेता येते. या जातीहून जरा श्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या कुणबी, बारोट, भाट वगैरे जातींत नवरा हा बायकोला काडी मोडून देऊ शकतो, परतु तो अधिकार बायकोला मिळत नाहीं. याच्या उलट भिल्ल, कोळी वगैरे हलक्या मानल्या गेलेल्या जातींत अगदीं स्वतत्र व्यवहार असून, पहिल्या नवऱ्यास थोडीशी रक्कम देऊन दुसऱ्याला त्याच्या स्त्रियेशीं पुन्हा लग्न करता येतें. या नात्याचे विधीहि सोपे असतात कोठें डोक्यावर पाण्याचा घडा घेऊन नवीन घरीं प्रवेश केल्यानें या नव्या लग्नाची सागता होते, तर कोठें नुसत्या अक्षता टाकण्यानें ती होते.

गुजराथेंतील बहुतेक वरील जातींत स्त्रियाची सख्या कमी आहे. त्यामुळें मुलापेक्षा मुली मिळण्याची अडचण अधिक भासते. याचीं कारणें

त्याचे सर्व सामाजिक व्यवहार या बंधनानें बांधून टाकिलेले असतात. कोणत्याहि व्यक्तीनें या नियमाचा यत्किंचित्‌हि भंग केल्यास त्याला जातीच्या शासनास पात्र व्हावें लागतें. त्या जातीची व्याप्ति एकाच गांवात असल्या-मुळें व तींतील व्यक्तींचें सर्व आयुष्य तेथेंच जाणार असल्यामुळें, अर्थातच त्यांना हें जातीचें बंधन झुगारणें शक्य नसतें. असें करण्याचा तो प्रयत्न करील तर त्याचे सर्वच व्यवहार अटकून पडतील. त्याच्या घरीं कोणी मुलगी देणार नाहीं, अथवा त्याच्याकडील मुली करणार नाहीं, त्याच्या घरीं लग्नकार्य झाल्यास त्याला मदत करण्यास अथवा जेवणास कोणी येणार नाहीं, व त्याच्या घरीं मृत्यु झाल्यास पुढील व्यवस्था करण्यासहि कोणी पुढें येणार नाहीं. अशा वैचीत त्या जातींतील दरेक व्यक्ति असल्यामुळें, तिला जातीचा अधिकार मान्य केल्यावाचून गत्यंतर नसतें.

या पद्धतीमुळें जे कांहीं परिणाम स्वाभाविक रीतीनें घडून येतात, त्यांत विवाहाची पद्धति हा एक परिणाम होय. अशा जातींत एकाच गांवात मुली देणें व घेणें हा व्यवहार घडत असल्यामुळें, त्या जातींतील लग्नाच्या मुली व मुलगे हे पूर्वीपासून सर्वांना माहित असल्यामुळें, त्यांना पूर्वीपासून अटकावून ठेवण्याची व्यवस्था करण्यांत येते व या मुलामुलींच्या अगदीं लहान वयांत त्यांचे आईबाप त्यांचा वाङ्‌निश्चय करून ठेवतात. यालाच गुजराथेंत विवाह असें म्हणतात व हा विवाह लग्नापूर्वी कित्येक वर्षें करून टेवण्यात येतो. त्यांत पाटीदारासारख्या कांहीं जातींत तर नवरा मुलगा व मुलगी चार सहा महिन्यांच्या वयाचीं असल्यापासूनहि त्यांचा विवाह करण्यांत येतो. एक वेळ असा विवाह झाला, म्हणजे या भावी वधूवरांपैकीं कोणी एक मृत्यु पावल्याशिवाय हा विवाह तुटू शकत नाहीं, मग विवाहानंतर त्यांपैकीं वर अथवा वधू अपघातानें अपंग झाली, तरीहि चालेल !

अशा प्रकारें सर्व बाबतींत जातीचीं जीं बंधनें घालण्यात येतात, तीं पाळण्यासाठीं अर्थातच न्यायासनाची जरूरी असणार. हें न्यायासन

अधिक खर्च मृत्युप्रसगीं करण्याची वहिवाट या प्रातात आहे! वस्तुत आपल्या आवडत्या माणसाचा मृत्यु झाल्यामुळें त्या घरचा कर्ता त्या वेळीं दु खग्रस्त झालेला असतो, परतु अशा प्रसगीं त्यानें शक्य तितका अधिक खर्च करून आपल्या सर्व जातीला भोजन घालावें व त्यासाठीं उची पक्वान्नें करावीं, हा निर्बंध खरोखरीच विस्मयकारक आहे तथापि तो सत्य आहे त्या माणसाची आपल्या जातींतील प्रतिष्ठा मृत्युप्रसगीं त्यानें केलेल्या अशा खर्चावर अवलबून असते लग्नकार्यें अवश्य असलीं, तरी त्याचा काल ऐच्छिक असू शकतो व आपल्याजवळील द्रव्याचें साधन पाहून मनुष्याला तो ठरविता येतो याच्या उलट कुटुबातील मृत्यु हा अनपेक्षित असल्यामुळे तो कर्त्याला अचानक गाठतो व त्याच्याजवळ त्या वेळीं द्रव्यसाधन असो वा नसो, त्याला या वेळचा खर्च हवें ते करून करावा लागतो अशा प्रसगीं कराव्या लागणाऱ्या ज्ञातिभोजनाशिवाय जातीचे नियम मोडल्यास दडादाखल म्हणून करावीं लागणारीं ज्ञातिभोजनें त्याच्या गळीं पडतात, तीं निराळींच या ज्ञातिभोजनामुळें एरव्हीं काटकसरीच्या बाबतींत नमुनेदार समजला गेलेला गुजराथी मनुष्य वरील प्रसगीं पाण्यासारखा पैसा खर्च करितो

ज्या प्रातात जातीचें इतकें महत्त्व मानलें जातें, तेथें अस्पृश्य वर्गाशीं व्यवहार करण्याचा तर प्रश्नच नव्हे तथापि इतकें म्हटलें पाहिजे कीं, मद्रास, मलबार वगैरे प्रातापेक्षा गुजराथेंतील अस्पृश्य लोकाची स्थिति त्या काळींहि पुष्कळ बरी असे व एकदरींत व्यापारउद्योगामुळें हा प्रात इतरापेक्षा अधिक सपन्न असल्यामुळें या अस्पृश्य वर्गाची सापत्तिक स्थिति अगदीं अनुकपनीय अशी नसे तथापि इतर वर्गाच्या मानानें मात्र ही उद्वेगजनक असे याबद्दल शका नाहीं व या वर्गाच्या उन्नतीचा कोणताहि प्रयत्न बडोद्यातील पूर्वीच्या राजवटींत झाला नव्हता हें निर्विवाद आहे

अशा या गुजराथ प्रातात इतर प्रातापेक्षा दारिद्र्याची झळ थोडी कमी लागे वास्तविक याबद्दलची खरी माहिती मिळणें शक्य नाहीं,

अनेक प्रकारचीं सांगण्यात येतात. त्यांतील प्राढविवाह, प्रभृतिसाठीं अशिक्षित दायाची योजना, वगैरे कारणें इतर प्रांतांनाहि एकसारखींच लागू आहेत. परंतु इकडील कांहीं जातींत ल्हानपणीं मुलींचा नाश करण्याची चाल अस्तित्वांत होती, हें एक विशेष कारण होतें. अलीकडे ही चाल नाहींशी होऊन, त्यामुळें स्त्रीपुरुषांतील विषमसंख्येचें प्रमाण हलकें हलकें कमी होत असल्याचें आकडेशास्त्री सांगतात. तथापि, अजूनहि स्त्रियांची संख्या पुरुषांच्या मानानें कमी आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. यामुळें समाजदृष्ट्या स्त्रियांची किंमत या प्रांतांत अधिक मानण्यांत येते. लग्नासाठीं वरपक्षाकडून वधूची मागणी करण्यांत येते. तसेंच पतिनिधनासारख्या संकटप्रसंगीं स्त्रीस पैशाची आर्थिक मदत असावी म्हणून लग्नाच्या वेळीं पतीकडून पत्नीच्या नांवानें तिन्हाईताकडे कांहीं रक्कम ठेवण्यांत येते, व निजकर कायद्यानें व रिवाजानें पत्नीचाच स्वतंत्र हक्क मानला जातो. अशा रकमेस 'पटा' असें म्हणतात.

त्या काळीं हिंदुस्थानांत सर्वत्रच बालविवाहाची पद्धत चालू होती. परंतु त्यांतल्या त्यांतहि गुजराथेंत ती विशेष जोरांत होती व याचें कारणहि समजण्यासारखें आहे. एक वेळ मुलामुलींचा विवाह झाल्यानंतर त्यांचें लग्न होणें हें जरी जातीनियमाप्रमाणें अवश्य असे, तरी तीं मुलें व मुली मोठीं झाल्यावर कदाचित् आपली आवडनिवड वापरून पालकांनी ठरविलेलें लग्न मोडतील अशी भीति असल्यामुळें स्वाभाविकच त्यांचें लग्न त्यांना समजूत येण्यापूर्वींच करून टाकून आपल्या वचनांतून मुक्त होण्याची प्रवृत्ति वधूवरांच्या पालकांत असे. या कारणानें इतर प्रांतांपेक्षांहि गुजराथेंत बालविवाह त्या काळीं अधिक होत.

जातींच्या कडक बंधनामुळें भिन्नजातीय विवाह तर इकडे अशक्यच असे, हें सांगणें नकोच. कोणत्याहि समाजांत लग्नमुंजीसारखे शुभ प्रसंग हे कार्यकर्त्यांच्या खर्चिकपणाला उत्तम संधि देतात. परंतु गुजराथेंतील विशेष आश्चर्यकारक गोष्ट ही कीं, अशा शुभ प्रसंगापेक्षा अनेकपट

नेहेमींच्या धिमेपणानें परंतु अचूक मार्गानें त्यांनीं सुधारणेचा उपक्रम सुरू केला प्रथमतः त्यांनी आपल्या मनानें असें ठरविलें कीं, धर्म ही दरेक मनुष्याच्या पसंतीची बाबत असल्यामुळें, तिच्यांत कोणत्याहि व्यक्तीवर इतरांचा दाब नसावा. असा दाब शारीरिक जोरजुलमाच्या स्वरूपाचाच असतो असें नव्हे, तर आर्थिक हानीच्या स्वरूपाचाहि तो असू शकतो. राज्यांतील प्रजेला धर्म आणि आचार या संबंधींचें विचारस्वातंत्र्य असावें व परधर्माचा स्वीकार केल्यानें त्याच्या निर्दिष्ट हक्कांना बाध येऊं नये या हेतूनें त्यांनी सन १९०१ सालीं 'धार्मिक स्वातंत्र्य निबंध' हा कायदा पास केला. त्यापूर्वी ब्रिटिश हिंदुस्थानांत या संबंधाचा सन १८५० सालीं पास झालेला कायदा अमलांत होता परंतु बडोदें राज्यांत तशी सोय नसल्यामुळें भासणारी अडचण दूर करण्यासाठीं हा नवीन कायदा घडण्यांत आला. या कायद्यांत कोणत्याहि व्यक्तीला संप्राप्त झालेल्या हक्कांना धर्मांतरानें अथवा जातिबहिष्कारानें बाध येऊं नये, हें मुख्य तत्व ब्रिटिश कायद्याप्रमाणेंच कायम ठेवून, त्याखेरीज या कायद्यांत अधिक सुधारणा केली आहे. धर्मांतर केल्याबद्दलची गोष्ट नोंधणी कामदाराकडे अगाऊ सूचना देऊन नोंधविण्याची व धर्मांतर करणारा मनुष्य ते करण्यापूर्वी काहीं मुदतीपर्यंत या राज्यांत राहत असण्याची जरूरी ठेवण्याबद्दलची योजना या कायद्यांत करण्यांत आल्यामुळें, जोरजुलमानें होणाऱ्या धर्मांतराला त्यानें प्रतिबंध घातला गेला आहे.

यानंतर विधवाविवाहाला मुभा ठेवण्याची सोय करण्याकडे त्यांनीं आपलें लक्ष वळविलें. ब्रिटिश हिंदुस्थानांत या बाबतींत यापूर्वी कायदा झालेला होता. त्याच धोरणावर सन १९०१ सालीं येथेंहि कायदा करण्यांत आला. परंतु पुढें मात्र महाराजांनीं सामाजिक सुधारणेच्या बाबतींत ब्रिटिश हिंदुस्थानच्या पुढें पाऊल टाकण्याचा निश्चय करून सन १९०४ सालीं बालविवाहप्रतिबंधक कायदा मंजूर केला. यासंबंधाचे जे विचार त्यांच्या मनांत फार दिवसांपासून घोळत होते, त्यांना या कायद्याच्या रूपानें त्यांनीं

कारण अशी आर्थिक तपासणी केव्हाहि करण्यांत आली नव्हती. परंतु गुजराथची जमीन अत्यंत सुपीक असल्यामुळें, त्यांत लहान मोठ्या नद्यांची विपुलता असल्यामुळें व पावसाचें मान साधारणतः पुरेसें व नियमित असल्यामुळें, या प्रांताला निसर्ग अनुकूल आहे. त्यानंच या कृषिप्रधान देशांतील शेतकऱ्याची शेतकीची पद्धति इतर भागाच्या मानानें पुष्कळ सुधारलेली असल्यानें त्याची सांपत्तिक स्थिति साधारणतः बरी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. याचा दाखला म्हणून असें सांगतां येईल कीं, पंजाबमध्यें अगदीं अलीकडे शेती सुधारण्याचे जे प्रयत्न करण्यांत आले आहेत, त्यांच्यामुळें तेथील शेतीला जें स्वरूप आलें आहे, तें अजूनहि पन्नास वर्षांपूर्वीच्या गुजराथच्या शेतीहून कमी प्रकारचें आहे. अशा प्रकारें व्यापार, उद्योग व शेती यांच्यामुळें गुजराथेंत लोकांजवळ दोन पैसे राहत, त्यामुळें त्यांना दानधर्म करण्यास अनुकूलता असे आणि लोकांत धार्मिक वृत्ति पुष्कळ असल्यामुळें त्यांच्याकडून दानधर्महि पुष्कळ करण्यांत येई. अजूनहि गुर्जरबंधूसारखे दानशूर लोक हिंदुस्थानांत इतरत्र थोडेच सापडतात. तथापि या दानधर्माचा व्हावा तसा फायदा होत असे, असें म्हणतां येत नाहीं. जुन्या काळच्या मार्गांनीच या दानाचा ओघ वहात असल्यामुळें, असेल तेथें अति व नसेल तेथें माती अशी स्थिति पुष्कळदां होई. सुस्थितींत असलेल्या जातिबंधूंना भोजनें, संपन्न असलेल्या मठमंदिरांना देणग्या, व कुत्रीं चिमण्या मुंग्या वगैरे पशुपक्ष्यांच्या भक्ष्याची सोय, अशा प्रकारच्या दानधर्मांत अनाथ दुबळे गरीब विद्यार्थी व अस्पृश्य वर्ग यांना वांवच नसे.

अशा प्रकारची धार्मिक, सामाजिक व आर्थिक परिस्थिति असलेला समाज महाराजांना आपल्या राज्यांत आढळला. त्याकडे पाहतां, निसर्ग आपल्याला अनुकूल असून सामाजिक परंपरा मात्र प्रतिकूळ आहे, अशी त्यांची खात्री झाली. यामुळें दैवयोगानें आपल्या हातीं आलेल्या या समाजाची सुधारणा करण्याची उमेद त्यांनीं धरली व त्या दृष्टीनें आपल्या

"लहान वयात मुलामुलींचीं लग्नें करण्याचा या देशातील जनसमाजात रिवाज पडलेला आहे. लग्न या शब्दाचा अर्थ युरोपियन लोक नवराबायकोचा शरीरसंबंध अशा प्रकारचा समजतात. वस्तुतः आपल्या समाजात मुलगा मुलगी वयात येईपर्यंत तसा संबंध घडत नाहीं हें खरें आहे, तथापि लग्न झालें या विचारानेंच दोघांची शरीरस्थिति लवकर पक्वतेस येण्याचा संभव असतो. जनसमाजाच्या स्थितीकडे लक्ष देता, रात्रंदिवस त्यांचे कानांवर ज्या गोष्टी पडतात व ज्या गोष्टी तीं पहातात, त्यावरून त्यांना पक्वतेची स्थिति पाहिजे त्यापेक्षा लवकर प्राप्त होण्याचा संभव असतो. लग्नाचा परिणाम फक्त संतति व्हावी एवढाच नसून, ती संतति सदृढ झाली पाहिजे हा असावा, व तो पार पाडण्यासाठीं शारीरशास्त्राच्या धोरणानें चाललें पाहिजे."

हा उतारा महाराजांच्या एखाद्या भाषणातील नसून, तो हुजूर हुकुमातील आहे. यावरून आपल्या हातीं सत्ता आहे म्हणून आपल्याला कायदा करता येईल अशी त्यांची विचारसरणी नसून, प्रजेची समजूत पाडून आपल्या हेतूचा तिला बोध करवावा ही दृष्टि त्यांनीं आपणापुढें कशी ठेविली होती, हें दिसून येईल अशा रीतीनें केलेल्या या कायद्यात वधूची किमान वयोमर्यादा बारा वर्षांची ठेवलेली होती. ती असमाधानकारक होती असें महाराजांना स्वतःला वाटत होतें; कारण सन १९०३ सालीं लाहोर येथील दयानंद वेदिक कॉलेजमध्यें केलेल्या भाषणात यासंबंधानें ते म्हणतात –

"या बाबतींत बारा वर्षांची मर्यादा फार कमी असून माझ्या मतें ती सोळा असली पाहिजे. परंतु राज्यकर्त्यांना आपल्या स्वतःच्या उत्साहाच्या भरात फार पुढें जाणें सोयीचें नसतें शक्य तितका लोकमनाचा पाठिंबा घेऊनच त्यानें पाऊल पुढें टाकणें इष्ट असतें मी ही वयोमर्यादा चौदापर्यंत करण्यास इच्छित होतों, परंतु लोकमनाकडे पाहून

कारण अशी आर्थिक तपासणी केव्हांहि करण्यांत आली नव्हती परंतु गुजराथची जमीन अत्यंत सुपीक असल्यामुळें, त्यांत लहान मोठ्या नद्यांची विपुलता असल्यामुळें व पावसाचें मान साधारणतः पुरेसें व नियमित असल्यामुळें, या प्रांताला निसर्ग अनुकूल आहे त्यांतच या कृषिप्रधान देशांतील शेतकऱ्यांची शेतकीची पद्धति इतर भागाच्या मानानें पुष्कळ सुधारलेली असल्यानें त्यांची सांपत्तिक स्थिति साधारणतः बरी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं याचा दाखला म्हणून असें सांगता येईल कीं, पंजाबमध्यें अगदीं अलीकडे शेती सुधारण्याचे जे प्रयत्न करण्यांत आले आहेत, त्यांच्यामुळें तेथील शेतीला जें स्वरूप आलें आहे, तें अजूनहि पन्नास वर्षांपूर्वीच्या गुजराथच्या शेतीहून कमी प्रकारचें आहे अशा प्रकारें व्यापार, उद्योग व शेती यांच्यामुळें गुजराथेंत लोकांजवळ दोन पैसे राहत, त्यामुळें त्यांना दानधर्म करण्यास अनुकूलता असे आणि लोकांत धार्मिक वृत्ति पुष्कळ असल्यामुळें त्यांच्याकडून दानधर्महि पुष्कळ करण्यांत येई अजूनहि गुर्जरबंधूसारखे दानशूर लोक हिंदुस्थानांत इतरत्र थोडेच सापडतात तथापि या दानधर्माचा व्हावा तसा फायदा होत असे, असें म्हणतां येत नाहीं जुन्या काळच्या मार्गानेंच या दानाचा ओघ वहात असल्यामुळें, असेल तेथें अति व नसेल तेथें माती अशी स्थिति पुष्कळदा होई सुस्थितींत असलेल्या जातिबंधूंना भोजनें, संपन्न असलेल्या मठमंदिरांना देणग्या, व कुत्रीं चिमण्या मुंग्या वगैरे पशुपक्ष्यांच्या भक्ष्याची सोय, अशा प्रकारच्या दानधर्मांत अनाथ दुबळ गरीब विद्यार्थी व अस्पृश्य वर्ग यांना वांवच नसे

अशा प्रकारची धार्मिक, सामाजिक व आर्थिक परिस्थिति असलेल्या समाज महाराजांना आपल्या राज्यांत आढळला त्याकडे पाहतां, निसर्ग आपल्याला अनुकूल असून सामाजिक परंपरा मात्र प्रतिकूल आहे, अशी त्यांची खात्री झाली यामुळें दैवयोगानें आपल्या हातीं आलेल्या या समाजाची सुधारणा करण्याची उमेद त्यांनीं धरली व त्या दृष्टीनें आपल्या

कायद्यात ती ठेविली नसल्यानें, आपल्या धर्मात राहूनहि परधर्माच्या अथवा परजातीच्या व्यक्तीशीं विवाह करण्यास कोणतीहि कायदेशीर अडचण त्या राज्यात राहिली नाहीं. या दृष्टीनें हा कायदा ब्रिटिश कायद्यापेक्षां अधिक उदार स्वरूपाचा व हिंदुधर्माला पोषक असाच झाला.

येणेंप्रमाणे हिंदुलग्नाच्या बाबतींत कायद्याने सुधारणा केल्यावर, महाराजांनीं आपलें लक्ष जातिबंधनाची तीव्रता कमी करण्याकडे वळविलें. हीं जातिबंधनें किती जाचक असत, याची कल्पना वरील विवेचनावरून येईलच अर्थात् जातींतील व्यक्तींना शिक्षा करणारे पंचायतींतील लोक हे मनुष्यच असल्यामुळें, आपसातील हेव्यादेव्यामुळें निरपराधी व्यक्तीला शिक्षा करण्याकडे त्याचें मन झुकण्याचा संभव पुष्कळ प्रसगीं राहतच असे. अशा वेळीं त्याच्या कृत्याविरुद्ध दाद मागण्याची कांहींहि सोय नसे. सरकारी न्यायकोर्टांत पैशाचा संबंध नसलेले कोणतेहि दावे न घेण्याचें तत्त्व ब्रिटिश कायद्यात मानिलें गेलें आहे, तीच स्थिति बडोदें राज्यातहि त्या वेळीं होती. यासाठीं या बाबतींत लोकाना न्याय मिळण्याकरिता ज्ञातिपंचायत कायदा करण्याच्या उद्देशानें १९११ सालीं महाराजांनीं त्याचा मसुदा तयार करवून तो प्रसिद्ध केला. परंतु पुढें त्याचा व्हावा तसा उपयोग होईल किंवा नाहीं, याबद्दल शंका वाटल्यावरून त्यांनीं तो मसुदा बाजूस ठेवून, त्याऐवजीं राज्याच्या दिवाणी काम चालविण्याच्या कायद्यात त्याबद्दलची तरतूद केली त्यामुळें ब्रिटिश हिंदुस्थानातील कोर्टांत निव्वळ ज्ञातिविषयक तंट्याबद्दलचे दावे दाखल होऊं शकत नाहींत, ते बडोदें राज्यातील कोर्टांत होऊं लागून, लोकाना जातीकडून होणाऱ्या त्रासाचें निवारण करून घेण्याचा मार्ग सुलभ झाला.

यानंतरचा सामाजिक प्रश्न अस्पृश्य जातींसंबंधाचा होय. या जातींच्या विरुद्ध कोणतेहि कायदे घडलेले नसल्यामुळें त्याच्या दु:स्थितीचें निवारण करण्यासाठींहि नवीन कायद्याची वस्तुत: आवश्यकता नव्हती, तर त्याना अवश्य त्या शिक्षणाच्या, वसतीच्या, द्रव्यसहाय्याच्या, नोकरीचाकरीच्या वगैरे

ती मला त्याहूनहि कमी करून बारावर आणावी लागली. पण त्याचा सुपरिणाम मात्र असा झाला कीं, या कायद्याविरुद्ध लोकमत सर्वस्वीं *नाहींसें झालें.*"

या कायद्याचें उल्लंघन करणाराला प्रथम फक्त दंडाचीच शिक्षा ठेवण्यात आल्यानें लोकांनाहि तो फारसा जाचक न वाटता, त्याचें कार्य एका अर्थीं शिक्षणात्मक असेंच झालें.

लग्नविषयक बाबतींत विधवाविवाहप्रतिबंध व बाल्यविवाह यांना अशा प्रकारें दूर केल्यावर, तिसरा प्रश्न हिंदु लग्नपद्धतीच्या स्थिरीकरणाचा त्यांनीं हातीं घेतला, व सन १९०६ त *हिंदुलग्नविवाह हा कायदा त्यांनीं* मंजूर केला. ब्रिटिश हिंदुस्थानात हिंदुधर्मशास्त्रविषयक नियम अजूनहि निबंधाच्या रूपानें एकत्रित केलेले नाहींत, यामुळें तेथें अनेक अडचणी उपस्थित होतात. *यासाठीं सन १९१३ सालच्या सुमारास या विषयींचे* सर्वच कायदे महाराजांनीं निबंधरूपानें संघटित केले. तथापि त्यापूर्वीं *सहा वर्षें आधीं हिंदुलग्नापुरता कायदा त्यांनीं घडविला. त्यात हिंदुलग्नाच्या मूलतत्त्वाची व्याख्या करून,* कायदेशीर लग्नाच्या अवश्य गोष्टी, स्त्री-पुरुषाचे परस्पर हक्क, त्यांचे मिळकतीवरील अधिकार, एकमेकांबद्दलची जबाबदारी व लग्नसंबंधाची अविच्छिन्नता, या सर्व गोष्टी निश्चित करण्यात आल्या. यापूर्वीं हिंदूंतील कित्येक हलक्या जातींत लग्नाचे असे काहीं निश्चित विधी नसल्यामुळें, वादग्रस्त प्रसंगीं लग्नाची शाबिती होणें सुद्धा कठिण होई ती अडचण या कायद्यानें नाहींशी झाली.

लग्नसंबंधीचा महाराजांच्या कारकीर्दीच्या मध्यकालातील अखेरचा कायदा म्हणजे ऐहिक लग्नविधि हा होय, व तो सन १९०८ सालीं करण्यात आला ब्रिटिश हिंदुस्थानात याबद्दल सन १८७२ सालीं 'विशेष लग्नाचा कायदा' म्हणून घडविण्यात आला होता, त्यात या कायद्याअन्वयें लग्न करणाऱ्या वधूवरांनीं लग्नाचे वेळीं आपण कोणत्याहि धर्माचे नसल्या-बद्दल लेखी प्रतिज्ञा करण्याची आवश्यकता ठेविली होती परंतु बडोद्याच्या

स्थिति सुधारण्याचा प्रयत्न महाराजांनीं आपल्या उपदेशानें, उदाहरणानें, अनुनयानें व कायद्यांनीं केला, त्याचा परिणाम काय झाला हे मोजण्याचें एखादें यंत्र अर्थातच उपलब्ध होण्यासारखें नाहीं. त्यामुळें यासंबधानें निश्चित असे जरी काहीं सांगता आलें नाहीं, तरी इतकें मात्र निर्विवाद रीतीनें म्हणतां येण्याजोगें आहे कीं, त्यांच्या कारकीर्दीच्या चोवीस वर्षांच्या या मध्यकाळांत बरेंच मोठें सामाजिक स्थित्यंतर घडून आलें. त्यांतील स्त्रियांच्या शिक्षणाचें प्रमाण पुष्कळ वाढलें. लग्नाच्या मुलामुलींची किमान वयोमर्यादा बारा ही तर कायद्यानेंच निश्चित केली गेली, तथापि याहूनहि अधिक वयापर्यंत आपल्या मुली अविवाहित ठेवण्याकडे लोकांची प्रवृत्ति वाढली, व हलक्या जातींत जरी कायद्याविरुद्ध अल्पवयी अर्भकांचीं लग्नें होत असलीं, तरी त्यांची संख्या प्रतिवर्षी कमी कमी होत गेली. लग्नाच्या बाबतींत लोकांना विचारस्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य मिळालें असूनहि त्याचा दुरुपयोग झाल्याचें आढळून आलें नाहीं. लग्नविधींना निश्चितता देण्यांत आली व पुनर्विवाहाला राजमान्यता दिली गेली. प्रसूतिसमयीं नवीन पद्धतीनें शिकलेल्या व स्वच्छतेकडे अधिक लक्ष पुरविणाऱ्या दायांची मदत स्त्रियांना सरकारकडून दिली जाऊं लागल्यामुळें समाजांत या कारणानें होणारी पूर्वींची मृत्युसंख्या कमी झाली. परदेशगमनाविषयींचा निषेध ढिला झाला, इतकेंच नव्हे तर त्याचे फायदे लोकांना कळूं लागून त्याबद्दल लोकांची प्रवृत्ति वाढत चालली. एकत्र खाण्यापिण्याच्या बाबतींतहि समाजबंधनें शिथिल होऊन उद्यानोपहारासारख्या प्रसंगीं एका मेजावरून भिन्न जातीचे लोकच काय, पण भिन्न धर्माचे लोकहि खानपान करतांना दिसूं लागले. क्लबासारख्या संस्थांतून एकत्र होण्याची सवय झाल्यानें कोणत्याहि मनुष्यासंबंधानें केवळ पोटजातीच्या दृष्टीनेंच विचार करण्याचें वळण कमी झालें. अनावश्यक धार्मिक आचाराचें प्रस्थ कमी झालें, अस्पृश्यवर्गाकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलला व एकंदरींत लोकांना सामाजिक दृष्ट्या विचार करण्याची

सोयी करून देण्याचीच जरूरी होती. त्याबद्दलचें आपलें धोरण महाराजांनी आपल्या अनेक भाषणातून व्यक्त केलें असून, हुजूर हुकुमांनी त्यांनी अस्पृश्य लोकांना सर्व प्रकारें मदत दिली आहे. सन १९०४ च्या डिसेंबर महिन्यात मुंबईस भरलेल्या सामाजिक परिषदेच्या अध्यक्षस्थानावरून केलेल्या भाषणात त्यांनी या विषयाला खास महत्त्व दिलें आहे. त्याचप्रमाणें लाहोर येथील दयानंद वैदिक कॉलेजातील भाषणात, त्यांना आर्य समाजानें दिलेल्या मानपत्राच्या प्रसंगीं, तसेंच सन १९०९ सालीं पुणें व मुंबई येथील डिप्रेस्ड क्लासेस मिशनमध्यें झालेल्या बक्षिससमारंभाच्या वेळीं, अशा अनेक प्रसंगीं त्यांनी या लोकाबद्दल आपण काय काय केलें तें जनतेपुढें मांडलें आहे अस्पृश्य विद्यार्थ्यांना शिक्षण देणें ही एकच गोष्ट घेतली, तरी तिच्यावरून त्यांच्या प्रयत्नाची व्याप्ति कळून येईल. त्यांच्या कारकीर्दीच्या या मध्यकालाच्या आरंभानंतर चार वर्षांनीं म्हणजे सन १८९१ सालीं बडोदें राज्यात अस्पृश्यासाठीं स्वतंत्र शाळा दहा असून त्यातून ७८४ विद्यार्थ्यांना शिक्षणाचा लाभ मिळत होता, तर त्यानंतर वीस वर्षांनीं या शाळांची संख्या २८८ होऊन त्यातून साडे पधरा हजार अस्पृश्य विद्यार्थी शिकत होते.

अस्पृश्य लोकांना मदत करण्याकडे या कालात लोकांचें दातृत्व वळत नसे तें वरच्या जातीच्या मर्यादेंतच रहात असे यामुळें त्या दानधर्माचें धोरण विवेचक नसल्यानें, तें दान पुष्कळ वेळा सत्कालीं व सत्पात्रीं होत नसे, असा उल्लेख वर केलाच आहे याचा परिणाम असा होई कीं, या दानाचा फायदा मतलबी व स्वार्थसाधु लोक घेत या गोष्टीला आळा घालण्यासाठीं म्हणून महाराजांनीं सन १९०७ सालीं परोपकारी संस्थांच्या नियमनासाठीं कायदा करून, दात्यांनी सद्धेतूनें दिलेलें दान योग्य कारणीं लाविलें जात आहे हें पहाण्याची जबाबदारी सरकारी अधिकाऱ्यावर टाकिली, व त्यायोगें प्रसंगविशेषीं अशा दानाच्या होत असलेल्या दुरुपयोगाला आळा घातला अशा रीतीनें प्रचलित समाज-

# प्रकरण २६ वें

## सुधारणांचा मध्यकाल

सन १८८७ पर्यंतच्या कालात महाराजांनीं आपल्या राज्यात कोणत्या सुधारणा घडवून आणिल्या, त्याची हकीकत पधराव्या प्रकरणात दिलेली आहे. त्यानतरच्या चोवीस वर्षांच्या मध्यकालात त्या सुधारणाची प्रगति कशी करण्यात आली, त्याबद्दलचें विवेचन या प्रकरणात करावयाचें आहे.

प्रथमत राज्यतत्राच्या सुधारणेचा विचार केला पाहिजे; कारण त्या-वरच इतर सर्व सुधारणाचें यशापयश अवलबून असणार हें उघड आहे. या दृष्टीनें या कालात अधिकाऱ्याच्या वर्तनाच्या, वेतनाच्या व अधिकाऱ्याच्या सर्व बावती नियमित करण्यासाठीं सुमारें पन्नास निरनिराळे नियम-सग्रह घडण्यात आले. त्यात त्याच्या नेमणुका, पगारवाढ, प्रवासभत्ते, शिक्षा, पेन्शनें वगैरेबद्दलचे नियम असून, त्याखेरीज निरनिराळ्या दर्जाच्या अमल्दाराचे अधिकार व त्याची पात्रता अजमाविण्याच्या परीक्षा वगैरे-बद्दलचे नियम होते. त्याचप्रमाणें अगदीं खालच्या दर्जाच्या खेडेगावातील नोकरापर्यंत या नियमाचें जाळें पसरविण्यात आलें व त्यायोगें सर्व नोकरशाहींत निश्चितता व एकसूत्रीपणा आणण्याचा प्रयत्न करण्यात आला. वरिष्ठापासून कनिष्ठापर्यंतच्या सर्व अमल्दाराचे अधिकार एकदम समजता यावे, अशासाठीं ते अधिकार एकत्र दर्शविणारें अधिकारपत्रक याच काळात प्रथम तयार करण्यात आलें. त्यानतर वेळोवेळीं अनुभवानें त्यात फेरबदल

नवीन दिशा लागली अर्थात् हें कार्य अगदीं अपुरें होतें, व अजून पुढें पुष्कळ मजल चालून जावयाची होती. तथापि नवीन इमारतीचा पाया घालीत असताना होणारें काम जमीनीच्या सपाटीखालींच होत असल्यानें तें दूर उभे राहणारांना उठून दिसत नाहीं, पाया भरून आल्यावर इमारतीला सुरुवात झाली, म्हणजेच तिचें स्वरूप हल्के हल्के दिसू लागतें, तशीच स्थिति साम्प्रतच्या कालातील समाजसुधारणेची होती. समाजाची सुधारणा होऊं लागली होती एवढें मात्र निश्चित. अर्थातच अशा बाबतींत राज्यकर्त्याला फार सावधगिरीनें पाऊल टाकावें लागतें, व ही गोष्ट महाराजाच्याहि पूर्णपणें ध्यानात होती, असें त्याच्या हुजूर हुकुमावरून स्पष्ट होतें अशा एका हुकुमात त्यानीं म्हटलें आहे कीं,

> "समाजाच्या सर्वसामान्य नैतिक आचाराविरुद्ध कायद्यात कांहीं येणार नाहीं, अशाबद्दल कायदे करणारानीं दक्षतेनें निरीक्षण करावें, तसेंच अशा कायद्याविरुद्ध मन असणाऱ्या लोकाच्याहि म्हणण्याकडे पूर्ण लक्ष द्यावें"

तथापि इतकें केलें, तरीहि महाराजाचा स्पष्ट अभिप्राय असा होता कीं,

> "लोकाची सामाजिक सुस्थिति ठेवणें हा पौर्वात्य देशात राजाचा धर्म मानिला जातो व त्यामुळें येथील संस्थानिकानीं सामाजिक प्रश्नात मन घालणें आपलें कर्तव्य समजलें पाहिजे,"

या अभिप्रायानुसार त्यानीं या कामात लक्ष घातलें. त्यायोगें समाजात महत्वाचें स्थित्यंतर घडून आलें, याबद्दल मतभेद होण्याचा संभव नाहीं. यासबधानें सयाजीगौरवग्रंथात दिलेला एका प्रमुख हिंदी पुढाऱ्याचा लहानसा अभिप्राय सार्थ आहे त्यात म्हटल्याप्रमाणें 'सामाजिक सुधारणेच्या बाबतींत तर सर सयाजीराव महाराज यानीं आपल्या इतर बहुतेक बधूना चागलेंच उदाहरण घालून दिलें आहे'



कार्यकारी मंडळा (Executive Council) ची स्थापना हें होय. महाराजांपुढें अखेर निर्णयासाठीं येणाऱ्या महत्त्वांच्या प्रश्नांची चर्चा करून त्यांवर आपला अभिप्राय नमूद करणें व महाराजांनीं पूर्वी केलेल्या हुकुमांच्या धोरणानें इतर प्रश्नांसंबंधानें अंमलबजावणीचे हुकूम करणे, हें काम या कार्यकारी मंडळाकडे दिलें गेले. त्याचप्रमाणें महाराज परदेशीं गेले असतांना त्यांच्या गैरहजिरींत उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांचे निकाल करण्याचें जबाबदारीचें कामहि या कार्यकारी मंडळाकडेच देण्यांत आलें.

अशा रीतीनें राज्ययंत्रांत शक्य तितकी सुधारणा महाराजांनीं केली, तरी सर्व यंत्रांप्रमाणेंच त्यांतहि नेहमीं अधिक दुरुस्ती व सुधारणा करण्याला अवसर रहातोच. सन १९०९ च्या जूनमध्ये रा. केरशास्पजी हे दिवाणपदावरून निवृत्त झाल्यावर, श्रीयुत रोमेश चंद्र दत्त यांना महाराजांनीं आपले दिवाण म्हणून आणिल्याचे मागें सांगितलेंच आहे. या अखिलभारतीय कीर्ति मिळविलेल्या मुत्सद्याची कारकीर्द दुर्दैवानें बरोबर सहा महिन्यांतच संपली; पण तेवढ्या अवधींत त्यांनीं राज्यकारभाराच्या कित्येक मूलतत्त्वांना हात घातला होता. त्यांपैकींचें एक तत्त्व राज्यांतील अधिकाराचे विकेंद्रीकरण (Decentralization) हे होय. त्या काळीं कार्यकारी मंडळाच्या सभासदांच्या अथवा खात्यांच्या मुख्य अधिकाऱ्यांच्या हातांतच सर्व अधिकार केंद्रीभूत झालेले असल्यामुळे, दरेक जिल्ह्याचा अधिकारी म्हणजे वरील टपाल खालीं पोहचविणारा पोस्टाचा नोकर होऊन बसला होता. त्याला स्वतंत्र अधिकार असे काहींच ठेविण्यांत आलेले नसून, सर्व अधिकारांचें केंद्रीकरण वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या हातांतच झालें होतें. ही अनिष्ट स्थिति बदलून टाकण्याची सूचना श्रीयुत दत्त यांनीं प्रथम केली. त्यांनीं ता. २३ जून १९०९ रोजीं महाराजांना याबद्दल सूचना करितांना लिहिलें कीं,

"कोणाहि अंमलदाराला अवश्य तो स्वतंत्र अधिकार दिला गेला नसतां तो आपल्या कर्तव्यांत मन घालून काम करील, हें मनुष्यस्वभा-

करण्यात आला, तरी त्या काळीं तयार केलेल्या मूळ साच्याची कल्पना त्याच्या पुढील आवृत्तींतहि कायम राहिली आहे. त्याचप्रमाणें खुद्द महाराजानीं, दिवाणानीं अथवा खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यानीं केलेले मार्गदर्शक हुकूम छापून सर्वांच्या माहितीसाठीं प्रसिद्ध करण्याचा उपक्रमहि याच काळात सुरू करण्यात आला. प्रथम प्रथम हे हुकूम बडोदावत्सल या नावाच्या वर्तमानपत्रात प्रसिद्ध करण्यात येत असत. पण सन १८९१ सालापासून ही पद्धति बदलण्यात येऊन, ते 'आज्ञापत्रिका' नांवाच्या सरकारी साप्ताहिकात प्रसिद्ध करण्यात येऊं लागले. या आज्ञापत्रिकेचा आरंभ या साळच्या फेब्रुआरी महिन्यात करण्यात आला व तेव्हापासून ती दर गुरवारीं प्रसिद्ध करण्यात येते. तिचें स्वरूप इंग्रज सरकारच्या गॅझेटप्रमाणें असलें, तरी तींत त्या गॅझेटहून अधिक विविध प्रकारची माहिती देण्यात येते. त्यामुळें सर्वांना सुलभतेनें व अल्प खर्चांत सरकारी हुकुमाचें व राज्यकारभाराचें ज्ञान उपलब्ध होऊन अधिकाऱ्याच्या एकतंत्रीपणाला नियमाचा आधार दाखवून आळा घालण्याचें साधन सर्वांना प्राप्त झालें.

तथापि या काळात वर दर्शविल्याप्रमाणें निरनिराळ्या खात्याच्या मुख्याधिकाऱ्याकडून प्रसिद्ध होणारे नियम व हुकूम याच्यात एकसूत्रीपणा ठेवण्याचें काहीं साधन नसल्यामुळें, पुष्कळ वेळा या भिन्न भिन्न खात्याच्या हुकुमाच्या मुळाशीं असलेल्या तत्वात विसंगतपणा दिसून येई. म्हणून तो नाहींसा करून सर्व खात्यासंबंधींचे नियम एकाच वरिष्ठ अधिकाऱ्याकडून घडले जावे, या हेतूनें सन १९०४ सालीं 'न्यायमंत्री' (Legal Remem अभिप्रा.-) या नावाच्या अधिकाऱ्याची योजना करण्यात आली. येथून चारतींत तर सर्व कायदे, नियम, उपनियम वगैरे या न्यायमंत्र्याकडूनच बधूना चागलेंच ञापत्रिकेंत प्रसिद्ध केले जाऊं लागले. त्यामुळें त्या सर्वांत ेपणा येऊं लागला.

केलेलें एक महत्वाचें कार्य म्हणजे राज्यातील

त्यांनीं आपली विवेकबुद्धि सावध ठेविली होती. उदाहरणार्थ, दिवाणाच्या वरील कामाचा बोजा कमी व्हावा एतदर्थ त्याच्या मदतीला एक 'वजीर' नेमावा, अशी एक शिफारस कमिशनमधील एका सभासदानें केली होती, तिच्या संबधानें दिवाण श्री. दत्त यानीं म्हटलें कीं,

"ही वजीर नेमण्याची सूचना काहींशी विचित्रच आहे. तिच्यामुळे अरबी भाषेतील सुरस गोष्टींची व हरून–अल–रशीदची आठवण होते."

या अभिप्रायानुसार महाराजानीं दिवाणाच्या वरिष्ठ अधिकाराला एक नवीन प्रतिस्पर्धी उत्पन्न करण्याचें नाकारिलें. त्याचप्रमाणे दुसऱ्या एका सभासदानें अशी एक सूचना आणिली होती कीं, महाराजाचा 'हुजूर कामदार' (Private Secretary) या अधिकाऱ्याचा दर्जा वाढवून त्याला पुष्कळशा हुजूर अधिकाराच्या बाबतींचा निकाल करण्याची सत्ता द्यावी. याहि सूचनेच्या विरुद्ध आपला अभिप्राय नमूद करिताना श्री. दत्तानीं लिहिलें कीं,

"मी इतर देशी राज्यातील बरेचसे प्रायव्हेट सेक्रेटरी पाहिले आहेत. त्या राज्यात स्वत राजे लोक राज्यकारभाराचे फारच थोडें काम करितात व हे प्रायव्हेट सेक्रेटरी तर सामाजिक समारंभातच गुतलेले असतात. म्हणून तेथें ही सुधारणा शक्य असली, तरी जेथे खुद्द राज्यकर्ता स्वत सर्व महत्त्वाच्या सर्व प्रश्नाचा विचार करून त्याचा निर्णय करितो अशा बडोद्यासारख्या राज्यात दिवाणाचा दर्जा महाराजाच्या सेक्रेटरी-सारखाच असला पाहिजे, व म्हणून हुजूर कामदाराच्या अधिकारात वाढ करण्याचें प्रयोजन मला दिसत नाहीं."

हा श्री. दत्त याचा अभिप्रायहि महाराजानीं स्वीकारून या बाबतींतील चालू पद्धति कायम ठेविली. अशा काहीं मुद्याच्या बाबतींखेरीज शक्य-तितकें अधिकाराचें विकेंद्रीकरण करण्याबद्दलचे हुकूम त्यानीं सोडले.

या सर्व सुधारणाचें धोरण शासनाधिकाराची जबाबदार अधिकाऱ्यात

याच्या विरुद्ध आहे. सांप्रत बडोदें राज्यांतील सुभे हे आपल्या स्वतःच्या प्रांतांतील कारभारासंबंधानें व आपल्या हुकुमतींतील प्रजेच्या हितासंबंधानें निरुत्साह झाले आहेत. त्यांची स्थिति यंत्रपुतळ्यासारखी झाली असून, त्यांना आपल्या कामाबद्दल व प्रजेच्या कल्याणाबद्दल आस्था वाटण्यास कांहींच कारण दिसत नाहीं. म्हणून ही स्थिति बदलून टाकून, दरेक प्रांताचा सुभा हा आपल्या प्रांताचें हिताहित पाहणारा जबाबदार अधिकारी होईल, अशा रीतीनें अधिकाराचें विकेंद्रीकरण करण्याची योजना कशी करितां येईल, याचा विचार करण्याकरितां एक कमिशन नेमावें अशी माझी सूचना आहे "

श्रीयुत दत्त याच्या या सूचनेप्रमाणें महाराजानीं सन १९०९ च्या जून महिन्यांत 'Decentralisation Commission' ची नेमणूक केली. या कमिशनचे अध्यक्ष दिवाण टेरचद या नांवाचे ब्रिटिश सिव्हिल सर्व्हिसमधील उमेदवार मागून घेतलेले गृहस्थ बडोदें राज्यांत मुलकी खात्याचे प्रमुख होते ते असून, इतर सभासदांत ॲकौंटंट जनरल रा. वणीकर, कडी प्रांताचे सुभे रा. खासेराव जाधव, हायकोर्टाचे एक न्यायाधीश मि. खंडाळावाला व नवसारी प्रांताचे सुभे रा. (हल्लीं रा. ब.) गोविंदभाई देसाई हे होते. या कमिशनला नेमून दिलेल्या कार्यमर्यादेंत रेव्हिन्यु, न्याय, शिक्षण, मेडिकल, पोलिस, लष्कर, पब्लिक वर्क्स् वगैरे सर्व खात्यांत जिल्हाधिकाऱ्यांना पूर्वीपेक्षां अधिक अधिकार कोणते देतां येतील, व त्यांची बजावणी कशा रीतीनें करितां येईल, यासंबंधाच्या शिफारशी करणें हें होतें. या कमिशननें पुष्कळ प्रयासानें चौकशी करून सन १९१० च्या फेब्रुआरी महिन्यांत आपल्या शिफारशींचा पहिला हप्ता महाराजांना सादर केला व त्यानंतर उरलेली चौकशी करून दुसरा व अखेरचा हप्ता सन १९११ च्या ऑक्टोबर महिन्यांत सादर केला. या शिफारशींचा महाराजानीं संपूर्ण विचार करून त्यावरून जिल्हाधिकाऱ्यांना जास्त अधिकार देण्यासंबंधानें अनेक हुकूम सोडले. तथापि हे हुकूम सोडतांना

नोकरशाहींत शक्य तितकी पात्रता आणण्याचा प्रयत्न केला यामुळें राज्य-तंत्राचे हे भाग घासून पुसून काढल्याप्रमाणें स्वच्छ होऊन तें यंत्र सुरळितपणानें चालू लागलें.

यानंतरची सुधारणा करासंबंधींची होय. मागील कालविभागांत महाराजांनीं पूर्वीच्या राजवटींतील करांसंबधींची बेबंदशाही मोडून टाकून, तिच्या जागीं सुव्यवस्थेची सुरुवात केल्याबद्दलचें निवेचन केलें आहे. त्या बाबतींत सांप्रतच्या कालविभागात पुष्कळ अधिक सुधारणा करण्यात आल्या.

प्रजेवर जबर कर बसविले म्हणजे राज्याचें उत्पन्न अधिक येऊं शकतें, ही कल्पना भ्रामक असते प्रजेचे कर देण्याचें सामर्थ्य व तिच्यापासून ते वसूल करण्याची सुव्यवस्था, यावरच करवसुली अवलंबून राहते. जबर कर बसविल्यानें कागदोपत्रीं राज्याचें उत्पन्न पुष्कळ फुगलेलें दिसलें, तरी त्याचा आकार एखाद्या सूज आलेल्या शरीराप्रमाणें असतो. त्यात सत्त्व बिल्कुल नसते कारण त्या कराचा बोजा प्रजेच्या सहनशक्तीच्या बाहेर असल्यामुळें त्याची वसूली होणें कठिण होतें. त्याचप्रमाणें कर कागदोपत्रीं माफक ठेविलेले असले, तरी त्याच्या वसुलीच्या पद्धतींत सुव्यवस्था व एकसूत्रीपणा असल्याशिवाय त्या बाबतींत प्रजेस सुरक्षितपणा वाटत नाहीं. याचा परिणाम असा होतो कीं प्रजेस ते कर देण्याचें सामर्थ्य असलें, तरी ते देण्याची इच्छा होत नाहीं. सबब या दोन्ही बाबतींत सुधारणा घडवून आणणें हाच राज्याच्या उत्पन्नाच्या शाश्वतीचा व वाढीचा खरा मार्ग होय, हें जाणून महाराजांनीं या दोन्ही बाबतींत या कालात सुधारणा केली. त्यापैकीं नोकरशाहीची सुव्यवस्था लाविल्यानें करवसुलीच्या व्यवस्थेंत निश्चितता आणिली गेली. त्यानंतर कराच्या आकारणींत सुधारणा करण्याचें त्यांनीं योजिलें

हा हेतु पार पाडण्यासाठीं त्यांनीं जमीनीच्या मगदुराप्रमाणें तिनवार आकार बसविण्याची व्यवस्था केली त्यामुळें प्रथमदर्शनीं पूर्वीच्या प्रमाणानें

वाटणी करून देणें हें असल्यामुळें, यापुढें स्वत महाराजाना व कार्यकारी मंडळाच्या अधिकाऱ्याना मामुली व स्थानिक महत्त्वाच्या प्रश्नाचे निकाल करावयास न लागून, शिवाय जिल्ह्याच्या अधिकाऱ्याना पूर्वींहून अधिक जबाबदारीच्या कामाची सवय होऊ लागली.

याच दृष्टीनें न्याय व अमलबजावणी खात्याची फारकत करण्याचें पूर्वींचें धोरण यापुढें अधिक व्यापक करण्यात आलें व त्यामुळें या काळात अमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्याना आपल्या अमलबजावणीच्या अधिकाराशिवाय आपल्या हुकुमतींतील भागात शातता राखण्यापुरत्या बदोबस्ताच्या अधिकाराव्यतिरिक्त इतर कोणतेहि फौजदारी अधिकार ठेविले नाहींत, व न्यायाधीशाकडे दिवाणी व फौजदारी न्यायदानाचे सपूर्ण अधिकार दिलेले आहेत तथापि न्यायतत्त्वाची माहिती मुल्की खात्याच्या अमलबजावणीच्या कार्यांतहि उपयोगी पडावी, म्हणून प्रसगविशेषीं काहीं नवीन मुल्की अधिकाऱ्यांना मात्र थोड्या मुदतीपुरते फौजदारी मुकदम्याचे अधिकार देण्यात येत असत.

अशा प्रकारें राज्यतत्रात नियमानीं कितीहि सुधारणा केल्या, तरी त्या नियमाची सफलता ते यत्र चालविणाऱ्या अधिकाऱ्याच्या पात्रतेवरच अवलबून असणार यामुळें योग्य अधिकारी निवडण्याकडेहि महाराजानीं त्याच वेळीं लक्ष पुरविलें जात, धर्म, पथ, देश वगैरे कोणत्याहि प्रकारचा भेदविचार मनात न आणिता केवळ लायकीच्या धोरणानेंच अधिकाऱ्याची नेमणूक करावयाची, होता होईतों पदवीधर लोकानाच वरिष्ठ अधिकाराच्या जागा द्यावयाच्या, न्यायखात्यात शक्य तोंपर्यंत कायद्याची अखेरची पदवी मिळविलेल्या लोकाचीच नेमणूक करावयाची, विशिष्ट शिक्षण अवश्य असलेल्या जागा शक्य तोंवर परदेशात तें शिक्षण सपादन करून आलेल्या लोकानाच द्यावयाच्या, व राज्यातील कनिष्ठ व मध्यम दर्जाच्या सर्व नोकरवर्गाकडून सर्वसाधारण माहितीचे विषय ठेविलेल्या परीक्षा पास करवावयाच्या, अशा प्रकारचें धोरण ठेवून महाराजानीं आपल्या

उत्पन्नातहि काहीं ठिकाणीं वाढ झाली होती. तिचा फायदा राज्यास मिळणें न्याय्य होतें. याच्या उलट काहीं जमीनींवर सर टी. माधवराव याच्या वेळीं बसविलेला आकार अनुभवानें अधिक असल्याचें दृष्टोत्पत्तीस आलें होते; त्यामुळें अशा जमीनीवरील आकार कमी करणेंहि अवश्य होतें. यासाठीं सर्व राज्यांतील जमीनीच्या आकाराची फेरतपासणी करण्याचें काम या वेळीं हातीं घेण्यात येऊन, त्यात जमीनीच्या लायकीप्रमाणें एकसूत्रीपणा आणण्यात आला. या फेरतपासणीचा अमल तीस वर्षेपर्यंत राहण्याचें ठरविण्यात आलें.

अशा रीतीनें खालसा जमीनींची व्यवस्था केल्यावर, बारखळी जमीनीं-कडे महाराजानीं आपलें लक्ष वळविलें. सर टी. माधवराव याच्या अमदानींत व महाराजाच्या कारकीर्दीच्या पहिल्या कालविभागात याबद्दलच्या प्रयत्नाना सुरवात करण्यात आली होती. तथापि त्या वेळच्या प्रयत्नात पुढील काळात तत्वत फरक करण्यात आला. पूर्वीच्या चौकशीच्या वेळीं ज्या वतनदार लोकाजवळ आपल्या वतनाचा खात्रीलायक पुरावा नसेल, त्याच्याकडून तीं वतनें काढून घेण्याची पद्धति उपयोजिली जात असे. परतु तसे करणें सोपें नसल्याचा अनुभव आला. यामुळें त्या पद्धतींत बदल करण्यात येऊन, ज्या वतनदाराना वाजवी कारणावाचून अथवा अयोग्य कारणासाठीं वतने देण्यात आलीं होतीं, त्याच्या वतनाच्या जमीनींची चौकशी करून पुढें न चालविण्याजोगीं वतने त्याना उधड रकमा देऊन त्याच्याकडून परत घेण्याची पद्धति येथून पुढें अमलात आणण्यात आली. यामुळें त्या वतनदार लोकाना आपल्या वतनाच्या गैरकायदेशीरपणाबद्दल अगोदरच जी शका वाटत होती, तिच्यामुळें त्याना त्या जमीनींच्या वतनहक्काबद्दल एकदम उधड रक्कम मिळाल्यामुळें सतोष झाला. यापुढें त्या जमीनी खालसा जमीनी मानण्यात येऊ लागून त्यावर इतर जमीनींप्रमाणें महसूल आकारण्यात येऊ लागल्याने, खातेदार व सरकार या उभयतानाहि एक प्रकारची शाश्वती वाटू लागली. तसेंच ज्या लोकाचें वतन योग्य

वसुलाचें उत्पन्न कमी झाल्यासारखें दिसलें. उदाहरणार्थ, वडोदें प्रांतातील डभोई, पादा व शिनोर या तीन तालुक्यांचें जमीनमहसुलाचें उत्पन्न सन १८८६–८७ सालीं कागदोपत्रीं १२ लक्ष ४४ हजारांच्या सुमारास होतें, तें सन १८९०–९१ सालीं ११ लक्ष ३४ हजारांचे सुमारास आलें, म्हणजे त्यांत अजमासें १ लक्ष १० हजार रुपये कमी झाले. परंतु वर दिलेल्या उपमेंत ज्याप्रमाणें रोगग्रस्त मनुष्याची सूज उतरल्यानें त्याचा आकार वाह्यत कमी झाल्यासारखा वाटला, तरी त्याची शक्ति वाढून परिणामीं फायदाच होतो, त्याच प्रकारें वर दर्शविल्याप्रमाणें या योजनेनें महसुलाचें उत्पन्न कमी झालें, तरी त्यापासून पुढें राज्याचा फायदाच झाला कारण नवीन महसूल एक तर नेमानें वसूल होऊं लागला व दुसरें असें कीं, पूर्वीं ज्या वेळीं जमीनीच्या मगदुरापेक्षा महसुलाचा आकार अधिक असे, त्या वेळीं ती जमीन कसणें फायदेशीर नसल्यामुळें तिच्या मालकाकडून ती पडतर टाकून देण्यांत येत असे अशा अनेक पडतर जमीनी यापुढें लागवडींत आणल्या जाऊं लागल्यामुळें त्या जमीनींवर पूर्वीं जो महसूल मुळींच वसूल होत नसे, तो यापुढें होऊं लागून राज्याच्या उत्पन्नात वाढ होऊं लागली उदाहरणार्थ, सन १८९४–९५ पासून १९०६–०७ या सालाच्या दरम्यान राज्यांतील ७,२५६ चौरस मैल इतक्या टापूंतील जवळ जवळ ब्यायशीं लक्ष बिघ्यांची मोजणी व तरमदी करण्यांत आली, व नवसारी जिल्ह्यांतील वानपूर विभागाचीच मोजणी करण्याचें तेवढें बाकी राहिलें. यामुळें अर्थातच महसुलांत निश्चितता आल्यानें एकंदरीनें राज्याचा फायदाच झाला

कमी जमीन होती; ५ ते २५ बिघे धारण करणाराची सख्या १,८५,००० होती; २५ ते १०० बिघे धारण करणारे लोक सुमारें ६५,००० होते; ६,७०० लोकाकडे १०० ते ५०० बिघ्यापर्यत जमीन होती, व ५०० बिघ्याहून अधिक जमीनीचे खातेदार राज्यात फक्त २६२ होते.

जमीनमहसुलाशिवायचे इतर सर्व वेरे अथवा कर या काळात अजीबात रद्द करण्यात आले. तथापि शेतीच्या कामासाठीं शेतकऱ्याना स्थानिक सुधारणा, दुरुस्त्या वगैरे करण्यासाठीं काहीं तरी कायमची योजना करण्याची आवश्यकता या सुमारास दिसू लागली. सडकाची दुरुस्ती, पिण्याच्या पाण्यासाठीं विहिरी व कुवे याची योजना, साडपाणी काढून लावण्याची व्यवस्था, गावातील मुलाना प्राथमिक शिक्षण देण्याची जरूरी, गावाच्या रक्षणाची तजवीज, या सर्व गोष्टी पूर्वीच्या काळीं ग्रामपचायतींकडून केल्या जात त्याचा सबध मध्यवर्ती सरकाराशीं मुळींच नसे, असें म्हटले तरी चालेल. परतु ग्रामपचायती नाहींशा झाल्यावर, मध्यतरींच्या काळात या गोष्टींची जबाबदारी धड ना गावकऱ्यावर व धड ना मुख्य सरकारावर, अशी झाली. यामुळे याबद्दलचा काहीं तरी कायमचा बदोबस्त करणें महाराजाना जरूर वाटलें. त्यानीं आपलें ध्येय आपल्या प्रजेस सुशिक्षित करून आपला कारभार कारण्यास लायक करण्याचें ठरविलें असल्यामुळें, या सुमारास आपल्या या उद्देशाचा आरभ पायापासून करून पूर्वीची ग्रामपचायतींची पद्धति पुन्हा स्थापन करण्याचें त्यानीं ठरविलें. याबद्दलचें विवेचन यापुढें करण्यात येईलच; तथापि येथें इतकें नमूद करावयाचें कीं, ग्रामपचायतींच्या पुनरुज्जीवनाबरोबरच त्या पचायतींना आपलें कार्य करण्याचें आर्थिक साधन तयार करून देण्याच्या विचारानें महाराजानीं त्यासाठीं एक स्वतत्र फड निर्माण करण्याची योजना केली, व त्याकरिता ब्रिटिश मुलखाप्रमाणें आपल्या राज्यात 'लोकल सेस' बसविण्याचें धोरण स्वीकारिलें.

या लोकल सेसचा ब्रिटिश हिंदुस्थानातील इतिहास थोडासा पाहण्या-

कारणानें व कायदेशीर रीतीनें करून दिल्याचें चौकशीअंतीं शाबीत झालें, त्यांना त्यांच्या वतनाबद्दलच्या नवीन सनदा करून देण्यांत आल्या.

या वतनदारांच्या बारखली जमीनींच्या, त्याचप्रमाणें गिरास हक्कदारांच्या जमीनींच्या तरमबंदीचा प्रश्न यानंतर ओघानेंच पुढें आला. त्याचा विचार खालसा जमीनींच्या धोरणानेंच करण्यांत आला. यांपैकीं गिरास हक्कदारांना मात्र ब्रिटिश सरकारची गॅरंटी असल्यामुळें त्यांचा प्रश्न स्वतंत्र रीतीनें बडोदें सरकारास सोडविणें शक्य नव्हतें. या कारणानें त्याबद्दल ब्रिटिश सरकार व बडोदें सरकार यांचें मिळून एक मिश्र कमिशन नेमण्यांत आलें. त्याचे अध्यक्ष त्या वेळचे रेसिडेंट कर्नल मीड हे असून, ब्रिटिश सरकारातर्फेचे इतर सभासद ॲसिस्टंट रेसिडेंट कॅप्टन् हॅरिसन, रा. ब. वाडीलाल बाळूभाई व रा. लल्लूभाई पारेख हे होते. रा. लल्लूभाई यांची नेमणूक ब्रिटिश सरकारनें गिरासियांचें म्हणणें कमिशनपुढें मांडण्यासाठीं मुद्दाम केली होती. बडोदें सरकारतर्फेच्या सभासदांत मि. सेडन, आय्. सी. एस्. सर्व्हे सेटलमेंट कमिशनर, रा. घाणेकर व रा. मिनुभाई मेढ हे होते. या कमिशनच्या अभिप्रायानुरूप उभयपक्षांत समजूत होऊन यापुढील तरमबंदीचें काम सुरळीत रीतीनें चालू झालें.

या सर्वांचा परिणाम थोडक्यांत असा देतां येईल कीं, बडोदें राज्यांतील लागवडीस येण्याजोग्या ६९,५२,२९५ बिघे जमीनींपैकीं ६०,७४,२८१ बिघे जमीन या काळांत लागवडीस आली. म्हणजे एकदर वसण्यालायक जमीनीपैकींची शेंकडा ८५ ५ इतकी जमीन प्रत्यक्ष लागवडींत आणण्यांत आली बाकीच्या जमीनीपैकीं शेंकडा १२.५ इतकी जमीन लागवडीलायक असून पडतर राहिली, ती अमरेली व कडी या प्रांतांत होती. वर दर्शविलेल्या लागवडीच्या जमीनीपैकीं सुमारें ४९ लक्ष बिघे जमीन स्वत जमीनीच्या मालकाकडून कसली जाऊन, सुमारें १२ लक्ष बिघे कुळ्याकडून कसली जात असे. या सुमाराची शेतकऱ्याची आर्थिक स्थिति थोडक्यांत खालील आकड्यावरून दिसून येईल. सुमारें ९० हजार खातेदाराकडे पांच बिघ्यांहून

व्यापारावरील निर्बंध खुला झाल्यामुळें, त्याचा उत्कर्ष होऊन राज्याचे उत्पन्न वाढेल. अथवा असें करावयाचे नसल्यास राज्यातील अतर्गत मालाच्या वाहतुकीवर जकाती बसवून त्याचें उत्पन्न ग्रामसस्थाना सोपावें, अशीहि सूचना करण्यात आली. तथापि ही सूचना अत्यत अव्यवहार्य असून, शिवाय तत्त्वत आक्षेपार्ह होती. परदेशातून येणाऱ्या मालावरील जकातीचें उत्पन्न त्या काळीं सुमारें सहा लाख असून, स्थानिक स्वराज्यसस्थाना सरकाराकडून दिली जाणारी मदत फक्त एक लक्ष पस्तीस हजार होती. अर्थात् या रकमेसाठीं सहा लक्ष रुपये घालविणें म्हणजे साडेचार लक्षाचे नुकसान सोसणें होतें. पण या व्यावहारिक नुकसानीपेक्षा तत्त्वदृष्ट्या या योजनेंत दोष असा होता कीं, अतर्गत व्यापारावरील कर पुन्हा बसविणे म्हणजे मागील वेऱ्याचीच पुनरावृत्ति काढणें होय. शिवाय परदेशातील मालावरील जकातीमुळें परदेशी व्यापाऱ्यावर तिचा बोजा पडतो, व अतर्गत जकातीचा अथवा जमीनीवरील कराचा बोजा राज्यातील प्रजेवर पडतो. ब्रिटिश हिंदुस्थानातहि याच कारणानें परदेशातील मालावरील जकात रद्द करून तिच्याऐवजीं अतर्गत जकात अथवा जमीनीवरील कर बसविण्याच्या विरुद्ध लोकमन फार वर्षांपासून असे लॉर्ड कॅनिंगच्या वेळेपासून ही तक्रार सुरू होती लॉर्ड लॅरेन्स या व्हाईसरॉयानें तर यासबधानें स्पष्ट लिहिलें होतें कीं, इग्रज व्यापारी लोकाचें स्टेट सेक्रेटरीपाशीं फार वजन असल्यानें, परदेशातील मालावरील जकात हिंदुस्थान सरकाराला ठेविता येण्यास कठिण पडतें. तथापि त्यानें या बाबतींत थोडीशी सुधारणा करण्याचा प्रयत्न केला. पण त्यानतर लॉर्ड मेयोनें पुन्हा विलायती व्यापाऱ्याच्या वजनाखालीं दबून जाऊन, जमीनीवरील कर बसविले! ब्रिटिश हिंदुस्थानातील परिस्थितीमुळें तेथें ही गोष्ट अपरिहार्य असली, तरी ती देशी राज्यात येणें अनिष्ट होतें व म्हणून महाराजानीं कोणताहि जमीनीवरील नवा कर बसविण्याचें नाकारिलें.

यानतरचा महाराजापुढील प्रश्न म्हणजे प्रजेवरील कराच्या समी-

सारखा आहे. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यास मुंबई इलाख्याचा सर्व्हे कामदार कॅप्टन विन्गेट यानें खेडेगावांतील लोकांची स्थिति सुधारण्यासाठीं एखादा फंड असण्याची आवश्यकता सरकारपुढे मांडिली व दर रुपयामागें एक आणा या कार्यासाठीं जमीनमहसुलाबरोबरच वसूल करण्याची शिफारस केली. ही शिफारस मुंबई सरकारनें तत्वत मान्य केली, पण तिची बजावणी मात्र केली नाहीं. यानंतर दहा वर्षांनीं जोनॅथन् डंकन यानेंहि अशाच प्रकारची योजना रूजू केली, परंतु तीहि त्या वेळीं तशीच पडून राहिली. पण सन १८६३ सालीं मात्र तिचा अमल करण्यात आला. या सालीं मुंबईचे गव्हर्नर सर बार्टल् फ्रिअर यानीं खेडेगावांतून जागोजागीं स्थानिक कमिट्या स्थापन करून, रुपयास एक आण्याप्रमाणें कर वसूल करण्याचा अधिकार त्यांना दिला. परंतु कांहीं ठिकाणीं या अधिकाराला लोकांकडून विरोध केला गेल्यामुळें, सन १८६९ सालीं एक कायदा मंजूर करून 'लोकल सेस फंड' कायम करण्यात आला. या फंडाचा विनियोग वर दर्शविल्याप्रमाणें स्थानिक कार्यासाठींच करण्याचें निश्चित करण्यात आलें.

याच धोरणानें सन १८९५ सालीं महाराजांनीं आपल्या राज्यात लोकल सेस वसूल करण्याचें ठरविलें. प्रथम प्रथम हा फंड जमीनमहसुलांतच जमा करण्यात येत असे, पण पुढें तो स्वतंत्र ठेवण्यात येऊ लागला. या कराचें उत्पन्न सन १९०३-०४ सालीं तो सार्वत्रिक केला गेल्यावेळीं सुमारें अडीच लक्ष होतें, तें सन १९१०-११ चे सुमारास, म्हणजे सात वर्षांत सुमारें साडे सहा लक्षांपर्यंत वाढलें. हें उत्पन्न याहूनहि अधिक वाढून त्याचा फायदा स्थानिक स्वराज्यसंस्थांना मिळावा, यासाठीं या राज्यात परराज्यातून येणाऱ्या मालावरील जकात कमी करून, त्याच्याबद्दल लोकल सेसशिवाय आणखी कांहीं कर जमीनीच्या उत्पन्नावर बसवावे, अशी एक सूचना महाराजांना या सुमारास करण्यांत आली, व तिच्या समर्थनार्थ असें कारण दाखविण्यात आलें कीं, असें करण्यानें

त्यानंतर मादक पदार्थांवरील करांत सुधारणा करण्यांत आली. त्यांतील मुख्य पदार्थ म्हणजे विलायती व देशी दारू आणि अफू हे होत. यांपैकीं अफूसंबंधाचें धोरण सर्वस्वीं परावलंबी असल्यामुळें, त्यासंबंधानें बडोदें सरकारास स्वतंत्र रीतीनें कांहीं करण्याजोगें नव्हतें. मागील एका प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें राज्यांत ठराविक प्रमाणांत अफूच्या लागवडीचे परवाने देण्यांत येऊन, त्या परवानेदारांपासून अफूचा रस विकत घेऊन त्याची सिद्धपूर येथें अफू बनवावयाची, व मग ती विकण्याचे मक्ते दुकानदारांना द्यावयाचे, हीच पद्धति चालू ठेवण्यांत आली होती. परंतु या मध्यकालाच्या अखेरीनंतर लवकरच हिंदुस्थान सरकारनें चीनमधील अफूची निर्यात कमी करण्याचें धोरण स्वीकारिलें व पुढें सन १९२३ च्या सुमारास ती निर्यात अजीबात बंद करण्याचा हुकूम केला. याबद्दलची हकीकत मागें दिलीच आहे. त्यामुळें राज्याच्या उत्पन्नास पुष्कळ नुकसान आलें आहे. दुसरी मुख्य बाबत दारूसंबंधाची होय. या बाबतींत दारूवर अधिक कर बसवून उत्पन्न वाढविण्यांत आलें. तथापि या अनीतिवर्धक चालीचा प्रसार शक्य तितका कमी व्हावा, या हेतूनें दारूचीं दुकानें शक्य तेथें कमी करण्याचें धोरणहि अमलांत आणिलें गेलें. दारूच्या प्रसारापासून होणाऱ्या उत्पन्नाविरुद्धची तक्रार कांहीं एकट्या बडोदें राज्याविरुद्ध करण्यासारखी नाहीं. ती सार्वत्रिक आहे. तथापि बडोदें राज्यासंबधानें इतकें मात्र विशेष सांगण्यासारखें आहे कीं, या राज्यांत दारूबंदीचें धोरण स्वीकारू म्हटलें, तरी तें त्या राज्याच्या भौगोलिक परिस्थितीमुळें अमलांत आणणें सर्वस्वीं अशक्य आहे. मागें सांगितल्याप्रमाणें बडोदें राज्याचे केवळ प्रांतच ब्रिटिश प्रांताच्या सरहद्दीला लागून आहेत असें नव्हे, तर त्यांतील तालुके व त्यांच्याहि पलीकडे जातां, त्यांतील गांवेंहि ब्रिटिश गांवांना लागून आहेत. यामुळें जोंपर्यंत ब्रिटिश मुलखांत संपूर्ण दारूबंदीचें धोरण स्वीकारलें जाऊन सर्व दारूचीं दुकानें बंद करण्यांत आलीं नाहींत, तोंपर्यंत बडोदें

करणाचा होता. पूर्वीच्या काळीं सुतार, सोनार, बारीकसारीक व्यापारी उदमी, दूधवाले, भाजीवाले, वगैरेसारख्या गरीब लोकांवर अनेक प्रकारचे कर बसविले असल्याचें वर्णन वर केलेंच आहे. त्या वेळीं त्याच्याहून अधिक श्रीमंत लोक मोकळे सोडले जात. यानंतर हे सर्व वेरे क्रमाक्रमानें रद्द करण्यात येऊन फक्त शेतीपासून उत्पन्न काढणाऱ्या लोकांकडूनच लोकल सेस वसूल करण्यात येऊ लागला. यामुळें यापुढेंहि शेती न करणारे अधिक उत्पन्नाचे लोक कोणत्याहि प्रकारच्या करापासून मोकळेच राहिले. वस्तुत राज्यांतील सुरक्षिततेचा फायदा सर्व प्रजाजनांना आपआपल्या चढत्या प्राप्तीच्या मानानें अधिकाधिक मिळत असल्यामुळें, त्या प्रमाणांत सर्व लोकांनीं राज्याच्या खर्चाची जबाबदारी करदानाच्या रूपानें स्वीकारिली पाहिजे, हें *सुधारलेल्या राज्यव्यवस्थेचें सर्वमान्य तत्त्व आहे.* त्यामुळें अशा अधिक उत्पन्नाच्या लोकांनीं आपल्या प्राप्तीचा थोडासा हिस्सा राष्ट्राला देणें योग्य आहे, असें महाराजांनीं ठरविलें व या दृष्टीनें ऐपत वेरा (Income-tax) बसविण्याची एक योजना तयार केली. या ऐपत वेऱ्याचें मुख्य तत्त्व हें होतें कीं, *कमी उत्पन्नाच्या लोकांना या कराची माफी मिळून,* तो फक्त समृद्ध लोकांकडूनच वसूल केला जावा या दृष्टीनें या कराच्या आकारणी साठीं स्वीकारलेल्या किमान उत्पन्नाच्या मर्यादेंत अनेक वेळा फेरबदल करण्यात आला अगदीं आरंभीं फक्त १०० रुपयांहून कमी उत्पन्न असणाऱ्या लोकांनाच या कराची माफी असे, पण पुढें ती किमान मर्यादा तीनशें, त्यानंतर पाचशें व अखेर साडेसातशें करण्यांत आली. तसेंच प्रथमतः या करापासून वतनदार, आसामदार लोकांना माफ करण्यात आलें होतें, ती माफी पुढें काढून टाकण्यात आली. सन १९०८ च्या फेब्रुआरी महिन्यात यासंबंधाचा कायदा घडण्यात आला, व त्याचे अंगभूत नियम वगैरे तयार झाल्यावर तो कायदा सर्व राज्यास त्या साली ऑगस्ट महिन्यापासून लागू करण्यात आला. अशा प्रकारें कराच्या समीकरणाचा प्रश्न सोडविण्यात आला.

*अशा रीतीनें राज्यांतील करांच्या बाबतींत,*

**'साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ।'**

अशा प्रकारचें समत्वाचें धोरण स्वीकारण्यांत आल्यानें, राज्याच्या उत्पन्नांत त्यामुळें स्थैर्य व निश्चितता प्राप्त झाली.

वर दर्शविल्याप्रमाणें करांच्या बाबतींत सुधारणा करण्यांत आली, तथापि राज्यांत उत्पन्नाचीं नवीन साधनें तयार केल्याशिवाय त्यांच्या संपत्तींत खरी भर पडली असें म्हणतां येणार नाहीं. कांहीं करांचा बोजा प्रजेंतील एका वर्गावरून कमी करून तो बोजा सहन करण्यास समर्थ अशा वर्गावर टाकण्यानें तो सह्य होतो, व या फेरबदलींत सरकारचा फायदा होतो हें खरें. तथापि यामुळें राष्ट्रीय संपत्तीची वाढ होत नाहीं. एका परातींत बुंदीचे लाडू शीग लागेपर्यंत ठेविलेले होते, ते तेथून उचलून दुसऱ्या परातींत ठेविले व तेथून तिसरींत ठेविले; असें करण्यानें ते लाडू उचलतांना त्यांच्या पडलेल्या कळ्यांचा लाभ उचलणाऱ्याला होऊं शकला; तथापि त्यामुळें लाडूंच्या संख्येंत वाढ होऊं शकली नाहीं; या गमतीच्या प्रकाराप्रमाणेंच करांच्या पुनर्व्यवस्थेचा प्रकार झाला. या कारणानें संस्थानाची संपत्ति वाढविण्याचे अन्य प्रकार महाराजांनीं योजिले. पडतर पडलेल्या जमीनींना सवलतीचे दर देऊन त्या करणाऱ्यांना तगावी देऊन अशा जमीनी लागवडीस आणण्यांत आल्या. सन १८८७ सालींच बडोदें कॉलेजला जोडलेल्या वर्गांतून दिल्या जाणाऱ्या शेतकीच्या शिक्षणाला प्रयोगक्षेत्र म्हणून एका नमुनेदार शेताची स्थापना करण्यांत आली, व त्यावर सन १८९० सालीं रा. खासेराव जाधव या परदेशांतून शेतकीचें शिक्षण घेऊन आलेल्या गृहस्थांची तज्ज्ञ म्हणून नेमणूक करण्यांत आली. या शेतांत नवीन हत्यारें, खतें, बीं, वगैरे आणवून, त्यांच्या लागवडीचे भिन्न भिन्न प्रयोग करण्यांत आले. राज्यांत इतर ठिकाणींहि या साधनांच्या वखारी स्थापण्यांत आल्या. पिकांना लागणारी कीड काढून टाकण्यासाठीं शास्त्रीय प्रयोग करण्याची व्यवस्था करण्यांत आली. यानंतर सन

राज्यातील गावातून काहीं पावलें दूर जाऊन ब्रिटिश हद्दींतून दारू पिऊन परत बडोद्याच्या हद्दींत येणें अगदीं सुलभ आहे. अशा स्थितींत अर्थातच बडोदें राज्यानें आपलें उत्पन्न नाहक घालविणें चुकीचें होईल. सांप्रत-काळीं या बाबीचें उत्पन्न हें राज्यातील एकदर उत्पन्नाचा एक मोठा भाग होऊन राहिलें आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. तथापि जोंपर्यंत एवढ्या मोठ्या उत्पन्नाची जागा भरून काढण्याचें दुसरें साधन उपलब्ध होण्या जोगें नाहीं, तोंपर्यंत या उत्पन्नाची बाबत म्हणजे एक अपरिहार्य अशी अनिष्ट गोष्ट आहे, असें मानल्यावाचून गत्यंतर नाहीं.

यानंतर राज्याच्या अंतर्गत व्यापारावरील निर्बंध दूर करून त्याची वाढ करण्यासाठीं राज्यात उत्पन्न होणाऱ्या वस्तूंवरील जकाती कमी करून राज्याची आर्थिक संपत्ति वाढविण्याचा प्रयत्न करण्यात आला. त्याचप्रमाणें लोकांच्या कायदेशीर व्यवहारापासून स्टँप व नोंधणीच्या साधनानेंहि उत्पन्नात वाढ करण्यात आली. सन १८८९ सालीं सुधारलेला स्टँप निबंध अमलात आला, त्या वेळीं बडोद्याच्या महाजन लोकांनीं हरताळ पाडिला होता, त्याबद्दलची हकीगत त्या वेळच्या दिवाणानीं महाराजांना कळविल्यावरून त्यानीं दिवाणास पाठविलेल्या जबाबात लिहिलें होतें कीं,

> "तुम्हास माहितच आहे कीं, आमचे सर्व प्रयत्न प्रजेवरील कराचा बोजा कमी करण्याबद्दलचे आहेत त्यासाठीं आम्हीं अनेक निरुपयोगी कर कमी केले आहेत अशा स्थितींत वाजवी कर घेण्याचें आम्हीं ठरविल्यास, ती गोष्ट जनहिताची म्हणून कबूल करण्याऐवजीं तिला विरोध करण्यांत लोक वेडेपणा करीत आहेत. वस्तुत अशा काय याचा हेतु नीट समजून घेऊन, फक्त काहीं लोकावर बसविलेल्या असल्या हलक्या कराना विरोध करण्यास लोकांनीं सुरवात केली, तर राज्यकारभार चालणेंच अशक्य होईल"

तथापि लोकांचा हा विरोध लवकरच निवळला. यानंतर वीस वर्षांनीं सन १९०८–९ च्या सुमारास नवा स्टँप अॅक्ट घडण्यांत आला.

सारखी उन्नति होऊं शकत नाहीं तथापि उद्योगधद्याना मदत होण्या साठीं भाडवल पुरविण्याची व्यवस्था मात्र सन १९०८ सालीं स्थापन झालेल्या बडोदा बँकेच्या द्वारें करण्यात आली या बँकेच्या स्थापनेच्या वेळीं महाराजानीं केलेल्या भाषणात आपला मुख्य उद्देश हाच असल्याचें सागितले आहे ते म्हणाले –

"अशा प्रकारच्या बँकेनें लोकाना उसनवार रकमा देण्याची, आपल्या शिलकी रकमा तींत ठेविण्याची, व एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं रकमा पोंचविण्याची सोय होणार असल्यामुळें, त्यायोगे या राज्यातील व्यापाराला, उद्योगधद्याना व कलाकौशल्याला पुष्कळ मदत होईल"

अशा रीतीनें व्यापार व उद्योगधद्याना भाडवल पुरविण्याची व्यवस्था करण्यात आली, त्याबरोबरच रेल्वेचें जाळें सर्व राज्यभर पसरवून वाहतुकीचें साधन वाढविण्यानेंहि व्यापाराला पुष्कळ मदत करण्यात आली किंबहुना रेल्वेचा प्रसार हा महाराजाचा आवडता विषय आहे, असें म्हटलें तरी चालेल वडोदें राज्यातील जमीन सर्वत्र मऊ व भुसभुसीत असल्यामुळें, त्यात पक्क्या सडका बाधणें फार कठिण जातें म्हणून सडकाऐवजीं रेल्वेचे रस्ते बाधणें, हेंच परिणामीं अधिक फायदेशीर होतें रेल्वेमुळें मालाची नेआण स्वकर होऊन, ती मोठ्या प्रमाणावर होऊ शकते म्हणून या खात्यावर विशेष भर देण्यात आला सन १९१०–११ अखेर राज्यात रेल्वेखात्यानिमित्त एकदर खर्च १९ लक्ष ५४ हजार रुपये करण्यात आला अशा प्रकारें राष्ट्रातील सपत्ति वाढविण्याचे प्रयत्न या मध्यकालात महाराजाकडून करण्यात आले

व्यक्तीचा काय, अथवा राष्ट्राचा काय, जमाखर्च सुधारताना नवीन आवक कशी होऊं शकेल याकडे ज्याप्रमाणें लक्ष द्यावें लागतें, त्याचप्रमाणें गैरवाजवी व अनाठायीं होणारा खर्च कमी कसा करता येईल, याचाहि विचार करावा लागतो महाराजानीं जमेची बाजू वाढविण्याचे प्रयत्न कम

१८९७ ९८ सालीं शेतकीचें एक खातें मातें मुख्की खात्याच्या अगमून वेगळे काढून उघडण्यात आलें व त्याच्या देखरेखीखालीं सर्व राज्यभर शेतकऱ्यांना अवश्य ती माहिती पुरवून मदत करण्याची व्यवस्था करण्यात आली.

शेतीची वाढ होण्यासाठीं पाण्याच्या पुरवठ्याची योजना मुख्यत्वें व्हावयास हवी विशेषतः हिंदुस्थानासारख्या अनिश्चित पावसाच्या देशांत शेतकरी ऐशीं लोकांचें जीवित सर्वस्वीं अवलंबून राहतें. यासाठीं कालवे, तलाव, विहिरी, इत्यादींच्या रूपानें शेतीसाठीं पाण्याचा मुबलक पुरवठा असणें जरूर आहे परंतु या कामाला गुजराथ प्रांत बहुतांशीं अयोग्य असा आहे. तेथील जमीन अगदीं सपाट असल्यामुळें व पावसाचें मान बेताचेंच असल्यामुळें, पावसाचें पाणी साठवून ठेविण्याची सोय करणें जवळ जवळ अशक्य आहे. फक्त ठिकठिकाणीं विहिरी खोदवून शेतास पाण्याची सवड करून देणें शक्य आहे व म्हणून त्याच दृष्टीनें राज्यात पुष्कळ प्रयत्न करण्यात आला.

याशिवायच हिंदुस्थानातील शेतकऱ्याच्या परंपरागत दारिद्र्याला आळा घालण्यासाठीं सहकारी पेढ्याची स्थापना करण्याची योजना या काळात हातीं घेण्यात आली अशा प्रकारची पहिली पेढी १९०४–५ सालीं स्थापन केली गेली. सन १९१०–११ च्या वार्षिक अहवालात अशा सहकारी संस्था १२४ असून, त्यांचे २८२५ सभासद असल्याचें व या सर्व पेढ्यांचें मिळून २ लक्ष रुपयांचें भांडवल असल्याचें नमूद करण्यात आलें आहे

शेतीसंबंधीच्या सुधारणाप्रमाणेंच औद्योगिक सुधारणाकडेंहि महाराजांना लक्ष दिलें, तथापि या बाबतींतहि बडोद्याची परिस्थिति व्यापारवृद्धीला प्रतिकूळ असल्याचें अनुभवास आलें बडोद्याच्या उत्तरेस अहमदाबाद व दक्षिणेस सुरत व भडोच, हीं व्यापाराचीं मोठालीं केंद्रें बडोद्याचा उत्कर्ष होण्यापूर्वीच भरभराटींत असल्यामुळें, गुजराथेंतील सर्व व्यापार परंपरेनें तिकडे खेंचला जातो, यामुळें या बाबतींत या राज्यात म्हणण्या-

केले, त्याबद्दलचें विवेचन आतापर्यंत केलें. त्याचप्रमाणें विनाकारण होणारा फाजील खर्च अटकाविण्याचा प्रयत्न त्यांनीं कसा केला, याबद्दलची हकीकतहि येथें नमूद केली पाहिजे. अशा खर्चापैकींची प्रमुख बाबत म्हणजे दानधर्माच्या नांवानें होणारा खर्च·ही होय. या बाबतींत खर्च कमी करताना महाराजावर जितकी टीका करण्यांत आली, तितकी इतर बाबतींत क्वचितच केली गेली असेल. कदाचित् ही टीका प्रसिद्ध रूपानें करण्यात आली नसेल; तथापि ती करण्यांत आली, ही गोष्ट निर्विवाद आहे व तसें होण्याचें कारणहि स्वाभाविक होतें. हिंदुधर्मांत व्यवहाराची सांगड धार्मिक कल्पनाशीं घातली गेली असल्यामुळें, व्यावहारिक बाबतींत सुधारणा करताना धार्मिक भावनाना धक्का लागण्याचा संभव बराच राहतो. फार प्राचीन काळापासून दानधर्मानें पुण्यप्राप्ति होत असल्याची कल्पना हिंदुसमाजात रूढ झाली आहे. किंबहुना तिचें मूळ ऋग्वेदापर्यंत खोल गेलेलें आहे. ऋग्वेदातील दहाव्या मंडळाच्या ११७ व्या सूक्तात दान करणाऱ्या पुरुषाची फार स्तुति केलेली आहे. तींत म्हटलें आहे कीं,

'जशीं रथाचीं चाकें निरंतर एका जागीं रहात नाहींत, तसें द्रव्य हेंहि एकाजवळ रहात नाहीं. तें नेहमीं एकाजवळून दुसऱ्याजवळ जात असतें. यासाठीं मनुष्यानें नेहमीं दान करीत असावें. निर्जीव नांगर हा स्वतःला जमीनींत रोवून घेऊन कृषकाला धान्याचें दान देतो. चाकर हा स्वत कष्ट करून धन्यास धन प्राप्त करून देतो; व लहानपणापासून अध्ययनाचे श्रम करून विद्वान झालेला ब्राम्हण इतराना ज्ञानदान करितो. त्यामुळें हे तिघेहि लोकाना प्रिय होतात. तद्वतच दाता हाहि सर्वांना प्रिय होतो. म्हणून हे इंद्रा, तूं आम्हास द्रव्याचें दान करण्यास समर्थ कर.'

अशा प्रकारें या सूक्तात द्रव्यदानाची प्रशंसा करण्यांत आली आहे. यानतरच्या काळात धार्मिक कृत्यांचा सर्व भार ब्राम्हणवर्गावर टाकिला

खरेदी वगैरे मार्गानें व्यवस्था करण्यात येऊ लागली व जेथें अशी व्यवस्था होत नव्हती, तेथेंहि त्या उत्पन्नाचा उपयोग खाजगी प्रपचाकडे करण्यात येत असे ही स्थिति केवळ हिंदूच्याच बाबतींत होती असें नव्हे, तर खंडेराव महाराजाच्या कारकीर्दीत मुसलमानाना दिलेल्या वतनाच्या बाबतींतहि होती. यामुळें खुद्द खंडेराव महाराजानींहि अशा वतनाबद्दलची चौकशी करून त्याच्यावर उत्पन्नाच्या दर रुपयामागें दोन आणे याप्रमाणें कर घेण्याचा हुकूम केला होता. परतु त्या हुकुमाची बजावणी मात्र झाली नाहीं त्यानतर सर टी. माधवराव यानीं आपल्या दिवाणगिरींत याबद्दलची चौकशी पुन्हा करून असा हुकूम सोडला कीं, सन १८६० पर्यंत दिलेलीं अशा प्रकारचीं वतनें चालू ठेविण्यात यावीं व त्यानतरच्या वतनाच्या योग्यायोग्यतेचा तपास करून त्या धोरणानें तीं वतनें कमी अधिक प्रमाणात चालवावीं तथापि अशा चौकशीनेंहि या प्रश्नाला खरा हात घातला गेला नाहीं. त्यानतर महाराजाना अधिकार मिळाल्यावर नवीन स्थापन केलेल्या बारखळी खात्यामार्फत अशा वतनाची तपासणी करण्यात आली. त्यात असे निष्पन्न झालें कीं, देवस्थानापैकींचीं कित्येक सर्वस्वीं सरकार मदतीनें चालविलीं जात असून, इतराना सरकारकडून अशन मदत मिळत असे पहिल्या प्रकारच्या देवस्थानाना सार्वजनिक देवस्थानें म्हणत व दुसऱ्याना खासगी देवस्थानें म्हणत. या दुसऱ्या प्रकारच्या खासगी देवस्थाना पैकींचीं कित्येक तर द्रव्याच्या आशेनें खासगी घरात मूर्तीची स्थापना करून त्याना मदिराचें नाव देऊन केलेलीं असत अशा प्रकारच्या मदिरातील मूर्तींच्या सख्येंत अधिक पैसे मिळविण्यासाठीं वाढहि करण्यात येत असे या दोन्ही प्रकारच्या देवस्थानातून उत्पन्नाचा व खर्चाचा हिशोब ठेविला जात नसे त्यामुळें त्यात होणारा खर्च कोणत्या कार्यासाठीं केला जाई, तो किती केला जाई, त्यापैकींचा किती भाग मूळ उद्देशाला धरून असे, व किती खाजगी उपयोगासाठीं केला जाई, याबद्दलची माहिती मिळणें अशक्य होतें यामुळें अशा सस्थाचें नियमन करण्यासाठीं

व्यतिरिक्त गरीब लोकांसाठीं अन्नछत्रें चालविण्याकरिताहि मंदिरांना गांव अथवा जमीनी करून देण्यांत येत असत. अशा मंदिरांपैकीं मनगोळी, बागेवाडी, हेसर्गे, इनळ, गदग, नीलगुद, वेट्टी, खारेपाटण वगैरे स्थानांचीं दानपत्रें उपलब्ध झालीं आहेत. परंतु उत्तरोत्तर ह्या नियोजित कामाकडे दिलेल्या उत्पन्नातून खर्च कमी होऊं लागून, तो दान घेणाऱ्याच्या प्रपंचाकडेच होऊं लागला. ही स्थिति इंग्रजी अमल सुरू होई-पर्यंत तशीच चालू राहिली. त्यानंतर या परिस्थितींत एकदम मोठा फरक पडला. पूर्वीचें संस्कृत शिक्षण या काळांत मागें पडून, त्याची जागा इंग्रजी शिक्षणानें घेतली; दिवसेंदिवस जीवनकलह अधिक कठिण होऊन त्यांत तगण्यासाठीं पाश्चात्यांचीं साधनें व त्याची विद्या अनु-करण्याची जरूरी अधिकाधिक भासूं लागली. अर्थात् अशा स्थितींत जुन्या पद्धतीचें वैदिक व पौराणिक शिक्षण देऊं म्हटलें, तरीहि तें घेणारा विद्यार्थीवर्ग दिवसेंदिवस कमी होऊं लागल्यानें, विद्यार्जनासाठीं दिल्या गेलेल्या दानाचा उपयोग मूळच्या उद्दिष्ट कार्यासाठीं होईनासा झाला. अशा वेळीं तीं दानें व ते अग्रहार देणारे दाते जीवंत असते, तर त्यांनींहि आपला मूळ उद्देश पार पाडण्यासाठीं दिलेल्या दानाच्या व अग्रहाराच्या उत्पन्नाचा ओघ बदलण्याची सूचना केली असती. ही गोष्ट ज्याप्रमाणें कायमच्या वतनांना लागू होते, त्याचप्रमाणें ती वैयक्तिक दानधर्मालाहि लागू होते. त्यामुळें ज्या दानाचा हेतु, त्याचें पात्र व त्याचा काल हीं योग्य नाहींत, तें दानहि योग्य नव्हे, असें भगवद्गीतेच्या वचनाप्रमाणें म्हणणें क्रमप्राप्त होतें.

या दृष्टीनें बडोद्यांतील पूर्वीच्या हकीकतींकडे पाहतां असें दिसून येतें कीं, येथेंहि मंदिरें, मठ, समाधी, पीरस्थानें, कबरस्थानें वगैरेकरितां कायमचीं वतनें करून देण्याचा प्रघात पडलेला होता. परंतु त्या वतनाचा उपयोग बऱ्याच ठिकाणीं मूळ हेतूप्रीत्यर्थ न होता, तें वतन म्हणजे स्वतःची खाजगी मिळकत आहे असें समजून त्याची गहाण,

पेशवाईपासून चालत आलेली आहे. पुण्यास पर्वतीजवळील रमण्यात हजारों ब्राह्मणाना अशी दक्षिणा प्रतिवर्षी देण्यात येई. तोच प्रघात बडोदें राज्यातहि चालू केला गेला होता. त्या संबधाचे मागील दाखले पाहता असें निघतें कीं सन १७८० ते १७८५ च्या दरम्यान या राज्यात विद्वान व अविद्वान अशा दोन्ही प्रकारच्या ब्राह्मणाना मिळून सुमारें तीन हजार ते सात हजारापर्यंतची दक्षिणा प्रतिवर्षी वाटण्यात येई. हा आकडा सन १७९५ सालीं अजमासें सतरा हजारापर्यंत गेला. याचे कारण त्या वेळचे महाराज गोविंदराव यानीं स्वत ला मिळत नसलेली गादी मिळाल्याबद्दल दानधर्म म्हणून इतकी रक्कम खर्च केली होती यानतर सन १८०२ सालीं विद्वान ब्राह्मणाना विशेष दक्षिणा देण्याचा प्रघात सुरू करण्यात आला व सन १८०८ सालीं अशी दक्षिणा परप्रातस्थ दूरदूरच्या विद्वानानाहि देण्यास सुरुवात झाली. अशा रीतीने ही रक्कम पुगत चालली, ती मल्हाररावाच्या कारकीर्दींत पाऊण लाखापर्यंत गेली! त्यानतर सर टी माधवराव याच्या अमदानींत ती कमी करण्यात आली, तरी ती बासष्ट हजारापर्यंतच आणण्यात आली. पुढे महाराज गादीवर आल्यावर त्यानीं १८९२ सालीं या प्रकरणीं तपास करण्यासाठीं एक कमिटी नेमिली तिच्यात इग्रजी शिक्षण घेतलेले पदवीधर विद्वान व जुन्या पद्धतीचे शास्त्री पडित अशा दोन्ही प्रकारचे सभासद नेमण्यात आले होते. त्यानीं केलेल्या शिफारशींवरून महाराजानीं सन १८९४–९५ सालीं या सबधाचे नियम केले. त्यात श्रावणमासात प्रतिवर्षी निरनिराळ्या विषयात उमेदवाराची परीक्षा घेण्यात यावी, व त्यात प्रशस्तिपत्रें मिळविणारानाच दक्षिणा देण्यात यावी, असा नियम करण्यात आला. अशा रीतीनें एक वेळ परीक्षेंत पास झालेल्या पडिताना मिळणारी दक्षिणा पुढें पाच वर्षेपर्यंत पुन्हा परीक्षा दिल्याशिवाय मिळत राहण्याची व्यवस्था तेव्हा करण्यात आली; पण त्यानतर ही पाच वर्षाची मुदत कमी करून तीन वर्षावर आणण्यात आली, व अलीकडे तीहि कमी करून दरवर्षीच्या परीक्षेंत पास होणाराना त्या-

महाराजांनीं 'सार्वजनिक संस्था संबंधीचा कायदा' करून, या वतना पैकींचा जितका भाग मूळ हेतूला धरून खर्च करण्यात येत असे तितका कायम ठेऊन, बाकीचा कमी करण्याचे हुकूम केले त्याचप्रमाणें ह्या सर्व देवस्थानांची देखरेख बारखळी खात्याकडे देऊन, दर वर्षारंभीं त्याच्या खर्चाबद्दलचें अंदाजपत्रक तयार करून तें या खात्यानें मंजूर करावें असा नियम केला व त्याप्रमाणें खर्च होत आहे किंवा नाहीं हें पाहण्याची जबाबदारी त्या खात्याकडे टाकली ज्या देवस्थानांना अंशत सरकारी मदत दिली जात असे, त्याच्यावर बारखळी खात्यानें नेमलेल्या पंचाच्या समितीची देखरेख असावी व हे पंच ज्या जातीच्या लोकांचा भरणा मुख्यत त्या मंदिरातील सेवकांत असेल, त्या जातींतूनच निवडले जावेत, असा निर्बंध घातला वर वर्णन केलेल्या सर्वस्वीं अथवा अंशत सरकारी मदतीनें चाललेल्या देवस्थानांशिवाय ज्यांना बिलकुल सरकारी मदत मिळत नसे, अशीं खाजगी देवस्थानें अथवा मंदिरेंहि असत तीं एखाद्या व्यक्तीनें स्थापन केलेलीं असत, तथापि पुढें पुढें त्याचा उपयोग केवळ एक उत्पन्नाचें साधन म्हणून केला जात असे लोकांच्या धर्म बुद्धीचा फायदा घेऊन त्याच्याकडून मिळालेल्या भेटींवर आपला प्रपंच चालविणें, म्हणजे पर्यायानें त्या देवतेचा विक्रय करणेंच होय तथापि जेथपर्यंत अशा देवस्थानांतून अनीतीचे प्रकार अथवा उघड उधळपट्टी चालत नाहीं, तेथपर्यंत सरकारनें त्याच्या व्यवस्थेंत हात घालू नये व वरील प्रकार दिसून आले, तरच धर्मनियामक या नात्यानें राजकर्तव्य म्हणून असले प्रकार बंद करण्याची व्यवस्था करण्यात यावी, असें धोरण घालून देण्यात आलें

यानंतरचा दानधर्माचा प्रकार म्हणजे ब्राह्मणांना दिली जाणारी दक्षिणा ही होय श्रावणमासात विद्वान ब्राह्मणांना त्यांनीं प्राचीन विद्या व संस्कृति कायम ठेविण्याच्या कामीं केलेल्या व करीत असलेल्या परिश्रमाचा मोबदला म्हणून, दक्षिणा देण्याची पद्धति मराठी राज्यात

वाजे ठेवलेले होते. पाच हजार मनुष्याचा समावेश होईल इतकी ही जागा विस्तृत होती. उत्तरेचा दरवाजा सकाळीं आठ वाजता उघडण्यात येत असे. तेथें दरवाज्याजवळ तादूळ व डाळ याच्या मिश्रणाचे ढीग केलेले असत. जो कोणी दरवाज्यात येईल त्याच्या पदरात एक ओगराळें भरून तेथील कोतवाल खिचडी घालीत असत. याप्रमाणें रात्रीं दहा वाजेपर्यंत हें खिचडी वाटण्याचें काम चालत असे. ही खिचडी विकत घेणारे व्यापारीहि तेथेंच असत. ते खिचडी घेऊन भावाप्रमाणें त्याचे पैसे रोख देत असत."[1]

हिंदूना खिचडी दिली जाई, त्याप्रमाणे मुसलमानाना शिजविलेला भात व त्याबरोबर कधीं कधीं मास देण्यात येई, त्याला ग्यारमी असे म्हणत. या दोन्ही बाबतींवर होणारा खर्च लाखों रुपयापर्यंत जाई. मागील एका प्रकरणात सागितल्याप्रमाणें, दुष्काळासारख्या अपवादाच्या प्रसगीं या खिचडीसारख्या दानापासून फायदा झाला असला, तरी एरव्हीं त्यापासून रिकामटेकड्या ऐतखाऊचा भरणा पोसला जाऊन निरुद्योगीपणाला एक प्रकारें उत्तेजन मिळत असे त्यामुळें हा प्रकार बद करण्याचें महाराजानीं ठरवून, खिचडी घेणाऱ्याच्या लायकीची चौकशी करविली व त्यापैकींचे जे खरे गरीब आढळून आले, त्याना पास देण्यात येऊन ही खिचडी देण्याचे चालू ठेविलें व इतराची बद करण्याचा हुकूम केला. हें काम सुरुवातीस बडोदें म्युनिसिपालिटीला सोपण्यात आलें होतें, परतु तिच्याकडून तें चागल्या रीतीनें होऊ न शकल्यामुळें पुढें तें सरकारी खात्यामार्फत करविलें जाऊ लागलें. त्यानतर ही खिचडी धान्याच्या रूपानें न देता तिच्या किंमतीच्या रोकड रूपानें देण्यात यावी असा हुकूम करण्यात आला व ही रक्कम मिळणारा इसम मयत झाला म्हणजे अर्थातच त्याची रक्कमहि बद व्हावी, असें ठरविण्यात आलें. अशा रीतीनें व्यवस्था करिता सन १९१० चे सुमारास खिचडीची रक्कम मिळणाऱ्या लोकाची

१ एका शिपायाचें आत्मवृत्त, पृष्ठ ३२९

वर्षापुरतीच दक्षिणा देण्यांत येते. यामुळें आपलें अध्ययन ताजें ठेवण्याची जबाबदारी या पंडितांवर टाकिली जाते. अशी व्यवस्था करण्यांत आली, त्याबरोबरच या दक्षिणेची श्री. मल्हाररावांच्या वेळीं खर्च होणारी रक्कम कमी करून ती या कालमागांत आठ हजारांवर आणण्यांत आली व अलीकडे ती पांच हजारांवर आणिली गेली आहे. या परीक्षांना दूर-दूरचे शास्त्री पंडित उमेदवार म्हणून येनात. त्यांत नजीकच्या गुजराथ व महाराष्ट्र या प्रांतांखेरीज बिहारमधील मैथिल ब्राह्मणांचा व मद्रास व आंध्र प्रांतांतील तामिळ व तेलगू विद्वान ब्राह्मणांचा भरणा अधिक असतो. या परीक्षेसाठीं वेदपाठ, श्रौत व स्मार्त, याज्ञिक, वेदार्थकथन, तंत्रशास्त्र, धर्मशास्त्र, पूर्वमीमांसा, वेदांत, व्याकरण, न्यायशास्त्र, साहित्य, होरा व गणित असें उभय प्रकारचें ज्योतिष, आयुर्वेद, सप्रयोग पुराण व सप्रयोग कीर्तन इतके विषय ठेवलेले असून, त्यांत उत्तीर्ण होणाऱ्या उमेदवारांना तीस पासून दीडशें रुपयांपर्यंतच्या दक्षिणा देण्यांत येतात. या दक्षिणा श्रावण शुद्ध एकादशीस देण्यांत येतात. त्या प्रसंगीं संस्कृत भाषेंत प्राचीन पद्धतीप्रमाणें पूर्वपक्ष उत्तरपक्षादि स्वरूपाची चर्चाहि करण्यांत येते, ती फार मनोरजक असते.

यानंतरचा दानधर्माचा प्रकार म्हणजे खिचडी व ग्यारमीचा होय. यापैकीं हिंदूना खिचडी व मुसलमानांना ग्यारमी देण्यांत येई. सन १८०४-०५ सालापर्यंत शिजविलेली खिचडी वाटण्यांत येत असे, पण त्या वेळेपासून तो प्रघात बंद पडून दरेकास तांदूळ व डाळ मिळून एक शेर खिचडी देण्यांत येई. या खिचडी वाटण्याच्या पद्धतीचें वर्णन जनरल नानासाहेब शिंदे यांनीं आपल्या 'एका शिपायाचें आत्मवृत्त' या पुस्तकांत दिलें आहे. त्यावरून त्यावेळची माहिती मिळू शकते ती अशी :—

"विश्वामित्री नदीच्या कांठीं केदारेश्वराचें एक विशाल मंदिर असून त्याच्या सभोंवार चौफेर मोठाल्या धर्मशाळा होत्या. धर्मशाळांना बाहेरच्या बाजूनीं भिंती असून फक्त आत जाण्याला दोन दर-

बंद करण्यास सुचविण्याचें काम ऑडिट खात्यानेंहि केले नाहीं, तर त्यानें आपलें कर्तव्य चुकविल्यासारखें होईल. (२५-५-१९०८.)

अशा प्रकारच्या हुकुमांवरून राज्यांतील इतर खात्यांप्रमाणेंच खानगी खात्याच्या खर्चावरहि दाब ठेऊन काटकसरीच्या धोरणानें राज्याच्या सांपत्तिक स्थितींत स्थैर्य आणण्याचा प्रयत्न महाराजांनीं केला, हें दिसून येईल.

याप्रमाणें जमाखर्चांत सुधारणा केल्यावर त्याचें खरें चित्र एकदम डोळ्यांपुढें उभें करणाऱ्या हिशेबी खात्याची सुधारणा करणेंहि ओघानेंच प्राप्त झालें. या बाबतींत महाराजांनीं आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या कालविभागांत स्वतंत्र हिशेबी खात्याची स्थापना करून त्याच्याकडे सर्व राज्यांतील जमाखर्चावर देखरेख ठेविण्याचे काम दिलें होतें. तथापि त्या खात्याच्या कामाची पद्धति असावी तशी समाधानकारक नाहीं असें वाटल्यावरून महाराजांनीं सन १८९२ सालीं बाबू रजनीनाथ रॉय या नांवाच्या बंगाल प्रांतांतील एका मोठ्या हिशेबी अधिकाऱ्याची नोकरी हिंदुस्थान सरकारकडून उसनी मागून घेतली. या बाबू महाशयांनीं वडोदें-तील जमाखर्चाच्या पद्धतीचे आकलन करून तींत कशा प्रकारें सुधारणा करावी, याबद्दल महाराजांना विस्तृत सूचना केल्या, व त्यावरून या खात्याच्या कार्यपद्धतींत फेरफार करण्यांत आले. तेव्हांपासून हिशेबी खातें हें इतर सर्व खात्याहून अलग असे वरिष्ठ दर्जाचें खातें झालें. त्यामुळें इतर कोणत्याहि खात्यांतील खर्चासंबंधाच्या गैरकायदेशीरपणावर दाब ठेवून आपला एकमुखी अधिकार सर्वांवर चालविण्याची सत्ता त्यास प्राप्त झाली.

यानंतर महाराजांना आपल्या राज्यांतील चलनपद्धतीकडे लक्ष देणें जरूर झालें. यासंबंधानें राजा सर टी. माधवराव यांनीं आपल्या दिवाण-गिरींत इंग्रज सरकारशीं केलेल्या वाटाघाटीचा उल्लेख मागें आलाच आहे. त्या वेळीं सर टी. माधवराव यांना ही वाटाघाट तशीच अपूर्ण टाकून द्यावी लागली. परंतु त्यानंतर महाराजांना अधिकार मिळाल्यावर बडोदें

संख्या ९७१ असून, त्यांना देण्यांत येणारी एकंदर रक्कम २३ हजार रुपये असल्याचें सरकारी दाखल्यावरून दिसून येतें. त्यानंतरच्या अलीकडील काळांत ही खिचडी घेणारे बहुतेक लोक कालवश झाले आहेत, व त्यामुळें या सदरीं होणारा खर्च बहुतेक कमी झाला आहे. या बाबतींत महाराजांनीं सावधगिरीनें व योग्यायोग्य विचारानें पाऊल टाकिलें, त्यामुळें लोकांनाहि त्यांच्या कृतीचें रहस्य पटलें व त्याविरुद्ध फारसा असंतोष उत्पन्न झाला नाहीं.

अशा रीतीनें अनेक प्रकारें खर्चांत काटकसर करण्यांत आली, त्यासंबंधीं केलेल्या हुकुमांत महाराजांनीं वेळोवेळीं म्हटलें आहे कीं,

" अनियमित धोरणावर वाढलेले खर्च किंवा जे खर्च चालू ठेवण्याचें विशेष प्रयोजन नाहीं असे खर्च कमी करण्याविषयीं हुकूम झाल्यावर, ते पुन्हा वाढविण्यांत येणार नाहींत इकडे लक्ष देत असावें. उदाहरणार्थ, ग्यारमी, खिचडी, वगैरेकडे होणारा फाजील खर्च कमी करण्याबद्दल तजवीज करण्यांत आली. तसा खर्च पुन्हा न वाढू देण्याबद्दल खबरदारी घेण्यांत यावी. " ( १५-५-१८९०. )

" खुद्द हुजूरस्वारीचा खर्च फार मोठा आहे. अशा स्वाऱ्या नेहमीं होऊं लागल्या, तर ही खर्चाची बाब मोठी होणार आहे, हें चांगलें नाहीं. याचा विचार खानगी कारभारी यांनीं करून कमी खर्चाचा रस्ता दाखविला पाहिजे. " ( २८-६-१८९५. )

" काहीं अनिवार्य कारणामुळें खर्च वाढविणें जरूरीचें पडलें, तर दुसऱ्या कोणत्या तरी कामांत तितकाच खर्च कमी करण्याचें धोरण ठेवावें. इतकेंच नव्हे, तर कोणा खाशास काहीं नवीन खर्च करणें असेल, तर त्यास बांधून दिलेल्या रकमेंत काटकसर करून त्या बचतींतून तसा खर्च करावा. " ( २४-९-१९०५. )

" खानगी खात्यांत फाजील निरर्थक खर्च होत नाहीं, हें पाहण्याचें काम अमलदाराचें आहे. तसा होत असलेला खर्च दाखवून तो

नाण्यांची भेसळ होऊन त्यांतील खरे व खोटें नाणें पारखण्यास मोठी अडचण पडे व या योगानें खोटें नाणें पाडणारास पुष्कळ सवड राही. पण याहून अधिक अडचणीची गोष्ट ही असे कीं, हें बाबाशाही नाणें व इंग्रजी कलदार नाणें, या दोहोंमधील प्रमाण वारंवार बदलत असल्यामुळें व्यापाराला फार हरकत येई. कायदेशीर रीतीनें दर इंग्रजी शंभर रुपयांस ११४ बाबाशाही रुपये, असें प्रमाण ठरलेलें होतें. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत हें प्रमाण कधींच स्थिर रहात नसे. ब्रिटिश हद्दींतून बडोदे राज्यांत आयात माल अधिक येई, त्या वेळेस त्या मालाची किंमत कलदार रुपयांनीं द्यावी लागत असल्यानें, त्या रुपयांची जरूरी अधिक लागे. त्या वेळीं बाबाशाही रुपयाची किंमत उतरत असे. पण मार्चपासून मे महिन्यापर्यंत बडोदे राज्यांतील शेतकीचा माल—विशेषतः कापूस—ब्रिटिश हद्दींत विकला जाई, तेव्हां त्याची किंमत बाबाशाही नाण्यांत वसूल केली जात असल्यानें, त्या वेळीं बडोदी रुपयांची किंमत चढत असे. या दोन चलनांतील फरक इतका अस्थिर असे कीं, कधीं कधीं दिवसाचे वेळीं कलदार चार आण्याचे बाबाशाही एकोणीस पैसे मिळत, तर त्याच दिवशीं रात्रीं ते १७ मिळत ! ही अडचण बडोद्याच्या भौगोलिक स्थितीमुळें विशेषच तीव्र होई.

बडोदें राज्यांतील नोकरांचे पगार बाबाशाही चलनांत ठरविलेले असत व त्यामुळें सरकारी हिशेबहि त्या पद्धतीनें ठेविले जात. असें असून कडी प्रांतांतील कडी व पट्टण विभागांत शिक्काई नाणें चालत असल्यामुळें तेथें जमीनमहसूल याच नाण्यांत वसूल होई, व मग खाजगी पारख लोकांकडून या शिक्काई नाण्याचें चलन बाबाशाहींत बदलून घेऊन, तें सरकारी तिजोरींत रवाना केलें जाई. असें करतांना वटावांत फायदा होण्यासाठीं पारख लोकांकडून टेंडरें मागविण्यांत येत, व तीं पसंत झाल्यावर चलनांत बदल करण्यांत येई. अर्थात् टेंडरें मागविल्यानंतर तीं येऊन स्वीकारिलीं जाईपर्यंत पुष्कळ अवधि जाई व चलनाचा भाव तर रोज बदलत असे. अशा

राज्यांतील चलनाच्या अनिश्चिततेमुळें त्या प्रश्नासंबंधानें कांहीं तरी निश्चित निकाल करणें त्यांना अवश्य झालें. त्यांनीं हा निकाल कशा रीतीनें केला हें पाहण्यापूर्वी आपल्याला बडोद्यांतील चलनाचा इतिहास थोडासा अवलोकन करावा लागेल.

महाराजांना राज्याचे अधिकार मिळण्याचे वेळीं तेथें तीन प्रकारचें चलन चालू होतें. ते येणेंप्रमाणें:—

१ खुद्द बडोद्यास पाडलेलें नाणें. यास बाबाशाही नाणें म्हणत.

२ मुसलमानी नाणें. यास शिक्काई नाणें म्हणत.

३ इंग्रजी नाणें. यास कल्दार नाणें म्हणत.

वरील तीनहि प्रकारचीं नाणीं बडोद्यात चालू असल्यामुळें, निरंतर अनेक प्रकारचा घोंटाळा उडत असे. बाबाशाही नाणें हें चांदीचें व तांब्याचें असें दोन प्रकारचें असून, चांदीच्या नाण्यांत रुपया, अधेली, पावली व चवली हीं असत. तांब्याच्या नाण्यांत ढबू पैसा—दोन पैशांचा ऐवजाचा एक मोठा पैसा—एक पैसा व अर्धा पैसा हीं असत. बाबाशाही रुपयाचे बहात्तर पैसे होत, पण ही संख्या निश्चित नसून एका रुपयाचे नव्वदपर्यंतहि पैसे कधीं कधीं मिळूं शकत. हीं बाबाशाही नाणीं पाडण्याची टंकसाळ बडोदें सरकारचा इंग्रज सरकारशीं तह झाला तेव्हांपासून अस्तित्वात असून, या नाण्याचा प्रसार बडोदें राज्यांत आणि रेवाकांठा व महीकांठा या एजन्सींत असे. तथापि ब्रिटिश मुलखांतील संयुक्त प्रांत, मध्यप्रांत वगैरे भागात लक्षावधि रुपयाचे बाबाशाही पैसे नेले जाऊन तेथें ते इंग्रजी पैशांच्या बरोबरीनें रुपयास चौसष्ट या प्रमाणात विकले जात. हें बडोदी नाणें अनेक दृष्टींनीं सदोष होतें. एक तर त्याचा आकार एकसारखा नसून, त्यांवरील अक्षरें संपूर्ण नसत व तींहि एकाच नाण्याच्या सर्व तुकड्यांवर सारखीं नसत. तीं नाणीं जाड असल्यानें वाजवितां येत नसत व त्यांचा आकार एक प्रकारचा नसल्यानें, *त्यापैकींचा कांहीं भाग कापून घेतला* तरी तें समजण्यास कांहीं मार्ग नसे. या सर्व कारणानीं बाबाशाही

गाळून त्याचे कल्दार रुपये करविले. तथापि अशा तात्पुरत्या उपायाचा उपयोग होत नाहीं असें अनेक वर्षांच्या अनुभवानें कळून आल्यामुळें, अखेर नाइलाजानें महाराजाना आपल्या राज्यातील चादीचे चलन अजीबात बद करून, त्याऐवजीं कल्दार रुपया हा कायदेशीर नाणे म्हणून मानण्याचा हुकुम करावा लागला. सन १९०१ च्या फेब्रुआरी महिन्यात त्यानी इंग्रज सरकारशीं या सबधानें एक करार करून पुढील पन्नास वर्षांच्या मुदतीपर्यंत आपल्या राज्यात कल्दार रुपया चालू करण्याचें ठरविलें व दर शभर कल्दार रुपयास बाबाशाही १३० रुपये असें त्यासाठीं प्रमाण ठरविलें. या कृत्यानें टाकसाळ व चलन हीं आपलीं स्वतत्र राजचिह्नें त्याना सोडून द्यावीं लागलीं! परतु परिस्थितीचा जोर सर्वस्वीं विरुद्ध असल्यामुळे त्याना तसें करणें भाग पडलें, मात्र त्यामुळें राज्यातील चलनाला एक प्रकारचा सुयत्रितपणा आला

यानतर बाधकामाच्या बाबतींत या कालात महाराजानीं केलेल्या सुधारणाचा विचार येतो सन १८९२ च्या २९ मार्च रोजीं आजवा सरोवरातील पाणी बडोदें शहरात नळानें प्रथमत आणण्याचा समारभ साजरा करण्यात आला त्या निमित्तानें मोठा समारभ करण्यात आला होता. त्या वेळीं या सरोवराला 'श्रीसयाजी सरोवर' असे नाव देण्यात आलें. या प्रसगीं महाराजानीं केलेल्या भाषणात म्हटलें कीं,

"माझ्या राज्यारोहणापासून जीं सार्वजनिक महत्त्वाचीं कामें या राज्यात पूर्ण करण्यात आलीं आहेत, त्यात आजवा सरोवराची योजना सर्वात अधिक महत्त्वाची आहे ही योजना म्हणजे माझ्या राज्यातील ३५०० गावासाठीं जी योजना करण्याचा माझा सकल्प आहे, त्याची पूर्वगामी तयारी आहे खेडेगावातून पिण्याच्या पाण्यासाठीं विहिरींची सोय करण्यात आली आहे व जेथें ती अजून करण्यात आलेली नाहीं, तेथें ती लवकरच करण्यात येईल. ज्या ठिकाणीं पाणी अगदीं वर असेल, अथवा जेथे नदीची सोय असेल,

स्थिर्तीत सरकारी अधिकाऱ्याची चलन बदलण्यात काय धादल उडत असेल, याची कल्पनाच करावी.

ही सर्व परिस्थिति महाराजाच्या नजरेस आल्यामुळें, त्यांनीं आपल्या युरोपच्या प्रवासात मुख्य मुख्य शहरांतील टांकसाळी तपासल्या होत्या, व शुद्ध नाणें तयार करण्याच्या कामातील सर्व प्रकार पाहिले होते. त्यावरून सन १८९०-९१ सालीं त्यांनीं आपल्या राज्यात बाबाशाही नाणें पाडण्यासाठीं नवीन व सुधारलेल्या प्रकारची यंत्रसामग्री आणवून तिच्यातून नवीन नाणें पाडविण्यास सुरुवात केली या पद्धतीनें बडोद्याच्या चलनात सुधारणा करून तें कलदार नाण्याच्या बरोबरीचें करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. इतक्यात सन १८९३ सालीं हिंदुस्थान सरकारनें बाबाशाही पैशाची किंमत सरकारी हुकुमानें कलदार पैशाहून कमी केल्यामुळें, बडोद्यातील चलनाला मोठा धक्का बसला. अशा रीतीनें आपल्या पैशाची किंमत उतरलेली पाहून तिला तोड म्हणून सन १८९४ सालीं महाराजांनीं बाजारातील सर्व बाबाशाही नाणें खरेदी करून त्याची किंमत वाढविण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. त्यानंतर सन १८९६ च्या एप्रिल महिन्यात महाराजांनीं एक हुकूम काढून कडी प्रांतातील शिक्काई नाणें रद्द करून त्याच्या ऐवजीं बाबाशाही नाण्यात व्यवहार व्हावा असें ठरविलें व त्यासाठीं दर शभर शिक्काई रुपयास १०९–६–० बाबाशाही रुपये असें प्रमाण ठरविलें. या योगानें बडोदें राज्यातील दोन चलनामुळें होणारा घोटाळा टळला, तरी कलदार व बाबाशाही यातील फरकामुळें होणारी अडचण यापुढें वाढतच गेली. सन १८९६–९७ सालीं कलदार व बाबाशाही यातील प्रमाण १००=१२१–६–१० असें होतें, तें १९०० सालीं १००=१४८ इतकें झालें. याच वेळीं बडोद्यास दुष्काळानें अत्यंत भयंकर स्वरूप धारण केल्यामुळें, चलनाच्या आर्थिक अडचणींत फारच तीव्र भर पडली. त्यामुळें महाराजांनीं आपल्या राज्यांतील बाबाशाही रुपये

यापुढें कराव्या लागणार असल्यामुळें, सन १९०४ सालापासून त्यासाठीं इरिगेशन खातें अथवा पाणीपुरवठ्याचें खातें म्हणून एक स्वतंत्र शाखा निर्माण करण्यात आली व तिच्याकडे अशा प्रकारच्या योजना करण्यासाठीं पाहणी करणें, चालू योजना पुऱ्या करणे, व पूर्वीच्या कामाची दुरुस्ती करणें, हीं कामें सोंपविलीं गेलीं. अशा रीतीनें मोठ्या मोठ्या शहरात व गावात धरणें बाधून त्यातील पाणी लोकाना पुरविणें शक्य असलें, तरी बाकीच्या सर्व खेडेगावासाठीं विहिरींची योजना करणेंच शक्य व सुलभ असल्यानें, तें कार्य या काळात जोरानें करण्यात आलें. त्यासाठीं लागणारी नवीन प्रकारची यंत्रसामग्री मागवून ती लोकाना पुरविण्याचें कामहि करण्यात आलें.

पाण्याच्या योजनेप्रमाणेंच इमारतीकडे लक्ष पुरविणें अवश्य होतें. राज्यकारभाराच्या सोईसाठीं लागणाऱ्या शेंकडो इमारती या काळात बाधण्यात आल्या. तथापि त्यातील प्रमुख इमारतींचा उल्लेख येथें करण्यासारखा आहे. अमरेली व मेहेसाणा या जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणीं राजवाड्यासारख्या सुदर व विशाल इमारती बाधण्यात आल्या. त्यापैकींचा थोडा भाग महाराजाच्या राहण्यासाठीं राखून ठेविला असून, बाकीचा भाग जिल्ह्याच्या मुख्य कचेऱ्यासाठीं देण्यात आला आहे. यानतरची महत्त्वाची इमारत म्हणजे बडोद्यातील म्यूझियमची अथवा पदार्थसंग्रहाची होय. या इमारतीचा मूळ भाग सन १८९५ सालात पूर्ण झाला, व तिच्यासाठीं तेथपर्यंत सुमारें सव्वा दोन लक्ष रुपये खर्च करण्यात आले. त्यातील वस्तुसंग्रह गोळा करण्याचें काम प्रो ब्लेक या तज्ज्ञाकडे दिलेलें होतें व ते पूर्ण झाल्यावर त्यावर देखरेख ठेविण्याचे काम बडोदें कॉलेजातील प्रो मसानी याजकडे सोंपण्यात आलें. तथापि या पदार्थसंग्रहालयाची खरी वाढ महाराजाच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या विभागातच करण्यात आली आहे, यामुळें त्याबद्दलचें विवेचन त्या खडात योग्य स्थळीं करण्यात येईल. साप्रतच्या अवधींत बडोदें शहरात मुख्य राजवाड्याच्या समोरील

अशा गोष्टींनिमित्त इतर गांवांतील वस्तीच्या दर हजार लोकामागें सहा ते आठ रुपयाच्या खर्चानें विहिरींतून पाणी काढून तें लोकांना पुरविण्याची व्यवस्था करण्यांत आलेली आहे. परंतु या योजनेचा संपूर्ण फायदा घेण्यासाठीं प्रजेचें सहकारित्व मात्र मिळालें पाहिजे."

यानंतर शेतीसाठीं पाणी पुरवण्याची योजना कडी व पट्टण विभागांतील कादरपूर गांवीं या काळांत करण्यांत आली. तेथें यासाठीं बांधण्यांत आलेल्या धरणाच्या बंधाऱ्याची लांबी १२००० फूट असून उंची २७ फूट आहे. या योजनेला एकंदर सात लक्ष रुपये खर्च आला. परंतु हें धरण पुरें झाल्यानंतर तें जरूरीपेक्षा फार मोठ्या प्रमाणावर असल्याचें अनुभवास आलें. नेहमींच्या पावसाचें पाणी एकत्र केलें असतां या तळ्याचा फक्त $\frac{1}{3}$ भाग व्यापिला जाई. त्यामुळें तेवढा भाग पाण्याच्या साठ्यासाठीं राखून ठेविला जाऊन, बाकीचा भाग शेतीच्या लागवडीसाठीं देण्याचें ठरविण्यात आलें. अशीच दुसरी योजना कडी प्रांतांत अनावाडा धरणानें करण्यात आली. परंतु तीहि जरूरीपेक्षा मोठी असल्याचाच अनुभव आला. या योजनेला दोन लक्ष रुपये खर्च आला. बडोदें प्रांतांतील सखेडा तालुक्यांत ओरसंग नदीच्या पाण्याचे कालवे काढून शेतीच्या कामासाठीं पाणी पुरविण्याची प्रचंड योजना या काळांत हातीं घेण्यात आली. सदर योजनेचा पाया घालण्याचा समारंभ ता. ४–५–१९०० रोजीं ऐन दुष्काळाच्या समयीं करण्यात आला. त्या प्रसंगीं महाराजांनीं केलेलें विस्तृत भाषण व त्यांत दुष्काळनिवारणार्थ योजावयाच्या निरनिराळ्या उपायांबद्दल केलेलें विवेचन, याचा उल्लेख यापूर्वी केला गेलाच आहे. या मोठ्या योजनेच्या एकंदर खर्चाचा अंदाज वीस लक्ष रुपये होता. अशीच दुसरी जंगी पाणीपुरवठ्याची योजना बडोदें प्रांतांतील डभोई विभागांत वढवाणा तळ्याच्या रूपानें सन १९०६–०७ सालीं मंजूर करण्यात येऊन, तिच्या कामाचा आरंभ सन १९०७ च्या एप्रिल महिन्यात करण्यात आला. अशा अनेक प्रकारच्या पाणीपुरवठ्याच्या योजना

रुपये खर्च करून एक इमारत बांधण्यात आली. सन १९००-०१ साली प्रथमोपचार, घरगुती आरोग्यशास्त्र व शुश्रूषा या विषयांचे शिक्षण देण्याचे वर्ग उघडण्यात येऊन, त्यांतून पास होणाऱ्यांना सर्टिफिकिटें देण्याची तजवीज करण्यात आली. मुख्य दवाखान्यात उपचाराकरिता राहणाऱ्या स्त्रियांसाठीं स्वतंत्र भाग बांधण्यात आला. त्याचप्रमाणें जवळजवळ एक लाख रुपयांच्या खर्चानें लष्करी लोकांसाठीं मुख्य दवाखान्यानजीकच एक स्वतंत्र भाग तयार करण्यात आला. रोग्यांना शुद्ध हवेचा लाभ मिळून त्या योगानें त्यांची प्रकृति सुधारण्यासाठीं मुख्य दवाखान्याच्या इमारतींत सॅनिटोरियमच्या पद्धतीनें कशी सुधारणा करावी याबद्दल अभिप्राय देण्याकरिता सर एम्. विश्वेश्वरय्या यांना खास बोलाविण्यात आले होते, व त्यांच्या अभिप्रायानुसार जरूर त्या दुरुस्त्या करण्यांत आल्या. त्याचप्रमाणें वडोदें प्रांतांतील अनसूया नांवाच्या गांवीं शंभर महारोग्यांसाठीं नर्मदा नदीच्या किनाऱ्यावर स्वतंत्र दवाखाना उघडण्यात आला व अशा लोकांसबंधानें स्वतंत्र कायदाहि घडविण्यांत आला.

रोगनिवारणार्थ येणेंप्रमाणें महत्त्वाच्या सुधारणा करण्यात आल्या, त्याबरोबरच रोगप्रतिबंधक उपायांकडेहि महाराजांनीं लक्ष पुरविलें. हिंदुस्थानांतील पुष्कळसे रोग गांवांतून साचणाऱ्या दुर्गंधीमुळे, पिण्याच्या गलिच्छ पाण्यामुळे व दूषित खाद्यपदार्थांमुळें उत्पन्न होतात हे जाणून, या तीन्ही गोष्टी नाहींशा करण्याची व्यवस्था करण्यासाठीं सन १८९१–९२ सालीं मुख्य वैद्यकीय खात्याला जोडून आरोग्यविषयक खातें (Sanitary Department) उघडण्यात आलें व त्यावर सॅनिटरी कमिशनरची नेमणूक करण्यात आली. त्यानें सर्व राज्यभर हिंडून घाण नाहींशी करविण्याची, जलाशय शुद्ध करविण्याची, मैला गांवाबाहेर दूर टाकविण्याची, मंडया व कसाईखाने यावर देखरेख ठेविण्याची, लोकांना आरोग्यविषयक माहिती देण्यासाठीं व्याख्यानें देण्याची व मॅजिक लॅटर्ननें चित्रें दाखविण्याची, अशी अनेक प्रकारची व्यवस्था करावयाची असे.

इंदुमती महालाची सुंदर इमारत बांधण्यात आली. याखेरीज या कालांतील मुख्य काम म्हणजे बडोदें शहराची सुधारणा हें होय. त्यांतील सांडपाणी वाहून नेण्यासाठीं केलेली ड्रेनेजची योजना, शहरांतील एका टोंकास बंद असलेल्या गल्ल्या मोकळ्या करून त्यांतून हवा खेळती करण्याची योजना, शहरांतील निरनिराळ्या भागांत खुल्या जागा पाहून तेथें लहान मोठे बगीचे करण्याची योजना, रस्ते रुंद करण्याची योजना, वगैरे निरनिराळ्या योजनांचा जन्म या कालांतच झाला आहे. परंतु त्यांचें काम बहुतांशीं या पुढील कालविभागांत करण्यांत आलें. अशा रीतीनें या खात्याच्या कार्याला जोरानें चालना देण्याचें काम महाराजांनीं या कालांत केलें.

या मध्यकालांत वैद्यकीय खात्यांत सुधारणा करण्याच्या कामीं विशेष प्रोत्साहन देण्यास मुख्यतः प्लेग हा कारणीभूत झाला. त्याबद्दलचें वर्णन मागें देण्यांत आलेंच आहे. त्या वेळीं कराव्या लागणाऱ्या सार्वत्रिक इलाजामुळें त्या खात्यांतील उणीवा समजून आल्या. या खात्यांतील नोकरांची संख्या व त्यांची वैद्यकीय लायकी या दोन्ही गोष्टींत सुधारणा करणें अवश्य आहे असा अनुभव त्या वेळीं आल्यावरून, या बाबतींत योग्य ते इलाज घेण्यांत आले व त्यासाठीं चांगले लोक बडोद्याच्या नोकरींत आकर्षिले जावे, म्हणून त्यांच्या पगारांत वाढ करण्यांत आली. त्याचप्रमाणें प्लेगचे जंतू शोधून काढून त्यावर इनॉक्युलेशनचा इलाज करविण्याच्या कामीं जंतुशोधनशास्त्राची (Bacteriology) ची मदत डॉ. हॉफ्किन वगैरेंना झाल्यामुळें, बडोद्यांतील मुख्य दवाखान्यांत अगदीं आधुनिक पद्धतीची यंत्रसामग्री असलेली जंतुशोधक शाळा मोठ्या खर्चानें उघडण्यांत आली. त्याचप्रमाणें एक्स् रेनें फोटो घेण्याचीं साधनेंहि आणविण्यांत आलीं.

या कालची दुसरी एक सुधारणा म्हणजे उन्मत्ताश्रमा (Lunatic Asylum) ची स्थापना ही होय. यापूर्वी वेड्याकरितां निराळी अशी सोय नसून त्यांना साध्या तुरुंगांत कोंडून ठेवण्यांत येत असे जाई. परंतु ही निर्दयपणाची पद्धति बंद करून सन १८९६–९७ सालीं अशा लोकांकरितां अर्धा लाख

हिंदुस्थानांत दहा वर्षे व त्याहून अधिक शिक्षा होण्यास पात्र अशा गुन्ह्यांच्या चौकशीच्या कामीं ज्यूरी नेमण्यांत येत असून, त्याहून हलक्या प्रकारच्या गुन्ह्यांसाठीं असेसरांची नेमणूक करण्यांत येते. परंतु ज्यूरीला निर्णायक अधिकार असल्यामुळें, गंभीर स्वरूपाच्या गुन्ह्यांत अशिक्षित ज्यूरर लोकांकडून अन्याय होऊं नये, यासाठीं इकडे उलट क्रम स्वीकारण्यांत आला आहे. येथें मोठ्या गुन्ह्यांत असेसर नेमले जाऊन, हलक्या गुन्ह्यांसाठीं ज्यूरी नेमण्यांत येते.

याच काळांत इंग्रज सरकार व बडोदें सरकार यांच्यामध्यें दिवाणी दाव्याचीं समन्से बजावण्याची व हुकुमनाम्यांची बजावणी करण्याची अरसपरस योजना करण्यांत आली.

या मध्यकालांत घडलेल्या कायद्यांत विशेष उल्लेखनीय म्हणजे हिंदुधर्मशास्त्रावरील कायद्यांचे एकीकरण हें होय. इतरत्र सर्व ठिकाणीं हिंदुधर्मशास्त्रांतील प्रश्न मूळच्या स्मृतिग्रंथांतील व त्यांवरील टीकांतील वचनांवरून व हायकोर्टाच्या निवाड्यावरून सोडविले जातात व त्यामुळें

'श्रुतिश्च भिन्ना स्मृतयश्च भिन्नाः
नैको ऋषिर्यस्य वचः प्रमाणम्।'

अशी स्थिति होऊन तिचा परिणाम

'धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम्।'

असा होतो. यावर इलाज म्हणून

'महाजनो येन गतः स पन्थाः।'

हे वचन मानावें, तर त्यांतहि महाजन कोणास म्हणावें, व त्यांचा पंथ कोणता, हें समजणें अशक्य होतें. अशी स्थिति न व्हावी, यासाठीं बडोदें राज्यांत या काळांत हिंदुधर्मशास्त्रावरील निरनिराळ्या भागांसंबंधानें निबंधरूपानें कायदे मंजूर करण्यांत आले व त्यांच्या योगानें या शास्त्राला एक प्रकारें निश्चितता देण्यांत आली. तथापि लोकांच्या नित्याच्या आयुष्याशीं संबंध येणाऱ्या गोष्टींसंबंधाचे कायदे त्यांच्या संमतीवांचून व

असे काहीं वरिष्ठ अधिकारी नोकरींत आल्यामुळे मूळच्या गुजराथी कायद्याचें इंग्रजी भाषांतर करविण्यांत आलें, तरी तें केवळ बोधरूप स्वरूपाचें असून, त्या कायद्याचें मूळचें गुजराथी रूप हेंच खरें अधिकृत रूप होतें. या योजनेमुळें कायद्याची सर्व परिभाषा देशभाषेंत उतरविण्यात आली या भाषेंत अस्खलितपणें व मध्यें एकहि इंग्रजी पारिभाषिक शब्द न वापरता वकीलांनीं केलेलें भाषण ऐकून परस्थांना मोठा विस्मय वाटतो, व ते देशी भाषेस महाराजांनीं दिलेल्या या उत्तेजनाबद्दल त्यांना धन्यवाद देतात

यानंतरची महत्वाची सुधारणा म्हणजे राज्यांतील वरिष्ठ न्यायाधिशी ( High Court ) च्या ठरावावरील खुद्द महाराजांकडे केल्या जाणाऱ्या अपीलाची सुनावणी करण्यासाठीं हुजूर न्यायसभेची ( Privy Council )ची स्थापना ही होय कितीहि वरिष्ठ दर्जाचे अधिकारी नेमिले, तरी खुद्द महाराजापर्यंत आपल्या कामाची दाद पोंचविल्याशिवाय समाधान न मानण्याची प्रवृत्ति लोकांत राहतेच, व म्हणून अशा अपीलांची तपासणी करून, त्यांतील मंजूर करण्यायोग्य अपीलें आपल्या स्वतः पुढें रुजू करण्यासाठीं महाराजांनीं सन १८९२ च्या एप्रिल महिन्यात आपल्या हुजूर कामदारास विशेष अधिकार दिले होते. तथापि ही योजना अनुभवाअंतीं असमाधानकारक ठरली त्यामुळें त्यांनीं सन १८९३ च्या मार्च महिन्यात एक हुकूम काढून अशा अपीलांची सुनावणी करण्यासाठीं तीन सभासदांच्या न्यायसभेची स्थापना केली या न्यायसभे पुढें सुनावणीसाठीं येणाऱ्या कामांना ब्रिटिश हिंदुस्थानांतील कायद्यानें स्थापिलेल्या प्रिव्ही कौन्सिलप्रमाणेंच मर्यादा ठरविण्यात आली, व अशा प्रकारें या अपीलांचा निकाल त्रयस्थ तज्ज्ञांकडून देवविण्याची व्यवस्था करण्यात आली

यानंतरच्या सुधारणेंत ज्यूरीची व असेसराची पद्धति ही येते मात्र येथें या पद्धतींत ब्रिटिश योजनेहून फरक करण्यात आला आहे. ब्रिटिश

फायदे या धारासभेकडून अपेक्षित होते, व या दृष्टीनें ब्रिटिश हिंदुस्तानातील अशा प्रकारच्या संस्थाच्या स्वरूपाहून तिचें स्वरूप भिन्न होतें. ही सुधारणा नवीन असल्यानें तिचा फायदा चांगल्या रीतीनें प्रजेकडून घेतला गेला त्या काळीं इतर फारच थोड्या संस्थानांत अशा प्रकारच्या संस्थाची स्थापना झालेली होती. या दृष्टीनें या बाबतींत त्यांना उदाहरण घालून देण्याचा मान बडोद्यासच मिळतो

अशा प्रकारे कायदे घडण्याच्या धारातंत्रांत, त्याच्या मार्फत घडल्या गेलेल्या कायद्यांत व त्यांची बजावणी करणाऱ्या न्यायखात्यांत या काळांत सुधारणा करण्यांत येऊन, त्यायोगे सुसंस्कृत राज्यपद्धतीच्या मार्गांत पुढें पाऊल टाकण्यांत आलें

आतापर्यंत उल्लेखिलेल्या अनेक खात्यांत महाराजांनीं कोणत्या सुधारणा केल्या याबद्दलचें विवेचन केल्यानंतर, सर्वांच्या अखेरीस त्यांचें आवडतें खातें–शिक्षण खातें–हें विवेचनासाठीं घेतलें आहे. महाराजांच्या आजपर्यंतच्या हजारों उद्गारांवरून शिक्षण हेंच सर्व उन्नतीचें मूळ असल्याबद्दलचें त्यांचें मत प्रसिद्ध आहे. त्यावरून

'अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥'

या भगवद्गीतेतील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें त्यांच्या मनें समाजाचें धारण करणारी व तिचा जीवभूत असलेली अपरा प्रकृति अथवा मुख्य शक्ति शिक्षण हीच होय व म्हणून त्या शिक्षणाची प्राप्ति सर्वांस व्हावी याबद्दल त्यांनीं अपार परिश्रम केले आहेत आपल्या कारकीर्दीच्या आद्य भागांत त्यांनीं शिक्षणविषयक अनेक सुधारणा केल्या, तथापि सक्तीच्या व मोफत पद्धतीशिवाय शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार होणें शक्य नाहीं अशी त्यांची दृढ भावना झाल्यामुळें, त्यांनीं या संबंधींचें पहिलें पाऊल सन १८९३ मध्यें टाकिलें त्या वेळचे त्यांचे विचार त्यांनीं आपले दिवाण मणीभाई जसभाई यांना ता. १६ मार्च १८९३ रोजीं लिहिलेल्या

सल्ल्यावरून परस्पर सरकाराकडून घडले जाणें हें इष्ट नव्हे, अशी आरंभापासूनच महाराजांची समजूत होती. विशेषतः अर्वाचीन काळांत राज्यकारभाराची प्रक्रिया दिवसेंदिवस अधिक भानगडीची होत चालल्यामुळें तिचें विकेंद्रीकरण करणें जरूर होतें, व तसें करितांना कायदे घडण्याच्या अधिकारांत प्रजेला भागीदार करणें हें सुसंस्कृत राज्यपद्धतीला अनुसरून आहे असें त्यांचें मत होतें. बडोदें कॉलेजच्या विद्यार्थ्यांपुढें केलेल्या भाषणांत त्यांनीं या मताचें आविष्करण करितांना म्हटलें कीं,

"माझ्या मतें राज्यकारभाराचा उत्कृष्ट प्रकार म्हणजे तो लोकांकडून केला जाणें हाच होय. लोकांनीं आपल्यासंबंधाचीं कार्यें स्वतःच करावयास शिकलें पाहिजे. हल्लीं राज्यकारभार अधिकाधिक गुंतागुंतीचा होत चालला आहे व त्यांतील पुष्कळ नवीन नवीन गरजा भागविणें जरूर होत चाललें आहे. यासाठीं अधिकारांचें विकेंद्रीकरण सूज्ञपणानें केलें, तर तें प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा पाया होऊं शकेल."

अशा प्रकारें प्रजेच्या प्रतिनिधींना राज्यकारभारापैकीं कायदे करण्याच्या कामीं हिस्सेदार करणें हा प्रकार सर्वत्र अनुसरला जातो. ब्रिटिश हिंदुस्थानातहि सन १८९२ सालीं स्थापन झालेल्या कायदे कौन्सिलाच्या पद्धतींत सुधारणा करून ती अधिक प्रातिनिधिक स्वरूपाची करण्याबद्दलची वाटाघाट चालू होती. महाराजांनींहि सन १९०७ सालीं आपल्या राज्यांत कायदे कौन्सिलची स्थापना केली. तिला 'धारासभा' असें नांव दिलें गेलें. वस्तुतः या सभेची कल्पना महाराजांनीं सन १९०४ सालींच निश्चित केली होती. या धारासभेचें स्वरूप मात्र आरंभापासून सल्लागार समितीचेंच ठेविण्यांत आलें होतें. तिचा अभिप्राय निर्णायक नसून तो सरकाराला बंधनकारक नसे. नवीन कायदे घडण्याच्या पद्धतीची माहिती, तिच्यांतील तत्त्वांचें लोकप्रतिनिधींना होणारें ज्ञान, व आपलें स्वतःचें मत व्यक्त करण्याची त्यांना मिळणारी संधि, इतकेंच

पत्रात व्यक्त केले आहेत. महाराजाची ही योजना अत्यंत महत्त्वाची असल्यामुळें त्यांचे एतद्विषयक विचार त्यांच्याच शब्दांनीं देणें योग्य होईल. ते म्हणतात.—

"गेल्या पुष्कळ काळपर्यंत सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा प्रयोग सर्व बडोदें राज्याला नाहीं, तरी निदान त्यांतील काहीं भागाला लागू करण्याचा विचार माझ्या मनात घोळत होता. या दृष्टीनें माझ्या अधिकाऱ्यांच्या व माझ्या पुष्कळ मुलाखती होऊन त्यासंबंधाची अवश्य ती माहिती मला मिळाली आहे. ती माहिती बरोबर आहे व तिच्यावरून केलेल्या खर्चाचा अंदाज कमी नसून थोडा अधिकच आहे असें गृहीत धरून, मी त्यासंबंधीचा हुकूम देत आहे. त्याची बजावणी सूज्ञतेनें करून त्या प्रयोगाकडे सर्व दृष्टींनीं अवलोकन केलें पाहिजे. त्या योजनेंत दोष आढळल्यास ते सुधारले पाहिजेत व त्या संबंधीच्या अंदाजपत्रकांत उणीव असल्यास ती दुरुस्त केली पाहिजे या कामीं उत्साहानें भरीं भरलें जाण्याची अथवा आग्रही होण्याची आमची मुळींच इच्छा नाहीं. उलट आमच्या चुका झाल्याचें आढळल्यास त्या सुधारण्याची आमची इच्छा आहे. या प्रयोगाला लागणारा सर्व खर्च करणे सरकाराला परवडेल किंवा नाहीं हा एक मोठा प्रश्न आहे. हल्लींच उत्पन्नाइतका खर्च आम्हीं करीत आहोत. ही स्थिति समाधानकारक नाहीं. तथापि आणखी काहीं थोडे हजार रुपये खर्च करण्याची जबाबदारी स्वीकारून मी असा हुकूम देतों कीं, अमरेली महालातील सर्व गावात सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाच्या शाळा स्थापण्यात याव्या. त्याचा खर्च अदाजे ३१७९०–८–० येईल सक्तीच्या शिक्षणाची सुरवात करण्यापूर्वी सर्व ठिकाणीं असें शिक्षण देण्याचीं साधनें तयार करून दिलीं पाहिजेत व तीं दिल्यावरहि जर लोक आपलीं मुलें शाळांत पाठविणार नाहींत, तर मग त्यांना शिक्षा करण्यावद्दलचा विचार पुढें करिता येईल.

स्वरुपरत्वे अनुकूल ते विषय त्यातून शिकविण्यात येत. कलाभवनात विद्यार्थ्यांची सोय मर्यादित असल्यानें, त्यात आरंभापासून जी भरपूर संख्या येत होती, तीच पुढेंहि साधारणत कायम राहिली आहे. अशा प्रकारची संस्था स्थापून महाराजानीं कला व धंदे शिकविण्याचा प्रश्न सोडविण्याचा अपूर्व प्रयत्न यशस्वी रीतीनें या काळात करून दाखविला.

*प्राथमिक शिक्षणाची सोय करून नवीन पिढीस साक्षर करण्याचा* प्रयत्न करण्यात आला, तरी तें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांपैकींचा मोठा वर्ग पुढें त्या शिक्षणाला पारखा होतो. समाजातील वरच्या पांढरपेशा वर्गातील मुले निर्वाहाचें साधन म्हणून आपण होऊन शिक्षण घेतात. त्याच्या खालच्या मध्यम वर्गाला सक्तीच्या कायद्यामुळें जरी प्रथम शिक्षणास सुरवात करावी लागली, तरी पुढें तो वर्ग आपल्या मुलाचें शिक्षण चालू ठेवितो. अशा वर्गावर कायद्याचा परिणाम दृश्यरूपाने व कायमचा दिसून येतो. परंतु समाजातील सर्वांत खालच्या थरावर हा परिणाम प्रथमदर्शनीं झाल्याचे दिसून आलें, तथापि तो पुढें टिकत नाहीं. या वर्गातील मुलाची गरज त्यांच्या पालकाना आपआपल्या शेतीच्या व उद्योगधंद्याच्या कामासाठीं लागत असल्यामुळें, कायद्याच्या निर्बंधानें प्रथम जरी त्या मुलाना शाळेंत जावें लागलें, तरी लवकरच शाळेची व त्याची ताटातूट होते. सर्व हिंदुस्थानात प्राथमिक शिक्षणाच्या चार इयत्तापैकींच्या पहिल्या इयत्तेंत प्रवेश घेतलेल्या एकदर विद्यार्थ्यांच्या संख्येपैकीं चौथ्या इयत्तेपर्यंत जाताना फार मोठा भाग गळतो, असा अनुभव आला आहे. गेल्या खानेसुमारीवरून असें दिसून येते कीं, हिंदुस्थानातील एकदर नऊ प्रातान मिळून पहिल्या इयत्तेंत प्रवेश होणाऱ्या साडेचौतीस लाख विद्यार्थ्यांपैकीं चार लाखाहूनहि कमी इतकेच विद्यार्थी चौथ्या इयत्तेपर्यंत राहतात. म्हणजे शेंकडा ८९ विद्यार्थी गळतात असा तिकडील अनुभव आहे, व तीच प्रवृत्ति बडोदें राज्यातहि दिसून येते. मात्र येथील सक्तीच्या कायद्यामुळें ते शाळा सोडून जात नाहींत इतकेंच. याच कारणामुळें प्राथमिक

मिळा आलेलें हें यश निःसशय अपेक्षेच्या बाहेर होतें. या कारणानें हा प्रयोग वाढवून पुढें तो क्रमाक्रमानें राज्याच्या निरनिराळ्या भागात लागू करण्यात आला अशा प्रकारें ही योजना यशस्वी झाल्यामुळें सन १९०६ सालीं ती सर्व राज्याला लागू करण्याचें ठरविण्यात आलें, व त्याबद्दलचा स्वतंत्र कायदा सन १९०७ च्या मे महिन्यात करून त्यात गैरहजर राहणाऱ्या मुलाना दंड करणें, विशेष कारणासाठीं हजिरीची माफी देणें, वगैरे बद्दलचे विस्तृत नियम करण्यात आले. सन १९१०–११ साल अखेर राज्यातील प्रायमिक शिक्षणाच्या एकदर शाळांची सख्या २,९३८ इतकी होऊन, त्यातील विद्यार्थ्यांची सख्या १,७२,८८२ इतकी झाली. यापैकीं मुलांच्या शाळा २,५९५ असून, त्यात १,१९,८४५ मुलगे शिकत होते. कन्याशाळांची सख्या ३४३ होती व त्यातील विद्यार्थिनींची सख्या ५४,०३८ इतकी होती या आकड्यांशीं सन १८८७ च्या अखेरच्या आकड्याची तुलना केली असता, या मध्यकाळात प्राथमिक शिक्षणात प्रगति केवढी झाली, हें दिसून येईल. सन १८८७ अखेर सर्व राज्यात प्राथमिक शिक्षणाच्या एकदर शाळा ३४६ असून त्यातील विद्यार्थ्यांची सख्या ३४,२६२ होती यापैकीं मुलींच्या शाळांची सख्या २७ असून, त्यात २,४५८ मुली शिकत होत्या. या आकड्यांची तुलना करताना असें दिसून येईल कीं, या मध्यकाळात प्राथमिक शाळांची सख्या आठपटीनें अधिक वाढली असून, विद्यार्थिवर्गाच्या सख्येंत पाचपटीनें वाढ झाली होती साधारणत प्राथमिक शाळांतून जाण्यायोग्य वयाच्या विद्यार्थ्यांचें प्रमाण एकदर लोकसख्येशीं शेकडा १५ असें पडतें, असा नियम आहे त्याप्रमाणें पाहिल्यास प्राथमिक शाळांत जाण्यायोग्य वयाच्या एकदर विद्यार्थिवर्गापैकीं शेकडा ५८ मुलें या काळीं शाळेंत जाऊं लागलीं होतीं. ही प्रगति निःसशय आशाजनक होती.

अशा प्रकारें सर्वसाधारण जनतेतील मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करण्यात आली, त्याबरोबरच अंत्यज वर्गाच्या शिक्षणाचा उद्योगहि नेटानें

गृहस्थांना महाराजांनीं वडोद्यांतील मध्यवर्ती वाचनालयाची स्थापना करण्यासाठीं पसंत केलें व त्यांच्या प्रमुखत्वाखालीं वडोद्यांत सन १९१० सालीं सेंट्रल लायब्ररीची स्थापना करण्यांत आली. आरंभापासून शहरविभाग व इतर विभाग असे या संस्थेचे दोन विभाग करण्यांत आले. संस्थेच्या स्थापनेच्या सुरवातीस महाराजांनीं आपला २०,००० निवडक पुस्तकांचा संग्रह तिला बक्षिस दिला, त्यामुळें तिची सुरवात जोरानें झाली. मोठ्या वयाच्या वाचकाबरोबरच बालकांसाठींहि या संस्थेत खास सोय करण्यांत आली व या लहानग्या वाचकांना झेंपतील व समजतील असे मनोरंजनाचे प्रकारहि तेथें ठेवण्यांत आले. या योगानें अशा लहान विद्यार्थ्यांना हा विभाग आरंभापासून फार प्रिय झाला आहे. याखेरीज वाचकांच्या घरीं अथवा परगांवीं पाठविण्यासाठीं सुमारें २५–३० पुस्तकें मावतील अशा पेट्या तयार करवून, त्यांत दर १५ दिवसांनीं नवीं नवीं पुस्तकें घालून वाचकांची सोय करण्याचा नवीन उपक्रम या संस्थेनें केला गेला.

मि. बोर्डेन यांनीं वडोदे येथें तीन वर्षेपर्यंत मनःपूर्वक काम करून ही संस्था चांगली नांवरूपाला आणिली. त्यांच्यामागें त्या जागीं काम करण्यासाठीं म्हणून रा. कुडाळकर या तरुण, विद्वान व उत्साही गृहस्थांना या विषयाचे शिक्षण घेण्याकरितां मि. बोर्डेन हे वडोदें येथें असेपर्यंत अमेरिकेंत पाठविण्यांत आलें, व तेथून ते परत आल्यावर मि. बोर्डेन हे स्वदेशीं परत गेले व त्या जागेचा हवाला रा. कुडाळकर यानीं घेतला. तेथे त्यांनीं सन १९२१ पर्यंत उत्साहानें काम करून या संस्थेला फार भरभराटीस आणिली; परंतु दुर्दैवानें या सालीं त्यांचा अकालीं अंत झाला. रा. कुडाळकर यांचा या विषयावरील मोठा अधिकार जाणून, त्यांना मद्रास येथे भरलेल्या अखिलभारतीय वाचनालय परिषदेच्या अध्यक्षत्वाचा मानहि मिळाला होता. अशा गृहस्थाच्या मृत्यूमुळें या संस्थेचें पुष्कळ नुकसान झालें. ही हकीकत वस्तुतः पुढील कालविभागांत येणारी आहे, तथापि सांप्रतच्या मध्यकालाच्या अखेरीस या योजनेचा

या शाळेंत येणारे विद्यार्थी इंग्रजीचें ज्ञान असलेले नसत, यामुळे त्यांना शिकण्यासाठीं देशी भाषेंतील शास्त्रीय पाठ्यपुस्तकांची जरूर पडली. म्हणून प्रो. गज्जर यांचे देखरेखीखालीं सयाजीज्ञानमंजूषा व लघुज्ञानमंजूषा या नांवाच्या देशी भाषेंतील शास्त्रीय विषयांच्या दोन पुस्तकमाला तयार करविण्यांत आल्या. प्रो. गज्जर हे सहा वर्षे प्रिन्सिपॉलच्या जागीं राहिले व त्यानंतर ते कायमचे बडोदें सोडून मुंबईस गेले. कलाभवनाची एकंदर व्यवस्था बरोबर चालली आहे किंवा नाहीं, हें पाहण्यासाठीं महाराजांनीं सन १९०८ सालीं बडोदा कॉलेजचे प्रिन्सिपॉल व पदार्थविज्ञानशास्त्र विषयाचे प्रोफेसर मि. जॅक्सन यांच्याकडून या संस्थेची तपासणी करविली व त्यांच्या अभिप्रायाप्रमाणे योग्य त्या सुधारणा त्यांत करविल्या. त्याचप्रमाणें या काळांत इंजिनिअरिंग, लाकडी सामानाची बनावट, चित्रकाम, घड्याळें बनविण्याचें काम, वगैरे विशिष्ट कलांचें शिक्षण घेण्यासाठीं कांहीं हुषार विद्यार्थी परदेशीं पाठविण्यांत आले व ते शिकून परत आल्यावर त्यांच्या ज्ञानाचा लाभ कलाभवनाच्या विद्यार्थ्यांना मिळण्याची व्यवस्था करण्यांत आली. सन १९०२ पासून सन १९०८ पर्यंत घड्याळें बनविण्याच्या शिक्षणाचा एक वर्ग चालविण्यांत आला होता. त्याचप्रमाणें सन १९०० सालांत बटनें, स्टीलपेन, एनॅमल, ब्रश वगैरे वस्तू तयार करण्याच्या शिक्षणाचा वर्गहि उघडण्यांत आला. अशा विषयांचें शिक्षण सप्रयोग द्यावें लागत असल्यामुळें, आरंभापासूनच कलाभवनाला जोडून एक प्रयोगशाळाहि काढण्यांत आली होती.

अशा प्रकारची संस्था त्या काळीं सर्व हिंदुस्थानांत ही एकच असल्यामुळें, तिला आरंभापासून विद्यार्थ्यांची वाण केव्हांच पडली नाहीं. सुरुवातीस प्रवेशपरीक्षेसाठीं ८४१ उमेदवार आले होते, त्यांपैकीं २४२ पसंत करण्यांत आले. ही संख्या एकाच वर्षांत ३५० पर्यंत गेली व त्या पुढील दोन वर्षांत तिची प्रगति ४६५ पर्यंत झाली. अशाच धर्तीवर पण लहान स्वरूपाच्या शाळा राज्यांत आणखी चार ठिकाणीं काढण्यांत आल्या व

# प्रकरण २७ वें



## लोकशासनाचा पाया

मागील प्रकरणात सागितलेल्या अनेक सुधारणा आपल्या प्रजेसाठीं महाराजानीं आपल्या कारकीर्दीच्या मध्यविभागात केल्या, परतु त्या सर्वांचा आधार राजसत्तेवर होता त्यानीं होऊन ज्या सुधारणा केल्या, त्याचा लाभ लोकाना मिळाला हें खरें, पण त्याच्या योगानें प्रजेंत आत्मविश्वास उत्पन्न होऊ शकला नाहीं दिलेली शिदोरी व सागितलेलें ज्ञान फार दिवस टिकत नाहींत, अशी म्हण आहे, तिला अनुसरून लोकाना ज्या गोष्टी स्वत करण्याचा हक्क दिला गेला नाहीं, त्या त्याच्यासाठीं दुसऱ्या कोणी केल्या, तरी त्या तशा निरतर केल्या जातील असा भरवसा त्याना वाटत नाहीं स्वावलबन व स्वाश्रय हे स्वसुखाला जितके कारणीभूत होतात, तितके परावलबन व परभृतता हे होऊ शकत नाहींत या कारणानें आतापर्यंत प्रजेसाठीं आपण केलेल्या सुधारणावर समाधान न मानिता तशा सुधारणा प्रजेने स्वत आपल्यासाठीं आपण करण्याचा धडा शिकावा व या योगानें राज्यात लोकशासनाचा पाया घालावा, अशी इच्छा महाराजानीं धरिली व आपल्या राज्यातील जनतेचा मुख्य आधार त्यातील खेडीं आहेत हें जाणून, त्या खेड्यातील लोकाना आपल्या गावकारभाराच्या सर्व गोष्टी स्वत करिता याव्या व सरकारी अधिकाऱ्याचा या बाबतींतील अधिकार काहीं प्रमाणात लोकात विभागून द्यावा अशी काहीं तरी योजना करण्याच्या मार्गास ते लागले

शिक्षणाची मर्यादा पाचव्या इयत्तेपर्यंत करावी अशा प्रकारची एक सूचना सन १९०९ सालीं करण्यात आली असता, त्या वेळचे दिवाण श्रीयुत रमेशचंद्र दत्त यांनी तिजविरुद्ध आपला अभिप्राय देताना म्हटलें कीं,

"सक्तीच्या प्राथमिक शिक्षणामुळें शेतकी व मजुरी करणाऱ्या वर्गांना आधींच त्रास होत आहे. ती मर्यादा आणखी एका वर्षानें वाढविल्यानें त्यात भर पडेल. शिवाय तिसऱ्या इयत्तेपर्यंतचें शिक्षणहि अद्यापि राज्यात सार्वत्रिक झालेलें नाहीं. अजून राज्यात अशीं खेडीं आहेत कीं, जेथें शाळा स्थापन झालेल्या नाहींत म्हणून सक्तीच्या शिक्षणाची मर्यादा सध्या पाचव्या इयत्तेपर्यंत न वाढविता, ती चौथ्या इयत्तेपर्यंतच ठेवावी."

या अभिप्रायाप्रमाणें ही सूचना महाराजाकडून स्वीकारिली गेली नाहीं. यावरून कायद्याच्या सक्तीमुळें घ्याव्या लागणाऱ्या शिक्षणाविषयींचा खालच्या वर्गांतील लोकांचा उत्साह पुढें मंद होत जातो, असें दिसून येतें अशा प्रकारें उत्साह मंद होणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं, त्यांनीं संपादन केलेलें शिक्षण पुढें चालू ठेवावें अशी काहीं तरी सोय केली तरच अशात तरी फायदा होण्यासारखा असतो हें काम वाचनालयानें चांगलें होऊ शकतें अर्थात् या वर्गांशिवायच्या वरील वर्गांना तर वाचनालयें ही एक अमूल्य देणगीच होय ज्ञानसंपादनाला त्याच्यासारखा दुसरा राजमार्ग नाहीं, हें जाणून महाराजांनीं दीर्घ विचाराअंतीं आपल्या राज्यात मोफत वाचनालयाची योजना सुरू करण्याचें ठरविलें. सन १९०५–६ मध्यें महाराज अमेरिकेच्या प्रवासाला गेले होते, त्या वेळीं मोफत वाचनालयाचा प्रयोग तेथें फार मोठ्या प्रमाणावर चालून यशस्वी झालेला त्यांच्या अवलोकनात आला त्या धर्तीवर बडोद्यात प्रयोग करण्याचें त्यांनीं ठरविलें त्यासाठीं अमेरिकेंतील सुप्रसिद्ध ड्यूई विद्यालयात वाचनालयशास्त्राचें शिक्षण घेतलेल्या मि बोर्डन नावाच्या तज्ज्ञ

स्थानिक स्वराज्य भोगत आलेलीं होतीं. वेदकाल हा फार प्राचीन काल म्हणून सोडून दिला, तरी पाणिनीच्या कालापासून म्हणजे शकपूर्व सातव्या शतकापासून या खेड्याच्या स्वायत्ततेचे स्पष्ट दाखले मिळू शकतात पाणिनीच्या अष्टाध्यायीच्या "ग्राम शिल्पिनि।" या सूत्रात सुतार व हजाम हे गावकामदार म्हणून वर्णिलेले आहेत. दुसऱ्या एका सूत्रात गावातील वतनदार सुतारास 'ग्रामतक्ष' म्हटलें असून, त्याशिवायच्या खाजगी धदा करणाऱ्या सुतारास 'कौटतक्ष' असे म्हटलें आहे यावरून हे दोन धदेवाईक गावनोकर असत, असें दिसून येईल. यानतरच्या शकपूर्व दुसऱ्या शतकातील पतजलीच्या अष्टाध्यायीवरील महाभाष्यात 'पचकारुकी' असा शब्द दिला आहे, व त्याचा अर्थ टीकाकारानीं

"कुलालकर्मारवर्धकीनापितरजका पचकारुकी।"

म्हणजे कुभार, लोहार, सुतार, हजाम व परीट हे पाच गावनोकर असलेल्या गावास 'पचकारुकी' म्हणावें असा केला आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं हे गावकामदार सुतार, कोष्टी, हजाम, परीट व चाभार असे दिलेले आहेत यातील कोष्टी व चाभार हे भिन्न आहेत यावरून याचाहि समावेश गावकामदारात केला जात असे असें दिसून येईल. या काळा-दरम्यानच्या जातकग्रथातूनहि या ग्रामसस्थाबद्दलचे सदर्भ आढळतात उदाहरणार्थ 'खरस्सर' जातकावरून ग्रामभोजक (पटेल) याचें काम स्थानिक रहिवाश्याच्या मदतीनें गावचा वसूल करणे व चोराचिलटापासून त्याचें सरक्षण करणें, हें असल्याचें दिसून येतें. 'ग्रामणीचड' जातकात झुरूड व ग्रामभोजक या गावकामदाराचा उल्लेख आढळतो. 'कुलावक' जातकात गावचा सर्व कारभार गावचेच लोक करीत असून मुख्य गावकामदाराला दड करण्याचा, दारूच्या दुकानदारापासून कर वसूल करण्याचा, व गावात शातता राखण्याचा अधिकार असे, असा उल्लेख आहे. 'पानीय' जातकात एका गावातील दोन ग्रामभोजकानी गावात प्राणीवध वद केला असता गावच्या लोकानीं त्याचा हुकूम रद्द करून

उपक्रम झाला, व त्यायोगें सर्व हिंदुस्थानाला आदर्शभूत असलेली व आपल्या योग्यतेच्या प्रमाणानें साम्प्रत काळीं अखिल भारतांत तिसरा नंबर मिळविलेली ही संस्था महाराजांच्या कर्तृत्वानें जन्मास आली.

येणेंप्रमाणें या प्रकरणांत वर्णिलेल्या अनेक प्रकारच्या सुधारणा महाराजांनीं आपल्या कारकीर्दीच्या या मध्यकाळांत घडवून आणिल्या, त्याचा समारोप श्रीयुत रमेश चंद्र दत्त यांच्याच शब्दांनीं करून हें प्रकरण पुरें करूं. श्रीयुत दत्त म्हणतात --

'To see that the money liberally spent on education is well and wisely spent and that we get back our money s worth in the benefits done to the people, to train the people to carry out the measures which concern them and to extend the bounds of self-govern ment to fix upon the system of taxation which would not be oppressive but at the same time would meet the increasing demands of administration, and to make justice cheaper and more expeditious, these are very sound and excellent aims and it will be my pleasant duty to help them to the utmost of my power

" शिक्षणाप्रीत्यर्थ उदारपणानें खर्च केल्या जाणाऱ्या पैशाचा विनियोग सुज्ञतेनें व चांगल्या प्रकारें होत असून त्याचा मोबदला त्यायोगें लोकांना होत असलेल्या फायद्याच्या रूपानें आपणास मिळत आहे हें पाहणें, लोकांच्या हितानहिताचे प्रश्न सोडविण्याचें शिक्षण त्यांना देऊन स्वयंशासनाची मर्यादा वाढविणें, लोकांना जाचक न होता राज्याच्या वाढत्या खर्चाला पुरी पडेल अशी कराची योजना निश्चित करणें, व लोकांना थोड्या खर्चांत व थोड्या वेळांत न्याय मिळेल अशी तजवीज करणें, हे सर्व उद्देश उत्कृष्ट व सूज्ञ असून ते सिद्धीस नेण्यासाठीं मी यथाशक्ति प्रयत्न अवश्य करीन "



यामुळें ते समूळ उपटून टाकणे अशक्य असतें. तोच प्रकार हिंदुस्थानातील ग्रामसस्थाचा होता."

या ग्रामसस्थाचे हे महत्त्व ओळखून त्याना पुन्हा कार्यक्षम करण्याचा विचार महाराजानीं केला, त्या वेळीं त्याचे पूर्वीचें स्वरूप शक्य तितकें कायम ठेवून त्या सस्थाचें पुनरुज्जीवन करण्याचें त्यानीं ठरविले. यासबधानें बडोदा गॅझेटिअरमध्यें स्पष्ट म्हटलें आहे कीं,

> "From the commencement of the land settlement problems, great efforts have been made to preserve as much of the ancient self government in the villages as possible."

असे असल्यामुळें या सस्थाचें पूर्वीचें स्वरूप काय होतें व त्याचा कारभार कसा चाळत असे हें जाणणें अवश्य आहे. कारण त्यायोगेच त्यापैकींचा किती भाग महाराजाच्या नवीन योजनेंत कायम ठेविला गेला आहे, हें समजून येईल. या ग्रामसस्थाचें विस्तृत विवेचन सर हेन्री मेन, श्रीयुत मुजुमदार, प्रो. मुकर्जी, श्री. जयस्वाल, प्रो. आळ्तेकर, वगैरे लेखकानीं आपआपल्या पुस्तकातून केलेले आहे. त्यावरून या सस्थाचें स्वरूप कसें होतें, हें दिसून येतें. विशेषत गुजरायेंत व महाराष्ट्रात तें कसें होतें हे पाहिलें असता, त्याच परपरेला अनुसरून या सस्थाच्या पुनरुज्जीवनाची योजना कोणत्या प्रकारची असावी हें समजण्यासारखें आहे. या दोन्ही प्रातातील ग्रामसस्थाबद्दलची साधार माहिती विशेषेंकरून आठव्या शतकापासूनच्या पुढील लेखावरून उपलब्ध होते. त्यावरून त्याचें स्वरूप साधारणत कशा प्रकारचें होतें तें आपण थोडक्यात अवलोकन करू या कामीं प्रो. आळ्तेकर याचें या विषयावरील पुस्तक फार महत्त्वाचें आहे.

त्या काळीं दरेक खेड्यात एकेक ग्रामपचायत असे. ती साधारणत एका अध्यक्षाच्या प्रमुखत्वाखालीं काम करी. या अध्यक्षाला ग्रामकूट असे म्हणत. काहीं ठिकाणीं त्याला ग्रामभोजक असेंहि म्हणत. साधारणत

त्यांना अधिकार मिळाल्यापासून त्यांनीं आपल्या राज्यांतील सर्व भागांत प्रवास करितांना त्यांतील खेडेगांवाच्या स्थितीचें सर्व दृष्टींनीं सूक्ष्म अवलोकन केलें होतें, व त्यांतील लोकांना स्वतः भेटून त्यांच्याशीं संभाषण करून त्यांच्या अडचणींचें, गरजांचें, साधनांचें व आकांक्षांचें संपूर्ण आकलन केलें होतें त्यावरून राज्यांतील कोणतीहि सुधारणा दृढमूल होण्याला ती थेट खेड्यापर्यंत जाऊन पोंचली पाहिजे, अशी त्यांची खात्री झाली होती त्या लोकांच्या नित्याच्या जरूरीच्या गोष्टी मुख्य राजधानीच्या ठिकाणाहून करण्याचा मार्ग द्राविडी प्राणायामाचा होता, ही गोष्ट त्यांच्या नजरेस आली होती शिवाय तो मार्ग परिणामींहि पूर्ण सफल होण्याजोगा नव्हता, कारण अनेक कारणामुळें खेडेगांवांतील परिस्थिति ही शहरांतील, व त्यातल्या त्यांत राजधानींतील परिस्थितीहून इतकी भिन्न असते कीं, एकींतून दुसरींत गेलें असतां निराळ्या जगांत प्रवेश केल्याप्रमाणें वाटतें. कण्व ऋषीच्या शांतिपूर्ण आश्रमांतून दुष्यंताच्या गजबजलेल्या राजधानींत प्रवेश करितांना कण्वशिष्यांना ज्याप्रमाणें

"जनाकीर्णं मन्ये हुतवहपरीतं गृहमिव।"

'तें नगर एखाद्या आग लागलेल्या घराप्रमाणें' भासलें, त्याप्रमाणें शहरांतील ते अनेक व्यवसाय, त्या अनंत उपाधी, तो संमिश्र व्यवहार व त्या निरंतर वाढत्या गरजा पाहून ग्रामीण मनुष्याची स्थिति भांबावल्यासारखी होते उलट पक्षीं, शहराच्या घिसाडघाईला व नित्याच्या कलकलाटाला सरावलेला मनुष्य खेडेगांवांत गेला, म्हणजे त्याला तेथील परिस्थिति सर्वस्वीं अपरिचित अशी वाटते सबंध हिंदुस्थानांत एकंदर सुमारें अडीच हजार नगरें आहेत, तर सात लक्ष खेडीं आहेत व सर्व नगरांत मिळून सुमारें साडेतीन कोटि वस्ती असते, तर बत्तीस कोटि लोकवस्ती खेड्यांतून राहते. यावरून लोकवस्तीचा शेंकडा ९५ भाग खेड्यांत राहत असून, फक्त शेंकडा पांच इतकाच भाग शहरांतून राहतो हेंच प्रमाण बडोदें राज्यांतहि आढळतें हीं सर्व खेडीं हजारों वर्षांपासून आपल्यापुरतें संपूर्ण

यतींचे सभासद लोकाकडून चिठ्या टाकून निवडले जात. त्याना सभ्य अथवा महत्तर असे म्हणत. त्याची निवडणूक दर वर्षी नवीन होत असे, व त्याच्या बैठकी गावातील देवालयाच्या मडपात अथवा वृक्षाखालीं भरत असत काहीं सपन्न गावात त्याच्या मालकीच्या इमारतीहि असत. या पचायतींकडे गावातील सार्वजनिक इमारती, शाळा, अनाथगृहें, देवाल्यें, विहिरी, तलाव वगैरेची देखरेख दिलेली असे या सर्वांच्या दुरुस्तीचे काम त्याचें असे. गावातील लहानशा स्वरूपाच्या दिवाणी व फौजदारी तक्रारींचा निकाल करण्याचा त्याना अधिकार असे व त्याच्या ठरावावर राजाकडे विवाद करण्याचा प्रघात असे

उदा० "ग्रामे पुरे वा वृत्तोन्यव्यवहार तस्य विवादे तदा राजान उपेयात्।"

या पचायतींत आपलें काम करण्यासाठीं आपल्यातील काहीं सभासदाच्या पोटकमिट्या नेमी. त्याच्या पेढ्याहि असत व त्यात पैसे ठेवणाऱ्याना व्याज मिळे त्याचप्रमाणें विशेष कार्यासाठीं लोकानीं 'इष्टापूर्त' म्हणून दिलेल्या देणग्याहि या पेढ्यात ठेविलेल्या असत. अशा रीतीनें या ग्रामसस्थाचा व्यवहार चालत असे. परतु या सस्था इग्रजी अमलापासून ढासळल्या जाऊन, पुढें तर त्या अजीबात नाहींशा झाल्या परकीय इग्रज अधिकाऱ्याना या खेड्यातील राज्यकारभार चालविणें कठिण झालें, या बद्दल सर हेन्री मेनचा दाखला देता येतो तो म्हणतो —

"जेव्हा जेव्हा अँग्लो इडियन कामदार जेथें जुनी लोकव्यवस्था नाहींशी झाली नाहीं अशा गावाचा बदोबस्त करण्यास जातात, तेव्हा त्याना गावपचायतींची रचना ठरविताना मोठी अडचण पडते. जमीनीचा कोणी तरी एकच मालक असला पाहिजे, ही कल्पना त्याच्या डोक्यात भरली असल्यामुळें, कैक वेळा कुळकर्ण्यालाच खेड्याचा मालक समजून सरकारी रजिस्टरात त्याचें नाव ते नोंदीत."

अशा कारणामुळें इग्रज अधिकाऱ्यानीं या स्थानिक ग्रामसस्थाचे अधिकार खेंचून आपल्याकडे घेतले रयतेकडून स्वन वसूल घेण्याच्या

घेतला असा उल्लेख आहे. 'गहपति' जातकात दुष्काळाच्या प्रसंगीं गावकऱ्यानीं ग्रामभोजकास विनंति केल्यावरून त्यानें परतफेडीच्या शर्तीनें त्याना अन्न पुरविल्याचा दाखला मिळतो. यानंतरच्या शतपूर्व चौथ्या शतकातील चाणक्याच्या अर्थशास्त्रात तर या गावगाड्यासंदर्भचें विस्तृत विवेचन केलेलें आहे. यापुढील काळातील शिलालेखातून व ताम्रपत्रातूनहि असे उल्लेख विपुल मिळतात

खेडेगावातील या स्थानिक संस्थाकडे न्यायाधिकार, व्यवस्थाधिकार व स्वामित्वाधिकार असे तीन प्रकारचे अधिकार असत. पहिल्या प्रकारच्या अधिकारानें या संस्था आपल्या गावातील गुन्ह्याची चौकशी करून गुन्हेगाराना शिक्षा देत दुसऱ्यानें त्या गावातील शातंतारक्षण, करवसूली, सार्वजनिक समारंभ, आरोग्यरक्षण वगैरे कामें त्या करीत व तिसऱ्या अधिकाराच्यायें ते गांवातील भूमीचें सरक्षण करून इतराकडून होणाऱ्या तिच्या अपहाराला प्रतिबंध करीत अशा प्रकारें या ग्रामसंस्था हजारों वर्षेपर्यंत आपलें कर्तव्य करीत आल्या आहेत त्या विस्तृत अवधींत अनेक वेळा परचक्रें आलीं, युद्धप्रसंग झाले व राज्यक्रांत्या झाल्या, तथापि या ग्रामसंस्था जशाच्या तशा अविकृत राहिल्या यामुळें त्याना सर चार्ल्स् ट्रेव्हिलियन या लेखकानें एक सुदर उपमा दिली आहे, तींत तो म्हणतो —

"One foreign conqueror after another, has swept over India, but the village municipalities have stuck to the soil like their own Kush grass which they liken to it It is a kind of grass which it is impossible to tear up by the roots, because *it grows in bunches*, and they say that the village constitution is like that grass"

"पुष्कळ परकीय विजेत्यानीं हिंदुस्थानावर टोळधाडीप्रमाणें स्वाऱ्या केल्या, तथापि त्यातील ग्रामसंस्था या जमीनींत दृढमूल झालेल्या दर्भाप्रमाणें कायमच राहिल्या आहेत तें गवत झुबक्यानें उगवतें,

त्यापासून फारसें निष्पन्न झालें नाहीं; उलट मल्हारराव महाराजाचे वेळीं अधिकच घोंटाळा झाला."

सन १८८५ सालीं नेमिलेल्या कमिटीच्या अहवालावरून सन १८९१ सालीं महाराजानीं या ग्रामसस्थात पुन्हा जीव आणण्याकरिता एक योजना घडली. त्या काळीं ग्रामसस्थाचें कलेवर अस्तित्वात असलें, तरी त्यातील चैतन्य म्हणजे द्रव्यनिधि हें नाहींसे झालें होतें. तें त्याना पुन्हा प्राप्त करून देण्यासाठीं महाराजानीं असा हुकूम केला कीं, या सस्थासाठीं स्वतत्र निधि निश्चित करून त्यातून गावकामदाराचे पगार देण्यात यावेत या कामदारात पटेल, तलाटी, शाळामास्तर, रखा, भगी, हजाम, कुंभार, सुतार, लोहार व वेठिया इतक्या लोकाचा समावेश करण्यात आला. यापूर्वी सर्व राज्यातील गावकामदारासाठीं म्हणून दरवर्षी साडे नऊ लक्ष रुपये खर्ची पडत असत, त्यात सुमारें तीन लक्षाची वाढ करण्यात आली. दरेक खेड्यात पाच लोकाची ग्रामपचायत नेमण्यात आली. त्यातील दोन सभासद लोकानीं निवडलेले असून, दोन सरकारनियुक्त असत, व गावचा पटेल हा या पचायतीचा अध्यक्ष असे. या पचायतींकडे गावातील गुरासाठीं पाणी पाजण्याचे हौद, सार्वजनिक इमारती, विहिरी, तलाव, गौचर जमीनी, रस्ते, वगैरेंची व्यवस्था व दुरस्ती आणि गावातील देवस्थाने व पीरस्थानें याची देखरेख, इतकीं कामें सोंपण्यात आलीं. गावकामदारात शाळामास्तराचा समावेश करण्यात प्राथमिक शिक्षणाला उत्तेजन देण्याचा त्याचा हेतु होता, कारण याच सुमारास सक्तीचें व मोफत शिक्षण करण्याची योजना त्याच्या डोक्यात घोळत होती.

याप्रमाणें महाराजानीं केलेल्या योजनेचा अनुभव घेताना तिच्या उपयुक्ततेची साक्ष त्या वेळचे सर्व्हे ऑफिसर मि. ईलियट यानाहि पटली. मि. ईलियट हे ब्रिटिश मुलखात मुलकी खात्यातील सिव्हिल सर्व्हंट असल्यामुळें, त्याना तिकडील राज्यव्यवस्थेचाहि अनुभव होता. यामुळें त्याना या प्रकरणीं तुलनात्मक अभिप्राय देता येण्यासारखा होता. तसा

दरेक गावास एक ग्रामकूट असे, परतु काहीं ठिकाणीं अनेक ग्रामकूट असल्याचे दाखलेहि मिळतात. ही ग्रामकूटांची सख्या बारापर्यंत असल्याचीं उदाहरणें सापडतात. तथापि हे अनेक ग्रामकूट साधारणत एकाच घराण्यातील असून त्यातील मुख्य पुरुषच अधिकारावर असावा, अथवा ते सर्व आळीपाळीनें काम करीत असावेत, असें अनुमान करण्यास जागा आहे. या ग्रामकूटाकडे गावाच्या रक्षणाची सपूर्ण जबाबदारी असे. त्या काळीं सर्व प्रजा सशस्त्र असून ती युद्ध करण्यास समर्थ अशी असे. त्यातील बांगड्या विकणारे कासारहि लढाईला जाऊन निकरानें लढत असत असा उल्लेख आढळतो. गावातील या स्वयसेवक फौजेचा नाईक अर्थातच ग्रामकूट हा असे व यामुळें त्याजकडे इतर महत्त्वाचीं लष्करी जबाबदारीचीं कामेंहि सोपण्यात येत. युवराजमल्ल राजाच्या बायकोला एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं स्वत च्या सरक्षणाखालीं पोंचविताना वाटेंतील चकमकींत मारिल्या गेलेल्या एका ग्रामकूटाच्या मुलाला त्या राजानें इनाम दिल्याचा दाखला उपलब्ध आहे. गावच्या करवसूलीचें काम अर्थातच या ग्रामकूटाकडेच असे. गावातील किरकोळ गुन्ह्यांची चौकशी करण्याचे फौजदारी अधिकार त्याजकडे असत सार्वजनिक कार्यासाठीं पट्टी करून पैसे उभारण्याचें कामहि त्याजकडे असे गावात शातता राखण्याचें काम त्याचेंच असे मुख्य सरकार व गावकरी यामधील दुवा तोच असे. गावाचें सर्व दप्तर त्याच्या कबज्यात असे.

या ग्रामकूटाला वेतनादाखल बिनआकारी जमीन देण्यात येत असे, व गावकऱ्यावरील इतर बारीकसारीक कराचीहि माफी त्याला असे. याशिवाय गावात उत्पन्न होणाऱ्या अथवा विकल्या जाणाऱ्या प्रपचाच्या सर्व वस्तून त्याचा भाग असे. या वस्तूवरील त्याच्या हक्काला 'मौलिक अर्हण' असें म्हणत याच्या हाताखालीं गावचे हिशोब ठेवणारा कारकून असे त्याला लेखक असें म्हणत काहीं लेखातून त्याना 'युक्त', 'आयुक्त', 'नियुक्त' अथवा 'उपयुक्त' असेंहि म्हणण्यात आलें आहे. गावपचा-

रहिवाश्यास असे. अगदीं लहान खेडेगावात अशी पचायत स्थापणें शक्य नसल्यास तशा दोन अगर अधिक खेड्याचे मिळून गट करून त्या दरेक गटात एकेक पचायत स्थापन करण्यात येई. या पचायतींकडे वर उल्लेखिलेले सर्व अधिकार असून, त्याशिवाय दहा रुपयापर्यंतचें वळतर नक्की करण्याचा, तसेच हद्दींच्या बाणासबधीच्या गुन्ह्यात दहा रुपयापर्यंत दड करण्याचा अधिकारहि त्याना देण्यात आला. यानतर सन १९०९–१० सालीं सरकारी जमीनीच्या खातेदाराचा मोबदला करण्याचा हक्कहि त्याना देण्यात आला, व त्यातील मोठ्या पचायतींना रुपये पचवीसपर्यंतच्या दिवाणी मुकदम्याची व किरकोळ फौजदारी गुन्ह्याची चौकशी करण्याचा अधिकारहि देण्यात आला.

अशा प्रकारे या ग्रामसस्थाचें पुनरुज्जीवन करण्याचा जोराचा प्रयत्न महाराजाकडून करण्यात आला, तथापि त्यात अपेक्षेप्रमाणें यश आलें नाहीं. या सस्था इग्रजी अमलापूर्वी हजारों वर्षे जरी आपलें काम सुरळीत रीतीनें करीत आल्या असल्या, तथापि त्यानतरच्या शेंदीडशें वर्षात त्या खिळखिळ्या झाल्यामुळें, त्याच्यातील सघशक्ति व सामर्थ्य नाहींसें झालें होतें, एकजुटीनें काम करण्याची त्याची सवय मोडली होती व गावातील दरेक मनुष्य असे मानू लागला होता कीं, जोंपर्यंत मी सरकारधारा योग्य रीतीनें भरत आहे, तोंपर्यंत मला गावकऱ्याची जरूर नाहीं. या वृत्तीमुळें लोकात स्वार्थ बळावला व गावात पक्ष व फळ्या पडून ज्याना पचायतींत सभासद होण्याचा अधिकार मिळाला होता, ते त्या अधिकाराचा दुरुपयोग इतर पक्षाविरुद्ध करू लागले, यामुळें गावातील कारभारात अव्यवस्था होऊ लागली. या कारणानें मुख्य सरकारास कांहीं अधिकार आपल्याकडेच राखून ठेवावे लागले. या कारणानें गावातील मुख्य सडकावर सरकारी पब्लिक वर्क्स् खात्याचीच देखरेख राहिली. वैद्यकीय व आरोग्यविषयक देखरेख मेडिकल खात्याकडेच ठेविण्यात आली व गावातील शिक्षण या सस्थाकडे सोंपविण्यात आलें होतें, तें पुन्हा सरकारी

पद्धतीमुळें गांवकामदारांचें वर्चस्व नाहींसें झालें. पूर्वीच्या वतनदारांपैकीं पाटील व कुळकर्णी अथवा तलाटी यांना इंग्रज सरकारनें आपले नोकर म्हणून ठेविले व गांवाचें रक्षण करणाऱ्या रामोशी, वरतणिया, रखा वगैरे लोकांना पगार देऊन आपले शिपाई बनविले. अशा प्रकारें इंग्रजी अंमलामुळें ग्रामसंस्था रसातळाला गेल्या.

या गोष्टींचा विचार करून महाराजांनीं सन १८८५ सालीं खेड्यांतील गांवकामदारांच्या स्थितीबद्दलची माहिती गोळा करण्यासाठीं एक कमिटी नेमिली होती. त्यानंतर त्यांनीं सर्व्हे सेटलमेंट खात्याला या माहितीचें वर्गीकरण करून त्यावर आपला अभिप्राय देण्याचा हुकूम केला. त्या माहितीवरून वडोदें राज्यांतील ग्रामसंस्थांची जी मागील हकीकत आढळून आली, तिचें वर्णन रा. म. रा. बोडस यांनीं आपल्या ग्रामसंस्था या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत केलें आहे, त्यावरून तें येथें उद्धृत केलें आहे तें असें:—

"एकंदर गुजराथेप्रमाणें गायकवाडी मुलखांतहि भूमिस्वामित्वा-संबंधानें फार घोंटाळा होता व निरनिराळ्या व्यक्तींच्या किंवा वर्गांच्या हक्कांचे एकमेकांवर थर सांचले होते. शांतता आणि सुरळित राज्य-कारभार फार वर्षेपर्यंत कधींहि न टिकल्यामुळें, चेपाचेपी व धिटाई करणारांस फावलें होतें, व तेणेंकरून गरीबांचे हक्क बुडून दांडगाईनें मिळविलेले अधिकारच उपभोगानें वंशपरंपरेचे हक्क होऊन बसले होते. प्राचीन ग्रामव्यवस्था बऱ्याच ठिकाणीं अस्तित्वांत होती खरी, परंतु तेथें बहुधा वतनाला मालक अनेक व चाकरी करण्यास कोणी नाहीं, अशी स्थिति झाली होती. गांवकामदारांना नोकरीदाखल चाकरियात व पसायता जमीनी दिलेल्या होत्या. त्यांपैकीं पुष्कळांना अनेक वांटेकरी झालेले होते. त्यांतील कित्येक गहाण पडल्या होत्या, व बारीच्या चाकरीच्या मानानें फार लहान होत्या. श्री. खंडेराव महाराजांचें लक्ष या बाबतींत सुधारणा करण्याकडे लागलें होतें, पण

उल्लेख केला आहे, त्यावरून तत्पूर्वी ते नसल्याची कल्पना सहज होईल. परंतु खेडेगावातील स्वराज्याच्या हक्काप्रमाणेंच हें तत्त्व प्राचीन काळीं लोकांना अपरिचित नव्हते. शकापूर्वी कित्येक शतकापासून मोठ्या शहरात स्वराज्य नांदत असे. यासंबधाची माहिती श्रीयुत मथाई आयगार ह्यानीं आपल्या 'Municipal Administration' नावाच्या पुस्तकात दिली आहे. त्यात त्यानीं त्या काळच्या निवडणुकीची माहिती येणेंप्रमाणें दिली आहे —

"The city was divided into thirty wards The number of members was also thirty Everyone who lived in those wards subject to certain qualifications, had a ticket, on which he wrote his name The tickets were arranged in separate bundles representing the thirty wards The bundles were then collected and put into a pot and placed before the general inhabitants, both young and old, in meeting assembled All the priests were required to be present. The oldest priest then took the pot and looking upward so as to be seen by all the people, called one of the young boys, standing nearby, who did not know what was inside, to pick out one of the bundles The tickets were then removed to another pot. After it had been well shuffled, the boy took one ticket out of the bundle and handed it to an officer called the arbitrator who received it in the palm of his hand with fingers open He read out the name which was shouted out by the high priest "

" शहराचे तीस भाग पाडलेले असत व दरेक भागाला एक सभासद याप्रमाणें एकदर सभासदहि तीस असत. या भागात राहणारा व काहीं विशिष्ट लायकी धारण करणारा प्रत्येक रहिवाशी हा मतदार असे. त्याला निवडणुकीच्या वेळीं एक चिठ्ठी देण्यात येई व तिजवर तो आपलें नाव लिही नतर या चिठ्ठ्या भागवार एकत्र करून, त्याचीं पुडकीं बाधीत व नतर तीं सर्व पुडकीं एका भाड्यात ठेवीत.

अभिप्राय त्यांनीं पाद्रा तालुक्याच्या अहवालात दिला आहे, त्यात ते म्हणतात –

"गावकामगाराच्या चाकरीपेक्षा वतनाकडे मुंबई सरकारनें फाजील लक्ष दिलें, तसें आम्ही करीत नाहीं वरतणिया, रखा, भंगी, घेड, हजाम, वगैरे कामगाराच्या चाकरीची इग्रजी अधिकाऱ्याना प्रवासात फारशी जरूर लागत नव्हती, म्हणून ते लोक त्याना निरुपयोगी व फुकटखाऊ वाटले, हें स्वाभाविक आहे परंतु वस्तुत देशी अधिकाऱ्याना त्याचा फार उपयोग होतो."

अशा प्रकारें ग्रामसंस्थाच्या पुनर्घटनेची योजना करून तिचा अनुभव पाहिल्यावर, तिचा विस्तार करण्याचा बेत महाराजानीं निश्चित केला. सन १८९४ सालीं त्यानीं आपल्या दिवाणाना लिहिलेल्या एका पत्रात ही आपली इच्छा स्पष्टपणें दर्शविली आहे त्या पत्रात ते म्हणतात –

"मि ईलियट हे जाण्यापूर्वी त्यानीं निदान शभर खेड्यात लोकानीं निवडलेल्या कामदारामार्फत गावाचा कारभार करणाऱ्या सस्था निर्माण कराव्या, असें तुम्ही त्याना सागावें या योजनेवर माझी फार भिस्त आहे व ती सर्व राज्यभर लागू करण्याची माझी इच्छा आहे"

महाराजाच्या या इच्छेप्रमाणें ग्रामपचायतींची स्थापना झाल्यावर, महाराजानीं बरींच वर्षें त्याना आपल्या परीनें काम करू दिलें व त्यानतर त्या पायावर पुढील इमारत बाधण्याचा उपक्रम केला सन १९०२ सालच्या डिसेंबर महिन्यात ग्रामपचायतींना निवडणुकीचा व गावकारभाराचा अधिकार देण्याबद्दलचे नियम मजूर करण्यात आले व ते पुढील सालच्या फेब्रुआरी महिन्यापासून अमलात आले. त्याअन्वयें दरेक खेड्यात तेथील वस्तीच्या कमी अधिक प्रमाणानें पाचपासून नऊ सभासदाची एक पचायत नेमण्यात आली, तिचा अध्यक्ष पूर्वीप्रमाणेंच गावचा पटेल हा असे या *सभासदाची निवडणूक करण्याचा मताधिकार त्या गावातील कायम वस्ती* असलेल्या व दोनशें रुपयाची स्थावर मिळकत अथवा घर असलेल्या

काऱ्याची नेमणूक केली व यासाठीं लागणारा खर्च त्या हद्दींतील दुकानदाराकडून वसूल करण्याचा हुकूम केला. पुढें याच अधिकाऱ्याकडे त्या शहरात नवीन रस्ते करविण्याचें व जुन्या रस्त्याची दुरुस्ती करण्याचें कामहि देण्यात आलें व यासाठीं लागणारा खर्च त्या शहरातील काहीं आयात व निर्यात वस्तूवर कर बसवून भागविण्याचें ठरविण्यात आले. सन १८५९–६० मध्यें शहरातील मैला काढविण्याची व्यवस्था करण्यात आली. सन १८६२ सालीं आगी विझविण्याचे बंब भागविण्यात आले. पुढें सन १८६६ सालीं खंडेराव महाराजानीं शहरातील व्यवस्थेच्या कामासाठीं निरनिराळ्या व्यवसायातील पाच गृहस्थाची एक कमिटी नेमली व या कामाचा वाढता खर्च भागविण्याकरिता गावातील घराच्या किंमतीप्रमाणें दर हजारीं अडीच रुपयेप्रमाणे घरपट्टी बसविली, परंतु पुढें तिच्या वसुलीचा खर्च उत्पन्नाहून अधिक होऊ लागल्यामुळें, ती रद्द करण्यात आली. यानतर सन १८७७ सालीं राजा सर टी माधवराव यानीं एक वटहुकूम काढून म्युनिसिपालिट्याच्या स्थानिक समित्या नेमण्याचा हुकूम केला तथापि त्याचें सर्व काम सरकारी अधिकाऱ्यामार्फतच होत असे त्या वेळीं स्थानिक कर नसत, व या म्युनिसिपालिट्याच्या खर्चासाठीं सरकारातून वस्तीच्या सख्येनुसार माणशीं चार आणेप्रमाणें मदत देण्यात येत असे

सर माधवराव याच्या दिवाणगिरीच्या अखेरीस अशा प्रकारच्या म्युनिसिपालिट्या २६ गावातून स्थापन करण्यात आल्या होत्या, व त्या सर्वांना मिळून २,८७,००० रुपयाची मदत सरकारातून देण्यात येई. त्यापैकीं २,३३,००० रुपये एकट्या बडोदे शहरासच देण्यात येत असून, बाकीच्या २५ सस्थाना मिळून फक्त सुमारें रुपये ५५,००० ची मदत मिळे। अशा प्रकारची स्थिति महाराजाच्या पूर्वोपर्यंत असे त्यानतर सन १८९१–९२ सालीं 'सुधराई निबंध' (Municipalities Act) घडण्यात आला व त्याअन्वयें लोकाना आपल्या गावाची व्यवस्था करण्यासाठीं आपल्या पसतीचे

खात्याकडे परत द्यावें लागलें. अशा रीतीनें या संस्थानवर्गींच्या मूळच्या उदार दृष्टींत थोडा फरक करावा लागला, तथापि महाराजांचा या संस्थावरील विश्वास ढळला नाहीं, असें त्यांनीं सन १९०९ च्या जून महिन्यात आपले दिवाण श्रीयुत रमेशचंद्र दत्त यांना लिहिलेल्या पत्रावरून स्पष्ट होतें या पत्रात ते लिहितात —

"लोकांच्या हिताविषयींच्या योजना त्यांच्याच हातून पार पाडाव्या अशा प्रकारचें शिक्षण त्यांना देणें, हें माझें मुख्य धोरण आहे. यासाठीं स्थानिक स्वराज्याच्या मर्यादा वाढतच गेल्या पाहिजेत, म्हणून ग्रामपंचायतींकडे व तालुकापंचायतींकडे पूर्वीहून अधिक काम दिलें पाहिजे"

कोणतीहि चांगली गोष्ट प्रथमच करू लागल्यावर त्यांत चुका या व्हावयाच्याच, पण आरंभीं चुका झाल्या म्हणून ती गोष्टच सोडून देणें अप्रयोजकपणाचें होईल काम करण्यानेंच त्या कामाचें शिक्षण मिळतें, हा धडा महाराजांनीं पूर्णपणें समजून घेतल्यामुळें, त्यांनीं पूर्ण स्वराज्याचा पाया जें स्थानिक स्वराज्य त्याच्या या प्रयोगाच्या परिणामानें नाउमेद न होता, आपलें कार्य तसेंच पुढें चालू ठेविलें

याप्रमाणें स्थानिक स्वराज्याचा पाया खेडेगावांत घातल्यावर, नंतर त्यावर तालुकापंचायतीचे व प्रांतपंचायतीचे मजले त्याच पद्धतीनें चढविण्यात आले त्याचबरोबर शहरांतील लोकांनाहि असेच हक्क देण्याची व्यवस्था करण्यात आली इ स १८९२ सालीं महाराजांनीं रेसिडेंट मील्साहेब यांना लिहिलेल्या पत्रात कळविलें होतें कीं,

"नुकतीच मी म्युनिसिपालिट्यांसंबंधाची एक योजना मंजूर केली आहे तिच्यात निवडणुकीचें तत्त्व घातलेलें असून, त्यासंबंधाचे नियमहि तयार केले आहेत तिचा उपयोग कसा काय होतो, तो पहावयाचा आहे"

या पत्रात निवडणुकीचें तत्त्व प्रथमच म्युनिसिपालटीच्या बाबतींत घातल्याचा

या बाबतींतील महाराजाच्या ध्येयाकडे जाण्याचे काहीं टप्पे आक्रमिण्यात आले. तें ध्येय काय होते, याबद्दलचे विवेचन बडोदें म्युनिसिपालिटीनें त्याच्या एका वाढदिवशीं त्याना दिलेल्या मानपत्राचें उत्तर देते वेळीं त्यानीं केलें आहे. ते म्हणाले,

> " राज्यकारभाराच्या कामात राज्यकर्त्यापासून प्रजाजनाना दूर ठेवणें, हे माझें ध्येय नाहीं. माझ्या मतें जें सरकार प्रजेच्या हातात हात घालून त्याच्या मदतीनें व त्याच्या इच्छेनुरूप सहानुभूतीनें व उदारपणानें काम करितें, तेंच सरकार उत्तम होय जर मला दीर्घायुष्य मिळाले व राज्यकारभारात मला लोकाची मदत झाली, तर त्याची नैतिक व भौतिक उन्नति घडवून आणून त्याना राज्यकारभारात महत्त्वाचा व सुबुद्ध भाग घेता येईल, अशा सुधारणा करण्याचा मी यथाशक्ति प्रयत्न करीन. "

हे उद्गार महाराजानीं काढल्यास तेत्तीस वर्षांवर काळ होऊन गेला आहे व त्याच्या या सत्यसंकल्पाचें फल देण्यासाठीं नारायणानें त्याना आयुरारोग्याचा लाभहि करून दिला आहे ईश्वर करो व त्याच्या हातून याहूनहि अधिक सुधारणा होण्याचा लाभ त्याच्या प्रजेला मिळो.



मग सर्व नागरिकांची सभा बोलावण्यात येई. तिला वृद्ध, तरुण, सर्व प्रकारचे लोक व नगरातील सर्व पुरोहित हजर राहत. नंतर सर्वांतील वृद्ध पुरोहित सभेच्या सन्मुख उभा राहून एका लहान अशा मुलाला बोलावून त्याजकडून एक पुटकें उचलवी. नंतर त्या चिठ्या दुसऱ्या एका भांड्यात ठेवून त्या चांगल्या हलविल्यावर, तो मुलगा त्या पुडक्यातून एकेक चिठी उचलून त्या सभेंत हजर ठेविलेल्या लवादाजवळ देई. तो लवाद आपल्या तळ्हातावर ही चिठी घेऊन तिच्यावरील नाव वाचून दाखवी व नंतर मुख्य पुरोहित तें नाव मोठ्यानें ओरडून सर्व सभेस जाहिर करी."

वरील परिच्छेदात सभासदाच्या ज्या लायकीचा उल्लेख केला आहे, ती लायकी येणेंप्रमाणें असे –

"दरेक सभ्य होणारा मनुष्य तीस वर्षांहून अधिक व पचाहत्तर वर्षांहून कमी वयाचा असावा लागे दुसरा नियम असा असे कीं, त्याच्या मालकीची विशिष्ट क्षेत्रफळाची जमीन असली पाहिजे, अथवा त्याचे मालकीचें घर असलें पाहिजे. जे लोक कर भरण्यात चुकत, अथवा ज्याना गुन्ह्याबद्दल शिक्षा झालेली असे, त्याना नगर-सभेचे सभ्य होता येत नसे"

अशा नगरसभा तक्षशिला, मदुरा, बादामी, ताम्रलिसा, उज्जयिनी, पाटलिपुत्र वगैरे मोठ्या नगरातून असल्याचे उल्लेख उपलब्ध आहेत. पाटलिपुत्राच्या नगरसभेचें मेगॅस्थनिसनें दिलेलें वर्णन बहुतेकाना माहीत आहेच

पण पुढें ती परंपरा कालांतरानें बंद झाल्यानंतर बडोदें राज्यात शहराच्या स्थानिक कारभारात सर्वत्र अव्यवस्था झाली. तींत कांहीं सुधारणा करण्याकरिता सन १८३० सालीं दुसऱ्या सयाजीराव महाराजानीं बडोदें राज्यातील चार प्रांताच्या मुख्य शहरातील सडकावर पाणी शिंपडविण्याची व्यवस्था करून त्या कामासाठीं एकेक अधिकार-

मानली नाहीं, तरी नीतिशास्त्र, इतिहास, विज्ञान इत्यादि वाङ्मयाची प्रत्यक्ष उपयुक्तता अर्थातच मान्य करावी लागेल. जी स्थिति साहित्याची तीच ललितकलाची होय. मात्र या बाबतींत या दोहोंत एक फरक आढळून येतो. साहित्याची जन्मजात अभिरुचि थोड्या लोकात आढळून येते, परतु ललितकलापैकीं गायनादिकाची गोडी दरेक मनुष्याला थोडी बहुत तरी जन्मत च असते. तथापि येथेंहि सदभिरुचि ही फार विरळ असते, व चित्रकला अथवा मूर्तिकला याच्याविषयीं तर मार्मिक दृष्टि मिळणें फारच कठिण असतें. अर्थात् अशी मार्मिक दृष्टि स्वत ला मिळून तिचा लाभ आपल्या प्रजाजनाना करून देणारे राजे हिंदुस्थानात त्या काळीं फारच दुर्मिळ होते. अशा दुर्मिळ राजात महाराजाची गणना असल्यामुळें, त्यानीं ललितकलाची जोपासना चागल्या रीतीनें केली. म्हणून साहित्य व ललितकला या दोहोंचा परामर्ष त्यानीं कशा प्रकारें घेतला, त्याची हकीकत या प्रकरणात आपण अवलोकन करू.

बडोदें राज्यात साहित्याच्या अभिवृद्धीला उत्तेजन देण्याचें कार्य काहीं अपरिचित नव्हतें. श्री. गणपतराव गायकवाड यानीं सन १८४९ सालीं ‘दक्षिणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणारी मडळी’ या सस्थेस पाच हजार रुपये बक्षिस दिल्याचा उल्लेख आढळतो. होनाजी बाळ, सगनभाऊ या प्रसिद्ध शाहीराना बडोद्याच्या अधिपतींचा पुष्कळ आश्रय व मदत असे. अनतफदी हे तर बडोद्याचेच वतनदार होते. त्याचे नातु अगदीं अलीकडेपर्यंत स्वत आख्याने रचून बडोद्यास कीर्तनें करीत असत व त्याचेहि सुमारें १० व १२ वर्षांचे दोघे नातू यानीं काहीं नवीन पोवाडे रचून ते सुमारें चार पाच वर्षांपूर्वींच महाराजासमोर म्हणून दाखविले होते. खडेराव महाराज हेहि अशा गुणी लेखकवर्गांना चागला आश्रय देत व त्याच्या मार्गे श्री. जमनाबाईसाहेब यानीं ही परपरा पुढें चालू ठेविली होती.

सरकारी कन्याशाळातून मुलींना गर्भ शिकविले जात; तशा गर्भ्यांचीं

सभासद निवडून देण्याचा अधिकार देण्यात आला. प्रथम हा अधिकार फक्त बडोदें शहरापुरता मर्यादित होता, व इतर म्युनिसिपालिट्यांत जनतेपैकींच्या आठ ते सोळा सभासदांची नेमणूक करण्याचा अधिकार सुभ्यांना देण्यांत आला होता. या संस्थाच्या खर्चासाठीं सात हजाराहून अधिक वस्तीच्या गावांना माणशीं आठ आणे व त्याहून कमी वस्तीच्या गावांना सहा आणे-प्रमाणें सरकारांतून मदत देण्याचें ठरविण्यात आलें. त्या वेळीं या संस्थांची देखरेख मेडिकल खात्याकडे असे. यानंतर सन १८९४–९५ सालीं पूर्वींच्या स्थितींत सुधारणा करून बहुतेक म्युनिसिपालिट्यांना सुभ्यांच्या अधिकाऱ्याच्या हुकमतींतून मुक्त करण्यात आलें. पुढें सन १९०५ सालीं सुधराई निबंध सुधारून तो नवीन स्वरूपांत मंजूर करण्यात आला. त्याअन्वयें लोकांनीं निवडलेल्या सभासदांचें बहुमत या संस्थांत ठेविण्यात येऊन, काहीं सरकारी अमलदार अधिकारपरत्वें, व काहीं सरकारनें नेमिलेले बिनअधिकारी लोक या संस्थांतून ठेविण्यात आले. यानंतर सन १९१० सालीं पुन्हा त्या कायद्यांत दुरुस्ती करून कामाच्या व्यवस्थेला नीट वळण लावण्यात आलें. म्युनिसिपालिट्यांच्या उत्पन्नासाठीं स्थानिक कर बसविण्याचा अधिकार त्यांना यापूर्वींच देण्यात आला होता.

या एकंदर सुधारणामुळें बडोदें शहराचें पूर्वींचें स्वरूप संपूर्णतेनें बदलून गेलें. पूर्वींचें बडोदें कसें होतें, यासंबंधचें वर्णन फोर्ब्स् व व्हीलर यांच्या लेखांवरून पहिल्या खंडात देण्यात आलेंच आहे, त्याच्याऐवजीं तें एक सुंदर शहर बनून गेलें. त्याच धोरणानें इतर शहरांतहि सुधारणा झाली व महाराजांच्या कारकीर्दीच्या या मध्यकालाच्या अखेर मोठ्या मोठ्या गावांतून रस्ते रुंद व सरळ करण्यात आले आणि ते झाडण्याची, शिंपडण्याची व दुरुस्त करण्याची व्यवस्था करण्यात आली, सर्वत्र प्रकाशाची सोय करण्यात आली, गावांतील मैला साफ करण्यास येऊं लागला, पाणीपुरवठ्याच्या योजना अमलांत आल्या, झाडें रोपण्याची सोय केली गेली व अशा रीतीनें लोकांकरवीं त्यांच्या गावाची व्यवस्था करण्यात येऊन

नवीन विचार, कल्पना व शब्द तींत आणावे लागतात. यासबधानें कै विष्णुशास्त्री हे आपल्या 'भाषातर' या निबधात म्हणतात —

"भाषा जी प्रगल्भ दशेस चढते, ती केवळ सृष्टीनियमानुसारानेंच चढते, असें नाहीं. म्हणजे प्राणी किंवा वनस्पति याची वाढ जशी नियमानें व्हावयाचीच, तशी काहीं भाषेची गोष्ट नाहीं. तिची अभिवृद्धि मुख्यत मनुष्यप्रयत्नानेंच आहे."

देशी भाषेच्या अभिवृद्धीचें हेंच धोरण महाराजानींहि आपल्या कारकीर्दीच्या आरभीं स्वतत्रपणें स्वीकारिलें. सन १८८९ च्या जानेवारींतील एका पत्रात त्यानीं आपले बधु श्री. सपतराव यास लिहिलें आहे कीं,

"क्रोके या खेळाच्या पुस्तकाचें मराठी भाषातर केलेलें पुस्तक आपण पाठविलें, तें पोचलें. पुस्तक सुदर झालें आहे. तें विकलें जाईल, अशी व्यवस्था करावी. या पुस्तकाचें गुजराथी भाषेंत, पण बाळबोध लिपींत, भाषातर करावें. अशाच प्रकारें इतर ग्रथाचीं मराठी व गुजराथी भाषातरें करवीत जावीं."

परतु या पत्रात केलेला उल्लेख केवळ प्रासगिक असल्यामुळें, देशी भाषेंत चागले ग्रथ निर्माण करण्यासबधानें सरसहा धोरण ठेवण्याच्या हेतूनें महाराजानीं यानतर हुजूर हुकूम केले. त्यात म्हटलें आहे कीं,

"देशी भाषातील ग्रथसामग्री वाढावी, या उद्देशानें परभाषेंतील ग्रथाचीं भाषातरें करविण्याची व नवीन पुस्तकें लिहिण्यास आश्रय व उत्तेजन देण्याची योजना विद्याखात्यानें करवावी. खर्चाच्या प्रमाणानें सरकारचा हेतु पार पडण्यासारखें काम झालें आहे कीं नाहीं, याबद्दल खात्री करून घ्यावी व सरकारचा खर्च गैररीतीनें न होण्याबद्दल सर्वांनीं सावधगिरी ठेवावी. पुस्तकें करण्याबद्दलच्या व त्यासाठीं उत्तेजन किंवा पारितोषिक मिळण्याबद्दलच्या मागण्या निरनिराळ्या खात्याकडे न येता, एकाच खात्यात याव्या. एखादा नवीन ग्रथ करविण्याचें किंवा भाषातर करविण्याचें काम हुकूम घ्यावयासाठीं रुजू करण्यात

## प्रकरण २८ वें



# साहित्य आणि ललितकला

सुभाषितकारानीं मनुष्याच्या संस्कृतीचें चिन्ह म्हणून साहित्य, संगीत व कला यांचें अस्तित्व त्याच्या ठिकाणीं वर्णिलें आहे व हें लक्षण महाराजानीं आपल्या आयुष्यक्रमात आपल्या वर्तनानें सार्थ करून दाखविलें आहे. मि. ईलियटसारख्या शिक्षकाच्या सहवासानें विद्यार्थिदशेपासूनच महाराजाना वाङ्मयाची आवड उत्पन्न झाली. तथापि या बाबतींत दिलेली शिदोरी व शिकविलेलें ज्ञान हीं फारशीं उपयोगीं पडत नाहींत; तेथें पाहिजे जातीचें, हेंच खरें आहे. हिंदुस्थानातील बहुतेक राजपुत्राच्या शिक्षकाच्या जागीं इंग्रज अगर हिंदी विद्वान गृहस्थाचीच नेमणूक करण्यात येते; तथापि पुढील आयुष्यात वाङ्मयाचा व्यासंग कायम ठेवणारे, इतकेंच नव्हे तर तो वाढविणारे संस्थानिक सबंध हिंदुस्थानात किती सापडतात? महाराजानीं आपल्या आयुष्यात जी साहित्यसेवा सुरू केली व आजतागायत वाढत्या प्रमाणावर अखंड चालू ठेविली आहे, तिचें कारण त्याची जन्मजात साहित्यविषयक अभिरुचि हेंच होय. शुद्ध आनंद व उपयोगिता हे साहित्यसेवेचे दोन हेतू असतात. अगदीं निरुपयोगी असें सत्वाङ्मय असणें शक्यच नाहीं. अंतःकरणाला व बुद्धीला प्रसन्नता देऊन त्याना नित्याच्या पेक्षां उच्च वातावरणात नेण्यानें व्यवहाराच्या दृष्टीनें पाहताहि वाङ्मय हें मनुष्याला अधिक उत्साही बनवितें. म्हणून या दृष्टीनें तर त्याची उपयुक्तता आहेच. परंतु कदाचित् प्रत्यक्ष व्यवहाराच्या दृष्टीनें जरी काव्यादि साहित्याची उपयोगिता

ग्रथमाला या दोन मालाची सर्व व्यवस्था आरभीं त्याचेकडेच असे पुढें ती विद्याखात्याकडे सोंपण्यात आली. त्यानीं आपल्या सुप्रसिद्ध रियासती लिहिण्यास बडोद्यासच सुरुवात केली. त्या रियासतींचे आरभींचे खड यानीं आपल्या स्वतच्या जबाबदारीवरच प्रसिद्ध केले. नतरच्या खडापैकीं मध्यविभाग २ व ३ हे पानिपत प्रकरणविषयक दोन भाग बडोद्याच्या सरकारी आश्रयानें प्रसिद्ध झाले आहेत.

महाराजाना देशी भाषातील ग्रथनिर्मितीच्या कामीं या आरभाच्या काळात उपयोगी पडलेले तिसरे गृहस्थ कै त्रिभुवनदास गज्जर हे होत. महाराजानीं सन १८८८ सालीं शास्त्रीय शिक्षणाचीं पुस्तकें गुजराथींत तयार करविण्यासाठीं ५०,००० रुपयाची रक्कम मजूर करून त्याबद्दलची सर्व व्यवस्था प्रो. गज्जर याचेकडे सोंपली. या मालेतून निरनिराळ्या शास्त्रावरील पुस्तकें तयार करविण्यात आलीं. येथपर्यंत विद्वान लोकाकडे देशी भाषात ग्रथ तयार करविण्याचें काम सोंपून ते ज्याची योजना करतील त्या लेखकाकडून तीं पुस्तकें लिहवून घेण्यात येत, परतु सन १८९३ सालीं सरकारमार्फत विद्वान लेखकाना नोकरींत ठेऊन त्याच्याकडून ग्रथ लिहविण्याची व्यवस्था करण्यात आली. अशा गृहस्थापैकीं मणिलाल द्विवेदी या नावाचे एक गृहस्थ होते. त्यानीं बडोदें राज्यातील पाटण येथील प्रसिद्ध जैन भाडारातून एकवीस ग्रथाचें सशोधनात्मक भाषातर केलें होतें. त्यापैकींचे काहीं ग्रथ प्रसिद्ध करविण्यात आले व काहीं प्रसिद्धीसाठीं तयार आहेत हीच भाषातरशाखेची पहिली स्थापना होय. या शाखेमार्फत जरी अनेक ग्रथ प्रसिद्ध करण्यात आले, तरी ते ग्रथ निवडण्याच्या कामीं एकसहा धोरण त्या काळीं घातलें गेलें नव्हतें, म्हणून सन १९०८ सालीं महाराजानीं विद्याधिकारी खात्याच्या हाताखालीं काम करणारी भाषातरशाखा नवीन पद्धतीवर स्थापन केली. या शाखेमार्फत प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकाचें 'Literature of Knowledge' व 'Literature of Power' म्हणजे ज्ञानवर्धक वाङ्मय व तेजोवर्धक

पुस्तकें रचणारांकडून त्यांनीं तयार करवून ठेविलीं होतीं, असा उल्लेख बापटकृत त्यांच्या चरित्रात आढळतो. पुढें महाराजाना अधिकारप्राप्ति झाल्यावर त्यांनीं आपलें लक्ष लवकरच वाङ्मयाकडे वळविलें. त्या काळीं मराठी वाङ्मयाची पैदास फारच अल्प प्रमाणात होत असे. बखरी व राजकीय पत्रव्यवहार वगळला, तर इंग्रजशाहीच्या सुरवातीपर्यंत मराठी गद्य असें फारसें नव्हतेंच, ही गोष्ट सर्वमान्य आहे. मराठींतील स्वतंत्र वाङ्मयाचे पहिले लेखक कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यानीं आपल्या निबंधमालेचा आरंभ सन १८७४ सालीं म्हणजे महाराजांच्या राज्याभिषेकाच्या सुमारासच केला होता. तत्पूर्वींच्या पन्नास वर्षांत मराठींत फारच थोडे ग्रंथ प्रसिद्ध झाले होते. सन १८७४ सालीं निबंधमालेस सुरवात करताना विष्णुशास्त्री यानीं मराठी भाषेची सांप्रतची स्थिति हा पहिलाच निबंध लिहिला, त्यांत त्या वेळच्या मराठी ग्रंथसंबंधानें जो उल्लेख केला आहे, तो तत्कालीन परिस्थितीचा निदर्शक असल्यानें येथें देत आहों —

"इंग्लिश भाषेंत पहिल्यानेच गति होऊन तींतील सुरस ग्रंथांची आपल्या लोकांस जेव्हा गोडी लागली, तेव्हा यासारखें आपल्या भाषेंत काहीं तरी करावें, अशी त्यास सहजच मोठी हौस वाटली. मग पुष्कळांनीं हा उद्देश भाषांतरद्वारें सिद्धीस नेला. त्याच्या योगानें लोकांचें पुष्कळ हित झालें, व इंग्रजी भाषेची योग्यता सर्वांस स्पष्टपणें कळून आली. पुढें कित्येकांनीं यावरहि तोड करण्याचें मनांत आणिलें. कोणी इंग्रजी ग्रंथांच्या नमुन्यावर कल्पित कथा, नाटकें व इतर ग्रंथ केले, व कोणी इंग्रजींतीलच गोष्टींचें देशाचारानुरोधानें रूपांतर करून मराठी ग्रंथ बनविले. तशींच संस्कृतांतूनहि काव्यादिग्रंथांचीं भाषांतरें होऊन भाषेची व रसिकत्वाची लोकांत वृद्धि होण्यास बरींच कारणें झालीं."

वरील उताऱ्यावरून मराठी गद्याच्या या आद्यकालीं भाषांतरावरच विशेष भिस्त ठेविण्यांत येत असे, असें दिसून येईल. हीं भाषांतरें सर्वच चांगलीं असत, असें नाहीं. परभाषेंतील ग्रंथांचें रहस्य स्वभाषेंत आणतांना

"साधारणत आपल्या समाजाचे चार वर्ग पडतात. ते (१) सुशि-
क्षित लोक, (२) राजे व सरदार वर्ग, (३) व्यापारी व (४) शेतकरी
५ आणि इतर खालच्या जाती, हे होत. यापैकींच्या पहिल्या वर्गावरच
ज्ञानप्राप्तीसाठीं इतर तीन वर्ग अवलंबून असतात. दुसऱ्या वर्गाचे लोक
आपल्या पूर्वीच्या उच्च दर्जापासून साप्रत ढळले आहेत व बाकीचे दोन
*वर्ग तर अजून बहुतांशीं अशिक्षितच आहेत. म्हणून त्याना ज्ञान*
मिळेल असे ग्रंथ लिहून प्रसिद्ध करण्याची जबाबदारी मुख्यत पहिल्या
वर्गावरच आहे. यासाठीं प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथासंबंधानें उपयुक्ततेची
दृष्टि तुम्हीं आपल्या नजरेपुढें ठेविली पाहिजे. व्यापार, शेतकी वगैरे
व्यवसायाच्या लोकानाहि प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकातून आपआपल्या
उद्योगाचें ज्ञान मिळेल, अशी योजना झाली पाहिजे."

इग्रजींतील प्रथाप्रमाणेंच सस्कृतातील उत्तम ग्रंथाचीं भाषातरें करविण्याची *व्यवस्थाहि महाराजानीं आपल्या अधिकारप्राप्तीनतर लवकरच केली.* येथील श्रावणमासदक्षिणेपैकींचे दरसाल ५,५०० रुपये नवीन पुस्तकें तयार करविण्यासाठीं त्यानीं लावून दिले व नतर त्याच निधींतून धर्म-शास्त्रावरील उत्तम पुस्तकें मराठींत प्रसिद्ध करण्यासाठीं दरसाल १०,००० रुपये खर्च करण्याचा हुकूम दिला. या रकमेंतून दत्तकचद्रिका, निर्णय-सिंधु, विवादताण्डव, सस्कारकौस्तुभ, दानचद्रिका, आचारमयूख व ब्रह्मसूत्रभाष्यासारखे कित्येक उत्कृष्ट ग्रंथ भाषातरित होऊन बाहेर पडले *आहेत. सस्कृत भाषेतील पुस्तकाचे इतिहास, शास्त्र, नाटकें व धर्म असे* चार भाग पाडून, त्यातील ग्रंथ मराठींत आणविण्याची व्यवस्था त्यानीं केली. सर्व देशी भाषाची जननी म्हणून सस्कृत भाषेचे महत्त्व फार मोठें आहे, याची जाणीव महाराज कधींहि विसरले नाहींत. *अलीकडे महाराष्ट्रात मराठीच्या फाजील अभिमान्यानीं विद्यापीठातील* अभ्यासक्रमातून सस्कृत भाषेचें उचाटन करविण्याची खटपट चालविली आहे. विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात मराठीला स्थान मिळावें, यासाठीं

पुस्तकें रचणारांकडून त्यांनीं तयार करवून ठेविलीं होतीं, असा उल्लेख वापटकृत त्यांच्या चरित्रांत आढळतो. पुढें महाराजांना अधिकारप्राप्ति झाल्यावर त्यांनीं आपलें लक्ष लवकरच वाङ्मयाकडे वळविलें. त्या काळीं मराठी वाङ्मयाची पैदास फारच अल्प प्रमाणांत होत असे. बखरी व राजकीय पत्रव्यवहार वगळला, तर इंग्रजशाहीच्या सुरवातीपर्यंत मराठी गद्य असें फारसें नव्हतेंच, ही गोष्ट सर्वमान्य आहे. मराठींतील स्वतंत्र वाङ्मयाचे पहिले लेखक कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या निबंधमालेचा आरंभ सन १८७४ सालीं म्हणजे महाराजांच्या राज्याभिषेकाच्या सुमारासच केला होता. तत्पूर्वीच्या पन्नास वर्षांत मराठींत फारच थोडे ग्रंथ प्रसिद्ध झाले होते. सन १८७४ सालीं निबंधमालेस सुरवात करतांना विष्णुशास्त्री यांनीं मराठी भाषेची सांप्रतची स्थिति हा पहिलाच निबंध लिहिला; त्यांत त्या वेळच्या मराठी ग्रंथांसंबंधानें जो उल्लेख केला आहे, तो तत्कालीन परिस्थितीचा निदर्शक असल्यानें येथें देत आहों:—

"इंग्लिश भाषेंत पहिल्यानेंच गति होऊन तींतील सुरस ग्रंथांची आपल्या लोकांस जेव्हां गोडी लागली, तेव्हां यासारखें आपल्या भाषेंत कांहीं तरी करावें, अशी त्यांस सहजच मोठी हौस वाटली. मग पुष्कळांनीं हा उद्देश भाषांतरद्वारें सिद्धीस नेला. त्यांच्या योगानें लोकांचें पुष्कळ हित झालें, व इंग्रजी भाषेची योग्यता सर्वांस स्पष्टपणें कळून आली. पुढें कित्येकांनीं यावरहि तोड करण्याचें मनांत आणिलें. कोणी इंग्रजी ग्रंथांच्या नमुन्यावर कल्पित कथा, नाटकें व इतर ग्रंथ केले; व कोणी इंग्रजींतीलच गोष्टींचें देशाचारानुरोधानें रूपांतर करून मराठी ग्रंथ बनविले. तशींच संस्कृतांतूनहि काव्यादिग्रंथांचीं भाषांतरें होऊन भाषेची व रसिकत्वाची लोकांत वृद्धि होण्यास बरींच कारणें झालीं."

वरील उताऱ्यावरून मराठी गद्याच्या या आद्यकालीं भाषांतरांवरच विशेष भिस्त ठेविण्यांत येत असे, असें दिसून येईल. हीं भाषांतरें सर्वच चांगलीं असत, असें नाहीं. परभाषेंतील ग्रंथांचें रहस्य स्वभाषेंत आणतांना

साहेबाचा आरसपानी पुतळा, महाराजाचे जनक पिते श्री. काशीराव गायकवाड याचा बसलेला पुतळा, कै श्री. फत्तेसिंहराव व जयसिंहराव या उभय राजपुत्राची जोडी उभी असलेला ब्रॉझचा पुतळा, पाणी वाहणारा भिस्ती, नाचणारी बाई, दोन चित्ते व त्याना पाळणारे रक्षक, सारंगीवाला वगैरे पुतळे फार उत्कृष्ट आहेत. याशिवाय लक्ष्मीविलास राजवाड्यातील मुख्य दरबारच्या दिवाणखान्यात पूर्वीच्या दिवाणाचे व इतर कित्येक राज कुटुंबीयाचे अर्धपुतळे हेहि फेलीचीच्या कलेचे उत्कृष्ट नमुने आहेत. पण या सर्वापेक्षा त्याचा उत्कृष्ट पुतळा म्हणजे हातात बदूक घेतलेला आरब शिकारी हा होय. तो मुख्य जिन्याच्या कठड्यावर उभा केला आहे. त्यातील शिकाऱ्याची सडपातळ पण चपल शरीरयष्टि, तीक्ष्ण दृष्टि, धाडसी व बेदरकार मुद्रा व हातातील बदूक धरण्याची ऐट, हीं सर्व वाखाणण्याजोगीं आहेत. याशिवाय फेलीचीनें केलेलें दुसरें अप्रतिम कुसरीचें काम म्हणजे निजलेल्या ईव्हचा शुभ्र सगमरवरी दगडाचा भर आकाराहून मोठा असा बनविलेला पुतळा हा होय. जगातील उत्तम कारागिरींत या पुतळ्याची गणना करण्याजोगी आहे. फेलीचीनतर फॅम्टन् नावाचा दुसरा एक कारागीर महाराजानीं आणविला होता त्यानें केलेलें उत्कृष्ट काम म्हणजे रोम शहराची स्थापना करणारे महापुरुष रॉम्युलस व रीमा हे दोघे लहान असताना त्याना एका लाडगीनें स्तनपान करवून वाढविल्याच्या प्रसगाचा पुतळा होय आल्बर्ट टॅस्ट् नावाच्या आणखी एका मूर्तिकाराकडूनहि महाराजानीं काहीं कामें करवून घेतलीं आहेत

याखेरीज अरब वेड्यातील शिपाई, हुजुरातचा स्वार व गीता वाचणारा ब्राह्मण हे उत्कृष्ट कलाकुसरीचे पुतळे महाराजानीं करवून योग्य ठिकाणीं ठेवविले आहेत.

*मूर्तिकलेप्रमाणेंच चित्रकलेलाहि महाराजानीं उत्तेजन दिलें आहे* त्यानीं युरोपातील सर्व प्रसिद्ध चित्रमदिरें आपल्या प्रवासात अवलोकिलीं होतीं, व त्यावरून दरेक देशाच्या निरनिराळ्या काळ्यतील सस्कृतीची

वाङ्मय, असे मुख्य दोन भाग करण्यात आले आहेत व या दोन्ही प्रकारच्या पुस्तकांचा प्रसार समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत गेला पाहिजे अशा अपेक्षेनें हीं पुस्तकें लिहविलीं जावीं, असा आपला उद्देश महाराजांनीं प्रकट केला आहे. याच दृष्टीनें सन १९०४ सालीं पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूल या शाळेला भेट देतेवेळीं महाराजांनीं म्हटलें कीं,

"जिनें कार्यकारणाचा योग्य संबंध कळतो, सामाजिक, राजकीय, धार्मिक, औद्योगिक वगैरे बाबतींतील आपली दुरवस्था आपल्याला कळून ती अशी का झाली याचीं कारणें शोधून काढता येतात, आणि सर्व विषयाचा न्यायानें व समतेनें विचार करण्याची पात्रता येते, तीच खरी विद्या होय."

अशा विद्येचा प्रसार करण्यासाठींच देशी भाषांतून पुस्तकें प्रसिद्ध करण्याचें धोरण महाराजांनीं स्वीकारलें. तथापि स्वाभाविक रीतीनें महाराजांच्या प्रारंभींच्या उपक्रमांत त्यांना या बाबतींत हवें तितकें यश मिळालें नाहीं. यामुळें सन १९१० सालीं मुंबई येथील ग्रंथप्रकाशक मंडळींकडून दिल्या गेलेल्या मानपत्राच्या प्रसंगीं महाराजांनीं या गोष्टीची जाणीव व्यक्त करून म्हटलें कीं,

"माझ्या संस्थानांत आतापर्यंत जीं पुस्तकें सरकारच्या मदतीनें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांत दोष आहेत हें मी कबूल करतों. यापेक्षां तीं पुस्तकें अधिक चांगलीं तयार करता आलीं असतीं. यापुढें जे ग्रंथ प्रसिद्ध होतील, ते अधिक चांगले होण्याविषयीं खबरदारी घेण्यात येईल."

पण याच्याहि पूर्वीपासून सरकारी आश्रयानें प्रसिद्ध करविल्या जाणाऱ्या ग्रंथांचें धोरण महाराजांनीं निश्चित करून ठेविल्याचें त्यांच्या सन १९०१ सालीं ग्रंथप्रकाशक मंडळीच्या पांचव्या वार्षिक समारंभ प्रसंगीं केलेल्या भाषणावरून दिसून येतें. या भाषणांत महाराजांनीं आपल्या समाजाची चिकित्सा करून म्हटलें कीं,



गीता पाठ करणारा ब्राह्मण
( महाराजांच्या मूर्तिसंग्रहांतील एक उत्तम पुतळा )

आहे. ती केवळ सर्वसामान्य लोकांनाच भासत आहे असें नमून, राजे लोकांनाहि राजे या नात्यानें ती भासल्याशिवाय रहात नाहीं. अशा स्थितींत सांप्रत कार्यीहि वाङ्मयाच्या वृद्धीला उत्तेजन देणाऱ्या राजांची संख्या केवळ हाताच्या बोटांवर मोजण्यासारखीच आहे ही गोष्ट ध्यानांत घेतां, त्या कार्यी महाराजांनीं केलेल्या एतद्विषयक प्रयत्नांचें महत्व बरोबर ध्यानांत येईल.

या प्रकरणाच्या आरंभींच साहित्य व ललितकला यांचें संस्कृतीच्या कामीं साहचर्य असल्याबद्दलचा एका श्लोकांतील उल्लेख दिला आहे. तदनुसार साहित्याप्रमाणेंच ललितकलांनाहि महाराजांनीं उत्तेजन दिलें.

सन १८८७ सालीं महाराजांनीं युरोपची पहिली सफर केली, त्या वेळेपर्यंत त्यांच्या अंगीं ललितकलांबद्दल जी कांहीं अभिरुचि होती, ती अस्फुट अवस्थेंत होती. या पहिल्या सफरींत मात्र त्यांनीं जे शिल्पकलेचे, मूर्तिकलेचे व चित्रकलेचे नमुने पाहिले, त्यांच्यामुळें त्या अभिरुचीला मूर्त स्वरूप आलें. मागील एका प्रकरणात महाराजांच्या प्रवासाचें वृत्त दिलें आहे, त्यात त्यांनीं वेळोवेळीं लिहिलेल्या पत्रांतून तिकडील कलांबद्दलचे अभिप्राय व्यक्त केले आहेत. त्यावरून त्यांच्या अभिरुचीला कसें वळण लागत चाललें होतें, हें दिसून येतें. अर्थात् या सर्व कलांची प्रतिमा आपल्या राज्यातहि उठावी, अशी इच्छा त्यांना होणें स्वाभाविकच होतें. या दृष्टीनें त्यांनीं प्रथम सन १८९३ सालीं प्रसिद्ध इटालियन मूर्तिकार फेलिची याला बडोद्याला आणिलें. हा कारागीर अप्रतिम कलावान् होता. तो बडोद्यास चार वर्षे राहिला; तेवढ्या अवधींत त्यानें बनविलेल्या अनेक पुतळ्यात त्याची उत्कृष्ट कारागिरी दिसून येते. त्या कार्यी पुतळ्यांतील कोणत्याहि सूक्ष्मभागांत वास्तवता आणणें हें मूर्तिकलेचें प्रमुख अंग मानणारा संप्रदाय जोरांत होता. त्यास अनुसरून फेलीचीनें आपल्या पुतळ्याच्या डोक्यापासून तों पायाच्या बोटापर्यंतच्या सर्व अवयवांत हुबेहूबपणा आणिला आहे. त्यानें बनविलेल्या पुतळ्यांत श्री. सौ. महाराणी-

हें सर्व लक्षात आणून महाराजांनी आपल्या राज्यात एक मोठा कलासंग्रह करविण्याचें ठरविलें. त्यासाठीं त्यांना सुदैवानें युरोपांत स्पीलमन् नांवाचा एक तज्ज्ञ भेटला. त्याच्या मदतीनें युरोपांतील उत्कृष्ट कलावंतांचीं चित्रें खरेदी करून त्यांनीं बडोद्यास आणविलीं. हीं चित्रें प्रथम बडोदें येथील सार्वजनिक बागेंतील श्वेत मंदिरा ( White Pavilion ) मध्यें ठेविलीं होतीं. त्यानंतर या संग्रहासाठीं प्रकाशाची अनुकूल योजना असलेला एक स्वतंत्र भाग तेथील मुख्य पदार्थसंग्रहालयाला जोडून नवीन बांधविण्यांत आला.

तथापि नुसत्या पाश्चात्य चित्रांचा संग्रह करण्यानें महाराजांच्या कार्याला एकदेशीयपणा आला असता. परंतु त्यांची दृष्टि अशी संकुचित नसल्यामुळें अर्थातच त्यांनीं हिंदी चित्रकलेलाहि उत्तेजन दिलें. अर्वाचीन भारतीय चित्रकारांचे मुकुटमणि राजा रविवर्मा यांच्याकडून महाराजांनीं काढविलेला अप्रतिम चित्रसंग्रह वरील गोष्टीची साक्ष देत आहे. त्यासाठीं राजा रविवर्मा यांना मोठ्या सन्मानानें बडोद्यास बोलावून खास ठेवून घेण्यांत आलें होतें. त्यांच्या हातच्या अस्सल तसबिरी येथील लक्ष्मीविलास राजवाड्यांत ठेविलेल्या आहेत. त्यांतील चौदा तसबिरी पौराणिक विषयावरील असून, त्याशिवाय त्यांनीं काढिलेल्या येथील राजकुटुंबीयांच्या आठ तसबिरी आहेत खुद्द राजा रविवर्म्यांच्या हातच्या तसबिरींचा एवढा मोठा संग्रह म्हैसूरशिवाय दुसऱ्या कोणत्याहि ठिकाणीं उपलब्ध नाहीं.

याप्रमाणें चित्रसंग्रह करवूनच महाराज स्वस्थ बसले नाहींत, तर बडोद्यांतील कलाभवनांतील विद्यार्थ्यांना चित्रकलेचें प्रगल्भ शिक्षण मिळण्याची व्यवस्थाहि त्यांनीं वेळोवेळीं केली. कांहीं विद्यार्थ्यांना यासाठीं युरोपांत पाठविण्यांत आलें. कांहींना फोटोग्रॅफीच्या कार्यांत राजाश्रय देण्यांत आला; इतर कांहींना विशेष प्रगति करण्यासाठीं उत्तेजन देण्यांत आलें. सारांश, अनेक प्रकारें चित्रकलेला उत्तेजन देण्याचे प्रयत्न महाराजांनीं केले.



आरब शिपाई
( इटॅलियन शिल्पकार फेलिची यानें बनविलेला पुतळा )

महाराजांनीं आपल्या कारकीर्दींत आपल्या राजधानीला ज्या अनेक सुदर इमारतींनीं सजविलें आहे, त्यातील सर्वांची कल्पना व शिल्प पद्धति त्यानीं स्वत पसत केलेली आहे. याबद्दलचा स्वानुभव त्या राज्याचे मुख्य शिल्पाधिकारी रा. तळवळकर यानीं 'सयाजीगौरवग्रथा'त नमूद केला आहे. त्यात ते म्हणतात —

"चालू बाधकामे कोठपर्यंत पुरीं होत आलीं आहेत, त्याच्या मूळच्या आखीव रचनेंत व तयार झालेल्या स्वरूपात फरक पडला आहे कीं काय, व तो पडला असल्यास इष्ट आहे कीं अनिष्ट आहे, वगैरे बद्दलची चौकशी व नवीन घाटत असलेल्या विचाराचें दिग्दर्शन, प्रसगीं स्वत हि हातानें आकृती काढून आपल्या आवडीचें केलेलें सूचन, इत्यादि कामें महाराज उत्साहानें व कलेच्या रसोद्ग्राही दृष्टीनें करतात."

अशा प्रकारें वाङ्मय व ललितकला याची आपल्या राज्यात उन्नति घडवून आणण्याचे प्रयत्न महाराजानीं केले, त्याना वरील विषयाबद्दलची त्याची अभिरुचि हीच मुख्यत कारणीभूत झाली आहे. केवळ उपयुक्ततेच्या दृष्टीनें अशा कलाना उत्तेजन देणें, व स्वत च्या अत प्रेरणेनें त्याच्या उन्नतीसाठीं प्रयत्न करणें, ह्या दोन गोष्टी स्वभावत भिन्न आहेत म्हणून या दोन प्रकारापैकीं बेन् जॉन्सन् ( Ben Johnson ) या कवीनें म्हटल्याप्रमाणें —

"The thirst that from soul doth rise,
Doth ask a drink divine"

'अत करणाची तृषा शात करण्यास उपयोगी पडणाऱ्या साहित्य-सगीतादि कला' याची अभिरुचि महाराजाना जात्याच आहे असें दिसून येईल.



कल्पना त्याना आली होती. वस्तुत संस्कृतीचा इतिहास म्हणजे सौंदर्य-प्रतीतीसाठीं मनुष्यानें केलेल्या प्रयत्नाचा इतिहासच होय. ('History of civilization is the story of the development of man's conception of what is beautiful and good') असें एक सुभाषित आहे, त्याप्रमाणें युरोपातील संस्कृतीचा इतिहास तेथील सिमॅन्यू व गिओतो या तेराव्या शतकातील चित्रकाराच्या कृतींपासून तों तहत आज-पर्यंतच्या चित्रसंग्रहावरून दिसून येतो. तसा व्यवस्थित रीतीनें लावलेला हिंदुस्थानातील चित्रकलासंग्रह एकत्र उपलब्ध नसल्यानें, आपल्याला भारतीय चित्रकलेचा सुसंगतवार इतिहास उपलब्ध होत नाहीं. तथापि अलीकडे या गोष्टीकडे भारतपुत्रांचें लक्ष जाऊ लागलें आहे, व त्यामुळें त्या दिशेनें हल्लीं काहीं प्रयत्न करण्यात येऊ लागले आहेत. पण हिंदुस्थानच्या दीर्घ इतिहासातील कलेचे नमुने मूर्तिभंजकाच्या हातोड्याना व विस्तवाच्या ठिणगीनें नामशेष झाल्यानें, तो गत इतिहास अनुक्रमानें आपल्यापुढें उभा करणें कठिण झालें आहे. एका कवीनें म्हटलें आहे कीं,

> "All passes, art alone enduring lasts
> The bust outlives the throne, the coin Tyberius"
> "जगातील सर्व वस्तू नष्ट झाल्या, तरी कला मात्र शिल्लक रहाते. राजाचीं सिंहासनें नष्ट झालीं, तरी त्याच्या पुतळ्यावरून व नाण्यावरून मागील इतिहास जुळविता येतो."

परंतु जंगली लुटारूंच्या दांडगाईनें हे कलेचे नमुनेहि नाहींसे झाले, तर इतिहासाची जुळणी करणें अर्थातच जास्त कठिण होतें. तथापि कधीं कधीं तो गत इतिहास आपण होऊन आपलें डोकें वर काढितो. अलीकडील सिंध व पंजाब येथील उत्खननावरून हिंदुस्थानच्या पांच हजार वर्षांपूर्वीच्या इतिहासाचा लागलेला शोध अशाच प्रकारचा आहे. त्यांत सांपडलेलीं चित्रें, मूर्ती वगैरेवरून, तसेंच अजंठा, वेरूळ वगैरे ठिकाणच्या चित्रांवरून प्राचीन संस्कृतीच्या इतिहासाचे दुवे जुळवावे लागतात.

अवलबून असून, एकाच्या उत्कर्षापकर्षावर दुसऱ्याचाहि उत्कर्षापकर्ष अवलबून आहे याची त्याना पूर्ण जाणीव होती.

आज हिंदुस्थानात ब्रिटिश प्रजा व सस्थानें या दोहोंची मिळून एक सयुक्त राज्यघटना तयार करून या दोन्ही घटकाना एकजीव करण्याचा उपक्रम चालू आहे. अशा वेळीं उभय पक्षानीं आपल्या स्वत च्या हिताला धक्का न पोहचता, इतराशीं अधिकाधिक सहकार्य करण्याची भाषा बोलणे व तसा प्रयत्न करणें हें अपूर्व नाहीं परतु थोड्याच वर्षापूर्वींपर्यंत असा काळ होता कीं, सस्थानिक व हिंदी प्रजा हे एकमेकाला अहि-नकुलाप्रमाणें नसले, तरी त्रयस्थाप्रमाणें मानीत असत त्यामुळें, एखाद्या सस्थानाच्या अधिपतीनें अखिल भारताविषयीं प्रेम ठेवून प्रसग येईल तेव्हा त्याला अनुभवानें, उपदेशानें व द्रव्यानें मदत करणें ही गोष्ट अगदीं अशक्य समजली जात असे त्या काळीं बडोदें राज्याइतकें सुव्यवस्थित राज्यतत्र इतर सस्थानातून क्वचितच आढळून येत असे तथापि यदाकदाचित् तें इतर काहीं थोड्या ठिकाणीं अवलोकनात येत असलें, तरीहि तेथील अधिपतींनीं अखिल हिंदुस्थानाच्या हिताबद्दल कळ-कळ दाखविल्याचें अथवा त्यासाठीं प्रयत्न केल्याचें दुसरें कोणतेंहि उदा-हरण नव्हतें त्या वेळीं फक्त महाराजानींच सस्थानाच्या व हिंदुस्थानाच्या एकत्वाचा धडा आपल्या कृतीनें इतराना घालून दिला. अर्थात् दरेक सस्थानाची अथवा ब्रिटिश प्राताची प्रादेशिक, राजकीय, सामाजिक वगैरे परिस्थिति भिन्न भिन्न असल्यामुळें, तिच्यात हात घालण्याचें त्याना कारण नव्हतें परतु सर्व हिंदुस्थानाला सामान्य असणारे असे जे भाषिक, धार्मिक, औद्योगिक, शैक्षणिक, आरोग्यविषयक वगैरे प्रश्न होते, त्याचा महाराजानीं विचार करून तत्सबधींचे आपले विचार व अनुभव ठिकठिकाणीं व वेळोवेळीं प्रदर्शित करून त्या सर्व प्रश्नाना आपल्या मदतीनें प्रत्यक्ष चालना दिलेली आहे

कोणत्याहि देशाची सुधारणा व्हावयाची असेल तर ती सर्व अगानीं

मूर्तिकला व चित्रकला याप्रमाणेंच गायनकलेलाहि त्यानीं आपल्या कारकीर्दीच्या आरंभापासून उत्तेजन दिलें आहे राज्याचे अधिकार मिळताच त्यानीं कलावंत खातें हें एक स्वतंत्र खातें करून, त्याची व्यवस्था ठेवण्यासाठीं त्यावर एक दरोगा नेमला त्यानंतर सन १८९७–९८ सालीं येथील प्रसिद्ध गवई मौलाबक्ष याचे चिरंजीव अल्लाउद्दीन याना पाश्चात्य संगीतशास्त्राची माहिती करून घेण्यासाठीं विलायतेस पाठविण्यात आलें, व तेथून ते परत आल्यावर त्याची कलावंत खात्यावरील मुख्याधिकारी म्हणून नेमणूक करण्यात आली रा भातखंडे या संगीतशास्त्रज्ञ गृहस्थानीं एक नवीन पद्धतीचें स्वरलेखन अथवा नोटेशन तयार केलें होतें, तें बडोद्याच्या गायनशाळेतून चालविण्याची व्यवस्था करण्यात आली

बडोदें येथील गायनाचा मोठा मोसम म्हणजे होळीचा सण होय या सणात हिंदुस्थानातील अनेक भागातून गुणवान गायनवादनपटु लोक बडोद्यास येतात व आपल्या कलेचा लाभ तत्रस्थाना देतात त्या काळीं या सणात बीभत्स प्रकार बरेच होत असत परंतु महाराजानीं हळूहळू ते कमी करवून त्यात सभ्यपणा आणविला व उत्कृष्ट कलाविलासाचा उपभोग घण्याची एक संधि असें त्या सणाला रूप आणिलें या सणाच्या निमित्तानें काहीं वर्षे बडोद्यास नाट्यप्रयोग करवून त्यात सोंगें आणवून करमणूक करण्याचा व्यवसाय सालोसाल चालू होता, असा उल्लेख रा सरदेसाइ यानीं आपल्या आठवणींत केला आहे नाट्यकलेबरोबरच नृत्यकलेला महाराजाच्या दृष्टीनें पुष्कळ महत्त्व आहे प्राचीन काळीं मोठ-मोठाल्या लोकाच्या घराण्यात व राजवाड्यातहि या कलेला किती मान असे, हें मालविकाग्निमित्रासारख्या नाटकावरून दिसून येतें शास्त्र या नात्यानें या कलेचा अभ्यास केल्यास त्यात नाक मुरडण्यासारखें काहीं नाहीं, असा आपला अभिप्राय महाराजानीं एक दोन पत्रात दर्शविला आहे तथापि कालमानाप्रमाणें धंदेवाईक लोकाना उत्तेजन देणें एवढेंच या कामीं करणें त्याना शक्य होतें

"सामाजिक सुधारणेच्या मार्गात अनेक अडचणी आहेत, परंतु त्या वाटतात तितक्या कठिण नाहींत. आपला स्वार्थीपणा व आपलें अज्ञान याच आपल्या प्रगतीच्या आड येणाऱ्या खऱ्या अडचणी आहेत व म्हणून आपण चिकाटीनें प्रयत्न केल्यास त्या नाहींशा होतील. आपल्या समाजात उणीवा आहेत. त्यांत स्त्रियांना अवश्य तें स्वातंत्र्य नाहीं, म्हणून त्या मागें राहत आहेत. जर त्याना समानतेची जाणीव करून देण्यात येईल, तर त्या आपल्या बरोबरीनें लोकाभ्रमाचा व दुर्मताचा निरास करण्यास मदत करतील. आपल्यांतील अस्पृश्य लोकाना ज्या रीतीनें आपण वागवितो, ती रीत अमानुष आहे. म्हणून त्यांचीहि उन्नति करण्याचा प्रयत्न आपण अवश्य केला पाहिजे. तसा तो आपण करूं, तरच आपण आर्य म्हणवून घेण्यास पात्र होऊं. समाजातील सर्वांचा दर्जा जन्मासारख्या यदृच्छेवर अवलंबून न राहता सर्वांना आपली उन्नति करून घेण्याची सारखी संधि मिळाली पाहिजे. या सर्व दृष्टींनीं आर्यसमाज प्रयत्न करीत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे."

त्याच दिवशीं आर्यसमाजानें चालविलेल्या दयानंद कॉलेजमध्यें विद्यार्थ्यांतर्फें त्याना दुसरें मानपत्र देण्यात आलें, त्या वेळीं ते म्हणाले,

"या प्रसंगीं मला विशेष जोर देऊन असें सांगावयाचें आहे कीं, सर्व हिंदी लोकांनीं आपले प्रांतिक, स्थानिक व जातीय भेद बाजूला ठेवून सर्वांनीं राष्ट्रीय अभिमानानें प्रेरित झालें पाहिजे. माझ्या स्वत विषयीं मला असें सांगता येईल कीं, माझ्या सार्वजनिक कार्यक्रमात पक्षभेदाची अथवा जातीय भेदाची भावना मला केव्हाहि शिवलेली नाहीं. जर आपली उन्नति कधीं काळीं व्हावयाची असेल, तर आपण सर्व प्रकारचे संकुचित विचार सोडून दिले पाहिजेत. सर्व राष्ट्राच्या कल्याणाचा विचार ज्याच्या मनात आला नाहीं, त्यानें आपलें कर्तव्य केलें, असें कधींहि म्हणता येणार नाहीं. माझा

# प्रकरण २९ वें



## अखिलभारतीय दृष्टि

महाराजानीं आपल्या कारकीर्दीच्या मध्यकाळात वडोदें राज्यात ज्या सुधारणा केल्या, त्याचें विवेचन गेल्या प्रकरणात केलें आहे. तथापि केवळ मी व माझें राज्य अशी संकुचित भावना महाराजांनी केव्हांहि ठेविलेली नव्हती. हिंदुस्थान हें प्राचीन काळापासून प्रबळ राष्ट्र म्हणून गाजलेलें होतें व त्याची प्राचीन संस्कृति एका काळीं सर्व जगताला दिपवून सोडीत होती परंतु कालचक्राच्या फेऱ्यामुळें सांप्रत ती निकृष्ट स्थितीला येऊन पोंहचली आहे या देशातील अनेक प्रकारच्या विविधपणामध्यें एक-राष्ट्रीयत्वाचें तत्व भरलेलें आहे, व म्हणून हिंदुस्थानातील दरेक सुपुत्राचें कर्तव्य आपल्या मातृभूमीचा उद्धार करणें हें आहे; ह्या सर्व गोष्टींची जाणीव महाराजाना तीव्रपणानें होती. त्यामुळें केवळ आपल्या राज्यात सुधारणा घडवून आणून त्याला श्रेष्ठ दर्जाला नेण्याची भावना एका दृष्टीनें स्वार्थी असून, अखिल हिंदुस्थानाच्या उन्नतीला शक्य तितका हातभार लावणें हें आपलें कर्तव्य आहे, असें ते मानीत. महाराजानीं राज्याधिकार धारण केल्यावर काढलेल्या जाहिरनाम्यात व त्यानीं केलेल्या पहिल्याच भाषणात 'माझ्या प्रजेचें कल्याण हें माझें आद्य कर्तव्य आहे असें मी समजतों,' अशी घोषणा केली होती. परंतु त्या वेळीं तें माझें अत्य कर्तव्य आहे, असें त्यानीं म्हटलें नव्हतें. 'पोट आणि अवयव' या गोष्टीप्रमाणें हिंदुस्थान व त्याचे घटक भाग असलेलीं संस्थानें, याचें परस्परावर

"स्त्रीशिक्षण, बालविवाहप्रतिबंधक, विधवाविवाह, अनेकपत्नीत्व-निषेध, जातिभेदनिवारण, पोटजातींतील विवाह, परदेशगमनाला मोकळीक, सहभोजन, अस्पृश्योद्धार, दारूबंदी व सार्वजनिक दान-पद्धतीची सुधारणा, या सर्वांचा विचार करतां त्यांचे मुख्य दोन विभाग पडतात. ते म्हणजे,

१ जातिभेदपद्धतीमुळें उत्पन्न होणाऱ्या अडचणी, व

२ स्त्रियांच्या परिस्थितीसंबंधाच्या अडचणी.

तेव्हां या दोन्ही प्रकारच्या अडचणींचे निराकरण कसें करितां येईल, याचा विचार आपल्याला केला पाहिजे."

असा उपोद्धात करून महाराजांनीं यासंबंधींचें विवेचन आपल्या भाषणांत पुढें केलें आहे. या विवेचनांतील बहुतेक प्रमाणें या भाषणा-नंतरच्या तीस वर्षांच्या काळांत लोकांना परिचित झालेलीं आहेत; इतकेंच नव्हे, तर या सर्व सुधारणा पूर्णांशानें नसल्या, तरी बहुतांशानें समाजानें आत्मसात् करून टाकिल्या आहेत. यामुळें त्या प्रमाणांची पुनरुक्ति येथे करण्याची विशेष आवश्यकता नाहीं. तथापि त्यांच्या विचारसरणींतील विशेष मुद्यांना अजूनहि महत्त्व आहे, यामुळें तेवढ्यांचा येथें उल्लेख करणें अप्रस्तुत होणार नाहीं. सामाजिक सुधारणा घडवून आणण्याच्या मार्गासंबंधानें ते म्हणाले,

"आपल्या सामाजिक परिस्थितींतील ज्या दोषांचीं मुळें समाजांत खोलपर्यंत गेलेलीं आहेत, त्यांचें उच्चाटन कायद्यानें करतां येणें शक्य नाहीं, ही गोष्ट आपल्याला ध्यानांत ठेविली पाहिजे. शिक्षण हाच या बाबतींत खरा उपाय आहे. आपण केलेल्या उपदेशानें समाजाच्या बुद्धीला चालना मिळून जर सार्वत्रिक जागृति होईल व कोणताहि सामाजिक दोष काढून टाकण्याचा सर्व लोक विचारपूर्वक प्रयत्न करतील, तरच तो नाहींसा होण्याचा संभव आहे."

यानंतर जातिभेदाचा प्रश्न प्रथम हातीं घेऊन महाराजांनीं त्याची

झाली पाहिजे, ती केवळ एकांगी होऊन चालणार नाहीं व त्यासाठीं समाजाला आधारभूत असलेल्या सामाजिक परिस्थितींत प्रथमत सुधारणा झाली पाहिजे, अशी महाराजाची समजूत असल्यामुळें त्यानीं या प्रश्नाकडे आपली दृष्टि आरंभापासून वळविलेली होती. सन १८८९ च्या जुलै महिन्यात कै. न्या. माधवराव रानडे यानीं मुंबईस 'सामाजिक सुधारणा-मंडळ' स्थापन करून त्याचे अध्यक्ष होण्याबद्दल महाराजाना पत्रद्वारें विनंति केली होती. त्या पत्राचें उत्तर पाठवून महाराजानीं न्या. रानडे याना लिहिलें कीं,

"हिंदूंच्या सामाजिक स्थितींत सुधारणा करण्याच्या प्रयत्नाना माझी नेहमीं मदत आहे. रूढीच्या श्रृंखला सैल करण्याच्या प्रयत्नाला थोडेंसें जरी यश आलें, तरी तें श्रेयस्कर आहे. तथापि या दृष्टीनें प्रयत्नाला सुरवात कोठें आणि कशी करावी, याबद्दल मात्र सावध-गिरी ठेविली पाहिजे. समाजातील एक दोष घालविताना त्याच्या जागीं दुसरा दोष न येता काहीं तरी चागलें व्हावें, अशी काळजी बाळगली पाहिजे. या बाबतींत यश येणें हें वैयक्तिक आस्थेवर व स्वार्थत्यागावर अवलंबून आहे माझ्या दृष्टीनें राजकीय हक्कापेक्षा समाजसुधारणा ही अधिक महत्वाची आहे. तथापि या संस्थेचा अध्यक्ष होण्यापेक्षा आश्रयदाता होणें मला बरें वाटतें. अशा चळवळींत माझे सुबुद्ध प्रजाजनहि सरकाराला प्रत्यक्ष मदत करून व सहा देऊन भाग घेतील अशी मला आशा आहे."

हिंदुस्थानात समाजरचना व धर्म याची अभेद्य सांगड घातलेली असल्यामुळें, या दोहोंचा विचार धर्मशास्त्राच्या प्रथतून एकत्रच केला आहे. म्हणून महाराजानीं सामाजिक व धार्मिक अशा दोन्ही प्रश्नात सारखेंच लक्ष घातलेलें आहे. सन १९०३ सालीं महाराज लाहोरास गेले असता तेथील आर्यसमाजानें त्याना मानपत्र दिलें, त्या प्रसंगीं त्यानीं आपले एतद्विषयक विचार व्यक्त केले आहेत. त्या वेळीं ते म्हणाले —

उत्पन्न करावयाची असेल तर या भावनेचाहि आपण त्याग केला पाहिजे. "

अशा प्रकारें जातिभेदाबद्दलचें विवेचन केल्यावर, त्यांनीं स्त्रियांच्या स्थितीचा विचार आपल्या भाषणात केला आहे. त्यात वेदकालापासून भारतीय समाजातील स्त्रियांच्या परिस्थितीचे टप्पे थोडक्यात वर्णन करून, त्यांनीं त्यांच्या इष्टस्थितीबद्दलचा निष्कर्ष असा काढिला आहे कीं,

" या बाबतींतहि आपलें ध्येय काहीं नवीन अथवा क्रांतिकारक नसून, तें आपल्या प्राचीन पूर्वजांनीं आदरिलेलें व आचरिलेलें असेंच आहे. त्याच्या बाह्य स्वरूपात परिस्थित्यनुसार फरक झाला असला, तरी आपली दृष्टि त्यातील तत्त्वावरच खिळलेली आहे. "

" कोणत्याहि समाजाचें जीवित म्हणजे परिस्थितीशीं त्याची निरंतर चालत असलेली लढाई होय त्या परिस्थितींतील कांहीं भाग शाश्वत असतो, तर काहीं बदलणारा असतो शाश्वत भागात देशाचें हवापाणी, भौगोलिक परिस्थिति व अनेक प्रकारच्या प्राकृतिक शक्ती याचा समावेश होतो, तर बदलणाऱ्या भागांत आर्थिक आणि राजकीय परिस्थिति व भिन्न संस्कृतींचा संघर्ष वगैरे गोष्टींचा समावेश होतो अशा दृष्टीनें पाहता, समाजाचें जीवित हें एखाद्या व्यक्तीच्या जीविताप्रमाणेंच विकार्य असनें व त्यात इष्ट ते विकार घडवून आणण्याचें मुख्य साधन ज्ञान हेंच होय. या ज्ञानानें अशी जाणीव उत्पन्न होते कीं, समाजघटनेंतील सर्व अवयवात एक प्रकारची साम्यावस्था आल्याशिवाय त्याला स्थैर्य येणार नाहीं व तशी साम्यावस्था येण्यासाठीं त्या भागाभवयाची श्रेष्ठकनिष्ठतेची कल्पना नाहींशी झाली पाहिजे "

" आपल्याहून भिन्न असलेल्या पाश्चात्य संस्कृतीशीं आपला संबंध आला असता आपण टिकाव धरू शकू किंवा नाहीं अशी पुष्कळ

असा पूर्ण विश्वास आहे कीं, देशांतील कोणत्याहि एका भागात झालेल्या उन्नतीचा परिणाम त्यांतील इतर भागावर झाल्यावाचून राहणार नाहीं. "

त्यानंतर महाराजांनीं शिक्षण व पडदापद्धति याचा उल्लेख केला व अखेर बालविवाहासंबंधानें ते म्हणाले,

"माझ्या राज्यांत नुकताच मी बालविवाहप्रतिबंधक कायदा केला आहे. तो वस्तुतः अगदीं प्राथमिक स्वरूपाचा आहे. देशाची उन्नति सर्वस्वीं त्यांतील लोकांच्या शरीरसामर्थ्यावर अवलंबून असते. परंतु जोंपर्यंत बालविवाहाची पद्धति रूढ आहे, तोंपर्यंत तरी उन्नति होणें अशक्य आहे. माझ्या नवीन कायद्यांत योग्य विवाहाची किमान मर्यादा बारा वर्षांची ठेविलेली आहे; ती माझ्या मतें अगदीं कमी असून ती सोळा वर्षांची असली पाहिजे. परंतु राजाला अशा बाबतींत ध्येयवादी होऊन चालत नाहीं. कोणताहि नवीन कायदा करते वेळीं शक्य तितका लोकमताचा पाठिंबा त्याला असला पाहिजे व म्हणून या कायद्याच्या मसुद्यांत किमान वयाची मर्यादा चौदा ही ठेविलेली होती; तरी ती कमी करून मला बारावर आणावी लागली. यामुळें इतका फायदा मात्र झाला कीं, त्या कायद्याविरुद्ध लोकमत राहिलेंच नाहीं. शरीरसामर्थ्याशिवाय प्रजेच्या इतर शक्तींचाहि विकास करण्यास अनुकूलता प्राप्त करून देणें, हें राजाचें कर्तव्य आहे."

यानंतरच्या वर्षी म्हणजे सन १९०४ सालीं डिसेंबर महिन्यांत मुंबईस भरलेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेचें अध्यक्षस्थान महाराजांना देण्यात आलें, त्या वेळीं तर त्यांनीं आपल्या भाषणात सर्व सामाजिक प्रश्नांचा विचार फार विस्तृतपणें केला. प्रथमतः सामाजिक परिषदेचे उद्देश कोणते व त्यांत सुधारणा कोणत्या दिशेनें अवश्य आहेत, याचा विचार करतांना त्यांनीं या प्रश्नाचें शास्त्रीय वर्गीकरण करून अवश्य असलेल्या सुधारणा खालीलप्रमाणें नमूद केल्या —

आहेत व काटकसर, चिकाटी, दक्षता, सौजन्य, गृहप्रेम व व्यवस्थितपणा ह्या गुणांत कोणत्याहि युरोपियन समाजांतील शेतकऱ्यांपेक्षां वरचढ असलेला कृषकवर्गहि आपल्यांत आहे. हे सर्व गुण कोणत्याहि समाजाला अमर करण्याला समर्थ असे आहेत. परंतु *अशी उत्कृष्ट साधनसंपत्ति असतांहि, आज आपल्या समाजाचें जीवन काय मोलाचें आहे ?"*

"याचे कारण शोधूं गेल्यास असें दिसून येईल कीं, आपल्यांत कोणतेंहि वैगुण्य नसून, आपली समाजघटना चुकीची आहे. आपण समाजाच्या हितापेक्षां व्यक्तीच्या हिताला अधिक महत्त्व देतों, हें याचें खरें कारण आहे. म्हणून यासंबंधीच्या आपल्या कल्पनांत फरक करून आपली समाजरचना नवीन परिस्थितीला तोंड देण्यास समर्थ अशी केली पाहिजे. याचेंच नांव सुधारणा व ती करणें मनुष्याच्याच हातांत आहे. म्हणून आपल्या भविष्यकालाचें कारण आपलें किस्मत नसून, आपलें कर्तृत्व आहे हें आपण लक्षांत ठेविले पाहिजे."

"या दृष्टीनें सामाजिक परिषद् बरेंच काम करीत आहे, तथापि याहून अधिक जोराचें, सतत व व्यवस्थित काम झालें पाहिजे. दरेक खेड्यांत जाऊन या नवीन तत्त्वाची शिकवण लोकांना देण्यासाठीं आपल्यांतील आर्यसमाज अथवा ख्रिस्ती लोकांतील मिशनरी संस्था यांच्यासारख्या अनेक संस्थांनीं हें काम केलें पाहिजे."

"हें सर्व करितांना आपण आपल्या अंतःकरणात बंधुत्वाची व ऐक्याची भावना जागृत ठेविली पाहिजे.

'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।'

सर्वभूतीं परमेश्वर आहे, असें तत्त्वज्ञान आपल्यांत असल्याबद्दल आपण अभिमान बाळगतो. मग तें तत्त्वज्ञान आपण व्यवहारांत मात्र कां विसरतों ? म्हणून माझी आपणांस अशी विनंति आहे कीं, आपण आपल्यांतील दोषांकडे दृष्टि न देता अखिलभारताच्या भविष्यकालाचें

पूर्वपीठिका तपासिली व त्याच्या अनिष्ट परिणामाचें विवेचन केलें. त्यात तत्वदृष्ट्या मनुष्यामनुष्यात केवळ जन्माच्या यदृच्छाप्रसंगावर त्याचा दर्जा ठरविणें अनेक दृष्टींनीं कसें घातुक आहे, याबद्दलचीं पुष्कळ उदाहरणें त्यानीं दिलीं तथापि हें तात्त्विक विवेचन केल्यावर त्यानीं या प्रश्नाच्या व्यावहारिक स्वरूपाला हात घातला. या जगात तात्त्विकदृष्ट्या अनिष्ट वाटणाऱ्या अनेक गोष्टींची सुधारणा व्यवहारात कशी करिता येईल हा प्रश्न जोंपर्यंत समाजसुधारकाना सोडविता येणार नाहीं, तोंपर्यंत त्या गोष्टींच्या अनिष्टतेचें तात्त्विक विवेचन फोलच होणार. अशा बाबतींत महाराजाची दृष्टि नेहेमीं व्यावहारिक असते, व म्हणून ते आपल्या भाषणात जातिभेदासंबधानें म्हणाले कीं —

" जातिभेद नाहींसा करणें हें आपलें अंतिम ध्येय आहे तें जर आपल्याला एकदम साधता आलें नाहीं, तर निदान तें आपलें साध्य म्हणून तरी धीटपणानें आपण आपल्यापुढें ठेविलें पाहिजे व मध्य तरींच्या अवधींत 'अकरणान्मदकरण श्रेय ।' या न्यायानें त्या रूढींच्या ज्या बाह्य व सूक्ष्म आचारामुळें आपल्या नित्याच्या वर्तनावर एक प्रकारचा असह्य दाब पडतो व आपसातील सहानुभूतीचा नाश होतो, त्या आचाराना फाटा देण्याची तरी व्यवस्था आपण केली पाहिजे, या दृष्टीनें सर्व जातींत सहभोजन व सामाजिक व्यवहार होण्यास आपण उत्तेजन दिलें पाहिजे इतकेंहि एकदम होणें शक्य नसेल, तर निदान एका जातींतील पोटभेदांत तरी अशा प्रकारचा सहव्यवहार व सहभोजन आपण सुरू केलें पाहिजे "

" तथापि जातिभेदाचे केवळ बाह्य आचार नाहींसे करण्यानें आपलें काम होईल व आपल्या समाजाची सर्व प्रकारची दुःस्थिति सुधारेल, असें मात्र आपण समजता कामा नये, कारण पुष्कळ वेळा आपण जातींचे बाह्य आचार सोडून दिले, तरी त्यातील भावना आपण आपल्या हृदयाशीं बाळगतों परंतु आपल्यात देशबंधुत्वाची जाणीव

दलितच रहावें किंवा उच्च स्थितीला जावें, ही गोष्ट सर्वस्वीं तुमच्या परिश्रमावर अवलबून आहे. निर्वाहाचें साधन प्राप्त करून घेणें हा जरी तुमच्या साप्रतच्या शिक्षणाचा हेतु असला, तथापि इतर दृष्टींनींहि तुम्ही आपली सुधारणा करून घेतली पाहिजे. "

या भाषणानतर थोड्याच दिवसानीं अशाच प्रकारचा समारभ मुबई येथील दलितोद्धार सस्थेने चालविलेल्या शाळेंत करण्यात आला, त्या प्रसगींहि महाराजाना आमत्रण करण्यात आलें होतें. त्या वेळीं ते म्हणाले —

"जर हिंदुस्थानाला आपली उन्नति करून घेऊन इतर प्रबल राष्ट्राच्या पक्तीला बसावयाचें असेल, तर त्याने आपली समाजघटना सुधारून तिच्यातील दुराग्रह, लोकभ्रम वगैरे सर्व झाडून टाकिले पाहिजेत. अशा पैकींची बाबत एक अस्पृश्यता ही होय. थोडा विचार केला असता असें दिसून येईल कीं, अस्पृश्यता हा नैतिक, आर्थिक, व्यावहारिक अथवा धार्मिक प्रश्न नसून, ती एक केवळ लोकभ्रमाची बाबत आहे. अस्पृश्यतेच्या मुळाशीं असलेली विटाळाची कल्पना केवळ खालच्या वर्गानाच लागू नसून, ती उच्च वर्णानाहि लागू पडते. सोंवळ्या ओंवळ्याच्या दृष्टीनें वरील वर्णांतहि विटाळ मानला जातोच. कदाचित् हीच पद्धति चालू राहिल्यास, कालातरानें उच्च वर्णाच्या कुटुबातील एखादी व्यक्तिहि कायमची अस्पृश्य मानिली जाऊ लागेल! असल्या चुकीच्या समजुती इतर समाजात नसल्यामुळें, त्याची आर्थिक, सामाजिक, राजकीय उन्नति हिंदु समाजापेक्षा पुष्कळ अधिक झाली आहे. म्हणून हा प्रश्न राष्ट्रीय स्वरूपाचा असून, जर आपल्याला राष्ट्र या दृष्टीनें वर यावयाचें असेल, तर आपण या दलितवर्गाचा प्रश्न हातीं घेऊन त्याची सामाजिक व राजकीय उन्नति घडवून आणण्याचा प्रयत्न अवश्य केला पाहिजे. "

हिंदुसमाजात समाजरचना व धर्म या दोहोंचा समावेश धर्मानेच

लोकाना शका येते अशा लोकाच्या मनात युरोपियन लेखकानीं प्रस्तृत केलेली सामाजिक न्यूनगडाची (Inferiority Complex) कल्पना असते. परतु ती उपपत्ति खरी असती, तर सस्कृतीच्या इतिहासात आपल्या समाजानें जी उत्कृष्ट कामगिरी करून दाखविली आहे, ती त्याला कधींच करतां आली नसती. युरोपियन लोकाच्या कवायती लष्कराला आपल्याकडील महादजी शिंदे, हैदरअली, रणजितसिंग वगैरे सारख्यानी बरोबरीनें तोंड दिलें व कला आणि हुन्नर, शेती आणि राजनीति, काव्य आणि तत्त्वज्ञान, शास्त्र आणि विज्ञान, इत्यादि सर्व शाखात चद्रगुप्त व अशोक, विक्रमादित्य व समुद्रगुप्त, शिवाजी व रणजितसिंग या व याच्या सारख्यानीं अतुल कीर्ति मिळविली आहे. यावरून युरोप खडाची श्रेष्ठता ही साप्रतकालीन असून चिरकालीन नाहीं, हें स्पष्ट होईल. युरोपच्या उत्कर्षाला सुरवात झाल्यास फार तर तीनशेंच वर्षे झालीं आहेत त्या सुमारास बेकननें सृष्टपदार्थाच्या नैसर्गिक गुणधर्माचें सशोधन करण्याची शास्त्रीय पद्धति सुरू केल्यामुळें, युरोपात मानवी श्रमाऐवजीं यात्रिक शक्तीची योजना करता येऊ लागली, व तेव्हापासूनच युरोपची भौतिक प्रगति होत गेली आहे तिला हवापाणी अथवा त्या समाजाची श्रेष्ठता हें कारण नसून, तेथील लोकानीं आपल्या समाजाची व्यवस्थित रीतीनें पुनर्घटना केली हेंच होय."

"त्या लोकाचें उदाहरण जर आपण अनुकरिलें, तर आपलाहि उत्कर्ष तशाच प्रकारें का होणार नाहीं? आपल्याला मिळालेली साधनसपत्ति उत्कृष्ट आहे, आपल्यात रजपूत, मुसल्मान, शीख, गुरखे, मराठे याच्यासारखे लढवय्ये वर्ग आहेत, राज्यकारभार व सार्वजनिक कामें करण्याची उत्कृष्ट बुद्धि व शक्ति असलेले ब्राह्मण, कायस्थ वगैरे वर्गहि आपल्यात आहेत वाणी, भाटिये, मेमन, पारशी, बोहरे, याच्यासारखे जन्मतःच व्यापारीबुद्धि असलेले वर्गहि आपल्यात

मानवी आयुष्यात धर्म हा असा एक भाग आहे कीं, जो सत्य तत्वावर आधारलेला असता मनुष्याच्या विकासाला सहाय्यभूत होतो. तर मग त्याच्या आधारभूत तत्वाची सत्यता कशी पारखावयाची ? याचें उत्तर एकच आहे कीं, ज्या प्रमाणानें तो धर्म सामाजिक शृंखलापासून व अज्ञानाच्या आणि गैरसमजुतींच्या अंधकारातून समाजाची मुक्तता करितो, तितक्या प्रमाणानें तो खरा धर्म होय या व्यतिरिक्तचा धर्म म्हणजे केवळ ढोंग होय."

"या धर्माची उत्पत्ति दैवी आहे किंवा मानवी आहे, असा प्रश्न पुष्कळ वेळा उपस्थित करण्यात येतो परंतु या बाबतींत मनुष्याची जिज्ञासा तृप्त करणें फार कठिण आहे. तथापि इतकें मात्र निश्चित आहे कीं, धर्म हा कोणाकडून बनविला जात नसून, तो आपोआप वृद्धि पावत असतो आपल्या लहरीप्रमाणें आपण एखादा अंगरखा काढून टाकून दुसरा घालू शकतों, तसें आपण धर्मामध्ये बदल करू शकत नाहीं, म्हणून बुद्धीला ग्राह्य होतील अशाच गोष्टी धर्मात येऊ शकतील. या दृष्टीनें पाहता परोपकार हें धर्मातील सर्वात श्रेष्ठ तत्त्व असल्याचें सर्वसंमत होईल. बंधुप्रेमाला पोषक, शुद्ध व निष्पाप असेंच हें तत्त्व असल्यानें, त्याशिवायचे नित्याच्या आचरणाचे जे बारीक नियम घालून दिलेले असतात, त्याचा समावेश धर्मतत्त्वात होऊं शकणार नाहीं. इतर देशातहि समाजात उच्च व नीच भेद आहेत, तरी त्यावर धर्माचा शिक्का हिंदुधर्माप्रमाणें मारिलेला नाहीं व त्यात ईश्वराच्या उपासनेच्या दृष्टीनें सर्व उपासक सारख्याच दर्जाचे समजले जातात."

याप्रमाणें धर्माच्या शाश्वत तत्त्वाचें विवेचन करून, नंतर महाराजांनीं वेदकालापासून अर्वाचीन कालापर्यंतच्या हिंदुधर्माच्या अवस्थाचें वर्णन केलें व नंतर ते म्हणाले —

"अशा रीतीनें अनेक शतकातील हिंदुधर्माचे स्वरूप आपण

ध्येय आपणापुढें ठेवू या व त्या ध्येयाकडे जाण्यास कोणीहि मनुष्य जी कांहीं मदत करील, तिच्यावरून त्याची योग्यता ठरवू या. मग तो मनुष्य ख्रिस्ती, हिंदु, मुसलमान अथवा पारशी कोणीहि असो. आपलें सर्वस्व आपल्या देशाला देण्याइतकें त्यावर जो प्रेम करितो, तोच खरा हिंदी होय, व याच तत्वाची कास धरून आपण आपलें कर्तव्य करीत राहिल्यानें आपल्याला यश प्राप्ति होणार आहे"

अशा प्रकारचे उद्बोधक विचार महाराजांनीं आपल्या भाषणांत व्यक्त केले व तदनुरूप त्यांनीं आपलें आचरण ठेवून अखिल हिंदुसमाजाच्या सुधारणेला हातभार लाविला आहे. तथापि हिंदुसुधारणेचा विचार करताना महाराजांचें लक्ष आरंभापासून त्या समाजाच्या सर्वांत खालच्या अवस्थेंत असलेल्या अस्पृश्य अथवा दलितवर्गाकडे गेलेलें होतें. अलीकडील काळांत अस्पृश्योद्धाराची चळवळ महात्मा गांधींच्या स्फूर्तीनें जोरानें चालविण्यांत आली आहे, परंतु तत्पूर्वीं अनेक वर्षांपासून या प्रश्नाला नुसत्या विचाराच्या क्षेत्रांतच नव्हे, तर आचाराच्याहि क्षेत्रांत महाराजांनीं हात घातला होता. या निकृष्टवर्गाच्या उन्नतीसाठीं महाराजांनीं आपल्या राज्यांत सन १९०९ सालपर्यंत किती प्रयत्न केले होते, याची हकीकत त्या सालच्या सप्टेंबर महिन्यांत पुणें येथील Depressed Classes Mission या संस्थेनें चालविलेल्या शाळेच्या बक्षिससमारंभाचे वेळीं त्यांनीं सांगितली, तिच्यावरून त्याबद्दलची कल्पना येईल. त्या वेळीं बडोदें राज्यांत निवळ दलितवर्गांतील मुलांना शिक्षण देणाऱ्या ३३५ शाळा असून, त्यांतून ८२,००० मुलें शिक्षण घेत होतीं, हें निवेदन करून महाराज म्हणतात —

"या दलितवर्गासाठीं मेहनत करण्यास बरेचसे हिंदु लोक नाखुष असल्यामुळें, त्या कामासाठीं मला ख्रिस्ती व मुसलमान शिक्षकांची योजना करावी लागली, ही दिलगिरीची गोष्ट आहे. मला स्वतःला तुमच्यासंबधानें दलित शब्द वापरलेला आवडत नाहीं, तथापि तुम्हीं

प्रथम प्रयत्न केला पाहिजे, कारण मणभर तात्त्विक समाधानापेक्षा तोळाभर व्यावहारिक सहानुभूति व्यवहारात अधिक उपयोगी पडते."

"तथापि हें सर्व कार्य करिताना आपण जुन्या रूढींचें पालन करणाऱ्या ज्या समाजावर हल्ला चढवितो, त्या समाजात चागल्पणाचा काहींच अश नाहीं असें न समजता, व त्याच्यावर कडक टीकेचा मारा न करिता, त्याच्याबद्दल सहानुभूति ठेवण्यानेंच आपले कार्य सुलभ होणार आहे. समाजातील व्यक्तींना ज्ञानवत करून त्याना योग्य मार्ग दर्शविणें हेंच मला अधिक पसत असून, त्याना सरसहा विरोध करण्याचें धोरण मी अयोग्य समजतों."

आपल्यातील जीर्ण व निरुपयोगी झालेले रीतिरिवाज व लोकभ्रम दूर करून, साप्रतच्या बदललेल्या परिस्थितीला अनुसरून समाजाची नवीन घडी बसविण्याची आवश्यकता महाराजानीं वारवार प्रतिपादन केली आहे. तथापि त्यामुळें आपल्या परपरेंतील चागल्या गोष्टीहि सोडून दिल्या पाहिजेत अशी लोकाची गैरसमजूत न व्हावी, याबद्दल त्याचा मोठा कटाक्ष असतो. उदाहरणार्थ, वरील भाषणाच्या पूर्वी थोडे दिवस अगाऊ त्यानीं बडोदें येथील सयाजीविहार क्लबात केलेल्या एका भाषणात या गोष्टीवर विशेष भर दिला आहे. त्यात ते म्हणतात —

"आपल्या नित्याच्या जीवनक्रमातून आपल्या उन्नतीला प्रतिबध करणाऱ्या सर्व चालीरीतींना, दुराग्रहाना व लोकभ्रमाना काढून लावावें असा मी आपणाना आग्रह करीत असलो, तरी मी ही गोष्ट खास लक्षात ठेवण्याची आपल्याला विनति करितों कीं, आपला खरा उत्कर्ष राष्ट्रीय पायावरच अवलबून असला पाहिजे. आपल्या हिंदुस्थानच्या राष्ट्रीय परपरेंत अनेक चागल्या गोष्टी आहेत त्या इतक्या आहेत कीं, त्याची आपल्याला पुरी कल्पनाहि झालेली नसेल. तेव्हा आपण लक्षात ठेविले पाहिजे कीं, ज्या राष्ट्राला आपल्या पूर्व परपरेविषयीं

केला जातो, व म्हणून समाजाची सुधारणा करणें म्हणजे पर्यायानें धर्माची सुधारणा करणें असेंच होतें. या दृष्टीनें हिंदुधर्माचा पाया जे वेद त्यावर मुख्य आधार ठेवून, त्यानंतरच्या काळांत हिंदुधर्मावर जमलेले अनेक गैरसमजुतींचे व लोकभ्रमाचे थर खरडून टाकून, त्याला मूळचें शुद्ध वैदिक स्वरूप प्राप्त करून देण्याचा नेटाचा प्रयत्न स्वामी दयानंद सरस्वती यांनीं आर्यसमाजाची स्थापना करून प्रथमतः सुरू केला त्याला पुढें अत्यंत यश येऊन एका काळीं धर्मबाह्य मानिला गेलेला हा संप्रदाय आज वटवृक्षाप्रमाणें फोफावून त्याच्या पारंब्यापासून त्याची वाढ सर्वव्यापी होऊं लागली आहे. हिंदुसमाजाच्या सुधारणेचा योग्य दिशेनें चालविलेला हा प्रयत्न महाराजांना आरंभापासून पसंत पडला असून, त्याला त्यांनीं वेळोवेळीं आपली सहानुभूति व सक्रिय मदत दिलेली आहे त्यापैकींचा एक प्रसंग म्हणजे सन १९११ च्या फेब्रुआरी महिन्यात बडोद्याजवळ असलेल्या रणोली या गांवीं भरलेली आर्यसमाजाची मोठी परिषद हा होय या प्रसंगीं त्या परिषदेचें उद्घाटन करून तींत त्यांनीं आपले सामाजिक व धार्मिक विचार व्यक्त केले आहेत, ते अत्यंत मननीय आहेत. भाषणाच्या आरंभीं आर्यसमाजाच्या कार्यासंबंधानें प्रशस्तिपर उद्गार काढतांना, महाराज म्हणाले –

"आपल्या राष्ट्राची स्थिति सुधारण्याच्या कामीं, त्याची उन्नति घडवून आणण्याच्या कामीं व त्यांतील अज्ञान आणि गैरसमजुती घालविण्याच्या कामीं या समाजानें चालविलेल्या प्रयत्नामुळें मला फार समाधान वाटत आहे "

असें सांगून आर्यसमाज हा एक धार्मिक संघ असल्यानें धर्मासंबंधानें चार शब्द सांगण्याचाच आज आपला हेतु आहे अशी प्रस्तावना करून महाराज पुढें म्हणाले –

"मनुष्य हा मूळतः धार्मिक प्राणी आहे. जगांतील कोणतेंहि राष्ट्र कांहीं धार्मिक समजुतींच्या आधाराशिवाय जगूं शकणार नाहीं.

मला या वेळीं प्रतीत होत आहे. हिंदुस्थानातील साधीं घरें, त्यातील ओसाड खोल्या व अगदीं अवश्य असें मोडकेंतोडकें सामान पाहिलें, व त्याच दर्जाच्या पाश्चात्य मनुष्याच्या घरातील सुखसोयींची विपुलता पाहिली, म्हणजे या अतराची बरोबर कल्पना येऊ शकते. तथापि सुदैवानें हिंदुस्थानातहि अलीकडे परिवर्तन होऊ लागलें आहे. साधेपणा हा गुण असला, तरी जाणून बुजून दारिद्र्याचा स्वीकार करणें हा प्रपचातील सद्गुण नव्हे, ही गोष्ट आता आपणास पटू लागली आहे व कालातराने ही भावना बळावेल अशी मला आशा आहे."

"आपल्या पूर्वेतिहासावरून प्राचीन काळीं हिंदुस्थान हा व्यापार-दृष्ट्या अत्यत समृद्ध देश होता, ही गोष्ट निर्विवाद आहे. हिंदुस्थानच्या गजबजलेल्या बदरातून अरबस्तान, इराण व युरोप या देशाकडे कापड, मलमल, रेशमी वस्त्रें, पोलाद, नीळ, साखर, मसाले, हिरे, हस्तीदत, सोनें वगैरे अनेक प्रकारच्या मालाचीं जहाजें भरून जात असत व त्याच्या बदल्यात आपल्याकडे वरील देशातून पितळ, जस्त, पोंवळीं, काच, लोंकरीचें कापड वगैरे जिनसा येत असत, याबद्दलचे अनेक दाखले मिळतात. हिंदुस्थानच्या व्यापारावरच व्हेनिस्चे वैभव आधारलेलें होते व पुढें हा व्यापार ईस्ट इडिया कपनीच्या हातात गेला, त्यामुळें इग्लडच्या वैभवाचा पाया घातला गेला मग प्राचीन काळातील व मध्ययुगातील हा हिंदुस्थानचा व्यापार कोठें व कसा नाहींसा झाला ? या प्रश्नाचा विचार करता असें दिसून येईल कीं, असें होण्याचीं अनेक कारणें आहेत त्यात परदेशगमनाविरुद्ध हिंदुस्थानात बनलेलें लोकमत, शास्त्रीय शिक्षणाचा अभाव व हिंदुस्थानची राजकीय सत्ता परदेशाच्या हातात जाणें हीं कारणें प्रमुख आहेत. कपनीच्या अमलात अतस्थ मालाच्या नेआणीवर जबर जकाती बसविल्या गेल्या व देशी कारागीरावर नियत्रण घालण्यासाठीं कपनी-कडून ठिकठिकाणीं व्यापारी कमिशनर नेमण्यात आले. याखेरीज खुद

पाहिजे, तर त्यात अनेक वेळा सुधारणा झाल्या आहेत असें दिसून येईल. परंतु आपली आजची स्थिति काय आहे व आपल्या भविष्य-काळातील धर्मकल्पना काय होणार आहेत? मला वाटतें, साम्प्रत आपण पुरुषार्थाच्या अवस्थेंतून जात आहोंत व म्हणून आपली जुनी परंपरा साम्प्रतच्या परिस्थितीशीं आपण मिळती करून घेतली पाहिजे."

"मनुष्यकृतीचे साधारणत तीन भाग पडू शकतात. ते म्हणजे धार्मिक, सामाजिक व राजकीय हे होत. हे सर्व भाग परस्परसंबद्ध असे आहेत. त्यामुळें त्यातील दरेकाच्या उत्कर्षापकर्षावर इतर भागाचाहि उत्कर्षापकर्ष अवलंबून असतो सामाजिक सुधारणा झाल्यानें धार्मिक उन्नति होते व या दोहोंवर राजकीय उन्नतीचा आधार असतो. समाजातील भिन्न भिन्न वर्गांत समतेची भावना व परस्पर प्रेम असल्यावर परोपकाराची इच्छा बळावते व त्यामुळें राजकीय व्यवस्था सुलभ होऊन,

'एकमेकां साह्य करूं।
अवघे धरूं सुपंथ'॥

अशी स्थिति येते."

"तथापि परोपकार या शब्दाचा अर्थ मात्र आपणास बरोबर समजला पाहिजे. अपात्रीं व अकालीं दिलेलें दान तामस मानिलें जातें व तें देणाऱ्याचें व घेणाऱ्याचें, उभयतांचेंहि नुकसान करितें या दृष्टीनें पाहता आपल्या समाजातील परोपकाराचा ओघ ज्या दिशेनें वहात आहे ती दिशा आपणास बदलावी लागेल. व्यवहारा-तील दु स्थितीची धोंड दूर करून हा ओघ इष्ट स्थलीं पोहोंचविण्याची व्यवस्था आपण केली पाहिजे. तात्त्विक विचारात निमग्न होणाऱ्या थोड्याशा व्यक्ती जगतांत असल्या, तरी बाकीचे सर्व लोक व्यावहारिक संकटांनीं ग्रस्त झालेले असतात. त्याच्या संकटाचा परिहार करण्याचा

आपल्या हिताकडे लक्ष न ठेविता, अखिल राष्ट्राच्या कल्याणाकडे आपली दृष्टि ठेविली पाहिजे व अशा रीतीनें प्रयत्न केल्यास या देशाची उन्नति होणें अशक्य नाहीं, असा आशावाद त्यांनीं लोकांपुढें मांडिला.

यानतर सन १९०६ च्या डिसेंबर महिन्यात कलकत्ता येथें भरलेल्या दुसऱ्या अखिलभारतीय औद्योगिक परिषदेचें उद्घाटन करण्याचा मानहि महाराजानाच देण्यात आला. त्या प्रसगीं त्यानीं केलेलें भाषण असेंच महत्त्वाचें आहे. या सुमारास हिंदुस्थानात स्वदेशी चळवळीची सुरुवात झाली असल्यामुळें, तिचा उल्लेख त्याच्या भाषणात येणें स्वाभाविक होतें. म्हणून तिच्याबद्दल ते म्हणतात –

" स्वदेशीचा अर्थ आपणास बरोबर समजल्यास, स्वदेशी चळवळ आपल्या उन्नतीच्या कामीं एक महत्त्वाची शक्ति होऊ शकेल. कमींत कमी खर्चांत अधिकात अधिक माल उत्पन्न करणें, हें स्वदेशीचें मुख्य ध्येय असलें पाहिजे. दरेक देशभक्तानें स्वदेशी मालाला थोडीशी अधिक किंमत पडली, तरी ती देऊन तो माल योडा कमी दर्जाचा असला तरी तोच वापरण्याची गैरसोय सोसली पाहिजे. तथापि उत्तरोत्तर स्वदेशी माल अधिकाधिक चागला निघत जाईल व तो उत्पन्न करण्याची किंमत कमी होत जाईल, यानद्दलची व्यवस्था झाली पाहिजे, तरच त्या मालाला परदेशातील मालाशीं टक्कर देता येईल. परदेशी भाडवलाचें दास्य आपल्याला किती करावें लागत आहे, याची कल्पना आपल्याला थोडक्यात अशी देता येईल कीं, आपल्या देशातील आगगाड्या चालविण्यासाठीं लागलेलें भाडवल युरोपातून आलेलें आहे, आपल्या इकडील खाणींतून माल काढण्याचें काम अमेरिकेंतील तज्ज्ञ लोकाकडून केलें जात आहे व आपल्याला अन्न, वस्त्र, करमणूक, उजेड, धुलाई, नेआण, वाहतूक व इतर सर्व वस्तू पुरविण्याचें काम परदेशाकडूनच केलें जात आहे. अशा प्रसगीं आपली अवस्था एखाद्या डोंगरावरील भयंकर कड्यावर

अभिमान वाटत नाहीं, व आपल्या प्राचीन संस्थातील, इतिहासांतील व वाङ्मयातील सुंदर व उपयुक्त गोष्टींबद्दल ज्या राष्ट्राला आदर व कौतुक वाटत नाहीं, त्या राष्ट्राचा बौद्धिक, नैतिक व सांपत्तिक उत्कर्ष केव्हाहि होऊं शकणार नाहीं "

येणेंप्रमाणें सामाजिक बाबतींत महाराजांनीं आपली दृष्टि केवळ आपल्या राज्यापुरती संकुचित न ठेवितां तिला अखिलभारतीय स्वरूप दिलें होतें, याबद्दलचें विवेचन केलें आहे. तथापि राष्ट्राची उन्नति केवळ सामाजिक सुधारणेनें होत नसून, तिच्या जोडीला औद्योगिक, शैक्षणिक, नागरिक, शारीरिक वगैरे इतर प्रकारच्या सुधारणाचीहि जोड असावी लागते, म्हणून महाराजांनीं या गोष्टींकडेहि आरंभापासून लक्ष पुरविलें आहे अखिलभारतीय सामाजिक व औद्योगिक परिषदाचें अध्यक्ष होण्याचा मान एका व्यक्तीस मिळणें, ही गोष्ट दुर्लभ आहे व त्यातूनहि एखाद्या संस्थानाच्या अधिपतीला हा मान मिळणें तर अधिकच कठिण आहे तथापि तो महाराजांना मिळाला, अर्थात् त्यांच्या या उभय क्षेत्रांतील परिश्रमाचा हा योग्य गौरव होय सन १९०२ च्या डिसेंबर महिन्यात अहमदाबाद येथें भरलेल्या औद्योगिक प्रदर्शनाच्या उद्घाटनप्रसंगीं त्यांनीं जें भाषण केलें, तें फार मननीय असून, त्यात त्यांची अखिल भारतीय दृष्टि चांगल्या रीतीनें प्रतीत होते या भाषणात प्रथमत त्यांनीं पाश्चात्य देशातील व हिंदुस्थानातील सांस्कृतिक कल्पनांची तुलना करून, दारिद्र्य म्हणजे साधेपणा व सुखाच्या साधनाचा अभाव म्हणजे संतुष्टता, या चुकीच्या कल्पनेचें निरसन करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला ते म्हणाले —

"दोन वर्षांपूर्वीं पॅरिस येथें भरलेलें औद्योगिक प्रदर्शन माझ्या मनश्चक्षूपुढें उभें असून, त्यात पाश्चात्य राष्ट्रांनीं एका शतकाच्या अवधींत घडवून आणिलेली औद्योगिक उन्नति प्रतिबिंबित झालेली मला दिसत आहे परंतु त्याबरोबरच सुखाच्या साधनाच्या कल्पनेविषयीं पाश्चात्य राष्ट्रें व हिंदुस्थान याच्यात किती मोठें अंतर आहे, हेंहि

व त्या स्थापन होईपर्यंत परदेशातील संस्थांत आपण आपले विद्यार्थी पाठवून त्यांना तयार करवून आणविले पाहिजेत."

यानंतर महाराजांनीं प्राचीन काळच्या अनेक देशांपासून या बाबतींत काय बोध घेतां येईल, याबद्दल विवेचन करून, सांप्रत काळच्या पाश्चात्य देशांतील औद्योगिक चळवळींच्या यशापयशापासून काय धडा घ्यावयाचा, याचा विचार केला. ते म्हणाले,

"पाश्चात्य देशांतून जाऊन आल्यामुळे हिंदुस्थानच्या भवितव्यतेविषयीं मी निराश झालों आहे, असें मात्र आपण मानूं नये. पाश्चात्य संस्कृतींतील अनेक दोषांची मला पूर्ण जाणीव आहे. औद्योगिक उन्नतीमुळे भांडवलवाले व मजूर यांच्यांत उत्पन्न होणारे कलह, खेडेगावांतील वस्ती कमी होऊन शहरांतून होणारी गर्दी व इतर नैतिक, आरोग्यविषयक व शासनविषयक अडचणी त्या देशांत उत्पन्न झाल्या असून, तेथील राज्यकर्त्यांना त्या सोडवितां आलेल्या नाहींत. पैशाच्या मागें एकसारखें लागल्यामुळें त्यांची द्रव्यतृष्णा अधिकाधिक वाढत चालली आहे व खर्चाळ जीवन आणि मौजशौक यांचें वेड त्यांना लागलें आहे. या सर्व गोष्टींची कल्पना मला आहे. म्हणून आपल्या इकडील नैतिक तत्त्वें न सोडितां, पाश्चात्य उन्नतींतील चांगला अंश तेवढाच आपण ग्रहण केला पाहिजे, असें माझें मत आहे. त्यांच्यातील व्यवहार आपण शिकणें व आपलें तत्त्वज्ञान त्यांना शिकविणें, याहून अधिक उदात्त ध्येय हिंदुस्थानाला कोणतें असणार!"

याप्रमाणें महाराजांनीं उपदेश केला; तथापि अशा अखिलभारतीय परिषदांतून भाषणें करून औद्योगिक उन्नतीचें महत्त्व वर्णन करणें इतक्याच पुरती आपली दृष्टि त्यांनीं पोंहोंचविली नसून, त्या धोरणानें आपल्या राज्यांत प्रत्यक्ष कृतीहि त्यांनीं केली आहे. औद्योगिक उन्नतीचें मुख्य साधन भांडवल हें असल्यामुळें व तें पुरविणाऱ्या संघटित संस्था

विलायत सरकारकडून देशी मालाच्या व्यापारावर मोठाल्या जकाती बसविण्यात आल्या. या सर्व कारणामुळे येथील सर्व उद्योगधंदे नष्ट झाले व याच कारणानीं हिंदुस्थानचा निर्यात व्यापार बसला. ज्या देशाचा निर्यात व्यापार नाहींसा झाला, त्या देशाच्या सांपत्तिक स्थितीला उतरती कळा लागली असें निःसंशय समजावें."

"*तथापि या स्थितींतहि आपण स्वस्थ न बसता तिच्यांत सुधारणा* घडवून आणण्याचा प्रयत्न केला असता, तर आपली स्थिति आज आहे अशी झाली नसती. परंतु धर्मविषयक खोट्या समजुतींमुळें आपण व्यापारी बाजूकडे लक्षच न दिल्यामुळें आपली अधोगति सांप्रत परमावधीला जाऊन पोहोंचली आहे."

"या स्थितीला उपाय काय करावे, हा आपणापुढें सांप्रत प्रश्न आहे. त्या उपायाचे मुख्यत्वे दोन भाग पडतात ते असे –( १ ) व्यापाराच्या पद्धतींत, साधनांत व यंत्रांत सुधारणा घडवून आणणें व ( २ ) औद्योगिक शिक्षणाची सोय करणें."

याप्रमाणें मुख्य तत्त्वाचें विवेचन केल्यावर महाराजांनीं हिंदुस्थानांतील प्रमुख धंद्यांचा तपशील तपासिला व त्यांतील कोणते उद्योगधंदे कोठें सुधारण्याचा प्रयत्न होणें शक्य आहे, यांबद्दलचें विवेचन केलें व अशा नवीन धंद्याच्या उन्नतीसाठीं आर्थिक संरक्षणाचें तत्त्व स्वीकारलें पाहिजे, असें त्यांनीं प्रतिपादन केलें. या औद्योगिक पुनरुज्जीवनासाठीं सरकारी मदत किती मागावी व ती किती मिळणें शक्य आहे, याबद्दलचा उहापोह त्यांनीं केला. त्याचप्रमाणें धंदेशिक्षणासाठीं शाळा काढण्याची आवश्यकता वर्णन करून त्या कामीं बडोद्यास कलाभवनाच्या रूपानें आपण एक ल्हानशी सोय करून दिल्याचें त्यांनीं सांगितलें व या कार्यासाठीं औद्योगिक प्रदर्शनाच्या उपयुक्ततेचें महत्त्व वर्णन केलें. अखेर त्यांनीं आपला मुख्य सिद्धांत असा मांडला कीं, या देशाच्या औद्योगिक उन्नतीसाठीं अखिलभारतीय चळवळ केली पाहिजे, तिच्यांतील दरेक व्यक्तीनें केवळ

करणाऱ्या लोकांची संख्या या अवधींत ९००० वरून २२,००० वर गेली. अशा प्रकारें आपल्या राज्यात औद्योगिक उन्नति प्रत्यक्ष घडवून आणून महाराजानीं इतरत्र केलेल्या उपदेशाचें सक्रिय उदाहरण स्वत घालून दिलें आहे.

येणेंप्रमाणें औद्योगिक उन्नतीबद्दल महाराजानीं परिश्रम केले, तथापि त्याची स्मरणीय म्हणून सर्वांत महत्त्वाची कामगिरी कोणती असेल, तर ती शिक्षणविषयक होय. अज्ञान हेंच आपल्या देशाच्या उन्नतीच्या मार्गांतील सर्वांत मोठें विघ्न आहे व ज्ञानदान हाच त्यावरील रामबाण उपाय आहे, हें त्याचें या बाबतींतील सूत्रवाक्य आहे. उदाहरणार्थ, सन १९०१ च्या जुलै महिन्यात अलीगड येथील मुसलमान कॉलेजात महाराजाना मानपत्र देण्यात आलें, त्या प्रसगीं त्यानीं केलेल्या भाषणात म्हटले आहे कीं,

" सर्व सुधारणाचें मूळ शिक्षण हें असून, साप्रतच्या स्थितींतून आपली मुक्तता होण्याचें ते एकच साधन आहे. "

त्याच सालच्या ऑगस्ट महिन्यात देवास येथील हायस्कूलमध्यें त्यानीं असेंच सागितले कीं,

" मानवी प्रगतीची व सुखाची शिक्षण ही एकच गुरुकिल्ली आहे."

सन १९०२ च्या सप्टेंबर महिन्यात मद्रास येथील पाचयप्पा कॉलेजमधील भाषणात ते म्हणतात —

" आपण सर्वजण आपल्या आयुष्यात निरनिराळ्या विषयाचे विद्यार्थीच आहोंत आपल्यापैकींचे काहींजण शाळेंत शिकतात, तर काहीं कचेऱ्यातून शिकतात, काहीं अपयशापासून धडा घेतात, तर काहीं यशापासून बोध घेतात. पण एकदरींत आपण नेहमीं शिक्षणच घेत असतों. "

सन १९०९ सालीं बडोदा कॉलेजच्या बक्षिससमारभाच्या प्रसगीं याच मुद्यावर त्यानीं भर दिला होता. ते म्हणाले —

उमें असल्याप्रमाणें झाली आहे, व म्हणून या स्थितींत सुधारणा कशी करावी हा आपणापुढें मुख्य प्रश्न आहे असें सागताना साप्रतच्या परिस्थितीची अतिशयोक्ति मी करीत आहें, असें आपण मानू नये ही आपली शेवटची संधि आहे व तिचा फायदा घेऊन आपली औद्योगिक उन्नति घडवून आणण्याचा प्रयत्न या वेळीं आपण जर केला नाहीं, तर भविष्यकाळाबद्दल आपल्याला फारशी आशा बाळगता येणार नाहीं "

यानतर साप्रतची परिस्थिति सुधारण्याच्या मार्गाबद्दल विवेचन करताना महाराजांनीं जनतेला औद्योगिक शिक्षण देण्याच्या सोयींवर मुख्य भर दिला निरनिराळ्या पाश्चात्य देशानतू औद्योगिक शिक्षणाची सोय किती निपुलतेनें करण्यात आली आहे, हें कथन करून महाराज म्हणाले,

"मी जे अनेक देश पाहिले आहेत, त्या सर्वांत अमेरिकेइतकी औद्योगिक शिक्षणाची उत्कृष्ट सोय इतर कोठेंहि माझ्या पाहण्यात आलेली नाहीं त्या देशातील दरेक सस्थानात औद्योगिक शिक्षण मोफत देण्यासाठीं सरकारी कॉलेज काढलेलें आहे. देशाच्या उद्योग धद्याची वाढ हें तेथें राष्ट्रकार्य समजलें जात असल्यामुळें, या शिक्षणाबद्दल सरकार कोणत्याहि प्रकारची फी न आकारतां सरकारी खर्चानें हीं कॉलेजें चालवीत असतें अशा कॉलेजातून शेतकीचें व इनिनिअरिंगचें शिक्षण देण्यात येऊन, काहीं ठिकाणीं लष्करी शिक्षणहि देण्यात येतें याशिवाय सर्व देशभर मिळून खासगी पैशानें चालविलेल्या औद्योगिक शिक्षणाच्या एकदर ४३ सस्था चालत असून, त्यातून सिव्हिल, मेकॅनिकल, इलेक्ट्रिकल व आरमारी इजिनिअरिंगचें शिक्षण देण्यात येतें त्याखेरीज ड्रॉइग, मॉडेलिंग, विणकाम, वगैरे कलाहि तेथें शिकविल्या जातात बॉस्टन, शिकॅगो, न्यूयॉर्क, येथील संस्थातून अडीच तीन हजारावर विद्यार्थी शिक्षण घेत असतात अशा सस्था आपल्या देशात स्थापन झाल्या पाहिजेत,

करणाऱ्या लोकांची संख्या या अवधींत ९००० वरून २२,००० वर गेली. अशा प्रकारें आपल्या राज्यात औद्योगिक उन्नति प्रत्यक्ष घडवून आणून महाराजांनीं इतरत्र केलेल्या उपदेशाचें सक्रिय उदाहरण स्वत घालून दिलें आहे.

येणेंप्रमाणें औद्योगिक उन्नतीबद्दल महाराजांनीं परिश्रम केले, तथापि त्यांची स्मरणीय म्हणून सर्वांत महत्त्वाची कामगिरी कोणती असेल, तर ती शिक्षणविषयक होय. अज्ञान हेंच आपल्या देशाच्या उन्नतीच्या मार्गातील सर्वांत मोठें विघ्न आहे व ज्ञानदान हाच त्यावरील रामबाण उपाय आहे, हे त्यांचें या बाबतींतील सूत्रवाक्य आहे. उदाहरणार्थ, सन १९०१ च्या जुलै महिन्यात अलीगड येथील मुसलमान कॉलेजात महाराजांना मानपत्र देण्यात आलें, त्या प्रसगीं त्यांनीं केलेल्या भाषणात म्हटलें आहे कीं,

> " सर्व सुधारणांचें मूळ शिक्षण हें असून, साप्रतच्या स्थितींतून आपली मुक्तता होण्याचें तें एकच साधन आहे. "

त्याच सालच्या ऑगस्ट महिन्यात देवास येथील हायस्कूलमध्यें त्यांनीं असेंच सांगितलें कीं,

> " मानवी प्रगतीची व सुखाची शिक्षण ही एकच गुरुकिल्ली आहे."

सन १९०२ च्या सप्टेंबर महिन्यात मद्रास येथील पाचयप्पा कॉलेजमधील भाषणात ते म्हणतात —

> " आपण सर्वजण आपल्या आयुष्यात निरनिराळ्या विषयाचे विद्यार्थीच आहोंत. आपल्यापैकींचे कांहींजण शाळेंत शिकतात, तर कांहीं कचेऱ्यातून शिकतात, कांहीं अपयशापासून धडा घेतात, तर कांहीं यशापासून बोध घेतात. पण एकदरींत आपण नेहमीं शिक्षणच घेत असतों. "

सन १९०९ सालीं बडोदा कॉलेजच्या बक्षिससमारंभाच्या प्रसगीं याच मुद्यावर त्यांनीं भर दिला होता. ते म्हणाले —

उभें असल्याप्रमाणें झाली आहे, व म्हणून या स्थिनींत सुधारणा कशी करावी हा आपणापुढें मुख्य प्रश्न आहे. असें सांगताना साप्रतच्या परिस्थितीची अतिशयोक्ति मी करीत आहें, असें आपण मानू नये. ही आपली शेवटची संधि आहे व तिचा फायदा घेऊन आपली औद्योगिक उन्नति घडवून आणण्याचा प्रयत्न या वेळीं आपण जर केला नाहीं, तर भविष्यकाळाबद्दल आपल्याला फारशी आशा बाळगता येणार नाहीं."

यानंतर साप्रतची परिस्थिति सुधारण्याच्या मार्गांबद्दल विवेचन करताना महाराजांनीं जनतेला औद्योगिक शिक्षण देण्याच्या सोयींवर मुख्य भर दिला. निरनिराळ्या पाश्चात्य देशांतून औद्योगिक शिक्षणाची सोय किती विपुलतेनें करण्यात आली आहे, हें कथन करून महाराज म्हणाले,

"मी जे अनेक देश पाहिले आहेत, त्या सर्वांत अमेरिकेइतकी औद्योगिक शिक्षणाची उत्कृष्ट सोय इतर कोठेंहि माझ्या पाहण्यात आलेली नाहीं त्या देशातील दरेक संस्थानात औद्योगिक शिक्षण मोफत देण्यासाठीं सरकारी कॉलेज काढलेलें आहे. देशाच्या उद्योग-धंद्याची वाढ हें तेथें राष्ट्रकार्य समजलें जात असल्यामुळें, या शिक्षणाबद्दल सरकार कोणत्याहि प्रकारची फी न आकारता सरकारी खर्चानें हीं कॉलेजें चालवीत असतें. अशा कॉलेजातून शेतकीचें व इंजिनिअरिंगचें शिक्षण देण्यात येऊन, कांहीं ठिकाणीं लष्करी शिक्षणहि देण्यात येतें याशिवाय सर्व देशभर मिळून स्वसर्गी पैशानें चालविलेल्या औद्योगिक शिक्षणाच्या एकंदर ४३ संस्था चालत असून, त्यातून सिव्हिल, मेकॅनिकल, इलेक्ट्रिकल व आरमारी इंजिनिअरिंगचें शिक्षण देण्यात येतें. त्याखेरीज ड्रॉइंग, मॉडेलिंग, शिल्पकाम, वगैरे कलाहि तेथें शिकविल्या जातात. बॉस्टन, शिकॅगो, न्यूयॉर्क, येथील संस्थांतून अडीच तीन हजारावर विद्यार्थी शिक्षण घेत असतात. अशा संस्था आपल्या देशात स्थापन झाल्या पाहिजेत,

"भौगोलिक परिस्थितीनें अथवा राज्यव्यवस्थेच्या योजनेने आपण कमेहि विभागिलो गेलो असलो, तथापि आपल्या चालीरीती, परंपरा, आकांक्षा वगैरे सर्व एकाच प्रकारच्या आहेत यामुळें कोणत्याहि एका भागाची सुधारणा झाल्यास आपोआपच दुसऱ्या भागातहि तशी सुधारणा झाल्यावाचून राहणार नाहीं."

याचप्रमाणें सन १९११ सालीं मुंबईच्या सॅनिटरी असोसिएशनपुढें केलेल्या भाषणात ते म्हणतात —

"आरोग्यविषयक बाबतींच्या अज्ञानानें, आळसानें व असलेल्या परिस्थितींत संतुष्ट राहण्याच्या वृत्तीमुळें हिंदुस्थानात प्रतिवर्षी किती लोक मृत्युमुखीं पडतात हें पाहून कोणत्या खऱ्या देशभक्ताचें अंतःकरण हलून जाणार नाहीं? सद्गृहस्थहो, आपण आपल्या देशातील आरोग्यविषयक प्रश्न ज्या रीतीनें सोडवू शकू, त्यावर आपल्या राष्ट्राचें भवितव्य अवलंबून आहे. त्यातील व्यक्तींच्या आयुष्यात जरी एक दिवसाची वाढ आपल्याला करिता आली, तरी आपल्या राष्ट्राच्या मानसिक, शारीरिक व आर्थिक सामर्थ्यांत किती तरी भर पडणार आहे! *आपल्या हिंदुस्थान देशाला जगातील श्रेष्ठ राष्ट्राच्या श्रेणींत* स्थान मिळावें अशी आपली इच्छा आहे, तर त्यासाठीं प्रयत्न करणें हें आपल्या सर्वांचें अवश्य कर्तव्य आहे."

या बाबतींत महाराजानीं आपली दृष्टि आपल्या राज्यापुरती संकुचित न ठेविता, ती निरंतर विस्तृत ठेविली आहे. दिल्ली येथें स्त्रियांसाठीं मेडिकल कॉलेज व त्यास जोडून दवाखाना काढण्यासाठीं लेडी हार्डिंज याजकडे एक लाख रुपयाची देणगी पाठविताना त्या सोबतच्या पत्रात अशा उपक्रमाबद्दल आपल्याला विशेष आस्था वाटत असल्यामुळें ही देणगी आपण पाठवीत असल्याचें त्यानीं कळविलें आहे.

इतकें सर्व झालें; तथापि जोपर्यंत हिंदुस्थानातील निरनिराळ्या भागातील लोक एकमेकाशीं एका भाषेंत परस्पर व्यवहार करू शकत नाहींत,

दिसून येतें, यामुळेंच अर्वाचीन काळांतील राष्ट्रनिर्मात्या पुरुषांत त्यांना अग्रेसरत्वाचा मान दिला जाणें स्वाभाविक आहे. राष्ट्रांतील हरेक घटक भागाची सुधारणा केल्यानें पर्यायानें सर्व राष्ट्राची सुधारणा होते व या दृष्टीनें हरेक घटकांत सुधारणा घडवून आणणारा पुरुषहि पर्यायानें अखिल राष्ट्राच्या सुधारणेला कारणीभूत होतो ही गोष्ट खरी असली, तरी आरंभापासूनच आपली दृष्टि अखिल राष्ट्राच्या सुधारणेवर ठेवणाऱ्या व्यापक बुद्धीच्या पुरुषाची किंमत अर्थातच याहून वरच्या कोटीची आहे, व अशी योग्यता असलेल्या भारतनिर्मात्या अल्पसंख्य पुरुषांतहि महाराजांची गणना वरच्या दर्जाची मानिली जाईल यांत शंका नाहीं.



"The first commandment of the true French patriot is 'thou shalt have no other goods but France.' It is a type or quality of patriotism which springs more naturally from the soil of France than that of any other land Are Englishmen also not patriotic? Yes, they are, but with them patriotism is a duty, while with Frenchmen it is a love. Great leaders of men prove their gift of leadership by the appeals which they address to those who under their command are called upon to fight under odds. Nelson's call to the English sailors was to respond to England's expectation to do their duty Napoleon's appeal was to the past glories of France. It was a love of a country planted and raised during the torrid summer of the Great Revolution when the integrity and independence of France were threatened by all the monarchies of Europe and matured while the legions of France under Napolean were tramping through the streets of every capital where those monarchs reigned. They were beaten in the end by a combined Europe, but national greatness does not depend so much on victory as upon the grandeur of the struggle put up for a people. "[1]

या उताऱ्यात म्हटल्याप्रमाणें सर्व प्रकारच्या प्रतिकूल परिस्थितींत हताश झालेल्या देशबंधूना खऱ्या व स्थायी उन्नतीचा मार्ग दाखवून, आपली राष्ट्रभक्ति व्यक्त करणाऱ्या पुरुषाचें देशप्रेमच उज्ज्वल स्वरूपाचें गणलें जातें व तसें प्रेम महाराजानीं दर्शवून प्रांतिक व स्थानिक अशा संकुचित भावनेच्या पलीकडे नेऊन आपली दृष्टि सर्व देशभर पोहोचविली

अशा प्रकारें सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, शैक्षणिक, नागरिक, भाषिक अथवा आरोग्यविषयक, कोणत्याहि प्रकारच्या सुधारणेचा प्रयत्न असो, त्यात केवळ आपल्या राज्यापुरती अल्प दृष्टि न ठेविता, अखिल भारतीय उन्नतीची दृष्टि महाराजानीं आरंभापासून ठेविली असल्याचें

१ 'War Memoirs,' by D Lloyd George Vol. Iv., pp. 2028—2029

"शिक्षणाचा उच्च हेतु ज्ञान संपादणें हा तर आहेच; परंतु त्याबरोबरच चारित्र्य कमाविणें हाहि आहे व हे उभय हेतू साध्य झाले, तरच आपल्या देशाची उन्नति होणार आहे."

अशा रीतीनें अनेक प्रसंगीं त्यानीं आपले शिक्षणविषयक विचार आपल्या भाषणातून प्रदर्शित केले आहेत. त्याचप्रमाणें त्याच्या सरकारी हुकुमातूनहि हीच गोष्ट अनेक वेळा दिसून येते.

"शिक्षणदान हें मोठें परोपकारी कार्य आहे व त्या कार्यांत जो यशस्वी होईल, तोच देशाचा खरा उद्धारक समजला जाईल,"

वगैरे हुकुमावरून त्याची शिक्षणाच्या बाबतींतील अखिलभारतीय दृष्टि दिसून येते. बनारस येथील हिंदु विश्वविद्यालयाला त्यानीं दिलेल्या मोठाल्या देणग्या हीच गोष्ट दर्शवितात.

"शिक्षणाप्रमाणेंच नागरिक या नात्यानें आपलें कर्तव्य करण्याचें ज्ञान सर्वांना प्राप्त झालें पाहिजे, कारण त्यानेंच लोकांची दृष्टि विस्तृत होते,"

व यामुळें असें शिक्षण देऊन हिंदी लोकात भारतीय भावना उत्पन्न केली पाहिजे; या हेतूच्या पूर्तीसाठीं राज्यातील अधिकारीवर्गापेक्षा प्रजाजनातील सुबुद्ध वर्गावर व व्यक्तींवर अधिक जबाबदारी पडते; म्हणून नागरिक या नात्यानें अशा व्यक्तींनीं आपली प्रादेशिक कल्पना वाढवून आपल्या राज्यात व अखिल भारतात विधायक सहकार्याचें सुप्रयोग शिक्षण निरनिराळ्या कार्यक्षेत्रात मिळविणें अवश्य असल्यानें त्यानीं अशा प्रसंगीं तत्परता दर्शविली पाहिजे, अशा अर्थाचें प्रतिपादन त्यानीं वेळोवेळीं केलें आहे. या शिक्षणाबरोबरच शारीरिक व आरोग्यविषयक शिक्षण दिल्याशिवाय सार्वत्रिक उन्नति होणें शक्य नाहीं, हें जाणून त्यानीं याच दृष्टीनें सर्व हिंदुस्थानाला लागू पडतील असे उद्गार काढले आहेत. उदाहरणार्थ, सन १९०१ च्या मार्चमध्यें मुंबई येथील ग्रँट मेडिकल कॉलेजातील बक्षिससमारंभाच्या प्रसंगीं केलेल्या भाषणात ते म्हणतात —



श्री सौ महाराणीसाहेब

तोंपर्यंत त्याच्यात देशबंधुत्वाची खरी भावना उत्पन्न होणें कठिण आहे, हें जाणून महाराजांनीं हिंदुस्थानची राष्ट्रभाषा होण्यास लायक असलेल्या हिंदी भाषेच्या प्रचारासाठीं अनेक वर्षांपासून उपक्रम सुरू केला आहे सन १९११ सालीं त्या वेळच्या जामनगरच्या जामसाहेबांना महाराजांनीं लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात —

> "सर्व हिंदुस्थानासाठीं एकच भाषा असावी व ती हिंदी असावी, असा प्रयत्न आपण करावा काय ? त्यासाठीं आपण आपली देशी भाषा टाकून देण्याची जरूरी नाहीं तेव्हा जर असा प्रयत्न करावा असा आपला अभिप्राय असेल, तर आपल्या राज्यातील शाळ्यातून ती भाषा सुरू करण्याची आपली तयारी आहे काय ?"

निदान महाराजांनीं तरी बडोदें राज्यातील प्राथमिक शाळ्यतून हिंदीचें शिक्षण अवश्य केलें असून, अगदीं अलीकडे तर न्यायकचेऱ्यातून हिंदी भाषाच वापरण्यात यावी अशा अर्थाचे हुकूम त्यांनीं सोडले आहेत, व त्यासाठीं सर्व वकीलांनीं हिंदी भाषेची परीक्षा देऊन अगर त्या भाषेच्या ज्ञानाबद्दलचें सर्टिफिकेट रुजू करून आपली पात्रता सिद्ध करावी, अशी आज्ञा केली आहे

अशा प्रकारें सांप्रतच्या दु स्थितीशीं सामना करून आपल्या मातृभूमीवरील आपली भक्ति सिद्ध करण्याचा उपदेश महाराजांनीं अखंड चालू ठेविला आहे देशभक्तीचे अनेक प्रकार भिन्न भिन्न देशात आढळून येतात, त्या सर्वांत निष्काम व निरपेक्ष प्रेमाइतका दुसरा उदात्त प्रकार क्वचितच असतो यासबधानें इग्लड व फ्रान्स या दोन देशातील देशभक्तीच्या प्रकारातील फरक इग्लडचे युद्धकालीन मुख्य मत्री मि लॉइड जॉर्ज यानीं आपल्या 'युद्धस्मरणें' (War Memoirs) या ग्रथाच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या चौथ्या खडात फार सुदर रीतीनें वर्णन केलें असून, त्यात फ्रेंच देशभक्ताच्या मातृभूमिविषयक प्रेमाची सरसता दर्शविताना म्हटलें आहे कीं,

# प्रकरण ३० वें



## गृहसौख्य व राजकार्य

सन १८८८ च्या फेब्रुआरी महिन्यात महाराज आपली विलायतची पहिली सफर संपवून परत आले. त्यानंतर कांहीं दिवस बडोद्यास राहून पुढें ते उटकमंड येथें उन्हाळ्यासाठीं गेले. तेथें ते असतांना ता. १२ मे रोजीं उटी येथेंच महाराणीसाहेब प्रसूत होऊन त्यांना प्रथम पुत्राचा लाभ झाला. त्याचें नांव जयसिंहराव असें ठेवण्यांत आलें. या शुभप्रसंगानिमित्त महाराणी व्हिक्टोरिया यांच्याकडून अभिनंदनाची तार आली, त्याबद्दल महाराजांना स्वाभाविक रीतीनें झालेला आनंद त्यांनीं व्हाईसरॉय लॉर्ड डफरिन् यांना पाठविलेल्या पत्रांत दर्शविला आहे. येथेंच महाराजांचा व म्हैसूरच्या माजी महाराजांचा विशेष परिचय होण्याचा प्रसंग आला. सन १८७५ सालीं प्रिंस ऑफ वेल्स् मुंबईस आले, त्या वेळीं व त्यानंतर दोन वर्षांनीं दिल्ली दरबारच्या प्रसंगीं या समान वयाच्या दोघां अधिपतींची तोंडओळख झालेली होती. दोघांनाहि दत्तविधानानेंच राज्यलाभ झालेला होता व दोघांचींहि राज्यें हिंदुस्थानांत वरिष्ठ दर्जाचीं होतीं. अशा स्थितींत या उभयतांत स्नेह जडावा, हें स्वाभाविक होतें. या वर्षाच्या जून अखेर महाराज विलायतच्या दुसऱ्या सफरीला निघून चारच महिन्यांनीं परत आले. 'या सफरीनें मला व्हावा तसा फायदा झाला नाहीं,' असा अभिप्राय महाराजांनीं एका पत्रांत व्यक्त केला आहे. यानंतर त्या सालच्या डिसेंबर महिन्यांत महाबळेश्वरीं जातांना त्यांनीं वाटेंत पुणें येथें

दिसून येतें, यामुळेंच अर्वाचीन काळांतील राष्ट्रनिर्मात्या पुरुषांत त्यांना अग्रेसरत्वाचा मान दिला जाणें स्वाभाविक आहे. राष्ट्रांतील दरेक घटक भागाची सुधारणा केल्यानें पर्यायानें सर्व राष्ट्राची सुधारणा होते व या दृष्टीनें दरेक घटकांत सुधारणा वडवून आणणारा पुरुषहि पर्यायानें अखिल राष्ट्राच्या सुधारणेला कारणीभूत होतो ही गोष्ट खरी असली, तरी आरंभापासूनच आपली दृष्टि अखिल राष्ट्राच्या सुधारणेवर ठेवणाऱ्या व्यापक बुद्धीच्या पुरुषाची किंमत अर्थातच याहून वरच्या कोटीची आहे, व अशी योग्यता असलेल्या भारतनिर्मात्या अल्पसंख्य पुरुषांतहि महाराजांची गणना वरच्या दर्जाची मानिली जाईल यांत शंका नाहीं.



गावीं येण्यासाठीं निघाली. तेथे आल्यावर एक दोन मुक्काम करून महाराज परत मुबईस गेले व तेथून याच बोटीनें बाणकोटास गेले. तेथून पुढें ते दासगाव बदरीं गेले. तेथे उतरण्यासबधाची अगाऊ खबर न पोचल्यामुळें त्याचें काहींच सामान तेथे आलें नव्हतें अशा स्थितींत महाडच्या मामलेदाराना ही हकीगत समजून त्यानीं कोठून तरी थोडें खाणें आणवून धर्मशाळेंत एक वेडीवाकडी खाट घालून कशीतरी महाराजाची सोय रात्रीपुरती लाविली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं भाड्याचा टांगा करून स्वारी पुढें जाण्यास निघाली, तो वाटेंत महाबळेश्वराहून हळू हळू येणाऱ्या गाड्या सामान वगैरे त्यास भेटले! यानतर दुर्दैवानें या बोटीचा अलीबागच्या बदरात आकस्मिक रीतीनें अत झाला तें बदर उथळ व खडकाळ असून बोटीवरील कप्तान नवखा असल्यामुळें बदरात शिरत असता बोट एकदम एका खडकास लागली व फुटून अल्प काळात नाश पावली.

महाराजाचे हे दिवस आनदात जात होते. कुटुबातील सर्व मडळींचें प्रेम त्याजवर बसून सर्वांशीं त्याचे सबधहि प्रेमळपणाचे होते. त्याच्या दत्तक मातु श्रीविषयीं त्याच्या मनात असलेला आदर त्याच्या या सुमाराच्या एका पत्रावरून दिसून येतो. तथापि त्याबरोबरच दानधर्माविषयींच्या त्याच्या वाढत्या प्रवृत्तीबद्दल त्याना महाराजानीं दिलेली सूचनाहि त्यात आढळते. ते लिहितात —

> "मजकडून आपणास जितकें सुख देववेल तितकें देणें, हा माझा धर्म आहे, परतु आपणहि आपली सर्व व्यवस्था हल्लींपेक्षा जास्त चागली ठेविली पाहिजे कीं, ज्याच्या योगानें कर्ज वगैरे होणार नाहीं. दुनिया चमत्कारिक आहे, परतु ती आपले सबधानें कशी असावी हें थोडेंसें आपल्या हातीं आहे."

सन १८८९ च्या जुलै महिन्यात महाराज कुन्नूर येथें असताना, त्यानीं आपल्या जन्मदात्या मातुश्रीस लिहिलेलें एकच पत्र उपलब्ध आहे. त्यावरून या भाग्यशाली जननीबद्दल त्याना वाटत असलेलें प्रेम

मुक्काम केला व तेथून ते एक दिवस वाईस जाऊन आले. तेथें त्याना गावच्या सार्वजनिक सस्थेकडून थाटाची पानसुपारी करण्यात आली. त्यानतर त्यानीं महाबळेश्वरास एप्रिल सन १८८९ पर्यंत मुक्काम केला. या सुमारास महाराजाचे दिवाण रा. लक्ष्मण जगन्नाथ यानीं स्वत च्या प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें निवृत्त होण्याची इच्छा दर्शविली, परतु महाराजानीं त्याना उत्तरीं कळविलें कीं,

"सध्या तुम्ही निवृत्त व्हावें, अशी माझी इच्छा नाहीं; कारण राज्यकारभाराच्या प्रमुख जागेवर सध्या जोरदार मनुष्याची जरूरी आहे, व अशा प्रकारचा मनुष्य मिळणें किती कठिण आहे, हें तुम्ही जाणतच आहात."

पुढें महाबळेश्वराहून महाराज एप्रिल महिन्यात आगबोटीच्या मार्गानें वडोद्यास परत आले. सन १८८८ मध्यें महाराजानीं युरोपच्या आपल्या दुसऱ्या सफरींत असताना तेथें आपल्यासाठीं 'शिंगारा' नावाची एक लहान आगबोट खरेदी केली तिची लाबी ११० फूट असून मध्यभागीं रुंदी २० फूट होती. ही बोट उत्तम प्रकारें शृगारलेली व सर्व सोयींनीं परिपूर्ण असून, त्याच्या आवडीची होती. ती घेऊन महाराजाचे सहवासातील अधिकारी रा. अब्बास तय्यबजी हे मुबईस आले, आणि तेथून बाणकोटच्या बदरात आगबोट ठेऊन ते महाबळेश्वरीं महाराजाना जाऊन भेटले. नतर महाराज महाबळेश्वराहून निघून बाणकोटास येऊन या बोटींत बसले. या आगबोटींत एक सुदर दालन पुस्तकालय म्हणून सजविलेलें असून, त्यात दोन चार हजार ग्रथ शोभिवत कपाटातून ठेविलेले होते. 'या दालनातील खिडकीनजीक बसून बाहेरच्या अफाट जलविस्ताराकडे नजर फेंकून प्रचड लाटाच्या तुषारानीं आर्द्र झालेल्या पवनलहरींचा आस्वाद घेत असता, त्यांची वृत्ति तल्लीन होत असे,' असें रा. सरदेसाई यानीं आपल्या आठवणींत नमूद केलें आहे पुढें ही बोट सायकाळीं तेथून निघून मध्यें मुबईस न थाबता एकदम पुढें उत्तरेस डुमसच्या खाडीच्या अलीकडे वडोदें राज्यातील उमरठ

चित्रकला, काव्यकला, मूर्तिकला व शिल्पकला या चार कलांचे दर्शक पुतळे उभे केले आहेत. राजवाड्याभोंवतालचा विस्तीर्ण बगीचा मि. गोल्डरिंग यानीं बनविला होता."

अशा प्रकारें हा उत्कृष्ट राजवाडा बनविला गेला असला, तरी त्यातील सोयी नित्याच्या जरूरीकडे लक्ष देऊन केलेल्या नाहींत, असा अभिप्राय महाराजानीं एका पत्रात दर्शविताना म्हटलें आहे कीं,

"लक्ष्मीविलास राजवाड्याची इमारत अजस्र असली, तरी त्यातील राहणाऱ्याच्या सोयीकडे ती बांधताना अगदीं दुर्लक्ष केलें गेले आहे. उदाहरणार्थ, माझ्या उपयोगासाठीं लागणाऱ्या सर्व खोल्या जवळ जवळ असण्याऐवजीं त्या दूरवर विखुरल्याप्रमाणें केलेल्या आहेत. या योगानें फार गैरसोय होते. त्याचप्रमाणें इतरहि अनेक गैरसोयी या राजवाड्याच्या बांधणींत राहिल्या होत्या उदाहरणार्थ, हा राजवाडा पश्चिमाभिमुख असल्यानें त्यात अतिशय उष्णता भरून राहते व ती राजवाड्याला लावलेल्या बाळसर दगडामुळें पुष्कळ काळपर्यंत टिकून राहते. या राजवाड्याला आरंभीं सज्जा नसल्यामुळेंहि फार गैरसोय होई. जुन्या सरकारवाड्याच्या नमुन्यावर हा बांधलेला असल्यानें त्यातील सर्व अडचणी यात आल्या होत्या. उदाहरणार्थ, राजवाड्याच्या मुख्य भागापैकींचा ऐवे हॉल हा आरंभीं स्वयपाकघर म्हणून निश्चित केला गेला होता ती योजना पुढें बदलून मुख्य इमारतीपासून अलग असें स्वतंत्र स्वयपाकघर बांधण्यात आलें. गुजराथेसारख्या उष्ण प्रदेशात दगडापेक्षा विटांच्या इमारती बांधणेंच अधिक सुखकर होतें. हा राजवाडा बांधताना त्यात पुढें राहणाऱ्याच्या सोयींचा विचार करून तो बांधला गेला नव्हता, हें उघडच होतें. वस्तुत अशा मोठाल्या इमारती बांधण्यापूर्वी त्यात राहणाऱ्याच्या कल्पनेला अनुसरून त्या बांधणेंच सोईस्कर असतें."

या राजवाड्याच्या वास्तुशांतीकरिता रु. २००० खर्च करण्यात आला.



हत्तीवरून शिकारीची तयारी

यानतर सन १८९३ च्या मे महिन्यापासून पुढील आठ महिने महाराजानीं विलायतच्या चौथ्या सफरींत घालविले. या अवधींतच ता. ३१–८–१८९३ रोजीं महाराजाचे चतुर्थ पुत्र धैर्यशीलराव याचा जन्म बडोदे येथें झाला. पुढें सन १८९२ च्या डिसेंबरपासून १८९५ च्या जानेवारीपर्यंत महाराज आपल्या विलायतच्या पाचव्या सफरींत होते. तेथें असताना त्याच्या मागें बडोद्यास बापट प्रकरण धुमसण्यास सुरवात झाली होती. या अवधींत महाराणीसाहेबाच्या शिक्षणात चागल्या प्रकारची प्रगति होत होती. सन १८९५ च्या सप्टेंबरमध्यें त्याचे वडील बाजीराव मामासाहेब व त्यानतर दोन अडीच वर्षानीं सन १८९८ च्या फेब्रुआरींत त्याच्या मातु श्री मामीसाहेब हीं उभयता वारल्यानें सौ महाराणीसाहेबाचें स्वतत्र माहेरघर सपलें व अपत्यसवर्धनाची वाढती जबाबदारी त्याना आपल्या अगावर घ्यावी लागल्या कारणाने त्याची व्यग्रताहि अधिक वाढली.

यापुढील कालातील महाराजाच्या गृहसौख्यासबधानें रा. सरदेसाई यानीं म्हटले आहे कीं,

"कौटुबिक दृष्टीनें सन १८९५ ते १९०५ पर्यंतचा दहा वर्षांचा काल महाराजाना फार सुखाचा गेला. या कालात मुले मोठीं होण्यास लागून, त्याच्या विद्याभ्यासाला सुरुवात झाली होती. मुला-वर अर्थातच महाराणींची देखरेख असे. त्या स्वत त्याचे कपडेलत्ते, भोजन, निजणें, उठणें, आजार वगैरे बाबतींबद्दल दक्षता ठेवीत. स्वत महाराज बाहेर जाताना त्याना घोड्यावर वगैरे घेऊन जात. अभ्यासाचे वेळीं आठवड्यातून चार दोन वेळ तरी राजपुत्राचे शाळेंत जाऊन त्याचे अभ्यास स्वत पहात असत, त्याचे व्यायाम व खेळ इत्यादि बाबतीत ते आपण भाग घेत व सुधारणेच्या सूचना करीत, आणि तत्सबधीं हुकूम देत मि. फ्रेंच, सरदेसाई व साळुंके ही त्रयी राजपुत्राच्या घरातल्या व बाहेरच्या व्यवहाराबद्दल जबाबदार असे. त्याच्या सर्व खेळात महाराज मोठ्या आनदानें भाग घेत. मुलाबरोबर

दिसून येतें. हें पत्र जुन्या संप्रदायाचा नमुना म्हणून देण्यासारखें आहे. पत्र अर्थातच मराठींत आहे; त्यांत आरंभीं,

"तीर्थरूप गंगारूप मातुश्री आईसाहेब, मु. कवळाणें,

वडिलांचे सेवेसीं अपत्य बालकें सयाजीराव गायकवाड याचा दोन्ही कर जोडून त्रिकाळ चरणीं मस्तक ठेवून अनेक शिरसाष्टांग नमस्कार."

असा मायना लिहून नंतर

"चि. विजयीभव फत्तेसिंहराव व जयसिंहराव याची, आमची व इकडील सर्वत्राची तब्यत चांगली आहे," वगैरे मजकूर कळविला आहे.'

सन १८९० च्या फेब्रुआरींत लक्ष्मीविलास राजवाड्याचें काम पूर्ण होऊन, त्यांत ता. १० रोजीं महाराज प्रथम राहण्यास गेले. हा मुक्काम तात्पुरता असून तो फक्त राजवाड्यातील सोयी किंतपत झाल्या आहेत, हें पाहण्यापुरताच होता 'हा राजवाडा पुष्कळ मोठा असला, तरी आमच्या परिवारातील सर्व लोकांना पुरेसा नसल्या-मुळें त्यांपैकीं च्या कांहींना बाहेर रहावें लागेल.' असें महाराजांनीं आपल्या एका पत्रांत लिहिलें आहे. वस्तुत हा राजवाडा फार विस्तृत आहे. याची कल्पना त्याचे शिल्पकार मि. चिझोल्म् यांनीं (Royal Institute of British Architects) या संस्थेपुढें वाचलेल्या निबंधावरून होईल. त्या वर्णनात त्यांनीं म्हटलें आहे कीं,

"या इमारतीची लांबी पांचशें फूट असून रुंदी दीडशें फूट आहे व त्याचें एकदर क्षेत्रफळ सुमारें साठ हजार फूट आहे. वाड्याचा दर्शनी भाग शिल्पदृष्टीनें पाहता मिश्र स्वरूपाचा आहे. त्यांत हिंदी शिल्पपद्धतीप्रमाणें नक्षीकाम केलेलें असून, अर्वाचीन पद्धतीप्रमाणें अवश्य असणारी दारांची रचना केलेली आहे. त्यातील कमानींतील कांहींमध्यें व्हेनिसची शिल्पकला व कांहींत गॉथिक शिल्पकला दिसून येते. मुख्य दरबाराच्या दिवाणखान्याची फरशी व्हेनिसच्या पद्धतीवर असून त्यांतील चार कोपऱ्यांत इटॅलियन शिल्पकार फेलिची यानें

काळजी घ्यावी. माझ्या मुलाना सर्वसाधारण शिक्षणाशिवाय कोणत्या तरी उपयुक्त व्यवसायाचेंहि शिक्षण मिळावें, अशी माझी खास इच्छा आहे. हे मी तुम्हास मुद्दाम लिहिण्याचें कारण असें कीं, त्याना साप्रत मिळत असलेलें शिक्षण त्याना फारसें भूषणरूप न होता, व्यवसायाच्या दृष्टीनेहि फारसें उपयुक्त नसण्याचा संभव अधिक आहे. साप्रतच्या संक्रमणाच्या व टीकेच्या कालात मोठ्याचीं मुलेंहि इतर वर्गाच्या मुलाप्रमाणेच सुशिक्षित झालीं पाहिजेत"

यापुढील एका पत्रात म्हटलें आहे कीं,

"तुम्ही मुलाच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष करू नये त्याच्या मानसिक शिक्षणाला मी फार महत्त्व देतो. राजपुत्राच्या बौद्धिक शिक्षणाला फारसें महत्त्व न देणारी काहीं लोकाची विचारसरणी मला पसत नाहीं. तुम्हावर याबद्दलची जबाबदारी असल्यामुळें, या बाबतींतील माझे विचार मी तुम्हाला मोकळेपणानें कळवीत आहे. त्याचा हेतु हा कीं, तुम्ही त्याप्रमाणे व्यवस्था ठेवावी. चि. फत्तेसिंहराव याना मोडी लिहिण्याचा सराव विशेष राहील, अशी व्यवस्था ठेवावी, कारण त्याबद्दल आता उपेक्षा करण्यात आल्यास, पुढें त्याना केव्हाहि मोडी चागले लिहिता येणार नाहीं"

अशा प्रकारें बौद्धिक शिक्षण देण्याबरोबरच घोड्यावर बसणें, शिकार करणें वगैरे प्रकारच्या शिक्षणासहि सुरवात करण्यात आली होती. सन १८९५ च्या मे मधील एका पत्रात, 'मी चि. फत्तेसिंहराव याजसह वारवार शिकारीस जातो, त्या वेळीं ते घोड्यावर फार चागले बसतात,' असें लिहून त्याच्याप्रमाणेंच 'चि. जयसिंहराव हेहि त्याच्या वयाच्या मानानें घोड्यावर आपली माड फार चागली ठेवितात' असें महाराजानी लिहिलें आहे. बौद्धिक व शारीरिक शिक्षणाप्रमाणें मुलाच्या शीलाचीहि वाढ करण्याबद्दल महाराजाचा कटाक्ष होता. याबद्दल त्यानीं मि ग्रँच याना विशेष सूचना देताना आपल्या पत्रात म्हटलें आहे कीं,

यानंतर ता. ३१ जुलै १८९० रोजीं बडोदें येथील मकरपुऱ्याच्या जुन्या राजवाड्यात महाराजांचे तृतीय पुत्र शिवाजीराव याचा जन्म झाला. तत्पूर्वी दोन महिने अगाऊ दिवाण रा. लक्ष्मण जगन्नाथ हे नोकरींतून मुक्त होऊन त्यांच्या जागीं रा. मणीभाई जसभाई यांची नेमणूक करण्यात आली होती. याच्या पुढील वर्षी महाराजांना न्युमोनिआचा आजार होऊन त्यांची प्रकृति काळजी करण्यासारखी झाली होती, परंतु ती हळूहळू सुधारली. तन्निमित्त बडोद्याच्या नागरिकांनीं ता. १७-२-१८९१ रोजीं मोठा आनंदोत्सव केला याच्या पुढील वर्षी ता. १-३-१८९२ रोजीं राजकन्या इंदिराराजा याचा जन्म झाला. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं बडोदें शहरासाठीं तयार केलेल्या आजवा सरोवरांतील पाणी प्रथमच शहरांत सोडण्याचा मोठा समारंभ करण्यात आला, व त्या योगानें लोकांची अनेक वर्षे होत असलेली अडचण दूर करण्यात आली. या प्रसंगीं महाराजांनीं केलेल्या भाषणात ते म्हणाले,

" मकरपुरा येथें मोठ्या खर्चानें बनविण्यात आलेला व नक्षीकामानें परिपूर्ण असलेला राजवाडा अथवा त्या भोंवतालचा सुंदर व विस्तीर्ण बगीचा यांना मी सार्वजनिक कामें समजत नसून, आज माझ्या राजधानीला शुद्ध गाळलेल्या पाण्याचा लाभ ज्या योजनेनें झाला आहे, तिलाच मी खरी सार्वजनिक उपयोगाची योजना समजतों."

या सुमारास महाराजांनीं बडोद्याचे माजी रेसिडेंट कर्नल मीडसाहेब यांना पाठविलेल्या पत्रांत या योजनेमुळें स्वतःला झालेला आनंद दर्शवितांना त्यांनीं म्हटलें आहे कीं, 'या योजनेनें मला जितका आनंद झाला, तितका यापूर्वी कधींहि झाला नव्हता.' याच पत्रांत 'निरडणुकीचें तत्व असलेली म्युनिसिपालिटीची योजना मी नुकतीच मंजूर केली आहे. तिचें कार्य कसें काय होतें, तें पाहू,' असेंहि त्यांनीं लिहिलें आहे. या सुधारणे-बरोबरच सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची सुरुवातहि त्या सुमारास केल्याबद्दलचा उल्लेख यापूर्वीच्या प्रकरणांत आलाच आहे.

हरगोविंददास व रानडे यांनीं घेतली असता त्याची प्रगति समाधानकारक असल्याचें आढळून आलें, तसेंच जयसिंहराव व शिवाजीराव हेहि शरीरानें व अभ्यासानें सुधारत आहेत,' असे महाराजांनीं कळविलें आहे

यापुढील सन १८९६ च्या डिसेंबर महिन्यात राजपुत्र फत्तेसिंहराव याचें वय सुमारें चौदा वर्षाचें झाल्यावर, 'त्याना इंग्लिश अथवा हिंदी कॉलेजात पाठवावे याचा विचार तूर्त न करिता, त्याचे अभ्यास जोरानें चालू ठेवावे व मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास होऊन हिंदुस्थानातील कॉलेजात जाण्याची त्याना पात्रता येईल असे धोरण ठेवावें,' असें महाराजांनीं आपले दिवाण रा श्रीनिवास आयगार याना कळविलें होतें

या सर्व पत्रावरून आपल्या मुलाच्या सर्वांगीण शिक्षणाविषयीं महाराज किती काळजी घेत होते, याची कल्पना येईल

या सुमारास वापळप्रकरणातील हकीकतीमुळें दिवाण मणीभाई जसभाई हे नोकरींतून निवृत्त झाले व त्याच्या जागीं रा जयसिंहराव आम्रे याची हगामी दिवाण म्हणून नेमणूक करण्यात आली आम्रे यानी सुमारें आठ महिने दिवाणगिरी केल्यानतर, रा श्रीनिवास आयगार याची ता १५–७–१८९६ रोजीं कायमच्या जागेवर नेमणूक करण्यात आली कोणतीहि नवी नेमणूक, विशेषत वरिष्ठ अधिकाऱ्याची नवी नेमणूक करण्यात आली, म्हणजे लोकात गप्पाचा सुळसुळाट होत असतो, तसा याहि वेळीं झाला परतु ही नवी नेमणूक समाधानकारक होणार असा थोड्याच अनुभवावरून क्यास करता येण्यासारखा असल्यामुळें, या गप्पाना या वेळीं विशेषसें खाद्य मिळालें नाहीं यानतर थोड्याच दिवसाना व्हाईसरॉय लॉर्ड एल्जिन् यानीं बडोद्यास भेट दिली हें वर्ष महाराणी व्हिक्टोरिया याच्या राज्यारोहणाच्या हीरकमहोत्सवाचें असल्यानें, तन्निमित्त इतर ठिकाणाप्रमाणेच बडोद्यासहि हा उत्सव मोठ्या समारभानें साजरा करण्यात आला त्या प्रसगीं दिलेल्या खान्याच्या वेळीं लॉर्ड व

आट्यापाट्या व क्रिकेट सुद्धा महाराज पुष्कळ वेळा स्वत खेळत."

राजपुत्राच्या शिक्षणासंबधानें व त्याची इतर दृष्टींनीं उन्नति करण्याच्या दृष्टीनें महाराजानीं स्वत फार प्रयत्न व काळजी घेतल्याचें त्याच्या हुकुमावरून व त्याच्या पत्रावरून दिसून येतें. त्याच्या व्यवस्थेची जबाब दारी आरभीं मि. फ्रेंच नावाच्या शिक्षकाकडे देण्यात आली होती हे गृहस्थ सन १८९२ पासून १९०५ पावेतों शिक्षक म्हणून काम करीत होते ते स्वत कर्तव्यदक्ष, नियमित व निर्व्यसनी असत त्याच्याकडे राजपुत्राचें शिक्षण सोंपून देतेवेळीं त्याबद्दलचे नियम व योजना निश्चित करण्यात आली होती, तींत शिक्षणाचें धोरण व कार्यक्रम नमूद केलेला होता त्यात या राजपुत्राचा शिक्षणक्रम साधारणत त्याच्या वयाच्या सातव्या वर्षापासून सुरू व्हावा व तो कमींत कमी मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेपर्यंत चालू रहावा, त्याच्या जोडीला आसइष्टातील व सरदार घराण्यातील लायक मुलें निवडून पसत करावीं, अगदीं लहान वयाच्या राजपुत्रासाठीं पालकाची नेमणूक करावी, त्याच्या शिक्षणाचा क्रम साधारणत हायस्कुला प्रमाणें असावा, व इतर सर्वसाधारण विषयाची माहिती त्याना इतर वेळीं करवून द्यावी, त्या अभ्यासक्रमात देशी भाषेकडे विशेष लक्ष द्यावें, त्यात हिंदीचाहि अतर्भाव करावा व सस्कृत ही दुय्यम भाषा असावी, स्लॉइड, ड्रॉइंग वगैरे हस्तकौशल्याचे विषय त्यात असावे, घोड्यावर बसणें, नेम मारणें वगैरे कला त्याना अवश्य शिकवाव्या, व वेळोवेळीं त्यांच्या परीक्षा परस्थ तज्ज्ञाकडून घेऊन त्याबद्दलचीं निवेदनें महाराजांकडे पाठवावींत, वगैरे बावतींबद्दलचे नियम करून दिले होते. याप्रमाणें योजना करून त्याशिवाय महाराजानीं मि फ्रेंच याना राजपुत्राच्या शिक्षणाविषयीं वेळोवेळीं पाठविलेल्या पत्रातून महाराजाची त्याच्या शिक्षणाविषयींची कल्पना व आस्था दिसून येते उदाहरणार्थ, सन १८९३ च्या डिसेंबरमध्यें लिहिलेल्या पत्रात महाराज म्हणतात —

"मुलाच्या आरोग्यासबधानें व अभ्यासासबधानें तुम्ही चागली

रस्त्यावर येण्याची गर्दी करू लागले, कारण काहीं दिवसांपूर्वी खरोखरींच एक मस्त झालेला हत्ती सुटून त्यानें पुष्कळ धुमाकूळ घातला होता त्यामुळें अशा वेळीं बगीच्याच्या पुढील दरवाजाजवळील अरुंद पुलावर लोकांची व गाड्यांची विलक्षण गर्दी झाल्यामुळें पुलाच्या दोन्ही बाजूचे कठडे मोडून पडले, व त्यामुळे अनेक लोक खालच्या नाल्यात पडून त्यांपैकीं सुमारें तीस लोक मृत्यु पावले असा प्रसंग यापूर्वी बडोद्यात कधींहि घडला नव्हता, त्यामुळें लोकांत त्यानें फार दिलगिरी पसरली. व्हाईसरॉयसाहेबांनी आपल्या आगमनानिमित्त योजिलेल्या प्रसंगीं या घडलेल्या आपत्तीबद्दल स्वत ची सहानुभूति दर्शवून अपघात झालेल्या लोकांना स्वत आर्थिक मदत देण्याची इच्छा एका पत्रांत महाराजांना दर्शविली परंतु आपल्या प्रजाजनांबद्दल महाराजांच्या अंत करणात अवश्य त्या सहानुभूतीची वाण नसल्यानें, त्यांनीं व्हाईसरॉयांनीं देऊ केलेली मदत साभार नाकारून, आपण स्वत दु खितांना सहाय्य देत असल्याबद्दल त्यांना कळविलें

याच भेटीच्या वेळीं ता ३१-११-१८९६ रोजीं व्हाईसरॉय साहेबांच्या हस्तें न्यायमंदिराचा उद्‌घाटन समारंभ करविण्यात आला व त्याला 'श्री चिमणाबाई न्यायमंदिर' असे नाव देण्यात आलें.

या सुमारास महाराजांनीं आपल्या कुटुंबातील धार्मिक विधींत एक मोठी सुधारणा घडवून आणिली, तिची हकीकत येथें आता दिली पाहिजे ही सुधारणा वेदोक्त प्रकरण या त्रोटक नावानें प्रसिद्ध आहे, तथापि या नांवावर इतरत्र घडलेल्या अनिष्ट गोष्टींचीं पुटें बडोद्यातील सुधारणेवर बसलीं नसल्यानें, त्या सुधारणेची वास्तव कल्पना येण्यासाठीं तिची खरी हकीकत पाहिली पाहिजे

वेदोक्त या शब्दाचा अर्थ 'वेदांनीं सांगितल्याप्रमाणें' असा असून, त्याचा प्रचारात आलेला अर्थ वैदिक मंत्रांनीं कुटुंबातील षोडश संस्कारादि धर्मकृत्यें करणें, असा झाला आहे हिंदु समाजाचे फार प्राचीन काळ्या-

"आपल्या भोंवतीं सांप्रत अनेक प्रकारच्या जातींच्या, धर्मांच्या व स्वार्थाच्या लोकांचा भरणा असल्यामुळें, तरुण राजपुत्राच्या कोंवळ्या मनावर कशा प्रकारची छाप पडते, त्याबद्दल आपण फार सावध असलें पाहिजे."

यावरोबरच वस्तुतः राजपुत्रांना धार्मिक शिक्षण देण्याची कांहीं तरी व्यवस्था करण्यास इच्छा होती, परंतु त्या वेळीं महाराजांचें मत असें होतें कीं, धर्मासंबंधाच्या पारंपरिक व सदोष कल्पना त्यांना देण्यापेक्षां त्यांची बुद्धि प्रगल्भ झाल्यावर त्यांनीं आपण होऊन तारतम्यानें धर्मसंबंधीं विचार करून आपलीं मतें बनविणें, हें अधिक श्रेयस्कर आहे. यामुळें राजपुत्राच्या एकंदर शिक्षणक्रमांत धर्मशिक्षणाचा अंतर्भाव त्या वेळीं केला गेला नाहीं

सन १८९५ च्या जुलै महिन्यांत राजपुत्र फत्तेसिंहराव यांचा तेरावा वाढदिवस साजरा करण्यांत आला. त्या दिवशीं महाराजांनीं आपले दिवाण रा. मणीभाई यांना लिहिलेल्या एका पत्रांत स्वतःचें पूर्वस्मरण करून लिहिलें आहे कीं,

"माझें दत्तविधान होऊन मी श्रीगणेशायनमः शिकण्यास सुरुवात केली, त्या वेळीं मला तेरावेंच वर्ष होतें. त्या वयांत चि. फत्तेसिंहराव यांचा मराठी अभ्यास पुरा होऊन, ते हल्लीं इंग्रजी तिसऱ्या इयत्तेंत शिकत आहेत. इतर मुलांचेहि अभ्यास चांगले चालले आहेत. ते सर्वजण मोठे होऊन सुशिक्षित होण्यानें अर्थातच मला फार आनंद होईल. चि. फत्तेसिंहराव हे लवकरच वयांत येऊन माझ्या कामांपैकीं कांहीं भाग स्वतःच्या अंगावर घेऊन मला माझ्या निष्फळ (?) जबाबदारींतून व गुंतागुंतीच्या कार्यांतून मोकळे करतील, अशी मला फार आशा आहे."

या पुढील पत्रांत 'राजपुत्र फत्तेसिंहराव अधिक बळकट व मोठे झाले असून ते निर्भयपणें घोड्यावर बसतात व चांगला नेम मारू शकतात, त्यांच्या अभ्यासाची परीक्षा मि. लिटलडेल, धामणस्कर,

मात्र हा आक्षेप जोरानें घेण्यात येत असे अशाच कारणामुळें त्रावण-कोरच्या राजघराण्यात अजूनहि सोन्याच्या गाईच्या मुखातून स्वत बाहेर पडल्यावरच त्या घराण्यातील राजपुरुषाना द्विजत्व प्राप्त होतें असे मान ण्याची पद्धति व संस्कार अव्याहत चालू आहे.

> ' The case of the Maharajahs of Travancore who perform the peculiar but significant ceremony of being re-born through a Golden Cow in order to attain the rank of a twice-born may be cited.'[1]

याच कारणानें शिवाजी महाराजानीं सन १६७४ सालीं स्वत स राज्याभिषेक करवून घेण्याचें ठरविले, त्या वेळीं ते क्षत्रिय नसल्याने त्याना अभिषेकाचा शास्त्रोक्त अधिकार पोचत नाहीं अशी हरकत घेण्यात आली. त्या वेळीं काशीचे पडित गागाभट्ट याच्याकडून आपल स्वत चें कुळ उदेपूरच्या शिसोदिया वंशाची एक शाखा असल्यामुळें आपण अस्सल क्षत्रिय आहों व त्यामुळें आपल्याला अभिषेकाचा अधिकार अवश्य आहे, असा शिवाजी महाराजानीं निर्णय करवून घेतला तथापि हा वाद पुढेंहि थोड्या बहुत अशानें चालूच होता

अस्सल क्षत्रिय मानिल्या गेलेल्या रजपूत घराण्यातून सर्व धर्मकृत्यें वैदिक मत्रानाच होत असतात परतु इसवी सनाच्या तेराव्या शतकापासून पधराव्या शतकापर्यंत झालेल्या कमलाकरभट्ट व इतर काहीं धार्मिक ग्रथकारानीं क्षत्रिय न मानिलेल्या लोकाचीं धर्मकृत्यें करण्यासाठीं पुराणोक्त पद्धति रचिली, व दक्षिणेंतील बऱ्याच घराण्यातून ती रूढ झाली बडोद्याच्या राजघराण्यातील धर्मकृत्यें या पुराणोक्त पद्धतीनेंच होत असत

यानतर महाराजानीं अधिकार धारण केल्यावर राजवाड्यातील धर्म-कृत्यासबधीं अनेक असबद्ध व अनिष्ट गोष्टी त्याच्या पाहण्यात येऊ लागल्या याबाबतीनें रा सरदेसाई यानीं लिहून ठेविलेल्या टाचणावरून या प्रकरणाची हकीकत समजून येते त्या काळीं पुणें वगैरे बडोद्याबाहेरच्या

[1] Caste and Democracy p. 13 by K. M Panikkar

लेडी एल्जिन याच्याहि स्वागताचा योग जुळून आल्यानें, त्या उभयतांनीं या समारंभात भाग घेतला होता. त्या वेळीं महाराणी व्हिक्टोरिया यांचें आरोग्यचिंतन करिताना महाराजांनीं त्या प्रसंगानें आपणास होत असलेला आनंद व्यक्त करून म्हटलें कीं,

> "इंग्लंडच्या इतिहासात महाराणी व्हिक्टोरिया याची कारकीर्द सर्वांत अधिक दीर्घकालीन व वैभवशाली झाली असून, हिंदुस्थानाला ती विशेष लाभकारक झाल्यामुळें, मला आजचा आनंद सहस्रपट अधिक वाटत आहे."

या प्रसंगाच्या वेळीं स्वतःच्या कारकीर्दीचीं अविच्छिन्न यशाचीं साठ वर्षें जातील व त्या वेळीं आपल्या राज्यारोहणाचा हीरकमहोत्सवहि अशाच रीतीनें साजरा केला जाईल, ही कल्पना महाराजाना आली नसेल. परंतु सुदैवानें तो प्रसंग नुकताच आला असून, महाराजांच्या शब्दांनींच त्याना परत अहेर करण्याची सुसंधि प्राप्त झाली. त्या वेळीं त्याची कारकीर्द सर्वांत अधिक दीर्घकालीन व वैभवशाली झाली असून, ती हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें विशेष लाभकारक झाली आहे, असाच अभिप्राय सर्व जगाने दिला आहे. हा योगायोग विशेष स्मरणीय असा आहे.

व्हाईसरॉय याच्या या आगमनप्रसंगीं एक खेदजनक प्रसंग घडून आला, त्याचा उल्लेख येथें केला पाहिजे. व्हाईसरॉयांच्या आगमनानिमित्त बडोद्याच्या सार्वजनिक बगीच्यात ता. २८ नोव्हेंबर रोजीं एक उपाहार-समारंभ योजिण्यात आला होता व तो संपल्यानंतर तेथें दारूकाम सोडण्यात येणार होतें या कारणानें तें पाहण्यासाठीं या बगीच्यात अफाट जनसमर्द भरला होता. रात्रीं आठ वाजण्याचे सुमारास दारूकाम संपल्यानंतर जमलेले लोक परतावयास लागले. इतक्यात पावसाची थोडी रिमझिम सुरू झाली, व एवढ्यातच एक हत्ती मस्त होऊन मोकळा सुटल्याची खोटी अफवा पसरली. त्यामुळें धास्तीनें जमलेले लोक सैरावैरा पळू लागून

ओळखणारे असे होते. त्याच्याबरोबर राजारामशास्त्री टोपले या नावाचे विद्वान शास्त्री येथील वेदशाळेंत अध्यापक असत, त्यांना महाराजांनीं आपल्याजवळ गीता वगैरे ग्रंथ वाचण्यासाठीं ठेवून घेतलें होतें. हे राजारामशास्त्री थोडे अधिक बोलके, सभाधीट व आग्रही असे होते. याशिवाय बद्रीनाथशास्त्री व भिक्षाचार्य ऐनापुरे हे दोघे विद्वान शास्त्री देवघरात असत. महाराजांनीं राजारामशास्त्री टोपले याजजवळ गीता वाचण्यास आरंभ केला व त्यानंतर कांहीं धार्मिक प्रश्नांची चर्चा करण्यास सुरुवात केली. त्या वेळीं आमच्या देवघरात आपण वेदोक्त विधीनें धर्मकृत्यांची सुरुवात करता काय, असा प्रश्न महाराजांनीं त्यांना केला असता त्यांनीं उत्तर दिलें कीं, तसे करण्यास हरकत नाहीं, परंतु आपल्याला प्रथम व्रात्यस्तोम यज्ञ करावा लागेल. पुढें ते म्हणू लागले कीं आपण क्षत्रिय आहात वगैरे सर्व गोष्टी खऱ्या, परंतु या नवीन भानगडींत पडणें इष्ट नाहीं. अशा रीतीनें प्रथम वेदोक्त कर्म करण्याचें कबूल करून, नंतर त्यांत सामील होण्याची प्रत्यक्ष वेळ आली असतां आपली तयारी नाहीं असें पाहून शास्त्रीबुवांनीं आपल्या नोकरीचा राजीनामा दिला. त्यामुळें गावांत मोठी खळबळ उडाली व लोकांत सुधारक व सनातनी असे दोन उघड तट पडले. याप्रमाणें चर्चा सुरू झाल्यावर महाराजांनीं आपल्या मनाचा निर्णय ठरवून सन १८९६ च्या विजयादशमीपासून म्हणजे ता. १५ ऑक्टोबरपासून राजवाड्यातील सर्व धर्मकृत्यें वेदोक्त पद्धतीनें करावींत, असा हुकूम केला. त्याप्रमाणें त्या दिवशीं वेदोक्त सुरू झालें. त्या वेळीं शिवदत्त जोशी, रेवाशंकर शास्त्री व भोलानाथ शास्त्री या तिघांनींच पुरोहित-कार्य केलें. राजघराण्यात यापूर्वी सर्व धर्मकृत्यें दक्षिणी उपाध्यायाकडूनच होत असून ते सर्व या प्रसंगीं प्रतिकूल झाले होते. तरीहि राजघराण्यातील वायामंडळीकडेस दक्षिणी लोकच धर्मकृत्यें करीत व त्यामुळें त्या सर्व वाया वेदोक्ताच्या विरुद्ध असत.

अशा रीतीनें वेदोक्ताची सुरुवात झाल्यानंतर हळूहळू सर्व कृत्यें

पासून चार वर्ण मानिले आहेत व त्यांतील ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांना द्विज समजले जाऊन, त्यांना वैदिक मत्रांनीं धर्मकृत्यें करण्याचा अधिकार आहे असा समज गेल्या अनेक शतकांपासून रूढ झाला वस्तुत आर्य लोक हिंदुस्थानात आल्यावर कार्यपरत्वें त्यांच्यात ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असे भेद पडले, तथापि ते सर्व आर्यच असल्यामुळें, त्या सर्वांना मौंजीबंधनादि संस्कारानें द्विज होण्याचा अधिकार मिळत असे परंतु त्या काळीं आर्यांनीं जिंकिलेल्या अनार्य लोकांचा समावेश जरी आर्यधर्मात करून घेण्यात आला व त्यांना चतुर्थ वर्णाचें स्थान देण्यात आलें, तथापि आर्यलोकांनीं आपल्यातील व त्यांच्यातील फरक स्पष्टपणें दर्शविण्यासाठीं म्हणून वैदिक मत्राचा अधिकार या चौथ्या शूद्र वर्णाला दिला नाहीं पुढें इसवी सनानंतरच्या कांहीं शतकात हूण, म्लेंच्छ, शक, गुर्जर वगैरे परस्थ लोकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून तेथील प्रदेश हस्तगत केला, तथापि ते आर्य संस्कृतीच्या आहारीं गेले त्यांना स्वतःची अशी विशिष्ट संस्कृति नसल्यामुळें, ही क्रिया सुलभतेनें होऊ शकली त्या वेळीं या परस्थ अनार्य राजाच्या आर्य होण्याच्या क्रियेस अग्निकुलाची उपपत्ति जोडण्यात आली फार प्राचीन काळीं सीता, द्रौपदी वगैरे साध्वी ज्याप्रमाणें अग्निदिव्य करून आपली शुद्धि करून घेत, त्याप्रमाणें हीं अनार्य राजकुळें काल्पनिक अग्निदिव्यानें आर्य क्षत्रिय बनलीं, अशा कल्पनेची ही अग्निकुलाची उपपत्ति होती तथापि ही उपपत्ति सर्वांनाच पसंत पडली नाहीं त्यामुळें अशा राजकुळांच्या क्षत्रियत्वाबद्दल शंका घेण्यात येऊन 'कलौ आद्यतयो स्थिति' म्हणजे कलियुगात फक्त आद्य अथवा ब्राह्मणवर्ण आणि अत्य अथवा शूद्रवर्ण हे दोनच वर्ण शिल्लक राहतील, असें मौर्य कुळाच्या वेळचें एक शास्त्रवचन पुढें करण्यात आलें त्यातहि ज्या राजकुळांची परंपरा प्राचीन काळापासून अविच्छिन्न चालत आल्याचें समजण्यासारखें होतें, त्यांच्याबद्दल हा आक्षेप फारसा घेण्यात आला नाहीं परंतु गरीबीतून स्वपराक्रमानें उदयास येऊन राज्य कमावणाऱ्या पुरुषाबद्दल

घरण्यात येऊन त्याना शास्त्रोक्त रीतीनें राज्याभिषेक केला ' हा होय अर्थात् हा निर्णय एकदा त्या वेळीं लागल्यावर त्या शिवाजी महाराजाच्या कुळास व त्याच्याशीं शरीरसबध झालेल्या कुळाना वेदोक्ताचा अधिकार ओघानेच प्राप्त झाला असे असता केसरीनें पुढें जें म्हटलें कीं, 'भोसल्याच्या कुळापेक्षा ज्याचें कुळ कर्तबगारीने, ज्ञातीने व मानाने कमी आहे, अशानीं आता तक्रार करावी अथवा उचल खावी हें शिष्टपरपरेस अथवा ज्ञाति सप्रदायपद्धतीस अगर न्यायास अनुसरून आहे, असे आम्हास वाटत नाहीं' तेंच तर्काच्या विरुद्ध होतें शिवाजी महाराजासच क्षत्रियत्वाचे अधिकार दिले ते चुकीचे होते, असें केसरीचे म्हणणें असतें, तर मग अथातच त्याच्या वशजाना व नातलगाना ते मिळू शकत नाहींत हें म्हणणें सरळ होतें, परतु शिवाजी महाराजाचें क्षत्रियत्व मान्य केल्यावर कोल्हापूर व बडोदें या सस्थानाच्या अधिपतींनीं वेदोक्ताचा अधिकार घेतला त्या वेळेस त्याच्या कृत्याला खूळ म्हणणें हें तर्कविरोधी होतें वस्तुत केसरीनें म्हटल्या-प्रमाणे 'माझी मुज लागताना अमुक मत्र म्हटला नाहीं तर माझा व माझ्या देशाचा सर्वस्वीं घात झाला अशी समजूत कोणाचीच नव्हती' हा प्रश्न मुख्यत समानत्वाच्या हक्काबद्दलचा व न्यूनगड (Inferiority Complex) काढून टाकण्याबद्दलचा होता एरव्हीं त्याला काहींच महत्त्व नव्हते पूर्वीपासून वेदोक्ताचे अधिकार असलेले सर्व लोक वेदोक्तकर्में आचरतात असें नव्हे, तसेंच हा अधिकार नवीन मिळालेले लोकहि तीं कर्में आचरितात असेंहि नव्हे तथापि या वादानें त्या वेळीं कशी खळबळ उडाली होती, हें मात्र दिसून येतें आजमितीस हा वाद शिळा झाला आहे पडित मदनमोहन मालवीयासारख्या पुराणमतवादी ब्राह्मणानें गगेच्या तीरावर शेंकडों अस्पृश्याना गायत्रीमत्रोपदेश केल्यावर या जुन्या वादाला किंमत काय राहणार? त्या वेळची समाजस्थिति समजण्यास मात्र त्याचें परिशीलन उपयोगी पडणार आहे

हा वाद बडोद्यास चालू होता, त्या वेळीं कित्येक लोकानीं महाराजाचा

ठिकाणीं निरनिराळे गृहस्थ सामाजिक सुधारणेचे प्रयत्न करूं लागले होते. पुण्यास जोतीबा फुले, गंगाराम भाऊ म्हसके वगैरे मंडळींचा उद्योग पैलावत चालला होता. सन १८८५ सालीं महाराजानीं धामणस्कर या नावाच्या गृहस्थाना इंग्रजी नोकरींतून बडोद्यास नायब सुभे म्हणून घेतलें. त्याच्या प्रोत्साहनानें बडोद्यातील विचारास नवीन चालना मिळाली. त्यानंतर रामजी संतूजी आवटे नावाच्या गृहस्थानीं 'बडोदा वत्सल' या नावाचें वर्तमानपत्र बडोद्यात काढून, याच प्रश्नाची चर्चा चालविली. त्याच्या खटपटीनें बडोद्यात मराठा जातीचे पुजारी तयार करण्यासाठीं एक वर्गहि काढण्यात आला होता. महाराजाच्या पहिल्या युरोपच्या सफरींतून ते परत आल्यावर त्यानीं मोठा खर्च करून प्रायश्चित्त घेतलें होतें. अशा वेळीं स्वाभाविक रीतीनें महाराजाचें लक्ष या प्रश्नाकडे वळलें. यापूर्वीपासून जोधपूरच्या शिवदत्त जोशी या नावाच्या एका गृहस्थास बडोद्यातून श्रावणमासदक्षिणा मिळत असल्यामुळें, ते नेहमीं बडोद्यात येत असत. त्या वेळीं बडोद्याच्या देवघरातील धर्मकृत्यें पुराणोक्त रीतीनें चाललेलीं पाहून त्याना आश्चर्य वाटलें. रजपूत राजाच्या घरीं धर्मकृत्यें वेदोक्त पद्धतीनें चालत असून, येथें तीं तशीं का चालत नाहींत याबद्दल तपास करून वेदोक्त पद्धतीनें तीं कृत्यें करण्याचा रिवाज महाराजानीं सुरू करावा, अशाविषयीं हे शिवदत्त जोशी पुष्कळ वर्षांपासून महाराजाना लेखी अर्ज देऊन व स्वत भेटून वारंवार सांगत असत. यामुळें या प्रश्नाचा एकदा कायमचा निर्णय करून टाकण्याचें महाराजानीं ठरविलें.

त्या काळीं बडोद्यास देवघर शाखेचें महत्त्व फार असे. हिंदुस्थानातील अनेक भागातून शास्त्री, पंडित, हरिदास, पुराणिक, वैदिक, याज्ञिक वगैरे पेशाचे विद्वान गृहस्थ बडोद्यास येत असून, त्याच्या योग्यतेनुरूप त्याची संभावना करण्याचें काम या देवघर शाखेकडे असे. या शाखेच्या मुख्य जागीं त्या वेळीं राजारामबुवा गोसावी या नावाचे गृहस्थ होते. हे गृहस्थ विशेष विद्वान नसले, तरी चतुरस्र असून व्यवहार व महाराजाचें धोरण

मुळे, तेथे व्याधीपेक्षा औषध अधिक भयंकर अशी स्थिति झाली. तेथें सामाजिक स्थैर्य आणण्यासाठीं योजलेले उपाय इतके क्षोभकारक होते कीं, त्या योगानें जातिद्वेष, जुलूम व छळणूक याची मात्र वाढ झाली. परंतु महाराजानीं अशा अविचाराच्या आधीन न होता आपल्या कार्याचें धोरण शांतपणाचें व विवेकाचें ठेविल्यामुळें, बडोद्यास ही सुधारणा थोड्या वेळात सर्वमान्य झाली, इतकेंच नव्हे, तर ती सुधारणा होती या गोष्टीची जाणीवहि लोकांत उरली नाहीं, इतकी ती काहीं काळानें स्वाभाविक वाटली.

असो याप्रमाणें हें वेदोक्त प्रकरण चालू असता, महाराजाचा नित्यक्रम पूर्ववत् चालला होता राज्यकारभाराच्या व्यग्रतेंतहि त्याचें वाचन व अध्ययन निरंतर चालू असे सन १८९६ च्या मार्चमध्यें त्यानीं मि. वीडन् याना पाठविलेल्या पत्रात लिहिलें होतें कीं,

"येथें मी रोमच्या इतिहासावरील पुष्कळ पुस्तकें वाचलीं व त्या-योगानें मला त्या देशाच्या इतिहासाची बरीचशी कल्पना आली आहे. ब्राईस्चें 'रोमन साम्राज्य' हें पुस्तक व इतर पुस्तकेंहि मी वाचलीं. आता ग्रीसच्या इतिहासावरील पुस्तकें वाचून त्यासंबधाचें ज्ञान मिळवावें अशी माझी फार इच्छा आहे. इतका मनोवेधक अभ्यास दुसरा कोणताहि मला आढळला नाहीं दरेक सुशिक्षित मनुष्याला या देशाच्या इतिहासाची माहिती असली पाहिजे व म्हणून या पुस्तकाचीं मराठी भाषांतरें करविण्याची व्यवस्था मी करीत आहें."

आणखी एका पत्रात ते लिहितात –

"गिबनप्रमाणेंच ग्रोटच्या पुस्तकाचीं वाचणें करण्याचा माझा विचार आहे, पण तूर्त मी दुसऱ्या एका पुस्तकाच्या वाचनात गुंतलों आहे. अशा वाचनानें मनुष्याच्या मनाला एक प्रकारची ऐतिहासिक दृष्टि येते."

इतिहासाप्रमाणेंच नीतिशास्त्र हा महाराजाचा आवडता विषय आहे व

वेदोक्त पद्धतीनें होऊ लागलीं. पहिल्या वर्षं दीड वर्षांत सण, उत्सव, श्राद्धपक्ष इत्यादि प्रसंगीं वेदोक्त विधींची चर्चा होऊन, हळू हळू जम बसत चालला. पुढें पूजेअर्चेचे खर्चाचे, साहित्याचे, दानधर्माचे वगैरे कित्येक प्रकार बदलून त्यात नवीन पद्धतीनें योग्य ते फेरफार करण्यात आले. सन १८९८ सालच्या मार्च महिन्यात युवराज फत्तेसिंहराव व राजपुत्र जयसिंहराव व शिवाजीराव याच्या मुंजी उमरठ येथें वेदोक्त पद्धतीनें करण्यात आल्या त्या प्रसंगीं बदरीनाथ शास्त्री या विद्वान् गृहस्थास उमरठ येथें मुद्दाम बोलावण्यात येऊन त्याच्या देखरेखीखाली हे उपनयनसमारंभ यथासांग पार पाडण्यात आले. या प्रसंगीं देवास मुनींची अक्षत देण्यास त्या गावीं मंदिर नव्हतें, म्हणून महाराजानीं त्यासाठीं दहा हजार रुपयाची मंजुरी देऊन तेथें मारुतीचें देवालय बांधविलें.

अशा रीतीनें महाराजानी आपल्या देवघरात वेदोक्त पद्धति सुरू केली. तिच्याविरुद्ध पुष्कळ प्रतिकूल टीका करण्यात आली. उदाहरणार्थ केसरी वर्तमानपत्राच्या तारीख २२ ऑक्टोबर १९०१ च्या अंकात वेदोक्ताच्या खुलाशाबद्दल एक अग्रलेख लिहिण्यात आला, त्यात आरंभीं 'आम्हीं जें आज यासबधानें विवेचन करणार आहों, तें कोणाहि व्यक्तीस अनुलक्षून नसून या प्रश्नाची आजपर्यंतची हकीगत कशी आहे, त्याची व्यवस्था कोणत्या प्रकारें झालेली आहे व पुढें ती कोणत्या तत्त्वावर झाली पाहिजे इत्यादि सामान्य तत्त्वाचाच विचार करणार आहों,' असें हेतुदिग्दर्शन केलें होतें पुढें 'ज्ञातिधर्माप्रमाणें पाहता ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यास जे गृह्य संस्कार सांगितले आहेत ते वेदोक्त मंत्रानीं करावे, अशीं स्मृतींतून वचनें आहेत,' असें मान्य करून 'शिवाजी महाराजाच्या कारकीर्दीत या प्रश्नाचा एकदा निकाल झालेला आहे,' असेंहि मान्य केलें आहे. तो निकाल म्हणजे 'त्या वेळच्या महाराष्ट्रांतील प्रसिद्ध ब्राह्मण, शेणवी, प्रभु, मराठे वगैरे जातींच्या मुख्याच्या व शूर पुरुषाच्या संमतीनें, किंबहुना सर्व महाराष्ट्राच्या अनुकूलतेनें व इच्छेनें शिवाजी महाराजाची सत्तेचाळीसाव्या वर्षी मुंज

काहींशी सुधारली, तरी आपल्या आवडल्या व एकुलत्या कन्येच्या मृत्यूनें त्याच्या मनास फार जबर धक्का बसला. त्या बडोद्याहून चार कोस असलेल्या केळणपूर गावीं जाऊन राहिल्या, पण तेथेंहि त्याना चैन पडेना. म्हणून त्या तेथून ता. २५ मे १८९८ रोजीं निघून बाईजवळील मेणवली गावीं नाना फडणवीसाच्या वाड्यात जाऊन राहिल्या. तेथे त्याच्या दातृत्वामुळें बाईकरातर्फे त्याना मानपत्र देण्यात आले परतु तेथेहि त्याची प्रकृति सुधारली नाहीं. म्हणून महाराजानीं त्याना तेथें पाठविलेल्या पत्रात त्याच्या प्रकृतीबद्दल आपणास वाटत असलेली काळजी दर्शविली आहे. ता. १६ जूनच्या पत्रात ते लिहितात —

" आपणास बारीक तापाची कसर येते व आपली तब्यत बरी नाहीं, तरी आपण चागले औषधोपचार चालू ठेवावेत "

या सूचनेप्रमाणें उपचार चालू होतेच. तरीहि त्याच्या प्रकृतींत सुधारणा न झाल्यामुळें त्या ऑक्टोबर महिन्यात बडोद्यास परत आल्या. पुढें दिवाळीच्या सुमारास त्याच्या प्रकृतीचे मान फारच बिघडत चाललें, व अखेर ता. २९ नोव्हेंबर १८९८ या दिवशीं सायकाळीं महाराजाच्या अकावर मस्तक ठेऊन त्यानीं आपला देह ठेविला.

श्री. ताराबाबाचा अत झाल्यावर महाराजानीं चार पाच महिन्यानीं इजिप्त देशात एक ल्हानशी सफर केली. ते नाईल नदीच्या मार्गे कायरो शहरीं गेले. त्यानीं तेथील जगद्विख्यात मनोरे पाहून नतर थीब्सिपर्यंत प्रवास केला. त्याचप्रमाणें सर्व जगात आकारानें व विस्तारानें पहिल्या नबरचें असलेलें आसुआन धरण त्या काळीं बाधलें जात होतें, त्याचें कामहि त्यानीं पाहिलें. ही सफर ल्हानशी होती, तरी 'तिनें माझ्या प्रकृतीला फायदा झाला' असें महाराजानीं त्यानतरच्या एका पत्रात लिहिलें आहे. यापुढील वर्ष दीडवर्षपर्यंत महाराजानीं विशेष लाबचा असा प्रवास केला नाहीं. सन १८९९ च्या एप्रिल महिन्यात बडोद्यास सयाजीविहार क्लब उघडला गेला, त्याच्या इमारतीचा अर्धा खर्च बडोदें सरकारनें दिला होता;

उघड उपमर्द व आज्ञाभंग केला असताहि त्यांनीं आपल्या अधिकाराचा उपयोग करून कोणास शासन केलें नाहीं. या नवीन सुधारणेस होत असलेला विरोध केवळ अज्ञानमूलक असून तो अधिकाराच्या जोरानें नाहींसा होणार नाहीं हें जाणून, त्यांनीं या विरोधाबद्दल कोणासहि उपसर्ग दिला नाहीं यासंबंधानें आपले स्वतःचे विचार त्यांनीं आपले एक इंग्रज मित्र मि वीडन् यांना या सुमारास लिहिलेल्या एका पत्रांत कळविले आहेत त्यावरून त्याबद्दलची कल्पना चांगली होऊं शकते. ते लिहितात –

"तूर्त मी कोणत्या कामांत गुतलों आहे, याची कल्पना तुम्हाला क्वचितच येऊं शकेल सांप्रत धार्मिक अपकृत्याची सुधारणा मी करणार आहें, हें तुम्हास कसें काय वाटतें? या कामीं माझी दृष्टि धार्मिक नसून सामाजिक आहे अलीकडे कांहीं दिवस मी वेदोक्त व पुराणोक्त या दोन धर्मविधींच्या प्रकारासंबधानें माहिती गोळा करीत आहे त्यापैकीं सामाजिक दृष्ट्या वेदोक्तपद्धति ही श्रेष्ठ मानिली जाते व्यक्तिश या दोनहि पद्धतींत मला स्वतःला कमीअधिकपणा कांहींच वाटत नाहीं परंतु लोक मात्र पहिलीला अधिक महत्त्व देतात अशा रीतीनें लोक केवळ विधी व कर्में यातच बुडून जाऊन, धर्माचीं खरीं तत्त्वें विसरून गेले आहेत, ही फार खेदाची गोष्ट आहे यामुळें आळसानें व अज्ञानानें ते गतानुगतिक झाले आहेत व म्हणून मी ही सुधारणा हातीं घेतली आहे जर विधींना लोक महत्त्व देतात, तर ते विधी योग्य व धर्मतत्त्वाला धरून तरी असावेत, हें स्पष्ट आहे"

या प्रकरणीं विशेष उल्लेख करण्यासारखी गोष्ट ही कीं, वेदोक्तपद्धतीची सुरुवात करण्यांत महाराजांचा हेतु समाजातील उचनीचत्वाची जाणीव काढून टाकून त्यायोगें समाजात धार्मिक दृष्टीनें स्थैर्य आणणें हा असल्यानें, त्यासाठीं योजावयाचे उपाय हेहि सामोपचाराचेच असले पाहिजेत हें ओळखून, त्यांनीं आपलें धोरण तशाच प्रकारचें ठेविलें परंतु बडोदें राज्याबाहेर इतर कांहीं ठिकाणीं हा विवेक न ठेविला गेल्या

माहिती देणारा एक विस्तृत लेख त्या मासिकाच्या फेब्रुआरीच्या अंकात "My ways and days in Europe and India" या मथळ्याखालीं दिला, तो विशेष बोधकारक असल्यानें त्यातील कांहीं भाग येथें दिला आहे. त्यात महाराज म्हणतात –

"साधारणत मी दररोज सकाळीं सात वाजता उठतो, नतर स्नान करून दररोज ब्राह्मणाना कांहीं दान देतो. ते ब्राह्मण त्या वेळीं माझ्या देखत मत्रपूर्वक प्रार्थना करितात व तींत पापक्षालनाची याचना करून आमच्या कुटुबाचें व राज्याचे अभीष्टचिंतन करतात. हे ब्राह्मण आमचे कुलोपाध्याय अथवा त्याचे प्रतिनिधी असतात. अलीकडे हें दान ब्राह्मणाप्रमाणेंच इतर जातींनाहि मी देतो या खाजगी प्रार्थने-शिवाय राजवाड्यातील देवघरात देवाची पूजा अर्चा वगैरे नित्यकर्में व वाढदिवस, श्राद्धपक्ष वगैरे नैमित्तिक कृत्येंहि व्यवस्थित रीतीनें करण्यात येतात."

"प्रार्थनेनतर मी दूध व रोटीचा अल्पाहार करून व्यायामासाठीं घोड्यावर बसून फिरावयास जातों. तेथून परत आल्यावर मी कांहीं वेळपर्यंत वाचन करितो. त्यात तत्वज्ञान बहुश असतेंच. आपल्या इकडील तत्वज्ञानाच्या पद्धतींची मी ग्रीसमधील पद्धतींशीं तुलना करितो; याचप्रमाणें इग्लिश, हिंदी, ग्रीक व रोमन इतिहासाचें वाचनहि मी करीत असतों. या विषयावरील गिबन, ब्राइस्, टोकेव्हिल्, फॉसेट् वगैरे ग्रथकार माझ्या विशेष आवडीचे आहेत. स्पेन्सरच्या शिक्षण-विषयक निबधातील विचारसरणी मला पसत पडते. शेक्सपिअरचीं नाटकें व बेन्थॅमचें राजनीतीवरील पुस्तक आणि मेनचें 'प्राचीनकाळचे कायदे' हें पुस्तक, या सर्वांचा मी अभ्यास करितों."

"माझें दुपारचें जेवण साधारणत अकरा वाजता होतें. त्या वेळीं जेवणास मजबरोबर मुलें व माझ्या दिमतीस असलेले कांहीं गृहस्थहि असतात. आमच्या जेवणात मादक पदार्थाचा स्पर्शहि नसतो. सुमारें

त्यावरील पुस्तकांचें त्यांचें वाचनहि नेहमीं चालू असतें या शास्त्रावरील कांहीं चांगल्या पुस्तकांचीं देशी भाषांतून रूपांतरें करविण्याविषयीं त्यांनी या काळ्यात हुकूम केले. 'डेही आणि टॅफ्टस् यांनीं केलेल्या नीतिशास्त्रा वरील ग्रंथाचें आपलें वाचन चालू असून, त्याचीं प्रश्नोत्तर रूपानें टाचणें करवीत असल्याबद्दलहि' त्यांनीं एका पत्रात लिहिलें आहे

परंतु महाराजाच्या या शांततेंत व सौख्यात भंग होण्याचा प्रसंग या सुमारास आला. महाराजाच्या भगिनी श्री. ताराबाना याची प्रकृति या वेळीं बरीच नादुरस्त झाली होती, त्याचप्रमाणें महाराजाच्या मातु श्री महाराणी जमनाबाईसाहेब याचीहि प्रकृति अस्वस्थ होती महाराजानीं ता ६ जून १८९७ रोजीं राजकन्या ताराबाना याना पाठविलेल्या मराठी पत्रात लिहिलें आहे कीं,

"अलीकडे आपली तब्यत बरी नाहीं, हें ऐकून मनास फारच वाईट वाटत आहे. तब्यत नीट राहण्याबद्दल आपण फार खबरदारी व काळजी घेतली पाहिजे डॉक्टरसाहेबाच्या सल्ल्यानें आपण चांगल्या हितकर व कोरड्या हवेंत जाण्याचें करावें, हें मला प्रशस्त वाटतें. ती मासाहेबाची स्वारी कर्नाळी येथें हवा पालटण्यासाठीं गेली आहे. कारण आज बरेच दिवस झाले, त्याच्या जीवास बरें नाहीं. औषधो-पचार जारीनें चालू आहे. ईश्वर करो व त्याना लवकरच आराम होवो व आपलीहि प्रकृति लवकरच सुधरो, अशी माझी पूर्ण इच्छा आहे."

परंतु ही इच्छा पूर्ण होण्याचा योगायोग नव्हता. श्री. ताराबाईचा अंत या वरील पत्रानंतर नऊ दिवसानींच म्हणजे ता १५ जून रोजीं सावंतवाडी येथें झाला ही दु खकारक वार्ता महाराजानीं मि ईलियट याना पत्रानें कळविताना, त्याच पत्रात जमनाबाईसाहेब याची प्रकृति गंभीर असून त्यांना कर्नाळीहून बडोद्यास मोतीबागेंत आणविल्याबद्दल लिहिलें होतें. पुढें त्याना चांगला उपचार झाल्यामुळें त्याची प्रकृति

असें मला वाटतें. तथापि आपल्या देशाबद्दलचें व लोकांबद्दलचें प्रेम आपल्या अंत:करणांत दृढ असावें, अशी मात्र माझी उत्कट इच्छा असते युरोपमधील मी पाहिलेल्या पुष्कळशा चांगल्या गोष्टी आपल्या देशांत अनुकरण्यासारख्या आहेत. उदाहरणार्थ, देशांतील सर्व लोकांत सक्तीच्या व मोफत शिक्षणाचा प्रसार, त्याचप्रमाणें स्थानिक स्वराज्य संस्थांची वाढ हिंदुस्थानांत होणेंहि फार अवश्य आहे, असें मला वाटतें या संस्थांतील बहुतेक मुख्य तत्वें हिंदुस्थानच्या प्राचीन काळांतील ग्रामसंस्थांत समाविष्ट झालेलीं होतीं "

" हिंदुस्थानांत सर्वसाधारण लोकांपेक्षा आपलें डोकें वर काढणें हें त्रासदायक असतें. सुखानें राहण्याची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें इतरांहून वरचढ होण्याचा प्रयत्न करूं नये, अशी येथील परिस्थिति आहे "

" विचाराची मौलिकता अथवा बुद्धीची श्रेष्ठता याजकडे लोक सशयी दृष्टीनें पहातात मोठा मुत्सद्दी अथवा सेनापति होण्यास तर इकडे अवसरच नाहीं लोकांत गाढ अज्ञान व दारिद्र्य पसरलेलें असल्यामुळें, त्यांच्यांत सारासारविवेक साधारणत कमी आहे इकडे सर्व गोष्टींवर श्रेष्ठतेचा शिक्का पाश्चात्य नमुन्याच्या पद्धतीनें मारला जातो, व त्या कसोटीवरच इकडील सुधारणाचे सर्व प्रयत्न पारखिले जातात त्यामुळें इकडे स्वतत्र विचाराची वाढ होणें फार कठिण होतें "

" मजप्रमाणेंच महाराणींनाहि पूर्ण स्वतत्रता असते त्या लवकर उठून थोडा अभ्यास करितात, नतर कांहीं काळपर्यंत देशी व इग्रजी वर्तमानपत्रें वाचतात दुपारचें जेवण साधारणत त्या एकट्याच अथवा मुलांबरोबरच करितात सायकाळीं राजवाड्याच्या आवारांत त्या तास दोन तास फिरण्याचा व्यायाम घेतात "

" आमच्या येथें पडद्याची पद्धति बऱ्याच काळापासून रूढ आहे. ती हितकारक नसल्याचें आमचें मत आहे, तरी लोकमतास मान

त्याच्या उद्घाटन प्रसंगीं महाराजांनीं केलेल्या भाषणात 'अशा सामाजिक संस्थाचा मुख्य उपयोग समाजात प्रेमळ विचारविनिमय व परस्पर स्नेहसंबंध उत्पन्न व्हावा हा असून, येथील सभासद या क्लबात येताना आपले त्रस्त मनोविकार बाहेर ठेवून व येथून बाहेर जाताना आतील प्रेमळ मनोविकार घेऊन जातील' अशी आशा व्यक्त केली.

यानतर जून महिन्यात महाराजानीं जयपूर, पतिआळा वगैरे ठिकाणीं जाऊन नतर सिमल्यास लॉर्ड कर्झन याची भेट घेतली, व परत येताना ते लाहोर, अमृतसर, आग्रा, रतलाम, या शहरीं जाऊन आले. पुढें हिंदुस्थानात सर्वत्र भयंकर दुष्काळ पडल्यामुळें ते त्या कामातच गुतले होते, व त्या सुमारासच सौ. महाराणीसाहेबाची प्रकृति बिघडल्यामुळें त्याच्यावर शस्त्रक्रिया करविण्यासाठीं त्यानीं विलायतची सहावी सफर केली. ती संपून ते १९०१ च्या जानेवारींत हिंदुस्थानात परत आले. त्यानतरच्या जुलै महिन्यात ते नैनिताल येथें जाऊन, परत येताना अलीगड व देवास येथें जाऊन आले. या दोन्ही ठिकाणीं त्याना मानपत्रें देण्यात आलीं. त्यापैकीं अलीगड येथील ॲंग्लो इंडियन ओरिएंटल कॉलेजनें दिलेल्या मानपत्रास उत्तर देताना महाराजानीं,

> " साप्रत कालीं कोणत्याहि समाजानें एकटे राहण्याचे दिवस उरले नसून, सर्व समाज हे एकाच इमारतीचे भाग असल्याप्रमाणें मानिले पाहिजेत व या सर्व समाजानीं मिळून लोकशिक्षणाच्या कामीं सहकार्य करण्यानेंच आपली मुक्ति होणार आहे, "

असा तेथील विद्यार्थ्यांना उपदेश केला.

सन १९०१ च्या एप्रिल महिन्यात महाराजानीं युवराज फत्तेसिंहराव याना अभ्यासासाठीं विलायतेस पाठविलें. तेथें त्याची प्रवेशपरीक्षा होऊन त्याचें नाव ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत दाखल करण्यात आलें. या सुमारास विलायतेंतील ' Nineteenth Century " मासिकाच्या संपादकानीं मागितल्यावरून महाराजानीं आपल्या नित्यक्रमाविषयीं व राजकीय धोरणाविषयीं

विनास राजवाड्यात करण्याचें ठरविलें. त्या प्रसंगाची हकीकत रा. सरदेसाई यानीं सयाजी गौरव ग्रंथातील आपल्या आठवणींत दिली आहे, ती वाचनीय आहे.

या व्याख्यानाना शहरातील सर्व सुबुद्ध गृहस्थाना आमंत्रणें केलीं होतीं. हीं व्याख्यानें रात्रीं ९ पासून १०–३० पर्यंतो चालत. या प्रसंगीं आरसेमहाल व सभोवतालचीं दालने गच्च भरून जात असत. फळा वगैरेच्या सहाय्यानें स्वामींनीं सनातनी धर्माची अत्यंत मोठी महती विशद करून सांगितली. एक दोन व्याख्यानातच महाराजास कळून चुकलें कीं, स्वामींची विद्वत्ता व वाचन हीं वेताचीं आहेत व केवळ वक्तृत्वाच्या ओघावर ठरीव पद्धतींच्या व्याख्यानानीं ते श्रोत्यास तल्लीन करितात त्याचें विवेचन एकदेशीय असून समाजास भुरळ पाडणारें आहे. पाच दिवस महाराजानीं स्वामींस मनमुराद बोलू दिलें; तें अशा हेतूनें कीं, मागाहून त्यास आपले काहीं बोलावयाचे राहून गेलें, अशी सबब राहू नये. शेवटच्या दिवशीं स्वामींनीं उपसंहार करून दहाचे सुमारास आपलें भाषण संपविलें तेव्हा यावर महाराज स्वतः बोलतील, अशी कोणाची अपेक्षा नव्हती. महाराजानीं श्रोत्यास सूचना केली कीं, कोणास काहीं बोलणें असल्यास बोलावें. परंतु दुसरे कोणी बोलेनात, तेव्हा बसल्या जागेवरून तेच बोलू लागले त्यांनी स्वामींच्या प्रत्येक मुद्यास उत्तर देऊन तो त्यांनीं सप्रमाण विचारपद्धतीनें खोडून काढला. आपला सनातनी धर्म मूलतः थोर आहे, पण त्यास अनेक कारणांनीं वैगुण्य आलें आहे. तें आपण पाश्चात्य ज्ञानानें नाहींसें करून पुन्हा आपल्या धर्माचें उच्च पद स्थापन केलें पाहिजे, अशा आशयाचें त्यांनीं प्रतिपादन केलें. तें इतकें सुंदर व विचारशक्तीस पटणारें झालें कीं, रात्रीं बारा वाजून गेले याचें भान सुद्धा कोणास राहिलें नाहीं ! महाराजाचें हें भाषण इंग्रजींत झालें. अशा रीतीनें स्वामींनीं एक महिन्याच्या उद्योगानें उत्पन्न केलेला परिणाम महाराजानीं सहज खोडून काढला.

एक कलाकपर्यंत भोजन झाल्यावर, अगदीं थोडा वेळ मी विश्रांति घेतों, व त्यानंतर सरकारी कामास सुरुवात होते. काम करणें हा माझा देहस्वभाव बनून गेला आहे व अशी मेहनत माझ्या प्रजेसाठीं करण्यानें मला अतिशय आनंद होतो. यामुळें राज्यकारभाराकरिता अवश्य असलेल्याहूनहि अधिक मेहनत मी केलेली आहे. पाच वाजे-पर्यंत सरकारी काम केल्यावर थोडा वेळ मुलांबाळांच्या व महाराणींच्या-समवेत घालविल्यानंतर, सायंकाळीं मी फिरावयास जातो. त्या वेळीं वाटेंत कोणी तरी एखादा मनुष्य कशा तरी तऱ्हेनें अर्ज देतो, तो घेऊन, त्याची चौकशी करून, त्याला दाद मिळण्याची व्यवस्था मी करितो. सर्व लोकांना मजपर्यंत पोंचता यावें, यासाठीं आठवड्यांतून दोन दिवशीं कांहीं कलाक मी लोकांच्या भेटीसाठीं नेमून देतों."

"माझ्या राज्यांतील मुलखांत मी वारंवार फिरतो. त्या वेळीं नेहमींची शिस्त ढिली करून, मी शेतांत जाऊन शेतकऱ्यांना भेटून त्यांच्याशीं प्रत्यक्ष संभाषण करितों. अशा वेळीं आपला दर्जा अज्ञात ठेवण्याचा मी प्रयत्न करितों, परंतु तें साधणें कठिण जातें. मराठी व गुजराथी या दोन्ही भाषा मला येत असल्यानें सर्वांशीं विचार-विनिमय करण्यास अर्थातच मला कोणतीहि अडचण येत नाहीं."

"माझे शिक्षक व पालक यांनीं सूज्ञपणानें मजवर हिंदुधर्माचा संस्कार दृढ करून ठेविला, याबद्दल मला आनंद वाटतो तथापि माझ्या मुलांच्या शिक्षणाच्या वेळीं सांप्रतच्या सरकारच्या अवरयेत त्यांना शक्य तितकें उत्तम इंग्रजी शिक्षण मिळावें, अशी मात्र माझी इच्छा आहे. त्यांनीं ज्या धर्माचें पालन करणें अवश्य आहे असें मला वाटतें, तो राष्ट्रधर्म होय व आपल्या देशावर निरतिशय प्रेम करण्या-नेंच ते खरे हिंदु राहतील, अशी माझी खात्री आहे धार्मिक विधी व आचार यासंबधानें माझें मत असे आहे कीं, त्यांपैकीं बरेचसे संकुचित स्वरूपाचे व अर्थशून्य आहेत. म्हणून त्यांना फाटा द्यावा

असें असता महाराजानीं जें पत्र त्याना पाठविलें, त्यावरून त्याच्या कर्तव्य-बुद्धीची चागली कल्पना येऊ शकते. तें पत्र येणेंप्रमाणें —

" ती ग. भा. श्री. **पार्वतीबाईसाहेब**, मु. मुबई,

यासी,

बालके सयाजीराव महाराज याचे शि. सा. दडवत, वि. वि. आपल्याकडून पत्र आजरोजीं आलें ते पावलें, त्याचा खुलासा मी पाठीमागून आपणास लिहून पाठवीन. आपल्यास रोकड नेमणूक बाधण्याचा मुख्य हेतु हा कीं, किरकोळ खर्च वगैरे पाहण्याची व मनुष्यें देण्याची तकलीफ आपणास पडू नये. यावरून आपणास तकलीफ अथवा दु ख द्यावें, असा माझा हेतु नाहीं. आपण समजदार आहा, यास्तव जास्त लिहावें असे नाहीं. आपणास तकलीफ न व्हावी याबद्दल मी झटेन आपलीं नेहमीं पत्रें येत गेलीं असता आम्हास बरें वाटणार आहे. आपणास कर्ज वगैरे बरेंच झालें आहे, असें माझे ऐकण्यात आलें आहे. ही गोष्ट खरी असल्यास शोचनीय दिसते; कारण कर्ज करून अडचणीनें राहणें हें बरोबर नाहीं, व शिवाय आपणास कर्ज करण्याचे कारणहि दिसत नाहीं याविषयीं आपणास हरकत वाटत नसेल, तर घरगुती रीतीनें आपण आम्हास हकीकत कळवावी. आपणास त्रास कमी व्हावा, या हेतूनें हें सुचविलें आहे."

असाच आदराचा सबध श्रीमत मल्हारराव यांचे प्रथम कुटुंब श्री. म्हाळसाबाई याच्याशीं, त्याचप्रमाणें श्री. राधाबाईसाहेब, रेवूबाईसाहेब वगैरे पूर्वींच्या राजस्त्रियाशीं महाराजानीं ठेवून त्या सर्वांचा परामर्श ते मोठ्या काळजीनें घेत असत.

सन १९०३ च्या उन्हाळ्यात महाराजानीं काश्मीरास स्वारी केली. त्या वेळीं त्यानीं श्रीनगरास काहीं दिवस काढून आजूबाजूचीं अच्छाबल, वेरीनाग, भवन, गुलमर्ग वगैरे ठिकाणे त्यानीं पाहिलीं. गुलमर्गहून पाठविलेल्या एका पत्रात ते लिहितात.—

देऊन आम्ही ती हळके हळके कमी करण्याचा प्रयत्न करीत आहों. माझ्या राज्याचा कारभार चालविण्यासाठीं सर्व खात्याच्या प्रमुख अधिकाऱ्यांचे मिळून एक मंडळ असून, त्या मंडळाचे अध्यक्ष दिवाण हे असतात. या मंडळाची योजना जरी इंग्रज सरकारच्या प्रतिनिधींशीं वाटाघाट करून केलेली असते, तथापि माझ्या गैरहजिरींत किरकोळ हरकतींनाहि मोठें स्वरूप येऊन राज्यकारभारात मोठ्या अडचणी उपन्न होतात व त्यायोगें राज्याधिपतीच्या धोरणाची सांगळी तुटून जाते. हिंदुस्थान हा विरोधाभासाचा देश आहे असें म्हटलें जातें. कदाचित् हें वर्णन निरपवाद नसेल; तथापि प्रसंगविशेषीं तें खरें असल्याचा मात्र अनुभव येतो."

या लेखावरून महाराजाच्या त्या काळच्या व्यवसायावर व वृत्तीवर चांगला प्रकाश पडतो. सन १९०१ च्या सप्टेंबर महिन्यात बडोद्यास स्वामी हंसस्वरूप या नावाचे एक सन्यासी आले होते. त्याच्या ज्ञानाची खोली जरी बेताची असे, तथापि त्यांचें इंग्रजी, संस्कृत व हिंदी या तीन्ही भाषांतील अप्रतिम वक्तृत्व, गंभीर आवाज व मोहक विचारसरणी इत्यादि गुणामुळें त्याच्या व्याख्यानांनीं श्रोतृसमाज अगदीं तल्लीन होऊन जात असे. ते बडोद्यास आले, त्या वेळीं तेथील श्रोतृसमाजहि त्यांनीं वेडावून सोडला होता. त्याच्या व्याख्यानात सनातन धर्माची महती वर्णन केलेली असून, नवीन पाश्चात्य सुधारणेनें हा प्राचीन सनातनधर्म नाश होऊं पहात आहे व म्हणून नवीन सुधारणेचा आपण त्याग केला पाहिजे, अशा अर्थाचें विवेचन असे. अशीं उत्कृष्ट व्याख्यानें ऐकण्याविषयीं महाराजांना खास शिफारस करण्यात आली व महाराजांनीं ही सूचना मान्य केली. महाराजांचीं स्वतःचीं मतें प्राच्य व पाश्चात्य या उभय संस्कृतींतील उत्तम भाग घेऊन त्यांचा बेमालूम सांधा जोडण्याच्या स्वरूपाचीं असल्यामुळें, निर्भेळ प्राचीन आचाराची तरफदारी स्वामी कशी करितात, हें पाहण्याची महाराजांची इच्छा होती. म्हणून त्यांनीं स्वामींचीं व्याख्यानें लक्ष्मी-

या सुमारास दिवाण रा. श्रीनिवास आयंगार हे कार्यनिवृत्त झाले व त्यांच्या जागीं रा. धामणस्कर यांची नेमणूक करण्यांत आली. त्या पुढील सालच्या उत्तरार्धांत महाराजांनीं मद्रासेकडे प्रवास केला. त्या वेळीं त्यांना तेथील गुजराथी समाजानें, मुसलमानी संस्थेनें, महाजन सभेनें व इतर अनेक संस्थांनीं मानपत्रें दिलीं. गुजराथी समाजाच्या मानपत्रांत मद्रास येथील गुजराथी वर्ग संपन्न स्थितींत असल्याबद्दल व त्याचें श्रेय त्यांच्या बडोदें राज्यांतील जन्मस्थानीं त्यांना मिळून असलेल्या शिक्षणादि लाभाला असल्या-बद्दल नमूद केलें होतें. त्यावरून त्या मानपत्राला उत्तर देतांना महाराजांनीं म्हटलें कीं,

"राजाला आपल्या प्रजेकडून साधारणतः तक्रारी ऐकण्याचेच प्रसंग वारंवार येतात, व आपली सुस्थिति असल्याची हकीकत प्रजेनें निवेदन केलेली ऐकण्याचे प्रसंग कमी येतात. हा अनुभव पहातां, आज आपण आपली स्थिति चांगली असल्याबद्दलची हकीकत सांगितली, ती ऐकून मला फार आनंद होत आहे."

यानंतर डिसेंबर महिन्यांत अहमदाबाद येथें राष्ट्रीय सभेबरोबरच भर-विलेल्या औद्योगिक प्रदर्शनाचें उद्घाटन करण्याचा सन्मान त्यांना देण्यांत आल्यामुळें, त्या कार्यासाठीं ते अहमदाबाद येथें गेले. त्या प्रसंगीं त्यांनीं केलेल्या विस्तृत भाषणाचा सारांश यापूर्वीं देण्यांत आलाच आहे. त्यानंतर त्या महिन्याच्या अखेरीस ते दरबारासाठीं दिल्लीस जाऊन सन १९०३ च्या जानेवारींत परत आले.

या सुमारास बडोद्याचे माजी महाराज मल्हारराव यांचें द्वितीय कुटुंब श्री पार्वतीबाई यांना महाराजांनीं पाठविलेलें एक पत्र उपलब्ध आहे, त्यावरून त्यांच्या स्वभावाची कल्पना येण्यासारखी आहे. साधारणतः पदच्युत झालेल्या राजाच्या गादीवर त्याच्यानंतर आलेल्या राजानें पूर्वीच्या राजाच्या कुटुंबाकडे व विशेषतः वादास्पद संबंध असलेल्या नातलगाकडे आपले-पणाच्या भावनेनें पाहिल्याचे प्रसंग फारसे अनुभवास येत नाहींत.

नाहीं. अर्थातच ही समजूत चुकीची होती, व तशी ती असल्याबद्दल महाराजानीं स्वत च्या कृतीनें सिद्ध केलें. त्यानीं 'हे स्थल रमणीय व गभीर असून तेथील देखाव्यानें आपण मोहित होऊन गेल्याबद्दल व या स्थलीं पुन्हा सवडीप्रमाणें जाण्याची आपली इच्छा असल्याबद्दल,' याननरच्या एका पत्रात लिहिलें आहे. द्वारकेहून परत आल्यावर युवराज फत्तेसिंहराव याच्या लग्नाचा समारभ वडोदें येथें मोठ्या थाटानें उरकण्यात आला सन १९०३ च्या सुरुवातीस दिल्ली दरबारानतर महाराज परत आल्यावर मुली पाहण्याच्या सबधात पत्रव्यवहार सुरू होऊन कित्येक मुली स्वत महा राजानीं व महाराणीसाहेबानीं पाहिल्या. अखेर फलटण येथील निंबाळकर याचे घराण्यापैकींचे रामचद्रराव जगदेवराव नाईक निंबाळकर याची कन्या पसत करण्यात आली श्रीमत युवराज याना आपली भावी वधू मुद्दाम दाखविण्यात आली होती व त्याच्या पसतीनतरच हा सबध निश्चित करण्यात आला. 'मुलानें पुढें आमच्या निवडणुकींत दोष काढू नयेत, म्हणून सर्व मुली त्याना आधीं दाखविण्यात आल्या होत्या तथापि ही पद्धति नवीन असून, कित्येकाना नापसत आहे,' असें महाराजानीं आपल्या पत्रात याबद्दल लिहिलें आहे. लग्नसमारभ ता ४ फेब्रुआरी रोजीं थाटानें उरकण्यात आला व नववधूचें नाव श्रीमत सौ पद्मावतीबाईसाहेब असें ठेवण्यात आलें लग्नानतर युवराजाच्या इच्छेनुसार त्याच्या राहण्याची स्वतत्र व्यवस्था करण्यात आली व तेच धोरण पुढें इतर राजपुत्राच्या बाबतींत स्वीकारण्यात आलें.

या वर्षाच्या जुलै महिन्याच्या पहिल्या तारखेस दिवाण रा. धामणस्कर हे सेवानिवृत्त होऊन, त्याच्या जागीं मि केरशास्पजी दादाचाचजी या पारशी गृहस्थाची नेमणूक करण्यात आली. या सुमारासच महाराजाना सधिवाताचा विकार प्रथम सुरू झाला व तेव्हापासून आतापर्यंत तो कमी अधिक प्रमाणानें त्याना त्रास देत आहे या ननरच्या सप्टेंबर महिन्यात महाराज अलाहा बाद येथें गेले. त्या वेळीं आजपर्यंतच्या त्याच्या देशहिताच्या कार्याचा गौरव

"हें डोंगराचें शिखर इतर शिखरांहून थोडें निराळें झालेलें आहे व येथून गाडी दूरवर पसरलेल्या दरीचा देखावा फार सुंदर दिसतो. त्यांतील सर्पाकृती नदीचीं सुंदर वळणें, व हिरव्यागार तृणांनीं आच्छादिलेलीं रुंद मैदानें, असंख्य व उच्च हिमाच्छादित शिखरें, या सर्वांचा देखावा फारच भव्य दिसतो. येथून आकाशांत अर्धें नसन्याम हारमुख पीक, कागनाग पीक व यागिस्तानच्या सरहद्दीवरील कागनाग पर्वतांचीं शिखरें, हीं स्पष्ट दिसूं शकतात. या शिखरावरील दरीत दिसणाऱ्या निळ्या रेषा म्हणजे वूलर सरोवर होय. या टेकडीच्या उजव्या हातास असलेल्या पर्वतश्रेणी आणखी हिमाच्छादित शिखरें आकाशांत उंच करून अखंड शांतीचें साम्राज्य दर्शवितात. या टेकडीच्या तळाशीं असलेल्या शहराची मांडणी स्पष्टपणें दिसून येते."

या प्रवासांत श्रीनगरास असलेले गालिच्यांचे, लाकडी कामाचे, चांदीच्या वस्तूंचे व विशेषेंकरून शालींचे कारखाने महाराजांनीं लक्षपूर्वक पाहिले व तेथील लोकस्थितीचेंहि बारीक निरीक्षण केलें. तेथून परत येतांना ते लाहोरवरून आले. तेथें त्यांना इस्लामिया कॉलेजांतून, त्याचप्रमाणें आर्यसमाजांतून व त्या समाजामार्फत चालविलेल्या दयानंद वैदिक कॉलेजांतून, अशीं मानपत्रें देण्यांत आलीं. पहिल्या मानपत्राच्या प्रसंगीं कॉलेजचे विद्यार्थी व शिक्षकवर्ग यांच्याशिवाय अंजुमनचे इतर सभासद व शहरांतील अनेक वजनदार मुसलमान सद्गृहस्थ हजर होते. त्या सर्वांनीं या मुस्लिम संस्थेला महाराजांनीं दिलेल्या भेटीचें फार कौतुक केलें व महाराजांच्या दोन्ही धर्मांवरील समदृष्टीचा आदरपूर्वक उल्लेख केला.

सन १९०२ च्या डिसेंबर महिन्यांत महाराजांनीं आपल्या राज्यांतील पश्चिमेच्या टोंकास असलेल्या श्रीकृष्णाच्या द्वारका नगरीस प्रथमच भेट दिली. महाराजांच्या पूर्वींचा बडोद्याच्या गादीवरील कोणताहि पुरुष तेथें गेला नव्हता, कारण अशी एक लौकिक समजूत प्रसृत झाली होती कीं, द्वारकेस गेल्यावर पुढें मनुष्य फार दिवस प्रपंचांत अथवा प्रवृत्तींत रहात



कै. युवराज फत्तेसिंहराव व त्याच्या पत्नी कै. सौ. पद्मावतीबाईसाहेब

अशा आशयाचा मजकूर होता. त्याला महाराजांनीं योग्य शब्दांनीं उत्तर दिलें. याच्या दुसऱ्याच दिवशीं म्हणजे ता. १ ऑक्टोबर १९०४ रोजीं त्याच शहरातील मॅक्डोनेल हिंदु विद्यार्थी वसतिगृहात प्रसिद्ध जर्मन पंडित डॉ. थीबो यांचें व्याख्यान झालें. त्या प्रसंगीं महाराज तेथें गेले असतां, आदल्या दिवशींच्या प्रचंड स्वागताची पुनरावृत्ति तेथेंहि करण्यात आली. त्या प्रसंगीं महाराजांनीं लहानसें भाषण करून तेथे जमलेल्या सर्व विद्यार्थ्यांना आपली धार्मिक सहानुभूति विस्तृत करून तिचा परिघ परधर्मीयांपर्यंत पोचविण्याचा व आध्यात्मिक विषयाबरोबरच आपल्या देशातील आधिभौतिक शास्त्राचाहि अभ्यास करून स्वार्थत्यागपूर्वक देशकार्य करण्याचा उपदेश केला. त्यांच्या भाषणानंतर पंडित मदनमोहन मालवीय यांनीं आपल्या अप्रतिम व वक्तृत्वपूर्ण भाषेने महाराजांचे आभार मानतांना म्हटलें कीं,

"आपला हिंदुस्थान देश बुद्धिमत्ता व चारित्र्य या नैसर्गिक संपत्तीनें समृद्ध असला, तरी सांप्रत तो हीनदीन स्थितीला गेला आहे. अशा वेळीं त्यांत आजच्या पाहुण्यासारखे नागरिक असावे व ते राजपदावर विराजित असावे, ही मोठ्या अभिमानाची गोष्ट आहे."

याप्रमाणे अलाहाबादचे समारंभ उरकल्यानंतर, सुमारें दीड महिन्यानेंच महाराज कलकत्त्यास गेले. त्या वेळीं तेथील नागरिकांनींहि आपल्या विशाल नगरमंदिरात महाराजांचें अपूर्व स्वागत केलें. त्या वेळीं महाराजांनीं दिलेल्या उत्तरात स्त्रियांची उन्नति, हिंदुस्थानाच्या उद्योगधंद्याचें पुनरुज्जीवन, धंदेशिक्षण देण्याची व्यवस्था, वगैरेंबद्दल विवेचन करून म्हटलें.—

"कोणत्याहि राष्ट्राचा मोठेपणा कशात असतो? तो त्याच्या शारीरिक सामर्थ्यांत अगर पाशवी शक्तींत नसून, त्याच्या बौद्धिक संस्कृतींत व भौतिक उन्नतींत असतो. आजपर्यंत हिंदुस्थानांत शास्त्रीय शिक्षणाची फार उपेक्षा झाली आहे. यासाठीं आपण आपल्या देशातील तरुण विद्यार्थ्यांना परदेशांत पाठवून त्यांना तेथून शास्त्रीयज्ञानसंपन्न करून आणविलें पाहिजे. या दृष्टीनें माझ्या राज्यात मला जें

करण्यासाठीं त्या शहराच्या नागरिकांनीं ता. ३० रोजीं त्यांना मानपत्र देण्याचा समारंभ योजिण्यांत आला होता. त्यासाठीं तेथील विस्तीर्ण मेयो हॉलची जागा पसंत करण्यांत आली होती. समारंभाची वेळ सायंकाळीं पांच वाजताची असताहि त्यापूर्वीं पुष्कळ वेळ अगोदर हॉलची जागा चिकार भरून गेली होती. सर्व वयाचे, जातींचे, वर्णांचे, धर्मांचे, दर्जांचे व धंद्यांचे लोक या प्रसंगीं हजर होते. जे वृद्ध लोक यापूर्वीं सभासारख्या प्रसंगांना कधींहि गेलेले नव्हते, ते सुद्धां या प्रसंगीं आलेले होते. ठरलेल्या वेळेपूर्वीं या प्रसंगासाठीं मुद्दाम नेमिलेल्या स्वागत समितीचे अध्यक्ष व अलाहाबाद येथील वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध नागरिक पंडित विश्वंभरनाथ हे सभास्थानीं आले. त्यानंतर थोड्या वेळानें महाराज येतांच सर्वांनीं त्यांना उत्थापन देऊन टाळ्यांच्या प्रचंड गजरानें त्यांचें स्वागत केलें. नंतर पंडित विश्वंभरनाथ यांनीं एक लहानसें भाषण करून मानपत्र वाचून दाखविलें. त्यांत,

"भारतवर्षांतील हिंदु राजाचा आदर्श फार उच्च प्रतीचा असून, आजपर्यंत आपण जीं प्रजाहिताचीं कामें केलीं आहेत, त्यांत आपल्या सर्व राज्यभर सक्तीच्या व मोफत शिक्षणाची भर घातली, म्हणजे त्या आदर्शाप्रत आपण पोंचणें अशक्य नाहीं, असें निःसंशय म्हणतां येईल. हिंदुस्थानांत ज्ञान ही सर्वांत पवित्र व श्रेष्ठ वस्तु मानिली गेली आहे. दारिद्र्य, रोग व गुन्हे हे सर्व अज्ञानापासून संभवतात. यासाठीं त्यांचा पाया जें अज्ञान, तें नाहींसें करण्यानें सर्व सौख्यांचें साधन आपण आपल्या प्रजेला प्राप्त करून दिल्यासारखें होईल. तथापि आपल्या सुबुद्ध कृतीचा लाभ केवळ आपल्या प्रजाजनांसच मिळत आहे असें नसून, विद्वत्ता व चारित्र्य असलेल्या व आपल्या देशाची दुःस्थिति सुधारण्याचा प्रयत्न करणाऱ्या हिंदुस्थानांतील इतर लोकांनाहि तिचा लाभ मिळत आला आहे. आपल्या सत्कृतीमुळें व निस्सीम देशभक्तीमुळें आपलें नांव आम्हां सर्वांना अत्यंत प्रिय झालेलें आहे."

या सालच्या डिसेंबर महिन्यांत मुंबई येथें ता. ३० डिसेंबर रोजीं भरलेल्या १८ व्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेचें उद्घाटन महाराजांनीं केलें. त्या वेळीं त्यांनीं देशांतील सामाजिक परिस्थितीचा जो विस्तृत आढावा घेतला, त्याचा उल्लेख त्यांची अखिलभारतीय दृष्टि व्यक्त करितांना इतरत्र केलाच आहे.

याच्या पुढील वर्षीं म्हणजे सन १९०५ सालीं युवराज फत्तेसिंहराव हे दुसऱ्या खेपेस विलायतेस गेले. त्याच सालच्या जून महिन्यांत राजस्नुषा श्री. सौ. पद्मावतीबाईसाहेब प्रसूत होऊन महाराजांना पहिली नात झाली. या कन्येचें नांव इंदुमती असें ठेवण्यांत आलें. त्यानंतर एकच आठवड्यानें महाराज युरोपच्या सातव्या सफरीसाठीं निघाले. आजपर्यंतच्या सर्व सफरींत ही सफर सर्वांत अधिक लांब मुदतीची झाली; कारण सन १९०५ च्या मेपासून सन १९०६ च्या नोव्हेंबरपर्यंत म्हणजे सुमारें अठरा महिनेपर्यंत ते हिंदुस्थानच्या बाहेर होते. या सफरींतून महाराज ता. १९ नोव्हेंबर १९०६ रोजीं हिंदुस्थानांत परत आले. त्यानंतर डिसेंबर महिन्यांत कलकत्ता येथील दुसऱ्या राष्ट्रीय औद्योगिक परिषदेच्या प्रसंगीं त्यांनीं विस्तृत असें प्रास्ताविक भाषण केलें.

या वर्षीं महाराजांना संपूर्ण राज्याधिकार आपल्या हातीं घेतल्यास पंचवीस वर्षें पुरीं होत होतीं. त्यामुळें त्याबद्दलचा रौप्यमहोत्सव मोठ्या थाटानें करण्याचें बडोद्याच्या प्रजेनें ठरविलें होतें. परंतु वर उल्लेखिलेल्या औद्योगिक परिषदेसाठीं महाराज कलकत्त्यास जाणार असल्यामुळें हा समारंभ पुढें ढकलून, तो त्यांच्या वाढदिवसाच्या सुमारास करण्याचें ठर-विण्यांत आलें. त्याप्रमाणें या उत्सवास ता. ५ मार्च १९०७ रोजीं सुरुवात झाली. त्या दिवशीं प्रातःकाळीं प्रथमतः एकवीस तोफांची सलामी देण्यांत आल्यावर, सर्व धर्मीच्या प्रार्थनामंदिरांतून महाराजाच्या आयु-रारोग्यचिंतनपर प्रार्थना करण्यांत आल्या. मुख्य समारंभासाठीं वारोशाच्या मैदानावर दहा हजार लोक बसतील एवढा मोठा अर्धवर्तुळाकृति मंडप

करिता येण्यासारखें आहे, तें मी माझा देश व माझे लोक याच्याविषयींच्या कर्तव्यबुद्धीनें केलें आहे. तथापि माझ्या स्थितीचा मला अभिमान वाटत नाहीं. हिंदुस्थानातील राजाच्या आयुष्यात नित्येक वेळा असे प्रसंग येतात कीं, त्याला राजा होण्यापेक्षा एक साधा नागरिक होणेंच अधिक पसंत पडावें. तथापि खाजगी मनुष्यापेक्षा राजाला आपल्या देशाचें व लोकांचें कल्याण करण्याची संधि अधिक मिळते हें खरें आहे व म्हणून आपल्या संपत्तीचा व अधिकाराचा उपयोग आपल्या लोकांच्या कल्याणासाठीं करणें हें त्याचें कर्तव्य आहे व तें शांतपणानें व गाजावाजा न करिता मला करिता यावें हीच माझी महत्त्वाकांक्षा आहे."

याच सालीं राज्यकारभाराच्या दृष्टीनें घडलेली महत्त्वाची गोष्ट म्हणजे श्रीयुत रमेश चंद्र दत्त यांचें बडोद्याच्या नोकरींत आगमन हें होय. सन १८९५ सालापासून महाराजांनीं त्याना बडोद्यास येण्यासाठीं बोलाविलें होतें, परंतु त्या वेळीं त्यानीं ब्रिटिश नोकरींतून निवृत्त झाल्यावर येण्याचें आश्वासन दिलें होतें त्याप्रमाणें सन १९०४ सालीं पेन्शन घेतल्यावर ते बडोद्यातील मुलकी खात्यात दाखल झाले ब्रिटिश नोकरींत असताना इंग्रज सरकारची जमीनधाऱ्याची पद्धति खेडुत वर्गाला असह्य होत आहे, अशी टीका त्यानीं वारवार केली होती त्यामुळें त्या पद्धतींतील सुधारा बडोद्याच्या मुलकी खात्याची पुनर्घटना करतेवेळीं आपल्याला कशा दुरुस्त करिता येतील याचा विचार त्याच्या मनात अर्थातच जोरानें चालू होता हें त्यानीं आपल्या बधूला या सालीं लिहिलेल्या व त्याच्या चरित्रात प्रसिद्ध झालेल्या एका पत्रावरून दिसून येतें ते लिहितात —

"माझ्या जमीनधाऱ्याच्या सुधारणेच्या योजनेकडे सर्व पश्चिम हिंदुस्थानचे डोळे लागून राहिले आहेत व आजपर्यंत ब्रिटिश सरकारला जो उपदेश मी करीत आलों, तो अमलात आणण्याचें सामर्थ्य माझ्यात कितपत आहे, हें पाहण्यास लोक उत्सुक आहेत."

(७) जिल्ह्यातून चार मोठे दवाखाने उघडण्याचे ठरविण्यात आले.

(८) अस्पृश्यवर्गासह सर्व लोकांसाठीं विहिरी बांधून देण्याकरिता साडे पाच लक्ष रुपये देण्यात आले.

(९) बडोदे शहरातील अतिशय गर्दीच्या वस्तीच्या भागात हवा खाण्यासाठीं खुलें मैदान तयार करून देण्याचें ठरविण्यात आलें.

या दिवशीं दुपारीं शहरांतील सर्व गरीबाना, दुर्बळांना व वेड्याच्या दवाखान्यातील रोग्याना जेवण देण्यात आलें. सायंकाळीं लक्ष्मीविलास राजवाड्यात दरबार भरविण्यात येऊन, रात्रीं बगीखान्याच्या जागेवरून दारूकाम सोडण्यात आलें.

दुसऱ्या दिवशीं बुधवारीं सरकारी लष्कराची पाहणी व दुपारीं शेतकीच्या वस्तूंचें प्रदर्शन भरविण्यात आलें. या उत्सवाचें स्मारक म्हणून महाराजाच्या हस्तें एका 'सिल्व्हर ओक' वृक्षाचें रोपण करण्यात आलें. ता. ७ गुरुवारीं न्यायमंदिरातील भव्य सभागृहात मुलांमुलींचें संमेलन भरविण्यात आलें व सायंकाळीं अगगडातील खेळ करविण्यात आले.

शुक्रवार ता. ८ रोजीं बडोद्यातील नागरिकाना सरकारतर्फे बांधून देण्यात आलेल्या मार्केटचा अनावरण समारंभ करण्यात आला व त्याच्या दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं शहरातील सर्व प्रतिष्ठित लोकांना राजवाड्यातील बागेंत उपाहार देण्यात आला.

रविवार ता १० हा दिवस या समारंभाचा अखेरचा दिवस होता. त्या दिवशीं तिसरे प्रहरीं कॉलेजच्या व हायस्कूलच्या विद्यार्थ्यांचे खेळ कॉलेजच्या प्रशस्त आवारात करण्यात आले, व त्यानंतर सायंकाळीं या दोन्ही संस्थातील शिक्षक व विद्यार्थी अशा सुमारें पाचशें लोकांनीं महाराजाना कॉलेजातून राजवाड्यापर्यंत पोंचविण्यासाठीं एक दिवट्याची मिरवणूक काढली. ही मिरवणूक कोठीपर्यंत आल्यावर, लोकांचा उत्साह वाढून महाराजाच्या गाडीचे घोडे सोडण्यात आले, व ती गाडी विद्यार्थ्यांनीं

उभारण्यात आला होता. त्यात समारंभी ९ वाजतां महाराजांना नागरिक मंडळातर्फे बडोद्याचे नगरशेट याच्या हस्तें मानपत्र देण्यात आलें. या प्रसंगीं बडोद्याचे रेसिडेंट कर्नल मीड, याच्या पत्नी व इतर अनेक प्रतिष्ठित सद्‌गृहस्थ हजर होते. मानपत्रात महाराजांच्या पाव शतकाच्या कारकीर्दीचें सिंहावलोकन करण्यात येऊन, त्यांनीं केलेल्या प्रजाहिताच्या कार्याचा कृतज्ञतापूर्वक गौरव करण्यात आला होता. या मानपत्राला महाराजांनीं मराठींत उत्तर देताना म्हटलें कीं,

"तुमचें कल्याण हेंच माझें कर्तव्य व तोच माझा मोक्ष, असें मी समजतों. तें कर्तव्य अजून पूर्ण रीतीनें माझ्या हातून झालें नाहीं. तथापि तें पूर्ण रीतीनें व्हावें, अशाबद्दल मी अहर्निश प्रयत्न करीत राहीन व तसें तें होईल, तेव्हाच मला पूर्ण समाधान वाटेल. माझे अधिकारी व प्रजाजन यांनी आजपर्यंत माझ्या कार्यांत मला पूर्ण मदत केली आहे व तशीच ते पुढें करीत राहतील, अशी मला उमेद आहे.

याप्रमाणें महाराजांचें भाषण झाल्यावर या उत्सवानिमित्त खालील प्रमाणें सवलती दिल्याचें जाहिर करण्यात आलें.

(१) रुपये पाच लक्षावर सरकारी वसुलाची माफी देण्यात आली.
(२) देशी भाषातील शिक्षण सर्व इयत्तापर्यंत मोफत करण्यात आलें.
(३) पाटण व अमरेली या दोन ठिकाणीं दोन अत्यज विद्यार्थि-वसतिगृहें उघडण्याचें ठरविण्यात आलें.
(४) विशेष शिक्षणासाठीं पाच विद्यार्थी युरोपमध्यें पाठविण्याचें ठरलें.
(५) बडोदें शहरासाठीं स्वतंत्र मार्केट देण्याचें ठरविण्यात आलें.
(६) बडोदें शहरात एक अनाथाश्रम उघडण्याचें ठरविण्यात आलें.

त्यांच्यावर अकालीं मुत्यूचा घाला पडला. तथापि खाजगी सुखदुःखामुळें महाराजांनीं आपला नित्यक्रम केव्हांहि फारसा विचलित होऊं दिला नाहीं.

सन १९०९ च्या सुरुवातीस महाराज लॉर्ड मिंटो यांना भेटण्यासाठीं कलकत्ता येथें गेले होते. त्या वेळीं तेथे त्यांच्याशीं संस्थानिकांना आपल्या राज्यांतील अंतःस्थ कारभारासंबंधानें अधिक स्वातंत्र्य मिळून त्यांना आपल्या प्रजेच्या कल्याणासाठीं सुधारणा करण्याची अधिक मोकळीक मिळावी, अशा अर्थाची चर्चा महाराजांनीं केली व नंतर थोड्याच दिवसांनीं त्याबद्दलची एक लेखी योजना करूनहि त्यांच्याकडे पाठविली.

यानंतरच्या फेब्रुआरी महिन्यांत दिवाण मि. केरशास्पजी हे दिवाणपदावरून निवृत्त झाले, त्या वेळीं त्यांच्या जागीं महाराजांनीं श्री. रमेशचंद्र दत्त यांची योजना केली. तेथपर्यंतच्या महाराजांच्या कारकीर्दीतील सर्व दिवाणांत कर्तृत्वाने व कीर्तीनें सर्वांत अधिक प्रसिद्ध असे दिवाण हेच होते; व हे पुष्कळ काळपर्यंत अधिकारावर राहते, तर खरोखरीच महाराजांना अमूल्य मदत मिळून बडोदे राज्याची सुधारणा झाली याहूनहि अधिक जलद झाली असती. परंतु ईश्वरी योगायोग कांहीं निराळाच होता.

याच सालच्या सप्टेंबर महिन्यांत महाराज पुण्यास गेले, त्या वेळीं तेथील अस्पृश्यसहाय्यक मंडळातर्फे चालविल्या गेलेल्या शाळेच्या बक्षिससमारंभाच्या प्रसंगीं त्यांनीं भाषण केलें व तसाच समारंभ ता. १८ ऑक्टोबर रोजीं मुंबई येथील शाळेंत करण्यात आला. तेथून परत आल्यावर नोव्हेंबर महिन्यांत हिंदुस्थानचे व्हाईसरॉय लॉर्ड मिंटो व त्याच्या पत्नी यांनीं बडोद्यास भेट दिली. बडोद्यास येण्यापूर्वी अहमदाबादेस त्यांच्या येण्याच्या वेळीं एक बॉंब टाकण्यांत आला होता, पण सुदैवानें त्यांतून ते बचावून बडोद्यांतील त्याचा मुक्काम आनंदानें पार पडला. त्यानंतर लवकरच ता. ३०–११–१९०९ रोजीं एकाएकीं दिवाण श्रीयुत दत्त यांचा अंत झाला. महाराजाना हा धक्का फार मोठा वाटला. यानंतरानें हिंदुस्थानांतील राजकीय महर्षि दादाभाई नवरोजी यांनीं महाराजांना

राजवाड्याच्या कमानीपर्यंत ओढीत नेली. त्या प्रसंगीं महाराजांनीं सद्गदित होऊन एक लहानसें भाषण केलें. त्यात ते म्हणाले :—

"माझ्या आयुष्यात हा प्रसंग निःसंशय अपूर्व आहे. इतक्या मानाला मी खरोखर पात्र नाहीं, असें मी तुम्हास सांगितलें पाहिजे. तुमच्या या कृतीनें माझें अंतःकरण भरून आलें आहे. मी आजपर्यंत जें काहीं केलें आहे, तें केवळ माझें कर्तव्य म्हणून केलें आहे. तें करीत असताना माझ्याकडून चुकाहि झाल्या असतील, परंतु त्या नेणतेपणानें झाल्या आहेत. मनुष्य हा चुकीस पात्र आहे व मीहि आपल्यासारखाच एक मनुष्य असल्यामुळें, मीहि चुकीस पात्र आहे. म्हणून माझ्या हातून झालेल्या चुकांबद्दल आपण सर्व मला क्षमा कराल अशी आशा आहे."

या भाषणानें उत्सवाची समाप्ति करण्यात आली. अशाच प्रकारचे समारंभ मुंबई, मद्रास, कलकत्ता, अलाहाबाद वगैरे प्रमुख शहरीं करण्यात आले. यावरून एवढ्या काळात महाराजांनीं आपल्या कृतीनें, केवळ बडोदें राज्यातच नव्हे, तर सर्व हिंदुस्थानातील लोकांच्या अंतःकरणात अढळस्थान कसें प्राप्त करून घेतलें होतें, याची कल्पना येईल. यापुढील सालीं म्हणजे १९०८ सालीं महाराजांच्या आयुष्यातील दोन महत्त्वाचे प्रसंग घडून आले त्यातील एक आनंददायक व दुसरा दुःखदायक होता. ता. २९–६–१९०८ रोजीं युवराज फत्तेसिंहराव यांना तृतीय अपत्य व प्रथम पुत्राची प्राप्ति झाली. त्याचें नांव प्रतापसिंहराव राजे असें ठेविण्यात आलें. या गोष्टीनें सर्वांस फार आनंद झाला. परंतु विलायतेहून आल्यापासून युवराज फत्तेसिंहराव यांची प्रकृति जी बिघडली, ती अधिक विकोपास जाऊन ता. १४–९–१९०८ रोजीं त्यांचा खेदकारक अंत झाला. हा प्रसंग महाराजांना वज्राघातप्रमाणें वाटण्यासारखाच होता. वस्तुतः धैर्य, पराक्रम, औदार्य, खेळाडू वृत्ति, इत्यादि अनेक गुण युवराजांत होते, परंतु त्यांचा विकास होण्यास अवसर न राहता रोगामुळें

वगैरे प्रसिद्ध मंडळी त्या समारंभास हजर होती. त्या प्रसंगीं महाराजांचा सत्कार करण्यांत आला, त्या वेळीं महाराजांनीं मराठींत एक लहानसें भाषण करून सांगितलें कीं,

"मी नुकताच जपान, अमेरिका, युरोप वगैरे ठिकाणीं गेलों होतो. त्यामुळें निरनिराळ्या राष्ट्रांतील लोकांच्या निरनिराळ्या चालींचें निरीक्षण करावयास मला मिळालें. इतर लोकांच्या चालीरीतींचें निरीक्षण करून आपण आपली सुधारणा केली पाहिजे. स्त्रियांना शिक्षण दिलें पाहिजे, याबद्दल आतां कोठें मतभेद आढळणार नाहीं; परंतु तें शिक्षण म्हणजे नुसत्या परीक्षा पास होणें नव्हे. स्त्रियांना संसारविषयक शिक्षण मिळालें पाहिजे. आपल्या पतीस वाईट गोष्टींपासून कसें परावृत्त करावयाचें, हेंहि बायकांस शिकविलें पाहिजे. नुसतें भाषण करतां येऊन कांहीं उपयोगाचें नाहीं. बोलण्यापेक्षां प्रत्येक गोष्ट कृतींत उतरली पाहिजे."

याच महिन्यांत बडोदें येथें मराठा शिक्षणपरिषदेची चौथी बैठक भरविण्यांत आली. तिचें अध्यक्षस्थान सरदार शंभुसिंह राजे मालेगांवकर यांना देण्यांत आलें होतें. त्या प्रसंगीं महाराजांना भाषण करण्याची विनंति करण्यांत आल्यावरून ते म्हणाले,

"श्रीशिवाजी महाराजांच्या इतिहासावरून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. प्राचीन व अर्वाचीन गोष्टींचा विचार करून इतिहासाचा अर्थ लक्षांत घेतला पाहिजे. युरोपमध्यें मार्टिन् ल्यूथरच्या वेळीं धर्मसुधारणा ज्या कारणांनीं व प्रयत्नांनीं झाली, त्याच वेळीं व त्याच कारणांनीं आपल्याकडे एकनाथ, तुकाराम, रामदास, इत्यादि पुरुषांनीं धर्मसुधारणा केली, त्याचा इतिहास पहा. शिवाजी महाराजांचे व तत्कालीन साधुपुरुषांचे विचार आकुंचित नव्हते. त्यांनीं सर्व लोकांच्या उन्नतीकरितां प्रयत्न केले, त्याप्रमाणें तुम्हीहि आपल्या सर्व देशबांधवांच्या कल्याणाकरितां प्रयत्न करावेत."



मुंबई येथील अस्पृश्योद्धार समाजाचें संमेलन

(यांत महाराजांच्या डाव्या हातास कै. सर चंदावरकर कै. ना. गोखले कै. गोकुळदास पारख वगैरे मंडळी आहेत)

असणारी मनुष्यहानि सहन करीत असलेल्या हिंदुस्थानातील लोकांनीं कसा बोध घेतला पाहिजे, यासंबधाचें मार्मिक विवेचन केलें.

अशा प्रकारें या कालविभागांत महाराजाचा राजकार्याचा नित्यक्रम सुरळित रीतीनें चालू होता; त्याचप्रमाणें हा काल त्यांना गृह-सौख्याच्या दृष्टीनेंहि एक मोठ्या अपवादाखेरीजकरून सुखाचा गेला. स्वतःच्या राज्यकार्यांत आपल्या पुत्राचें सहाय्य आपल्याला मिळावें, व यासाठीं त्यांना उत्तम शिक्षणसंस्कार प्राप्त व्हावेत, याबद्दल महाराज शक्य ते प्रयत्न करीत होते. त्याचे द्वितीय चिरंजीव जयसिंहराव यांना प्रथम इंग्लंडमध्यें हॅरो येथील हायस्कूलमध्यें घालण्यांत आलें होतें व त्यानंतर त्यांना अमेरिकेंतील हार्वर्ड युनिव्हर्सिटीमध्यें पाठविण्यांत आलें. तेथें असतांना त्यांनीं शारीरिक श्रमाचें महत्त्व अमेरिकेसारख्या लोकसत्ताक देशांत राहून शिकावें, अशी महाराजाची इच्छा होती. जयसिंहराव यांनीं आपल्या कार्यांत व विद्यालयांतील अभ्यासक्रमांत यश संपादन करावें, अशी स्वाभाविक मनीषा त्यांनीं युनिव्हर्सिटीच्या एका चालकास लिहिलेल्या पत्रांत व्यक्त केली आहे. परंतु जयसिंहराव यांची प्रकृति मूळचीच नाजुक असल्यामुळें, त्यांच्या हातून अवश्य ते परिश्रम होऊं शकले नाहींत. तथापि ते त्या युनिव्हर्सिटीची बी. ए. ची परीक्षा पास झाले होते. महाराजाचे तिसरे चिरंजीव शिवाजीराव यांची प्रकृति मात्र महाराजाच्या सर्व मुलांत सुदृढ असे. त्यांना शिक्षणासाठीं प्रथम विलायतेंत एका खाजगी शाळेंत घालण्यांत आलें. परंतु कांहीं दिवसांनीं तेथील अभ्यास-क्रम सोडून ते हिंदुस्थानांत परत आले. त्यानंतर त्यांनीं मुंबई विद्या-पीठाच्या मॅट्रिक्युलेशनचा अभ्यास करून त्या परीक्षेंत १९०६ सालीं यश मिळविलें. त्याच्या पुढील सालीं त्यांची प्रीव्हियस्‌ची परीक्षाहि पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतून पास झाली. तेथें असतांना क्रिकेटच्या अनेक सामन्यांत खेळून त्यांनीं चांगलें नांव मिळविलें. त्यानंतर १९१० मध्यें ते पुन्हा विलायतेस जाऊन ऑक्सफर्ड विद्यापीठांतील खाईस्ट चर्च कॉलेज-

पाठविलेल्या दुखवटयाच्या पत्राच्या उत्तरात महाराजानीं आपला अभिप्राय असा दर्शविला कीं,

"श्रीयुत दत्त याचा मृत्यु म्हणजे केवळ बडोद्याचीच नव्हे, तर सर्व हिंदुस्थानची झालेली हानि होय. श्रीयुत दत्त हे अगदीं मला पाहिजेत तसे गृहस्थ होते. त्याच्या अनुभवाचा व कर्तृत्वाचा फायदा घेऊन राज्यात पुष्कळ प्रगति करावी, असा माझा हेतु होता."

याहून श्रीयुत दत्त याच्या गुणाचें अधिक मार्मिक विवेचन त्याच्या मृत्यूबद्दल खेद प्रदर्शित करण्यासाठीं बडोद्यास भरलेल्या जाहिरसभेंत महाराजानीं केलें व त्यात प्रसिद्ध लेखक, विद्वान वक्ता, राज्यकार्यकुशल मंत्री, निष्ठावान समाजसुधारक, इत्यादि अनेक दृष्टींनीं त्याचें वर्णन महाराजानीं केलें, पण त्या सर्व गुणात त्याचा मुख्य गुण म्हणून त्याच्या प्रेमळ, शात व टीकासहिष्णु स्वभावाचा विशेष उल्लेख केला. असे पुरुष मृत झाले तरी ते चिरंतनच असतात, असा टेनिसन् कवीच्या शब्दानीं त्यानीं समारोप केला.

यानतर थोड्याच महिन्यानीं महाराजाशीं अत्यत प्रेमाचा सबध असलेल्या दुसऱ्या एका व्यक्तीची हानि होण्याचा प्रसग त्याना भोगावा लागला. सन १९१० च्या मार्च महिन्यात त्याचे प्रेमळ शिक्षक, विश्वासू मित्र व इमानी सेवक मि. ईलियट हे विलायतेस वारल्याची खबर त्याना हिंदुस्थानात मिळाली त्यावरून त्यानीं मि. ईलियट याच्या चिरजीवास लिहिल्याप्रमाणें त्याच्या मनाच्या स्थितीची केवळ कल्पनाच करावी अशी ती झाल्याचें दिसून येतें. यानतर थोड्याच दिवसानीं महाराज परदेशाच्या सफरीला गेले. या वेळीं ते जपान वगैरे देशात जाऊन सन १९१० च्या नोव्हेंबरमध्यें परत आले. त्या वेळीं मुबईच्या आर्यन ब्रदरहुड सस्थेनर्फे त्याचें स्वागत करण्यात आले. याच सालीं बडोद्यास सेंट्रल लायब्ररीची स्थापना करण्यात आली या योजनेचा विस्तार पुढें क्रमा क्रमा झाला, त्याचें विवेचन इतरत्र केलें आहे ता १८ डिसेंबर रोजीं मुबईस हिदु स्त्रियाचें तिसरें वार्षिक समेलन भरविण्यात आलें, त्या वेळीं सर वुइल्यम् वेडरबर्न, न्या. चदावरकर

याच महिन्याच्या अखेरच्या दिवशीं म्हणजे ता ३१ डिसेंबर रोजीं वडोदें येथें महाराजाच्या रौप्यमहोत्सवप्रसंगीं बनविलेल्या म्युनिसी बागेमध्ये महाराजानीं जपानहून आणविलेल्या बुद्धाच्या भव्य पुतळ्याचें अनावरण त्याच्या हातून करविण्यात आलें त्या वेळीहि त्यानीं

"जेव्हा जेव्हा तुमची नजर या मूर्तीकडे जाईल, तेव्हा तेव्हां महात्मा बुद्धाचे उच्च गुण व विचार कमे होते, याचा विचार करण्यास व त्यावरून बोध घेऊन सत्कम आचरिण्यास शिका"

असें श्रोत्याना सांगितलें

यापुढील वर्षाच्या फेब्रुआरी महिन्यात बडोदें राज्यातील अमरेली या जिल्ह्याच्या ठिकाणीं औद्योगिक प्रदर्शन भरविण्यात आलें होतें, तें उघडण्याचा समारंभ उरकून त्याच महिन्यात ता २६ रोजीं वडोद्याजवळ असलेल्या रणोली गावीं आर्यसमाजाचें एक मोठें संमेलन भरलें होतें, तेथें महाराज गेले त्या प्रसंगीं त्यानीं आर्यधर्माची उत्पत्ति, उत्क्रांति व प्रस्तुत स्थिति, यावर आपले मननीय विचार व्यक्त करताना म्हटलें,

"हल्लींच्या आमच्या धार्मिक कल्पनामुळें त्यातील चुका दुरुस्त होण्याऐवजीं त्या अधिक बळकट होतात, म्हणून धार्मिक अधिकारी-परपरेबद्दल संशयाची वृत्ति आपण आपल्या अतःकरणात वाढवून, दरेक गोष्टीचा निर्णय आपल्या विचारशक्तीच्या सहाय्यानें करण्याची प्रथा पाडली पाहिजे कोणत्याहि राष्ट्राचें राजकीय भवितव्य हें पुष्कळ अशीं त्यातील सामाजिक व धार्मिक कल्पनावर अवलबून असते म्हणून प्रत्यक्ष परिस्थितीच्या अनुभवानें आपल्या कल्पनात फरक करण्याचा काळ सांप्रत आला आहे"

यानतर एप्रिल महिन्यात मुंबई येथील आरोग्यमंडळापुढे महाराजानीं एक अत्यत विस्तृत भाषण करुन त्यात आरोग्यशास्त्राच्या माहितीमुळें युरोपातील देशात अनेक रोगाचें पाऊल कसें मागें हटलें आहे, व त्यामुळें प्राक्तनवादाला चिकटून बसून आपल्या डोळ्यादेखत आपल्या देशात होत

मध्यें दाखल झाले. तेथेंहि त्यानीं क्रिकेट, टेनिस वगैरे खेळ्यात आपलें प्राविण्य दाखविलें होतें.

महाराजाच्या कन्या इंदिराराजा याहि मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेंत राजपुत्र शिवाजीरावाबरोबर पास झाल्या होत्या व महाराजाचे सगींत धाकटे राजपुत्र धैर्यशीलराव याचा विद्याभ्यास चालू होता. अशा प्रकारें गृहसौख्याचा लाभ या काळात महाराजाना चागला मिळत होता.

या काळातील महाराजाच्या अधिकारीवर्गांतील काहीं प्रमुख गृहस्थाचा उल्लेख येथें करणें अप्रस्तुत होणार नाहीं. समर्थ, पेस्तनजी हे आरभापासूनच येथील नोकरींत आलेले होते. त्यानतर रा. अब्बास तैयबजी नावाचे तरुण व उत्साही गृहस्थ विलायतेंत राहून तिकडील रीतिभातींचे माहितगार असलेले आढळल्यावरून महाराजानीं त्याना आपल्याबरोबर घेतलें. युरोपातील काहीं स्वाऱ्यात ते महाराजाबरोबर होते. महाराजाच्या सहवासात पुष्कळ दिवस राहून कारभार व रीतभात पाहिलेल्या गृहस्थात रा. तैयबजी हे प्रमुख होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपल्याला हवी तशी अष्टपैलू सोबत मिळण्यास हिंदुस्थानात आपल्या दर्जामुळें अडचण पडते, हें जाणून सन १८८९ चे आरभीं महाराजानीं डॉ. नेव्हिन्स् नावाच्या इंग्रज गृहस्थास आपल्या नोकरींत घेतलें. हे गृहस्थ साधे व सदाचारी असून महाराजावर त्याची फार निष्ठा होती. आपला उपयोग महाराजाना व्हावा, अशी त्याची इच्छा होती, परतु हिंदुस्थानातील परिस्थिति इंग्लडहून वेगळी असल्यामुळें, डॉक्टर या नात्यानें त्याचा उपयोग राजकुटुबास फारसा झाला नाहीं. त्याची विद्वत्ताहि बेताचीच असल्यामुळें त्याजपाशीं शिकण्यासारखा काहीं विषय महाराजाना नव्हता. त्यानीं बडोद्यात पाच वर्षें नोकरी केल्यानतर, ते विलायतेस परत गेले. त्याच्यानतर बरींच वर्षें महाराजाजवळ डॉक्टर व कपॅनिअन् अशा दुहेरी नात्यानें डॉ. बटुकराम मेहता हे काम करीत असत हे गृहस्थ चतुरस्र व हिंमतबाज असत. महाराजापुढें आलेल्या अनेक प्रश्नाचा विचार करण्यास डॉ. बटुकराम याचा

उपयोग चागला होत असे. दहा बारा वर्षे पावेतो त्यानीं महाराजाजवळ काम केल्यावर, सन १९०३ चे जुलै महिन्यात ते युरोपात वारले. त्याना छत्रीमशालीचा सन्मान व तहाह्यात आसामी महाराजानीं करून दिली होती. मि. फ्रेंच नावाच्या एका इग्रज गृहस्थास राजपुत्राचे शिक्षक म्हणून सन १८९२ सालीं आणण्यात आले. ते आपल्या कामात दक्ष असत, तथापि त्याचा स्वभाव फारसा आकर्षक अथवा मनमिळाऊ नसल्यानें स्वत महाराजाना मि. ईलियट यांचा जसा उपयोग झाला, तसा त्याचा राजपुत्राना झाला नाहीं तथापि, महाराजाचें त्याचे विषयींचें मत उत्तम होतें, असे दिसून येतें. मि. फ्रेंच यानीं तेरा वर्षे नोकरी केल्यावर सन १९०५ सालीं ते निवृत्त होतेवेळीं महाराजानीं त्याना लिहिलेल्या एका पत्रात त्याच्याविषयींचा आपला अभिप्राय व्यक्त करिताना म्हटलें आहे कीं,

"माझ्या मुलाच्या शिक्षणाच्या कामीं आपली मदत मला नेहमीं विश्वासार्ह व भरवशाची अशी वाटत असे व आपल्यासारख्या मोकळ्या मनाच्या व सरळ मार्गाच्या गृहस्थाशीं व्यवहार करताना मला नेहमीं आनद वाटत असे."

मि फ्रेंच याच्यानतर मि हार्डिंग व न्यूमन् हेहि महाराजाजवळ या काळात नोकरीस असत. याशिवाय मि. वीडन या नावाचे गृहस्थ हे युरोपात व हिंदुस्थानात काहीं दिवस महाराजाजवळ होते. हे गृहस्थ विद्वान असत. याच्याजवळ महाराजानी गिबनच्या 'रोमन साम्राज्याचा अपकर्ष व ऱ्हास' या प्रसिद्ध ग्रथाचा अभ्यास केला व त्याचे साराशरूपानें टाचण काढलेलें असें एक पुस्तक तयार केलें त्याचें नाव 'From Cæsar to Sultan' हें असून, ते मूळात इग्रजींत छापिलें गेलें व नतर त्याचें मराठी भाषातर कै. राजारामशास्त्री भागवत यानी करून प्रसिद्ध केलें. मि वीडन् हे सन १९०८ सालीं एक वर्षभर बडोद्यास महाराजाबरोबर पाहुणे म्हणून राहिले होते. महाराजाचे आप्त असून त्याच्या नोकरींत असलेल्या प्रमुख गृहस्थात कै खासेराव जाधव याचा उल्लेख प्रमुखपणानें केला

मध्यें दाखल झाले. तेथेंहि त्यांनीं क्रिकेट, टेनिस वगैरे खेळांत आपलें प्राविण्य दाखविलें होतें.

महाराजांच्या कन्या इंदिराराजा याहि मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेंत राजपुत्र शिवाजीरावांबरोबर पास झाल्या होत्या व महाराजांचे सर्वांत धाकटे राजपुत्र धैर्यशीलराव यांचा विद्याभ्यास चालू होता. अशा प्रकारें गृहसौख्याचा लाभ या काळांत महाराजांना चांगला मिळत होता.

या काळांतील महाराजांच्या अधिकारीवर्गांतील कांहीं प्रमुख गृहस्थांचा उल्लेख येथें करणें अप्रस्तुत होणार नाहीं. समर्थ, पेस्तनजी हे आरंभापासूनच येथील नोकरींत आलेले होते. त्यानंतर रा. अब्बास तैयबजी नांवाचे तरुण व उत्साही गृहस्थ विलायतेंत राहून तिकडील रीतिभातींचे माहितगार असलेले आढळल्यावरून महाराजांनीं त्यांना आपल्याबरोबर घेतलें. युरोपांतील कांहीं स्वाऱ्यांत ते महाराजांबरोबर होते. महाराजांच्या सहवासांत पुष्कळ दिवस राहून कारभार व रीतभात पाहिलेल्या गृहस्थांत रा. तैयबजी हे प्रमुख होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपल्याला हवी तशी अष्टपैलू सोबत मिळण्यास हिंदुस्थानांत आपल्या दर्जामुळें अडचण पडते, हें जाणून सन १८८९ चे आरंभीं महाराजांनीं डॉ. नेव्हिन्स् नांवाच्या इंग्रज गृहस्थास आपल्या नोकरींत घेतलें. हे गृहस्थ साधे व सदाचारी असून महाराजांवर त्यांची फार निष्ठा होती. आपला उपयोग महाराजांना व्हावा, अशी त्यांची इच्छा होती, परंतु हिंदुस्थानांतील परिस्थिति इंग्लंडहून वेगळी असल्यामुळें, डॉक्टर या नात्यानें त्यांचा उपयोग राजकुटुंबास फारसा झाला नाहीं. त्यांची वृत्ताहि वेतांचीच असल्यामुळें त्यांजपाशीं शिकण्यासारखा कांहीं विषय महाराजांना नव्हता. त्यांनीं बडोद्यांत पांच वर्षें नोकरी केल्यानंतर, ते विलायतेस परत गेले. त्याच्यानंतर वरीच वर्षें महाराजांजवळ डॉक्टर व कंपॅनिअन् अशा दुहेरी नात्यानें डॉ. बटुकराम मेहता हे काम करीत असत. हे गृहस्थ चतुरस्र व हिंमतबाज असत. महाराजांपुढें आलेल्या अनेक प्रश्नांचा विचार करण्यास डॉ. बटुकराम यांचा

मनावर आपली छाप चागली बसविली. गोपाळराव हरि देशमुख, खंडेराव हरि बेदरकर, बळवतराव अनत देव, बाळाजी पाडुरग वगैरे गृहस्थ वारवार महाराजाचे भेटीस येत व महाराजहि त्याचे अगत्य ठेवीत."

रा. सरदेसाई याच्यासारखेच बहुश्रुत असे दुसरे एक लेखक रा शकर मोरो रानडे हे त्या कालात बडोद्यात नोकरीस असत ते हव्या त्या विषयावर पाहिजे त्या वेळीं उत्कृष्ट लेख लिहिण्याबद्दल प्रसिद्ध असत. नाट्यकथार्णव या नावाची स्वकृत नाटकाची एक माला त्यानीं रचिली होती या काळच्या पुरुषातील आणखी एक महत्त्वाचे उल्लेखनीय गृहस्थ म्हणजे महाराजाचे कनिष्ठ बधु श्रीमत सपतराव हे होत. त्याचा प्रेमळ स्वभाव, दिलदार अत करण, इतराना सहाय्य करण्याची तत्परता व पूर्ण निरभिमानी वृत्ति, या गुणामुळे ते सर्वांना अत्यत प्रिय झालेले असत, व त्याच्या सारख्याच्या सहवासात महाराजाचा काल सुखात जात असे

राजकारणाच्या व सामाजिक आणि इतर महत्त्वाच्या वार्तांत आपला पुष्कळ वेळ घालवीत असूनहि महाराजाची पाश्चात्य पद्धतीप्रमाणें खेळाडु वृत्ति या काळात खूप जागृत असे 'तापी तीरावरील शिकारी, कोजा गिरीस किंवा दिवाळींत चालणाऱ्या सोगऱ्याच्या खेळाचा गोंगाट, उमरठच्या वाळवटावर किंवा मकरपुऱ्यास होणारे आट्यापाट्याचे डाव, हुरड्याचे शेता-तील उपहार, महाबळेश्वर वगैरे ठिकाणचीं वनभोजनें,' वगैरे गोष्टींची हकीकत रा. सरदेसाई याच्या आठवणींवरून कळून येते. घोड्यावर बसणें, शिकार करणें, नेम मारणें व इतर सर्व प्रकारचे ल्ष्करी खेळ खेळणें, या कृत्यात महाराजाच्या उत्कृष्ट कर्तबगारीबद्दलची माहिती साप्रतचे बडोद्याचे सेनापति रा. नानासाहेब शिंदे यानीं आपल्या आठवणींत दिली आहे. सेनापति रा. शिंदे हे सन १८९५ साला‌त बडोद्याच्या फौजेंत दाखल झाले व १८९७ च्या आरभीं ते महाराजाचे ए डी. सी. झाले. तेव्हा पासून त्यानीं सुमारें चाळीस वर्षे महाराजाच्या निकट सहवासात काढिलीं

पाहिजे. सत्यवक्तेपणा, औदार्य, उत्कृष्ट नीतिमत्ता, निःसीम स्वामिनिष्ठा, धाडसी व उतावळा स्वभाव, निर्भीड निस्पृहपणा आणि अप्रिय पण पथ्यकर स्पष्टवक्तेपणा, या अनेक गुणांच्या समुच्चयामुळें ते विशिष्ट व्यक्ति म्हणून समजले जात. महाराजांच्या सहवासांत असून आपल्या इतिहासावरील व्यासंगामुळें महाराष्ट्रांत प्रसिद्ध झालेले रा. सरदेसाई हेहि या कालांतील अधिकाऱ्यांत उल्लेख करण्यासारखे गृहस्थ होते. ते सन १८८९ च्या आरंभीं महाराजांच्या नोकरींत शिरले व तींन त्याचीं ३७ वर्षे महाराजांच्या निकट सहवासांत गेलीं. ते राजपुत्रांच्या दुय्यम शिक्षकाचें काम करीत असत. त्यांनीं महाराजांच्या सववासानें खाजगी व कौटुंबिक माहिती लिहून ठेविली आहे, तिचा प्रस्तुत ग्रंथकारास पुष्कळ उपयोग झाल्यानें, तिचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख येथें करणें अवश्य आहे.

रा. सरदेसाई यांच्या आठवणींवरून महाराजांच्या या कालांतील व्यवसायाचा व व्यवहाराचा व्याप समजून येतो. महाराज केवळ आपल्या राज्याचा कारभार करूनच रहात नसत; तर ते हिंदुस्थानांतील सर्व प्रकारच्या चळवळींचे जीवन झालेल्या थोर पुरुषांच्या सहवासांतहि ते असत.

रा. सरदेसाई सांगतात कीं,

"महाराष्ट्रांतील न्या. रानडे, डॉ. भांडारकर, वगैरे प्रसिद्ध व्यक्तींचा ओढा महाराजांकडे विशेष असे. पुणें, मुंबई, लोणावळा, महाबळेश्वर वगैरे ठिकाणीं ते असतांना इकडचे पुष्कळ सद्गृहस्थ महाराजांना भेटत असत व अनेक प्रचलित प्रश्नांवर ते आपला निर्भीड सल्ला त्यांना देत. त्या सर्वांची एकच भावना होती कीं, महाराजांची खरी योग्यता सर्वांच्या निदर्शनास यावी. महाराजहि त्या सर्वांची प्रेमळ भावनेनें भेट घेत, त्यांचे विचार शांतपणानें ऐकत आणि काहीं बिकट प्रश्न उद्भवला, तर त्यासंबंधीं या मंडळींचें मत अजमावून पाहण्यास संकोचत नसत. असें करितांना त्यांनीं आपल्या कर्तृत्वानें व विचारी वृत्तीनें सर्वांच्या

धारी व्यक्ति असून ती नेहमीं आपल्या ख्यालीखुशालींत मग्न असावयाची, व त्यामुळे राज्यातील मोठमोठ्या अमल्दारानाहि तिचें दर्शन दुर्लभ असावयाचे, मग इतर लोकाची तर गोष्टच नको, असाच अनुभव बहुतेक सस्थानातून दिसून येत असे अशा वेळीं सरकारी कामकाजाच्या कारणानीं, त्याचप्रमाणें उपरोक्त मुद्दाम घडवून आणिलेल्या प्रसगानीं, दिवाणापासून तो शेतकऱ्यापर्यंत, हवी त्यास महाराजाची भेट घेता येई व महाराजहि अशा भेटी देण्यास उत्सुक असत. त्यामुळें सर्व दर्जाच्या व वर्गाच्या लोकाचे मनोगत त्याना कळून, त्याचा फायदा राजकारणात तर त्याना झालाच, परतु त्याबरोबरच अशा प्रकारें अनेक लोकाच्या सहवासाचा लाभ घेऊन त्यात आनद मानणें, हा त्याच्या स्वभावाचा व नित्यक्रमाचा एक भाग बनून गेला तथापि अनेक कारणानीं व अनेक व्यक्तींशीं सहवासाचे प्रसग जरी महाराजाना आले, तरी त्याना कोणाच्या सोबतीची जरूरी अशी कधींहि भासत नसल्यामुळें, त्याचें काम कधींहि अडत नसे किंबहुना काम हाच त्याच्या आयुष्याचा मुख्य व्यवसाय बनला होता, आणि त्या योगानेंच इतर भानगडीचे आणि त्रासाचे प्रसग त्याच्यावर आले असताहि, ते त्यातून शात चित्तानें आपला मार्ग काढीत. सन १९०८ च्या ऑगस्ट, सप्टेंबर महिन्यात युवराज फत्तेसिंहराव याची प्रकृति अत्यवस्थ असतानाहि महाराजाचे काम सारखें चालूच होतें व त्या प्रसगीं काम आहे म्हणून मी जगतों आहे, असे त्यानीं उद्गार काढल्याचा उल्लेख रा. सरदेसाई यानीं नमूद केला आहे. काम, वाचन व व्यायाम हे तीनहि व्यवसाय त्याचे नियमानें चालू असत दरेक कामात टापटीप व नियमितपणा ठेवून त्यानीं या काळात बडोद्याच्या जीवनावर आपली कायमची छाप बसविली हा चोवीस वर्षांचा मध्यकाल एकदरींत त्याना फार सुखाचा गेल्यामुळें त्या प्रसन्नवृत्तीचें प्रतिबिंब सर्वत्र अवलोकनात आलें. यामुळें महाराजाच्या प्रथम कालविभागास उत्साहकाल म्हणता आला, तर या मध्यकालास आनदकाल असें म्हणता येईल व यानतरचा तिसरा कालविभाग हा विचारकाल म्हणून उल्लेखिता येईल.



आहेत, व त्यापैकींचीं चौदा वर्षें साम्रनच्या मध्यकालात गेलीं. त्यानीं महाराजाच्या अश्वारोहणाच्या कुशलतेबद्दलच्या अनेक गोष्टी नमूद केल्या आहेत, त्यावरून या बाबतीची माहिती समजून येते. आपल्याप्रमाणेंच आपल्या अमलदारानाहि घोड्यावर बसता आलें पाहिजे असा नियम महाराजानीं केलेला होता, परतु त्या नियमाच्या कसोटीची वेळ येई तेव्हा या अमलदाराची कशी फजिती होत असे, याचें वर्णन रा. नानासाहेब शिंदे यानीं दिलेलें आहे, तें फार गमतीचें आहे.

रा. नानासाहेब शिंदे म्हणतात —

"रयतेची स्थिति पाहण्यास महाराज प्रातात फिरण्यास जात, त्या वेळीं बहुतकरून सकाळ, सायकाळ घोड्यावर बसून आसपासच्या पाच सहा खेड्याची स्थिति ते स्वत जाऊन पाहत असत अशा वेळीं तीस पस्तीस मैलाची चक्कर ते करीत असत. एक वेळीं तर त्यानीं अठ्ठेचाळीस मैलाची मुशाफरी घोड्यावरून केली, तरी त्यास बिलकुल थकवा आलेला नव्हता! अशा वेळीं प्रातातील कित्येक अमलदार सुभे, पोलिस नायब सुभे, वगैरेंची पुरी फजिती उडत असे कित्येकास घोड्यावरून उतरल्याबरोबर नीट चालता येत नसे, कित्येक घोड्यावरून खालीं येत, कित्येकाच्या पोटात दुखू लागे, कित्येकाचे घोडे लगडे होत, तर कित्येकाच्या जिनाचे तग अगर रिकाबसोट तुटत असत"

अशा प्रकारें राजकारण, समाजसुधारणा, औद्योगिक उन्नति, वाचन, लष्करी व्यायाम, खेळ, इत्यादि अनेक व्यवसायामुळें महाराजाचा सबध अनेक लोकाशीं येत असे त्याबरोबरच त्यानीं वारवार भोजनें, उपवनसमेलनें, भेटीदेटी इत्यादि अनेक प्रकारानीं तो दृढ करण्याचा उपक्रम बडोद्यात सुरू केला त्यामुळें, राजा, प्रजा व अधिकारी याच्यामधील प्रेमळ व्यवहाराची जी प्रथा त्यानीं पाडिली, ती इतर फारच थोड्या देशी राज्यात पाहण्यात येत असे राजा म्हणजे एक अदृश्य अशी सर्व सत्ता-



महाराणीसाहेबांनीं केलेली वाघाची शिकार

अनुमान काढणें फार चुकीचें होईल. त्या काळीं इंग्रज व फ्रेंच हीं राष्ट्रें हिंदुस्थानच्या राजकारणात उतरलीं नसतीं तर हिंदुस्थानचें काय झालें असते, हा प्रश्न मोठा मनोरंजक झाला असता. त्यापैकींचीं काहीं अजीबात नाहींशीं झालीं असतीं, अथवा त्यानीं इतरावर आपली सत्ता स्थापिली असती, अगर त्या सर्वांनीं मिळून अमेरिकेसारखी एखादी संयुक्तसंस्थानपद्धति स्वीकारली असती, हें आज सागणें कठिण आहे. तथापि इतकें म्हणता येईल कीं, त्या वेळीं जर त्याचा संबध जगातील इतर राष्ट्रांशीं आला असता व त्यानीं शास्त्रीय व लष्करी ज्ञानाच्या बाबतींत नवीन पद्धतीची सुधारणा केली असती, तर हिंदी लोक जगातील इतर कोणत्याहि देशाच्या लोकापेक्षा खात्रीनें कमी ठरले नसते. त्यानीं तसें केलें नाहीं, ही त्याची चूक होय तथापि मला अशी आशा आहे कीं शिक्षणानें आता ही चुकी दुरुस्त होईल. हिंदी संस्थानांतील राजे बेदरकार राहून आपलें कर्तव्य करीनासे झाले, तर त्याच्याच प्रजेनें पुढें येऊन त्याना आपलें कर्तव्य करण्यास व सुधारलेल्या नमुन्याप्रमाणें आपली राज्यव्यवस्था ठेवण्यास भाग पाडलें पाहिजे."

महाराजाच्या या भाषणामुळे इंग्रजी अधिकारीवर्गांत बरीच खळबळ उडाली होती. या समारंभानंतर बादशहा एडवर्ड यानीं हॅरो येथें एका क्रीडागणाचें उद्घाटन केले, त्या प्रसगीं महाराज हजर राहिले होते; तथापि लवकरच लडन सोडण्याची त्याची इच्छा होती, असें दिसतें. कारण या सुमारास लिहिलेल्या एका पत्रात ते म्हणतात –

"लडन मला मानवत नाहीं, म्हणून येथील कार्यक्रम शक्य तितक्या लवकर उरकून मी येथून निघणार आहें."

याप्रमाणें लवकरच लडन सोडून ते स्विट्झरलडमध्यें गेले. तेथील टायरोल प्रांतात भरलेल्या जर्मन डॉक्टराच्या परिषदेस ते हजर राहिले व जर्मन भाषा त्याना अपरिचित होती, तरी त्यानीं इंग्रजी भाषेंतून तींतीळ झालेल्या चर्चेचा साराश समजून घेतला. नतर म्यूनिच, ड्रेस्डेन, बर्लिन, रोम,

# प्रकरण ३१ वें

## पुढील सफरी



सन १९०५ च्या मार्च महिन्यात महाराज युरोपच्या सातव्या सफरी-साठीं मुंबईहून निघाले. ते प्रथम पॅरिस येथें जाऊन नंतर लंडनला गेले. तेथें ता. ६ रोजीं ईस्ट इंडिया असोसिएशन या संस्थेच्या एका सभेस त्यांची अध्यक्ष म्हणून योजना करण्यात आली होती. त्या सभेंत हैद्राबाद संस्थानचे माजी रेसिडेंट सर डेव्हिड् बार यांनीं त्या संस्थानासंबंधानें भाषण करून हिंदुस्थानातील देशी राज्यांसंबंधानें कांहीं सर्वसाधारण विचार दर्शविले, त्यांत देशी राज्यांतून राज्यकारभार फारसा समाधानकारक रीतीनें चालत नाहीं, अशा अर्थाचे उद्गार त्यांनीं काढले. त्या प्रसंगीं समारोपाचें भाषण करताना महाराजांनीं हिंदी संस्थानें व हिंदी लोक यांच्या संबंधानें मार्मिक विचार प्रकट करून म्हटलें कीं,

"एखाद्या हिंदी संस्थानांत कितपत प्रगति झाली आहे, हें ठरविताना त्या संस्थानाच्या बौद्धिक व नैतिक उणीवा, त्यांतील शिक्षणाची अपूर्णता व राजकीय बंधनें यांचा विचारहि केला पाहिजे. व्याख्यात्यांनीं उल्लेखिलेला काळ हैद्राबाद संस्थानाला फार अड चणीचा होता. तशा प्रकारची—एक साम्राज्य जाऊन त्याच्या जागीं दुसऱ्याची स्थापना होण्याच्या वेळची—असामान्य परिस्थिति हिंदुस्थाना शिवाय इतर देशांना अपरिचित आहे, असें नव्हे. म्हणून तिच्यावरून हिंदुस्थानचे लोक आपला कारभार करण्यास असमर्थ आहेत, असे

आपल्या राज्यातील औद्योगिक साधनसंपत्तीची तपासणी करून, त्यात कोणते नवीन उद्योगधंदे सुरू करता येतील, यासंबंधींचा सल्ला देण्याकरिताहि एका तज्ज्ञ माणसाची मागणी केली. ती करिताना त्यानीं हें स्पष्ट सांगितलें कीं,

"बडोदें राज्य हे मुख्यत कृषिप्रधान आहे व म्हणून तेथें कोणतेहि उद्योगधंदे सुरू करावयाचे असल्यास, त्याना अवश्य असणाऱ्या साधनासाठीं तेथील शेतीरच अवलंबून रहावें लागणार आहे. म्हणून बडोद्यास येणाऱ्या तज्ज्ञानें तेथील शेतीच्या परिस्थितीचा पूर्ण अभ्यास केलेला असावा."

याचप्रमाणें

"नागरिक धर्म व तत्संबंधीं कर्तव्यें या विषयावर एखाद्या तज्ज्ञाकडून एक पुस्तक लिहवून त्यात नागरिक धर्माची वाढ कसकशी झाली, याची हकीकत दिलेली असावी; तसेंच निरनिराळ्या राज्यपद्धतीनुसार नागरिकाच्या हक्कात व कर्तव्यात कसकसा फरक होतो याचें विवेचनहि त्यात असावें व अशा प्रकारचें हें पुस्तक साधारणत पधरा ते अठरा वर्षाच्या मुलाना समजेल असें असावें,"

अशी तजवीज करण्याचा उपक्रमहि महाराजानीं केला. तथापि या सफरींत ज्या गोष्टीकडे यानीं विशेष लक्ष दिले व त्यानतर तिचा उपक्रम आपल्या राज्यात केला, ती गोष्ट म्हणजे मोफत वाचनालयाची योजना ही होय. तिच्याकडे त्यानीं इतकें लक्ष पुरविलें कीं, त्यासंबधाच्या नियमाचा एक मसुदा तानडतोब करून त्यानीं तेथल्या तेथून बडोद्यास पाठविला, व त्यानतर हिंदुस्थानात आल्यावर मागील एका प्रकरणात सांगितल्याप्रमाणें लवकरच आपल्या राज्यात वाचनालय खातें उघडून बडोदें शहरात सेंट्रल लायब्ररीची स्थापना केली.

अशा रीतीनें महाराज आपल्या प्रवासाचा पूर्ण लाभ घेत होते; तथापि सामाजिक दृष्ट्या अमेरिकेंतील स्त्रीपुरुषाचा या राजदपतीला आलेला

फ्लॉरेन्स, जिनीव्हा वगैरे ठिकाणीं जाऊन ते पॅरिसला आले. तेथून मग येच स्पेनमधील प्रसिद्ध बैलाची साठमारी पाहून ते लंडनला परत आले. यानंतर सन १९०६ च्या मे महिन्यात ते महाराणीसाहेब व कै. संपतराव यांजसह अमेरिकेस जाण्यासाठीं निघाले. संस्कृतीच्या देरेक अंगात पुढारलेला हा तरुण लोकसत्ताक देश स्वतः पहावा व तेथील शैक्षणिक, औद्योगिक वगैरे परिस्थितीची बारीक माहिती करून घेऊन तिचा लाभ आपल्या राज्याला कसा देता येईल तें पहावें, असा फार दिवसापासून त्याचा मनोदय होता. यासाठीं त्या देशातील जबाबदार अधिकाऱ्याची ओळख असणें जरूर होतें म्हणून लंडन येथील अमेरिकेचे वकील मि. व्हाइट्लॉ रीड यानीं अमेरिकेंतील सेक्रेटरी ऑफ् स्टेट याना एक पत्र लिहून त्यात त्याना महाराजाचा अगाऊ परिचय करून दिला. त्यात त्यानीं म्हटलें होतें कीं,

"महाराज गायकवाड व त्याच्या महाराणी हे दोघे अमेरिकेस येत आहेत. महाराज हे फार बुद्धिमान राजे असून, त्याना ब्रिटिश राजकारण व सस्था याची उत्तम माहिती आहे. अमेरिकेला त्याचा येण्याचा हेतु तेथील शिक्षणसस्थाचें निरीक्षण करून त्या देशात आपल्या राज्यातील विद्यार्थ्यांना पाठविण्याची सोय कशी करता येईल हें पहावें, हा आहे. महाराणीसाहेब याहि सुबुद्ध असून सुशिक्षित आहेत."

अशाच अर्थाचें एक पत्र अमेरिकेंतील विख्यात हारवर्ड विद्यापीठाच्या अध्यक्षाना मि रीड यानीं पाठविलें. नंतर महाराज लंडनहून निघून पॅसिफिक महासागराच्या मार्गे सॅन्फॅन्सिस्कोवरून अमेरिकेस गेले. तेथें गेल्यावर त्यानीं आपल्या अभ्यासी वृत्तीला अनुसरून तिकडील परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन केलें. तेथील पदार्थसंग्रहालयाच्या अध्यक्षाजवळ आपल्या संस्थानातील शिक्षणसंस्थाची पाहणी करून त्याबद्दल विधायक सूचना करण्यासाठीं एका तज्ज्ञ माणसाची त्यांनीं मागणी केली. त्याचप्रमाणें

अशा प्रकारें अमेरिकेंतील लोकाचें सामाजिक वर्तन जरी फारसे प्रशसनीय असल्याचें आढळलें नाहीं, तरी त्याच्या देशातील सर्व प्रकारच्या सस्था फार उच्च प्रकारच्या होत्या असें मात्र त्याचें मत झालें त्या सस्थाचे महाराजानीं योग्य निरीक्षण करून नतर ते ऑगस्ट महिन्यात इग्लडास परत आले. तेथे आल्यावर त्यानीं त्या काळचे भारतमत्री मोर्लेसाहेब याना भेटण्यासाठीं एक पत्र लिहिलें व त्याच्याकडून समति येताच त्याच्या घरीं त्याची भेट घेतली. त्या भेटीचें वर्णन मोर्लेसाहेबानीं स्वत च आपल्या 'आत्मवृत्ता'च्या दुसऱ्या खडात केले आहे. महाराजाना अमेरिकेंतील लोकाच्या सभ्यतेचा नुकताच अनुभव आलेला होता, व अमेरिकन लोक हे इग्रजाचे चुलतबधू मानले जातात; त्यामुळें सभ्यतेच्या बाबतींत या आपल्या चुलतबधूच्याहून आपण फारसे मागें नाहीं, अशी खात्री पटविणारे महापुरुष इंग्लडातहि होते. त्यापैकींच मोर्लेसाहेब हे एक जीर्ण पुरुष होते. हिंदुस्थानातील सर्वात अधिक सुसस्कृत व प्रमुख राजे आपल्या भेटीला येत आहेत, तेव्हा त्याचें स्वागत करण्यासाठीं त्याना तोफाची सलामी देणें जरूर आहे,

"परतु मी शहराबाहेरच्या उपनगरात रहात असल्यामुळे तें कार्य करण्यासाठीं मजपाशीं चोरापासून सरक्षण करण्याकरिता जवळ बाळगलेला सहाबारी रिव्हॉल्व्हर मात्र आहे, असे मी त्याना सागितलें."

असला आचरट विनोद या भारतमत्र्यानीं आपल्या आत्मवृत्तात नमूद केला आहे! त्याबरोबरच आपल्या पाहुण्यापेक्षा कांहीं पानसाळे अगोदर जन्माला येण्याचा मान आपल्याला मिळालेला आहे, या परिस्थितीच्या जाणीवेनें

"मी या भेटींत गायकवाड महाराजाना कांहीं पितृतुल्य उपदेश केला,"

असेंहि त्यानीं लिहून ठेविलें आहे. अठरा वर्षांच्या वयापासून राज्यकारभारात पाव शतकपर्यंत मुरलेल्या राजपुरुषाला दोन तीन वर्षेहि प्रत्यक्ष



अमेरिकेंतील एक स्थल
खेचरावर बसलेले – महाराज, महाराणीसाहेब व कै. श्री रूपतराव
वाहनस्थ – कै. रा. दातार

तरीहि या सफरींत असताना बडोद्यातील राज्यकारभाराच्या बाबती त्याच्या मनात घोळतच असत, असें त्याच्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. कधीं राज्यातील 'सरदार मडळीस योग्य सरकारी कामाकडे लावण्याची व्यवस्था करण्याबद्दल,' तर कधीं 'राज्यातील परोपकाराच्या सार्वजनिक देणग्या देणाऱ्या उदार गृहस्थाच्या दातृत्वाचे चीज सरकारकडून करण्याची योजना करण्याबद्दल,' कधीं 'अस्पृश्य वर्गाच्या शिक्षणाची विशेष व्यवस्था करण्याबद्दल,' तर कधीं 'शहराच्या वस्तीमधील खुल्या भागातून बगीचे करून तेथें लोकाना हवा खाण्यासाठीं व करमणुकीसाठीं बसता येईल अशी व्यवस्था करण्याबद्दल,' अशा मामुली कारभाराबाहेरील अनेक गोष्टींसबधानें ते आपल्या अधिकाऱ्याना सूचना व हुकूम पाठवीत होते, असें त्याच्या पत्रावरून दिसून येतें अशा प्रकारें आजपर्यंतच्या त्याच्या सफरींतील सर्वांत लाबची ही सफर सपून ते त्या सालच्या नोव्हेंबर महिन्यात हिंदुस्थानास परत आले.

यानतरचीं दोन वर्षे त्यानीं येथेंच घालविलीं, व सन १९१० च्या मार्च महिन्यात ते पुन्हा सफरीस निघाले या खेपेस त्यानीं चीन व जपान पाहण्याचें ठरविले. त्यासाठीं ते प्रथम कोलबो येथें गेले, तेथून 'चायना' बोटींतून प्रवास करीत असता, वाटेंत ते पेनाग व सिंगापूर येथें उतरले होते. या दोन्ही शहरात अनेक प्रकारच्या फळाचें पीक विपुल होत असल्याचें त्याना आढळलें. येथील पावसाचें मान फार असून हवेंत ओलावाहि अतिशय असल्यानें, झाडावरून शेवाळें व बारीक वेली उगव लेल्या दिसत. सिंगापूर येथील गव्हर्नरचा बगला एका सुदर बागेंत असून शहरात सुदर रस्ते व वृक्षराजी आहेत शहराला पाण्याचा मुबलक पुरवठा असूनहि शहराच्या आरोग्यावर त्याचा अनिष्ट परिणाम मुळींच झालेला नाहीं. शहराच्या बाहेरचा सर्व प्रदेश म्हणजे एक मोठें वनच बनलें असून त्यातून सरळ, रुद व सुदर रस्ते आखून बनविले आहेत याच शहरीं जोहोरच्या सुलतानाचा राजवाडा आहे, त्याचें रबराचें फार मोठें उत्पन्न

अनुभव फारसा स्पृहणीय नव्हता. हिंदुस्थानातील लोक जंगली असून ते आफ्रिकेंतील रानटी लोकांहून फारसे अधिक सुधारलेले नाहींत व त्याच्या तील राजे लोकाजवळ अमूप संपत्ति असल्यानें, ते सदभिरुचीच्या अभावामुळें आपादमस्तक दागिन्यानीं मढलेले असतात, असल्या वेडगळ समजुती अमेरिकेंतील लोकात प्रचलित असल्यामुळें, त्याचें वर्तन प्रसंगीं अगदीं असभ्य व उद्दाम असें असे खाडिलकराच्या मानापमान नाटकातील लक्ष्मीधराप्रमाणें महाराजानीं हाताच्या सर्व बोटात आंगठ्या घातल्या नाहींत म्हणून तिकडील पुरुषानीं आपली निराशा झाल्याचें जाहिर केलें दरेक परस्थ मनुष्याच्या जाहिर व खासगी अशा सर्व गोष्टींबद्दलचे प्रश्न विचारून विचारून त्या चव्हाट्यावर आणण्याची चटक लागलेल्या तेथील वर्तमानपत्राच्या बातमी दाराना महाराजानीं फारसें उत्तेजन दिलें नाहीं, म्हणून चिडून जाऊन त्यातील एकानें तर काहीं खोटीं विधानें प्रसिद्ध केलीं, त्यामुळें त्याला फिर्यादीची जरब दाखवावी लागली फार काय पण सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या अशा या देशातील स्त्रियानीं तर आपल्या पुरुषावरहि ताण केली! त्या संबधाचा आपला अनुभव महाराणीसाहेबानीं 'सॅन्फ्रॅन्सिस्को कॅलिफोर्निया एक्झॅमिनर' पत्राच्या सन १९१० च्या सप्टेंबर मधील अकात एक लेख लिहून प्रसिद्ध केला, त्यात त्या म्हणतात –

" अमेरिकन स्त्रियाच्याजवळ मृदुता कोठें असेल, तर ती फक्त त्याच्या कपड्यात आहे त्याच्या अत करणात तिचा गधहि नाहीं त्या निर्दय व म्हणून असभ्य असतात फार काय त्या अगदीं अडाणी असतात कारण असें नसतें, तर त्यानीं आम्हाला 'तुम्ही ईस्ट इडियन आहात, कीं वेस्ट इडियन आहात, का अमेरिकन इडियन आहात, असे जगंगी प्रश्न केले नसते व केवळ आमचा पोषाख त्याच्याहून भिन्न पण अधिक सभ्य होता म्हणून आम्ही रस्त्यातून जात असतां एखाद्या सरकशींतील वाघाकडे डोळे वटारून पहावें, त्याप्रमाणें त्यांनीं आम्हाकडे पाहिलें नसतें "

योकोहामा येथे असताना उतावळीच्या कार्यक्रमामुळे तेथील ब्रिटिश परराष्ट्रीय वकील सर क्लॉड मॅकडोनल्ड याना भेटण्यास महाराजाना वेळ झाला नाहीं. यामुळें एक ल्हानसे वादळ उपस्थित झाले! सर क्लॉड याचा त्यामुळें गैरसमज झाला व त्यातच त्यानीं महाराज इंग्रजाविरुद्ध असल्याबद्दलच्या ऐकलेल्या हकीकतींची भर पडली. त्यामुळें त्याची मिजास जाऊन महाराजानीं आपणास भेटण्याचे मुद्दाम टाळलें, असा त्याचा ग्रह झाला, परतु पुढें त्याबद्दलचा खुलासा होऊन गैरसमजुतीचे निराकरण झाले. तथापि सर क्लॉड याच्या मनातील अढी गेली नाहीं, व यानतर जरी महाराजाच्या जपानच्या बादशहाशीं झालेल्या मुलाखतीच्या वेळीं ते तेथें हजर होते, तथापि एकदरींत त्याचें वर्तन थडच होतें! अशा प्रकारें अभाविन गोष्टींनी आपली गैरसमजूत करून घेण्यास काहीं इंग्रज अधिकारी कसे तयार असतात, याचा अनुभव महाराजाना काहीं नवीन नव्हता. असो.

नतर महाराज किओतो येथे गेले. हें शहर जपानची जुनी राजधानी असून, तेथील बादशहाचा राजवाडा व कित्येक देवळें फार प्रेक्षणीय आहेत. तेथें असतानाच बादशहा सातवे एडवर्ड निधन पावल्याची बातमी आली. किओतोहून ओसाका या प्रसिद्ध व्यापाराच्या शहरीं जाऊन नतर महाराज ता. १४ मे ला जपानची राजधानी टोकिओ येथें पोहोंचले. तेथें बादशाही पाहुणे म्हणून त्याची व्यवस्था ठेविण्यात आली होती व इंपीरिअल हॉटेल या भव्य वसतिगृहाचा काहीं भाग त्याच्यासाठीं स्वतत्र राखून ठेवण्यात आला होता. तेथें त्याची काउट ओकुमा या प्रसिद्ध राजकारणी पुरुषाशीं भेट झाली या पुरुषानें जपान देश सांप्रतच्या श्रेष्ठ दर्जाला आणण्याच्या कामीं पुष्कळसा भाग घेतला होता. त्याच्या ल्हानपणीं हा देश अगदीं मागासलेला असून, तो पाश्चात्य देशाच्या टोळधाडीच्या वळी पडण्याच्या बेतात आला होता. अशा वेळीं काउट ओकुमानीं व इतर देशभक्तानीं पाश्चात्य देशात विद्यार्थी म्हणून जाऊन

राजकारणाचा अनुभव नसलेल्या या पत्र-पंडितानें उपदेश करावा हें धाष्टर्य केवळ जेते लोकनाच येऊं शकतें! तथापि महाराजांनीं तिकडे फारसें लक्ष न देतां मोर्लेसाहेबांना ता. २१ सप्टेंबर रोजीं एक पत्र पाठवून त्यांत लिहिलें कीं,

"आपणास मी मागल्या वेळीं भेटलों, त्या वेळीं हिंदी संस्थानाच्या राज्यकारभाराबद्दल आपण मला माहिती विचारली, त्यावरून मी कांहीं टाचणें तयार करविलीं आहेत, तीं या सोबत पाठवीत आहे. माझें मत असें आहे कीं, संस्थानाची स्वाभाविक मार्गांनीं प्रगति होण्यासाठीं त्यांना सांप्रत आहे याहून अधिक स्वायत्तता दिली पाहिजे. कांहीं दिवसांपासून हिंदी संस्थानिकांचें एक मंडळ असावें, अशी कल्पना प्रचलित झाली आहे. जर योग्य तत्त्वावर रचलेलेंच असें एखादें मंडळ स्थापन होऊन त्याला पुरते अधिकार देण्यांत येतील, तर माझ्या मतें त्यापासून पुष्कळ फायदा होईल. हिंदी संस्थानासंबंधाचे प्रश्न अशा मंडळाकडून सोडविणें सुलभ होईल कारण त्यांतील सभासदांना आपल्या गरजांचें प्रत्यक्ष ज्ञान असतें. शिवाय अशा मंडळाच्या स्थापनेनें संस्थानिकांना समाधान होऊन, त्यांचा आत्मविश्वास वाढेल, व त्याच्यांत आपलें उच्च कर्तव्य चांगल्या रीतीनें पार पाडण्याबद्दल एक प्रकारची स्पृहणीय चढाओढ लागून राहील. त्याचप्रमाणें साम्राज्याच्या कल्याणाबद्दल व संरक्षणाबद्दलहि त्यांना अधिक कळकळ वाटूं लागेल. अखेर, त्यांचा एकमेकांशीं निकट संबंध येऊन, त्यांना आपआपल्या संस्थानांतील राज्यकारभाराची परस्परांशीं तुलना करण्याची संधि मिळून त्याच्यांतील मैत्रीहि वाढूं शकेल."

या पत्राबरोबरच त्यांनीं संस्थानिकांच्या मंडळाच्या योजनेसंबंधाचें एक टाचण पाठविलें. ही योजनाच सांप्रतच्या नरेंद्रमंडळाची मूळ कल्पना होय.

येणेंप्रमाणें महाराज तिकडील परिस्थितीचा अभ्यास करीत होते



जपानमधील ग्रूप

आहे. येथील घराची बांधणी सुंदर असून त्यांपैकीं कांहीं घरें या शहराच्या दलदलीमुळें उंच खांबांवर बांधलेली आहेत. पेनांगच्या पार्श्वभागीं एक टेकडी असून तिच्या माथ्यावर सुंदर बंगले बांधले आहेत. या प्रदेशांत पूर्वी जंगल असून जोहोरच्या सुलतानानें तो लागवडीस आणून आबाद केला असल्याचें महाराजांनीं एका पत्रांत लिहिलें आहे. त्याबरोबरच असे उद्गार काढण्यासहि ते चुकले नाहींत कीं,

"यावरून बुद्धिमान व उत्साही राजाला घोर अरण्याच्या व भिकार झोंपड्यांच्या जागींहि समृद्ध व भरभराटीला येणारीं शहरें कशीं उठवितां येतात, हें पाहून आश्चर्य वाटतें!"

पेनांगहून हाँगकाँग येथें जाऊन नंतर ते मकाव या पोर्तुगीज वसाहतीच्या शहरीं गेले. तेथील गव्हर्नर महाराजांना भेटण्यास आला होता. त्यानंतर ते कॅंटन या चिनी शहरीं गेले. तेथील रस्ते अरुंद, वाकडे व गलिच्छ असून त्यांतून माणसें, मेणे व गाड्या यांच्या गर्दीमुळें रस्त्यांतून अपघात टाळून चालणें मोठें कठिण पडतें. या शहरांत रेशमाचा व हस्तिदंताचा व्यापार मोठा आहे. कॅंटनहून ते परत हाँगकाँगला आले, तेथें त्यांना तेथील शीख समाजाकडून त्यांच्या मंदिरांत मानपत्र देण्यांत आलें. नंतर ते शांघायला गेले व तेथें एक दिवस थांबून पुढें नागासाकी या पहिल्याच जपानी शहरीं ते उतरले. तेथील शहरचा मेयर त्या शहरांतील नागरिकांच्या प्रतिनिधिमंडळासह महाराजांना सामोरा आला व त्यानें त्यांना कळविलें कीं, महाराज जपानांत असेपर्यंत जपानी सरकारनें त्यांना दिमतीस एक स्पेशल आगगाडी दिली आहे, तिचा महाराजांनीं उपयोग करावा. परंतु महाराजांनीं आगबोटीनें प्रवास करण्याचें ठरविलें व तेथून ते योकोहामाला जाऊन नंतर कोबे येथें गेले. तेथील इंडो-जपानीज सभेनें व हिंदी व्यापाऱ्यांनीं त्यांचा मोठा सत्कार केला. तेथें असतांना तेथून जवळच असलेलें कामाकुरा येथील डायाबुत्सचें मंदिर त्यांनीं पाहिलें. तेथील मूर्ति ४९ फूट उंच असून फारच प्राचीन असल्याचा त्या लोकांचा समज आहे.

उभ्याउभ्यानेंच झाली; कारण येथील शिष्टाचार असाच आहे, असें आमच्याबरोबर असलेले परराष्ट्रीय इंग्रज वकील सर मॅकडोनल्ड यांनीं आम्हांस सांगितलें. भेटीपूर्वी आम्हांला बाहेरच्या दिवाणखान्यांत बराच वेळ बसावे लागले. एकंदरीने ही मुलाखत साधारणतः औपचारिकच झाली. बादशहा व त्यांची पत्नी यांच्या अंगीं अजून पाश्चात्य देशांतील शिष्टाचार चांगलासा उतरल्याचें मला भासलें नाहीं."

ता. २४ रोजीं महाराजांना योकोहामा येथें राहणाऱ्या भारतीय व्यापाऱ्यांनीं हिंदी पद्धतीची मेजवानी दिली. त्या प्रसंगीं त्यांनीं महाराजांचें स्वागत करतांना त्यांच्या राजकार्याचा गौरव करून, त्यांनीं व्यापारवृद्धीला दिलेल्या उत्तेजनाचे कौतुक केलें. ता. ३० रोजीं महाराजांनींहि तेथील सर्व प्रसिद्ध लोकाना एक जंगी उपाहार दिला. नंतर ते जपानहून अमेरिकेंत आले व तेथील अनेक प्रमुख शहरीं ते गेले. नायगारा येथील प्रसिद्ध धबधबा पाहून ते न्यूयॉर्कला आले. तेथें हारवर्ड युनिव्हर्सिटींतील प्रसिद्ध पंडित लॅनमन्, वॅपस, वगैरे गृहस्थांच्या भेटी घेऊन ता. १२ जून रोजीं खान्याचे आमत्रण आल्यावरून ते अमेरिकेचे प्रेसिडेंट रूझवेल्ट यांच्याकडे गेले. याप्रमाणें अमेरिकेंतील प्रवास पुरा करून ते परत इंग्लंडला आले. तेथें पुन्हां एकदां त्यांनीं लॉर्ड मोर्ले यांची भेट घेतली. ता. १ ऑगस्टला बादशहांनीं त्यांना भेटीस बोलाविलें. त्यानंतर ऑक्स्फर्ड व केंब्रिज येथील विद्यापीठें त्यांनीं पुन्हां एक वेळ पाहिलीं. महाराज हे यापूर्वी इंग्लंडांत सात वेळां जाऊन आलेले होते व त्यामुळें तेथील पुष्कळ वजनदार लोकांना ते परिचित झाले होते. तरीहि त्यांच्यासंबंधानें इंग्रज लोकांत व वृत्तपत्रांत किती अज्ञान भरलें होतें, याचे जे अनेक नमुने त्यांना पहावयास सांपडले, ते फार गमतीचे होते. कांहींनीं त्यांच्यासंबंधानें असे लिहिलें कीं, 'त्यांचा सर्व तोफखाना सोन्याचा आहे,' तर दुसऱ्या कांहींनीं म्हटलें कीं, 'त्यांच्या बडोद्यांतील राजवाड्यांतील हवा उष्ण करण्यासाठीं विजेचें यंत्र ठेविलेलें आहे!' अगदीं अलीकडे म्हणजे गव्हर्नरपर्यंत

तेथून शास्त्रीय व लष्करी शिक्षण संपादन करून घेऊन स्वदेशाला परत गेल्यावर त्याचा परचक्रापासून बचाव करून त्याला उत्कर्षाला चढविलें. असे हे गृहस्थ महाराजाना 'स्वतंत्र वृत्तीचे, दृढनिश्चयी व व्यावहारिक ज्ञानानें पूर्ण असलेले' असे भासले, यांत नवल नाहीं

ता २१ मे रोजीं महाराजाना तेथील इंडो-जपानीज संस्थेतर्फे मानपत्र देण्याचा समारंभ झाला. त्यांत,

"आपल्या राज्यात आपल्या सूज्ञ व प्रेमळ कारकीर्दीत झालेल्या नैतिक व भौतिक प्रगतीचें आम्ही कौतुकानें अवलोकन करीत आहों तेथें सार्वजनिक आरोग्य व बांधकाम यात होत असलेली उन्नति आणि प्राथमिक व दुय्यम शिक्षण याचा होत असलेला उत्कर्ष, यामुळें आपलें बडोदें राज्य इतराना आदर्श झालें आहे व आपल्या उदार, सहानुभूतिपर व सुबुद्ध राज्यव्यवस्थेमुळें आपण आमच्या आदराला व प्रेमाला पात्र झाला आहात,"

असा महाराजाचा गौरव केला होता

त्याला उत्तर देताना महाराजानीं आपलें नेहमींचें सूत्रवाक्य बोलून दाखविलें कीं,

"पाश्चात्य राष्ट्रानीं ज्या नव्या सुधारणेचा अवलंब केला आहे, तिचाच स्वीकार आपण केला नाहीं तर आपण मागें पडू तथापि सर्वच पाश्चात्य गोष्टींचें अंधानुकरण करणें हें अर्थातच वेडेपणाचें होईल तसें न करता तुमच्याप्रमाणें दोहोंतील चागल्या गोष्टींचा स्वीकार करणें हाच खरा उन्नतीचा मार्ग होय"

ता २३ रोजीं महाराजाना जपानच्या बादशहाकडून खास आमंत्रण आल्यावरून ते राजवाड्यात त्यांच्या भेटीसाठीं गेले त्या प्रसंगाची हकीकत महाराजानीं स्वत खाजगीरीत्या लिहून ठेविली आहे –

"आम्हीं सकाळीं दहा वाजता बादशहा व बादशाहीण यांची भेट घेतली ते दोघेहि वृद्ध व जर्जर झाल्यासारखे दिसत होते. भेट

च्या फेब्रुआरी महिन्यात बडोद्याजवळ असलेल्या रणोली गावीं आर्यसमाजाचे एक मोठें संमेलन भरविण्यात आले होतें, त्या प्रसंगीं त्यांना विनंति करण्यात आल्यावरून त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारिलें होते. त्यात त्यांनीं आपले धर्मविषयक विचार विस्तृतपणानें सांगितले. तसे करताना ते म्हणाले —

"आपल्या सांप्रतच्या धर्मविषयक कल्पनांमुळे आपल्या हातून होणाऱ्या तद्विषयक चुका कमी होण्याऐवजीं अधिक होतात. यासाठीं शब्दप्रामाण्यावर कमी आधार ठेवून आपल्या तर्कावर व बुद्धीवर अधिक भिस्त ठेवण्यास आपण शिकलें पाहिजे असें केलें तरच आपली सामाजिक व राष्ट्रीय सुधारणा ही केवळ स्वप्नवत् न ठरता खरी ठरेल. कोणत्याहि समाजाची राजकीय प्रगति ही त्याच्या सामाजिक व धार्मिक आचरणावर अवलंबून असते. ज्या समाजात आपआपसात द्वेष व झगडे चालू आहेत, त्याची राजकीय दृष्ट्या उन्नति होण्याची आशाच नको. प्रजेंत एकी व ज्ञान याची वृद्धि झाल्यास, त्याच्या मागोमाग सुराज्य खात्रीनें येईल. जर कोणत्याहि देशाच्या सरकारात प्रजेच्या जातीच्या लोकाचा भरणा असूनहि, ते सरकार आपल्या प्रजेबद्दल सहानुभूतिपर नसेल, तर तो दोष प्रजेचाच आहे. यासाठीं आपल्यातील दोष काढून टाकून तुम्ही आपली सुधारणा कराल, तर तुमच्या उन्नतीच्या प्रयत्नाच्या आड सरकार कधींहि येणार नाहीं."

वस्तुत या उद्गारात आक्षेपार्ह असें काहींच नव्हतें परंतु आर्यसमाज ही संस्था त्या काळीं इंग्रज सरकारच्या संशयाला व रोषाला पात्र झालेली असल्यामुळें, अशा संस्थेच्या धार्मिक संमेलनात भाग घेणे हेंहि त्यांना आवडलें नाहीं, व त्यामुळें महाराजावर पुढें जें काहूर उठलें, त्यात हा प्रसंगहि काहीं अंशीं कारणीभूत झाला. तथापि यासंबंधाची हकीकत पुढें येणार असल्यामुळें, त्याबद्दलचें विवेचनहि योग्य स्थळीं येईल.

यानंतर थोड्याच दिवसांनीं ब्रिटनचे बादशाहा पांचवे जॉर्ज याच्या राज्याभिषेकाच्या समारंभासाठीं महाराजांना आमंत्रण आल्यावरून, त्यांना

तेथून शास्त्रीय व लष्करी शिक्षण संपादन करून घेऊन स्वदेशाला परत गेल्यावर त्याचा परचक्रापासून बचाव करून त्याला उत्कर्षाला चढविलें. असे हे गृहस्थ महाराजाना 'स्वतंत्र वृत्तीचे, दृढनिश्चयी व व्यावहारिक ज्ञानानें पूर्ण असलेले' असे भासले, यात नवल नाहीं.

ता. २१ मे रोजीं महाराजाना तेथील इंडो जपानीज सस्थेतर्फे मानपत्र देण्याचा समारंभ झाला. त्यात,

"आपल्या राज्यात आपल्या सूज्ञ व प्रेमळ कारकीर्दीत झालेल्या नैतिक व भौतिक प्रगतीचें आम्ही कौतुकानें अवलोकन करीत आहों. तेथें सार्वजनिक आरोग्य व बांधकाम यात होत असलेली उन्नति आणि प्राथमिक व दुय्यम शिक्षण याचा होत असलेला उत्कर्ष, यामुळें आपलें बडोदें राज्य इतराना आदर्श झालें आहे व आपल्या उदार, सहानुभूतिपर व सुबुद्ध राज्यव्यवस्थेमुळें आपण आमच्या आदराला व प्रेमाला पात्र झाला आहात,"

असा महाराजाचा गौरव केला होता.

त्याला उत्तर देताना महाराजानीं आपलें नेहमींचें सूत्रवाक्य बोलून दाखविलें कीं,

"पाश्चात्य राष्ट्रांनीं ज्या नव्या सुधारणेचा अवलंब केला आहे, तिचाच स्वीकार आपण केला नाहीं तर आपण मागें पडूं. तथापि सर्वच पाश्चात्य गोष्टींचें अंधानुकरण करणें हें अर्थातच वेडेपणाचें होईल. तसें न करता तुमच्याप्रमाणें दोहोंतील चागल्या गोष्टींचा स्वीकार करणें हाच खरा उन्नतीचा मार्ग होय."

ता. २२ रोजीं महाराजाना जपानच्या बादशहाकडून खास आमंत्रण आल्यावरून ते राजवाड्यात त्याच्या भेटीसाठीं गेले. त्या प्रसंगाची हकीकत महाराजानीं स्वतः खालीलप्रमाणें लिहून ठेविली आहे –

"आम्हीं सकाळीं दहा वाजतां बादशहा व बादशाहीण याची भेट घेतली. ते दोघेहि वृद्ध व जर्जर झाल्यासारखे दिसत होते. भेट

गृहस्थाना प्रथमच भारतमंत्र्याच्या कौन्सिलच्या सभासदत्वाचा मान मिळाल्या-बद्दल त्याच्या अभिनंदनासाठीं महाराजाच्या अध्यक्षतेखालीं एक मोठा समारंभ करण्यात आला. त्या वेळीं त्यानीं केलेल्या भाषणात जरी अनेक मुद्याचें विवेचन करण्यात आलें होते, तरी त्यातील सर्वांत महत्त्वाचा मुद्दा हा होता कीं,

"जर हिंदी संस्थानातून युरोपियन अधिकाऱ्याची नेमणूक करण्यानें त्या संस्थानाचा फायदाच झाल्याचा अनुभव आजपर्यंत आला आहे, तर ज्याची बुद्धिमत्ता व कर्तृत्वशक्ति कसोटीला लागलेली आहे, अशा लायक हिंदी गृहस्थाची ब्रिटिश हिंदुस्थानातील राज्यकारभाराच्या महत्त्वाच्या जागावर नेमणूक करण्यास हिंदुस्थान सरकारनें भिण्याचें काहीं कारण नाहीं."

ता. २२ जुलै रोजीं महाराजाची जॉर्ज बादशहाशीं बकिंगहॅम राजवाड्यात भेट झाली, व ता. २६ जुलै रोजीं त्या काळचे उदयोन्मुख राजकारणी पुरुष मि. लॉइड जॉर्ज याचीहि भेट झाली

यानतर ता २८ जुलै रोजीं एक फार महत्त्वाचा समारंभ घडवून आणिला गेला. लंडन युनिव्हर्सिटीच्या मुख्य दिवाणखान्यात पृथ्वींतील अनेक देशातील सरकार, राजे, मुत्सद्दी व विद्वान याच्या आश्रयानें व मदतीनें जागतिक परिषदेचें पहिलें अधिवेशन भरविण्यात आलें. हा समारंभ जगात अपूर्व होता व अशा प्रसंगींहि महाराजाना सर्वानुमतें अध्यक्षस्थान देण्यात आलें, यावरून त्याची योग्यता या वेळीं कशी सर्वमान्य झाली होती हें दिसून येतें या वेळीं आपल्या अध्यक्षीय भाषणात महाराजानीं प्रथम उपोद्घात करताना म्हटलें कीं,

"आजचा प्रसंग हा अशा दृष्टीनें अपूर्व आहे कीं, सर्वजातीय परिषद भरविण्याची कल्पना विचारी पुरुषाच्या डोक्यात फार वर्षे पासून घोळत असली, तरी व्यावहारिक राजकारणात तिला स्थान मिळण्याचा हा पहिलाच प्रसंग आहे."

कलकत्ता शहर हें मद्रास प्रान्तात आहे, असें विधान करण्यापर्यंत ज्याची अगाध विद्वत्ता धावली, त्यांनी तीस वर्षांपूर्वी आपल्या ज्ञानाचे असे तारे तोडावे, यात नवल नाहीं. प्रवासात अनेक मौजेचे अनुभव येतात, त्यांतील विनोदाचे विषय जसे कधीं कधीं इंग्रज लोक होतात, तसे कधीं कधीं तेथें गेलेले हिंदी लोकहि होतात. या सफरींत अशीच एक गमत महाराजांना पहावयास सापडली. हिंदुस्थानातील एका लहानशा संस्थानाच्या राजांनीं एक मोटरगाडी विकत घेतली होती, व ती स्वत चालविण्याची त्यांना फार हौस असे. परतु तसें करण्यास अवश्य इतकें ज्ञान त्यांना नसल्यामुळें, त्याच्या मोटरीच्या चाकांना वारवार पक्चर होऊं लागलें. त्यामुळें ती खटखट कायमची काढून टाकावी म्हणून त्या राजश्रींनीं आपल्या मोटरच्या पुढील भागास दोन पोळ लावून त्यांना एक म्हातारा घोडा जुपला, व त्यात बसून ते लडनच्या रस्त्यातून चैनींत हिंडू लागले !

याच सुमारास हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलच्या जागीं लॉर्ड हार्डिज याची नेमणूक झाली होती. म्हणून महाराजांनीं त्याची भेट घेतली, व नतर ते हिंदुस्थानास परत येण्यास निघून नोव्हेंबरअखेर मुंबईला येऊन पोंहचले तेथें त्यांना आर्यन् ब्रदरहुड या सस्थेनर्फे एक मेजवानी देण्यात आली त्या प्रसगीं सर नारायणराव चदावरकर यांनीं महाराजांच्या स्वागत-पर भाषण करून, त्यात त्यांच्या सामाजिक सुधारणेच्या प्रयत्नाबद्दल उल्लेख केला होता त्याला उत्तर देताना महाराज म्हणाले कीं —

"आपल्या पुढील सर्वांत श्रेष्ठ ध्येय म्हणजे हिंदुस्थानात एक राष्ट्रीयत्व निर्माण करणें हें होय. तें करण्यास सर्वांच्या भावना सारख्या असल्या पाहिजेत व तशा त्या होण्यास त्यांच्यात सामाजिक व्यवहार सुरू झाला पाहिजे. सार्वजनिक कार्यांत स्त्रियांनीं भाग घेऊं लागणें, हें मी आपल्या प्रगतीचें लक्षण समजतों; कारण त्या योगानें पुरुषात दाक्षिण्य व सभ्यता हीं येतील."

यानंतर महाराज काहीं दिवस बडोदें येथें राहिले. पुढें सन १९११









• महाराजांच्या मध्यकालातील दुसरे चार दिवाण—

१ रा. रामचंद्र विठोबा धामणस्कर (इ स १९०१–१९०४)

२ रा. खरशेदजी रुस्तुमजी दादाचानजी (इ स १९०४–१९०९)

३ मि. सी. एन्. सेडन (इ स १९०९–१९१२)

४ मि. रमेशचंद्र दत्त (इ स जून १९०९ व नाव्हेंबर १९०९)

लवकरच पुन्हा तिकडे जावें लागलें. त्यासाठीं ते ता. १९ एप्रिल १९११ रोजीं मॅन्टुआ बोटीनें मुंबईहून निघाले. प्रथम कांहीं दिवस इतर देशांत घालवून नंतर ते इंग्लंडास गेले. राज्याभिषेकाच्या निमित्तानें हजारों श्रीमंत व प्रसिद्ध लोकांनीं लंडन येथील चांगलीं घरें आधींच अडकवून ठेविल्यामुळें, या प्रसंगीं चांगलें घर मिळविण्यास महाराजांना बरीच अडचण पडली. तथापि अखेर एक घर मिळालें. राज्याभिषेकाच्या पूर्वीच्या अवधींतहि महाराजांचा कार्यक्रम भरपूर होता. त्यांतच नवीन भारतमंत्री लॉर्ड क्रयू यांची त्यांनीं भेट घेतली. बादशहाच्या राज्याभिषेकाचा मुख्य समारंभ ता. २२ जून रोजीं वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें ठेविण्यांत आला होता. तेथें खुद्द बादशहाच्या जागेपासून जवळच महाराजांसाठीं खुर्ची ठेविण्यांत आली होती. महाराज समारंभासाठीं त्यांचा नेहमींचा पांढरा शुभ्र व साधा पोषाख करून गेले. हा समारंभ तीन तासपर्यंत चालला होता. दुसऱ्या दिवशीं ता. २३ रोजीं बादशहाची लंडन शहरांतून मोठी मिरवणूक काढण्यांत आली होती व तींत हिंदी संस्थानिकांचें एक पथक ठेवण्यांत आलें होतें. त्याच्या अग्रभागीं दोन घोड्यांच्या गाडींत महाराज बसले होते. ही मिरवणूक सकाळीं सव्वानऊपासून दुपारीं सव्वातीनपर्यंत चालली होती. ता. २४ रोजीं स्पिटहेड येथें आरमारी पहाणी झाली. त्यासाठीं 'मगोलीया' बोटींतून किनाऱ्यापासून आठ दहा मैलावर लांब जाऊन हा देखावा पाहण्याची महाराजांसाठीं खास तजवीज करण्यांत आली होती. या जमावांत १६० ब्रिटिश लढाऊ जहाजें व १५ परदेशीय जहाजें गोळा करण्यांत आलीं होतीं. रात्रीं बरोबर साडे नऊ वाजतां एक खूण केल्याबरोबर एकदम विद्युत्प्रकाशानें हीं सर्व जहाजें दीपित करण्यांत आलीं, तो देखावा अत्यंत प्रेक्षणीय होता. ता. २७ रोजीं बकिंगहॅम राजवाड्यांत उद्यानोपहार देण्यांत आला. या सर्व प्रसंगीं महाराजांनीं हजर राहून हिंदी संस्थानिकांचें अग्रेसरत्व स्वीकारलें.

यानंतर ता. ८ जुलै रोजीं सर कृष्ण गोविंद गुप्त या विद्वान बंगाली

# प्रकरण ३२ वें



## असंतोषाची मीमांसा

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें महाराजांनीं केलेल्या सफरींच्या मध्यंतरींचा काल ते आपल्या राज्यांत घालवीत असत. तेथें असतांना राज्याच्या सर्व प्रांतांत फिरून प्रजेची स्थिति स्वतः अवलोकन करणें व चालू राजकारणी प्रकरणाचीं कामें करणें, हा त्यांचा नित्याचा कार्यक्रम चालूंच असे. त्यांतच व्हाईसरॉय, गव्हर्नर, राजेरजवाडे यांच्यासारख्या शिष्टांच्या आगमनाचीं नैमित्तिक कार्येंहि मधून मधून उपस्थित होतच असत. सन १९०८ च्या सुरवातीस मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क यांनीं वडोद्यास भेट दिली. त्यानंतर अनेक ठिकाणचे राजेहि येऊन गेले. पुढें सन १९०९ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत त्या वेळचे व्हाईसरॉय लॉर्ड मिंटो यांचें आगमन बडोद्यास झालें. यांच्यापूर्वींचे व्हाईसरॉय लॉर्ड कर्झन यांच्या येण्याचें बरेच दिवस घाटत असूनहि त्यांचें येणें अखेर झालेंच नाहीं, याबद्दलची हकीकत मागें येऊन गेलीच आहे. कर्झन-साहेबांची कारकीर्द साडेसात वर्षेंपर्यंत चालली व त्यानंतर लॉर्ड मिंटो त्या जागेवर येऊन चार वर्षे झालीं होतीं. लॉर्ड कर्झन यांच्यापूर्वींचे व्हाईसरॉय लॉर्ड एल्जिन् हे सन १८९६ सालीं वडोद्यास आले होते. तेव्हांपासूनच्या तेरा वर्षांत कोणीहि व्हाईसरॉय वडोद्यास आले नव्हते.

यानंतर मुख्य विषयासंबंधानें ते म्हणाले कीं,

"जगतांतील मानवसमाजविषयक प्रश्न कांहीं नवीन नाहींत; पण म्हणून ते सोडविण्यास सोपे आहेत असेंहि नाहीं व त्यांतील मुख्य प्रश्न हा तर सर्व जातींना व सर्व लोकांना लागू पडेल असाच आहे. तो हा कीं, विचार व विकार यांची तडजोड कशी करावी. पुष्कळ वेळा आपलें योग्य कर्तव्य करण्यास आपली बुद्धि आपणास शिकविते, परंतु त्याप्रमाणें आचरण करण्यास आपलें मन कचरतें. तथापि मला अशी आशा आहे कीं, सांप्रत सर्वत्र जागृत होत असलेल्या सदसद्विवेकबुद्धीच्या सहाय्यानें सर्वांबद्दल प्रेम व सहकारिता हीं उत्पन्न होऊन, त्यामुळें हा मुख्य प्रश्न सोडविण्यास आपल्यास मदत होईल. जेथपर्यंत सर्व मनुष्यजातीविषयीं एकत्वाची भावना आपल्यांत येऊं शकणार नाहीं, तेथपर्यंत आपले दुराग्रह नाहींसे होणार नाहींत. यासाठीं जर आपल्यांतील फरक एकमेकांशीं न झगडतां आपण समजूं शकूं व सहानुभूतीनें एकमताच्या बाबतींत सहकार्य करूं शकूं, तरच हा प्रश्न सुटेल "

परंतु महाराजांची ही आशा किती फोल होती हें यानंतर लवकरच जागणाऱ्या जागतिक युद्धानें ठरणार होतें. या प्रसंगीं भिन्न भिन्न जातींविषयींचें प्रेम दूरच राहो, परंतु स्वज्ञातींतील पण परराज्यांतील लोकांचेहि गळे स्वार्थामुळें कसे लाखोंनीं कापण्यांत आले हें पाहिलें, म्हणजे जगताच्या आरंभापासून 'विचारी पुरुषाच्या मनांत घोळत असलेलें हें ध्येय' जगाचा अंत होईपर्यंत पुढें केव्हांहि अमलांत येईल कीं काय, याबद्दल शंका वाटल्यावाचून राहत नाहीं असो.

या परिषदेनंतर स्कॉटलंडांतील सेंट अँड्र्यूज येथील विद्यापीठाच्या पंचशतवार्षिक उत्सवासाठीं आमंत्रण आल्यावरून महाराजांनीं तेथें जाऊन एक लहानसें भाषण केल्यावर, हिंदुस्थानांत परत येण्याची त्यांनीं तयारी केली, व लंडन सोडून ता. १० नोव्हेंबर रोजीं ते मुंबईस येऊन पोहोंचले.

—०—

"I do not argue that public opinion here is to be bowed to No one has more consistently defied it in some matters than I ' [1]

"लोकमतापुढे मान वाकवावी असें माझें म्हणणेंच नाहीं किंबहुना काहीं बाबतींत माझ्याइतकी लोकमताची बेपर्वा कोणीच केली नसेल !"

व त्यामुळें त्यांनीं आपला आग्रह तसाच चालवून सन १९०५ सालीं बंगालची फाळणी करण्याचा हुकूम सोडला व त्याची अमलबजावणीहि करून टाकिली! एका सबंध प्रांताचें लोकमत धाब्यावर बसवून राज्याधिकाऱ्यानें आपला हट्ट तडीस नेला, या गोष्टीनें बरींच वर्षे जागृत होत असलेले बंगाली पुढारी एकदम प्रक्षुब्ध झाले, व त्यांनीं सरकारच्या या कृत्याला तोंड देण्यासाठीं म्हणून स्वदेशी व बहिष्कार या शस्त्राचा अवलंब केला त्याचबरोबर आज बंगालचा अपमान झाला, तर उद्या दुसऱ्या प्रांताचा होईल, यासाठीं सर्व प्रांतानीं संघटित रीतीनें या सरकारी अरेरावीचा प्रतिकार करावा, अशी बंगालनें त्यांना विनंति केली व राष्ट्रीय सभेमुळें उत्पन्न झालेल्या एकराष्ट्रीयत्वाच्या चळवळीचा परिणाम होऊन इतर प्रांतानींहि बंगालला या वेळीं साथ दिली या योगानें सर्व हिंदुस्थान देशभर असंतोषाची लाट पसरली तिचा दृश्य परिणाम म्हणून सन १९०५ सालीं बनारस येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात नामदार गोखले यांच्यासारख्या नेमस्त पुढाऱ्याच्या अध्यक्षतेखालींहि स्वदेशी व बहिष्काराचे ठराव पास करण्यात आले

त्यापुढील सालचें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन कलकत्ता येथें भरविण्यात आलें व त्यासाठीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याकरिता रा दादाभाई नौरोजी या राजकीय वृद्ध पितामहाना मुद्दाम विलायतेंतून बोलावण्यात येऊन त्यांच्या नेतृत्वाखालीं स्वराज्य हें हिंदुस्थानचें अंतिम ध्येय असल्याचा ठराव पसार

१ Ronaldshay s ' Life of Lord Curzon Vol II p. 328

चाळू परिस्थितीबद्दलचे असमाधान हा या शिक्षणाचाच नैसर्गिक परिणाम होता. या गोष्टीचे प्रत्यंतर हवें असल्यास त्या वेळचे व्हाईसरॉय लॉर्ड मिंटो याचे स्वत चेच उद्गार म्हणून देता येतील. त्यानीं भारतमत्र्याच्या समतीनें हिंदुस्थानातील कौन्सिलातून हिंदी प्रातिनिधिक लोकमत कसे वाढविता येईल याचा विचार करण्यासाठीं एक कमिटी नेमली, त्या वेळीं त्यानीं लिहिलें कीं,

"The growth of education, which British rule has done so much to encourage, is bearing fruit Import ant classes of population are learning to realise their own position, to estimate for themselves their own intellectual capacities and to compare their claims for an equality of citizenship with those of the ruling race, whilst the directing influences of political life at home are simultaneously in full accord with the advance of political thought in India "

"शिक्षणाच्या वाढीला उत्तेजन देण्याचे इग्रजी राज्याने आजपर्यंत जे प्रयत्न केले आहेत, त्याना आता फळें येत आहेत. साप्रत काळीं देशातील महत्वाचे लोक आपल्या स्वत ची परिस्थिति ओळखण्याला, आपल्या बौद्धिक सामर्थ्याचा अदाज काढण्याला व नागरिकत्वाचे समान हक्क मिळविण्याच्या दृष्टीनें राज्यकर्त्यांशीं आपली तुलना करण्याला शिकत आहेत. अशा रीतीनें हिंदुस्थानात जी विचारक्राति होत आहे, तिला पोषक अशीच खुद्द इग्लडातील विचाराची दिशा आहे."

अशा प्रकारें तत्कालीन विचारक्रातीची मीमासा करून लॉर्ड मिंटो यानीं प्रचलित असतोषासबधानें आपला अभिप्राय असा व्यक्त केला कीं,

"Beneath a seemingly calm surface, there existed a mass of smothered political discontent, much of which was thoroughly justifiable, and due to causes which we were bound to examine "[१]

[१] 'Lord Minto' by John Buchanan p. 231

त्यामुळें लॉर्ड मिंटो यांच्या स्वागताचा समारंभ थाटाचा करण्यात आला. शिवाय त्या काळीं सर्व हिंदुस्थानभर चाई असलेल्या नव्या चळवळीची छाया बडोद्यावर पडलेली नसल्यामुळेंहि येथील वातावरण स्वच्छ असेंच होतें. यानंतर लवकरच बडोद्याच्या वातावरणात मोठें वादळ उपस्थित झालें, त्याची हकीकत पुढें येईलच; परंतु त्याचें पूर्वचिन्ह अजून दिसू लागलें नसल्यामुळें वाह्यत तरी बडोदें या हिंदुस्थानच्या 'पश्चिम आघाडीवर सामसूम' (All quiet on the Western Front) च होती. मात्र ब्रिटिश हिंदुस्थानात या काळीं सर्वत्र असंतोष पसरल्याचा निनाद ऐकू येत होता. त्याचाच प्रतिध्वनि पुढें बडोद्यास उमटला; तो कसा तें जाणण्यासाठीं तत्कालीन परिस्थितीचें थोडेंसें अवलोकन केलें पाहिजे.

लॉर्ड कर्झन हे एक अपूर्व कर्तृत्वाचे पुरुष होते, व त्या कर्तृत्वाच्या जोरावर आपण हिंदुस्थानात काहीं तरी अपूर्व कार्य करून दाखवून वॉरन् हेस्टिंग्स्, डलहौसी वगैरे सारख्या आपल्या पूर्वीच्या पराक्रमी इंग्रज राजकारणी पुरुषांच्यावर ताण करून दाखवावी, अशी महत्त्वाकांक्षा त्यांनीं बाळगली होती. हिंदुस्थानचा त्या काळचा राज्यकारभार फार ढिलाईनें चालला आहे, यासाठीं त्याच्यात नवीन जोम उत्पन्न करून त्याला नवीन वळण लावलें पाहिजे, अशा निश्चयानें त्यांनीं सर्व अधिकाराचें केंद्रीकरण मध्यवर्ती सत्तेच्या हातात करण्याचा प्रयत्न चालविला होता; व त्याकरिता जरूर ते उपाय ते योजीत होते. त्याच्या मतें अशा उपायांपैकींचा एक उपाय बंगालची फाळणी हा होता. वस्तुत या योजनेनें बंगाली लोकमताचा उपमर्द करावा, असा त्याचा मूळ हेतु नसेलहि; परंतु ही त्याची योजना प्रसिद्ध झाल्याबरोबर तिजविरुद्धचें आपलें मत बंगाल प्रांतानें सनदशीर मार्गानें पण सुसंघटित रीतीनें व्यक्त केलें. तरी लॉर्ड कर्झन याना एकदा आपण आपला संकल्प जाहिर केल्यावर मग माघार घेणें हें कमीपणाचें वाटलें. याचा पुरावा त्याच्या पत्रातच मिळतो. त्यांनीं भारतमंत्र्याना लिहिलेल्या एका पत्रात अशी प्रौढी मिरविली आहे कीं,

India cannot be prolonged without damage to her national life, . . . . . that the placid, pathetic contentment of the masses is not a soil on which the Indian Nation would grow, and that in deliberately disturbing it, we are working for her highest goal."

"शिक्षणामुळें व अनुकूळ संधीमुळें प्रथमतः अस्पष्ट असलेल्या हिंदी लोकांच्या आकांक्षांना कसें उत्तेजन दिलें गेलें आहे, हें आतांपर्यंत आम्हीं दाखविलेंच आहे....आमचा असा संपूर्ण विश्वास आहे कीं, आम्हीं हिंदुस्थानाला आजपर्यंत आमच्या संरक्षणाच्या सावलींत ठेविलें होतें; तो काळ आतां अधिक लांबविल्यास त्या देशाच्या राष्ट्रीय जीवनाला धोका येण्याचा संभव आहे. त्या देशांतील खालच्या वर्गाच्या लोकांत जो निश्चेष्ट व करुणास्पद संतोष वसत आहे, त्या भूमीवर त्यांच्या राष्ट्रीयत्वाचा वृक्ष वाढूं शकणार नाहीं व म्हणून जाणूनबुजून त्या संतोषाचा भंग करण्यानें आम्ही त्या देशाचें खरें कल्याणच करीत आहोंत."

वरील उताऱ्यावरून विचारी व धोरणी पुरुष अशा प्रश्नांकडे कोणत्या दृष्टीनें पाहत होते हें समजून येईल. या सर्व धोरणी पुरुषांच्या गुरुस्थानीं शोभणारा इंग्रज मुत्सद्दी एडमंड बर्क याची राष्ट्रीय असंतोषाची मीमांसा अशा प्रसंगीं फार मननीय आहे. तो म्हणतोः—

"आपण ज्या काळांत राहतों, त्यांतील परिस्थितीबद्दल तक्रार करणें, अधिकारी वर्गाविषयीं कुरकुर करणें, गतकालाबद्दल खेद करणें, व भविष्यकालाबद्दल अमर्याद आशा करणें, हा मनुष्यजातीचा सर्वसाधारण स्वभाव आहे, व तो अज्ञान आणि उथळ विचार यांचा दर्शक आहे. अशा तक्रारी सर्व कालीं करण्यांत येतात. तथापि सर्व काळ सारखे नसतात, यामुळें वरील प्रकारच्या सर्वसाधारण तक्रारी कोणत्या व सांप्रतच्या परिस्थितीचीं निदर्शक अशीं विशेष कारणें कोणतीं, या दोहोंतील फरक समजणें यालाच खरा राजकीय दूरदर्शीपणा

करण्यांत आला. इतकें झालें तरी सरकार आपला निश्चय बदलीना व दुसरीकडे लोकांतील असंतोषहि कमी होईना; उलट तो वाढतच जाऊन आपआपल्या मनाच्या कमीअधिक तीव्रपणामुळें त्या काळच्या राजकारणी पुरुषांत नेमस्त व जहाल असे उघड उघड दोन पक्ष झाले. त्याचा झगडा सन १९०७ सालीं सुरत काँग्रेसच्या वेळीं अध्यक्षाच्या निवडणुकीच्या निमित्तानें निकराला येऊन त्याचें पर्यवसान मारामारींत झालें, व काँग्रेसची बैठक मोडली जाऊन एक पक्ष तिच्यांतून फुटून निघून गेला. अशा प्रकारें या वादाला आलेलें बाह्य स्वरूप जरी तत्कालीन राजकीय प्रश्नाच्या व व्यक्तींच्या भोंवतीं घुटमळत होतें, तरी त्याचें मूळ प्रस्तुत परिस्थितीबद्दलच्या असंतोषांत होतें. सुमारें एक शतकाच्या इंग्रजी शिक्षणानें लोकांना इंग्रजी राजकारणाचा चांगलाच परिचय झाला होता, व त्याच्यातील प्रजासत्ताक राज्यपद्धतीबद्दल आदर वाटू लागून, ती पद्धति आपल्या देशाला लागू व्हावी अशी महत्त्वाकांक्षा त्याच्यांत उत्पन्न झाली होती, व तिच्यामुळेंच सर्व देशभर जोरानें चळवळ सुरू झाली होती.

परंतु या महत्त्वाकांक्षेमुळें सुरू झालेल्या सनदशीर चळवळीबरोबरच दुर्दैवानें कांहीं निकारवश तरुणांचा एक वर्गहि या सुमारास उत्पन्न झाला व त्यानें निराशेच्या भरांत सरकारी अधिकाऱ्यांविरुद्ध अत्याचार करण्यास सुरुवात केली. अर्थातच ही अत्याचारी प्रवृत्ति देशहिताला विघातक होती व तिचा निषेध करणें जितकें आवश्यक होतें, तितकेंच योग्य आणि कायदेशीर चळवळीला प्रतिबंध न होईल अशी खबरदारी घेणें हेंहि अवश्य होतें. परंतु या दोहोंमधील फरक लक्षांत घेऊन विवेचक बुद्धीनें वागणें हें त्या काळीं फार कठिण झालें होतें. वस्तुतः जबाबदार इंग्रज मुत्सद्यांनीं ही गोष्ट अनेक वेळां कबूल केली आहे कीं, हिंदी लोकांत स्वराज्याचे हक्क मिळविण्याची आकांक्षा उत्पन्न होण्यास इंग्रजी शिक्षण हेंच सर्वस्वीं कारणीभूत झालें आहे. अर्थात् आपण दिलेल्या शिक्षणामुळें उत्पन्न झालेल्या इच्छेला आपणच विरोध करणें हें सर्वस्वीं विसंगत होतें, कारण

प्रगल्भ होतात व त्याची महत्वाकांक्षा वाढते, आणि ती साध्य करून घेण्याच्या इच्छेमुळें चालू परिस्थितीविषयीं त्याचे मनांत स्वाभाविक रीतीनें असंतोष उत्पन्न होतो. परिस्थितींत सुधारणा होण्याच्या शक्यतेची जाणीव, हें प्रगतीचें चिन्ह आहे. याच्या उलट असंतोषाचा पूर्ण अभाव हा अपकर्षाची खूण होय. जर या असंतोषानें कोठें राजद्रोहाचें रूप धारण केलें असेल, तर तो शिक्षणाच्या सदुपयोगाचा परिणाम नसून, दुरुपयोगाचा परिणाम होय. कारण ज्या शिक्षण-पद्धतीनें अत्याचाराला व गुन्ह्याला उत्तेजन मिळतें, ती शिक्षणपद्धतीच सदोष आहे. नुकतेच हिंदुस्थानांत व इंग्लंडांत जे अत्याचार करण्यांत आले, त्यामुळे सर्वांच्या अंतःकरणांत संतापाची उर्मि उसळली आहे. ज्यांच्यावर माथेफिरू अत्याचारी लोकांनीं घाला घातला आहे, त्यांनीं आपलें कर्तव्य करण्यांत आपलें सर्व आयुष्य वेचलें आहे. अशा गुन्ह्यांचें उन्मूलन करणें हें अर्थातच दरेक सुधारलेल्या सरकारचें कर्तव्य आहे. परंतु अशा अत्याचाराचे समूळ निर्मूलन करण्यास व तशा प्रवृत्तीचेंच उच्चाटण करण्यास तिच्या खऱ्या मूळ कारणांचें शोधन करून तीं कारणें नाहींशीं करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सुदैवानें बडोद्यास या अनिष्ट प्रवृत्तीचा उपसर्ग लागलेला नाहीं. माझ्या राज्यांत राजद्रोह व अत्याचार यांना अवकाश नाहीं. माझी प्रजा शांतताप्रिय, कायद्यांचे पालन करणारी व आपल्या व्यवसायांत उद्युक्त अशी आहे. गेल्या तीस वर्षेपर्यंत माझ्या प्रजेचा मला निकट परिचय आहे व त्यांच्या सूज्ञपणावर माझा पूर्ण विश्वास आहे, आणि माझी अशी उमेद आहे कीं, तोच सूज्ञपणा त्यांना अविचारापासून व अत्याचारां-पासून दूर ठेवील आणि येथील सरकारला त्यांच्यावर नियंत्रण घालण्याची जरूरी भासणार नाहीं."

याच सुमारास ब्रिटिश हिंदुस्थानांत नवीन राजकीय सुधारणांचा कायदा मंजूर करण्यांत आला. त्या सुधारणा 'मोर्ले-मिंटो सुधारणा'

" ब्राह्मन शान दिसणाऱ्या पृष्ठभागाच्या खालीं दडपला गेलेला राजकीय असंतोष भरून राहिला आहे त्यांपैकीं चा पुष्कळसा भाग अगदीं योग्य व न्याय्य असून, त्याचा विचार करणें आपलें कर्तव्य आहे "

याच मताचा अनुवाद त्या वेळचे भारतमंत्री लॉर्ड मोर्ले यांनीहि केला आहे त्यांना आपल्या आठवणींच्या दुसऱ्या खंडाच्या १५४ पानावर लिहिलें आहे कीं,

The danger arose from a mutiny not of sepoys about greased cartridges but of educated men armed with modern ideas supplied from the noblest arsenals and proudest trophies of English literature and English oratory The fairly educated Indians were thoroughly dissatisfied with the old order of things

Even those who doubted, recognised signs that the time had come for turning a new page. "

"या काळीं जो धोका होता तो काडतुसांना चरबी लावल्याची तक्रार करणाऱ्या शिपायांच्या दंग्याचा नसून, इंग्रजी वाङ्मय व इंग्रजी वक्तृत्व या उदात्त हत्यारखान्यातील आधुनिक कल्पनांच्या शस्त्रास्त्रांनीं सज्ज झालेल्या सुशिक्षित लोकांच्या असंतोषाचा होता या सुशिक्षित हिंदी लोकांच्या मनात चालू परिस्थितीविषयीं पूर्ण असंतोष उत्पन्न झाला होता त्यामुळे संशयात्मे लोकानाहि कबूल करून चुकलें कीं सुधारणा करण्याचा काळ आता जवळ येऊन ठेपला आहे " अशाच अर्थाचे उद्गार पुढें सन १९१९ सालचे भारतमंत्री मि मॅन्टेग्यु यांनीहि त्या वेळच्या सुधारणांच्या अहवालाच्या पृष्ठ ९२ वर काढले आहेत त्यात ते म्हणतात –

' We have shown how impulses at first faint, have been encouraged by education and opportunity We believed profoundly that the time has now come when the sheltered existence which we have given

## सूची

—*—

म्हणतात. अधिकारी व प्रजा यांच्या वादांत प्रजेची चूक कधींच होत नाहीं, असें म्हणणारांपैकीं मी नाहीं. उलट प्रजेच्या हातून अनेक प्रसंगीं घोर व अक्षम्य चुका होतात, असें माझें मत आहे. तथापि या उभय पक्षाच्या झगड्यांत दोघांचीहि जबाबदारी सममान असते, असें प्रथमदर्शनीं तरी धरून चालण्यास हरकत नाहीं. कदाचित् अनुभवानें याच्याहि पुढें जाऊन असें म्हणता येईल कीं, ज्या वेळीं प्रजेंत वारंवार असंतोष उत्पन्न होतो, त्या वेळीं त्या देशाच्या राज्यघटनेंत अथवा कारभारातच कोठें तरी चुकत असतें. प्रजेला दंगेधोपे करण्यापासून वस्तुतः कांहीं लाभ नसतो, व म्हणून ज्या वेळीं प्रजेच्या हातून गैरवर्तन होतें, त्या वेळीं तो त्याचा गुन्हा नसून, ती त्याची चूक होय, असें मानलें पाहिजे. म्हणून अशा प्रसंगीं परिस्थितीचें खरें निदान करून तिच्या सुधारणेची अचूक चिकित्सा सुचविणाऱ्या पुरुषानें देशाचें मोठें कार्य केल्यासारखें होईल."

या उद्गारांत राजकीय तत्त्वज्ञानाचें सारसर्वस्व उत्तम प्रकारें आलेलें आहे.

त्या काळीं हिंदुस्थानदेशभर चालू असलेल्या या विचाराचा अप्रत्यक्ष संसर्ग देशी संस्थानानांहि होणें अपरिहार्य होतें. म्हणून एक विचारी मुत्सद्दी व राजकारणी पुरुष या नात्यानें तत्कालीन असंतोषाची मीमांसा करण्याची संधि महाराजांनीं या सुमारास घेतली. नवीन विचाराचा प्रवेश विशेषतः विद्यार्थीवर्गांतच होत असल्यामुळें, महाराजांनीं सन १९०९ च्या सप्टेंबर महिन्यांत वडोदें कॉलेजच्या बक्षिससमारंभाचे वेळीं केलेल्या भाषणांत त्यांना उद्देशून म्हटलें कीं,

"अलीकडे असें म्हटलेलें कधीं कधीं आपल्या ऐकण्यांत येतें कीं, सांप्रतच्या राजकीय असंतोषाला शिक्षणाची प्रगति हीच सर्वस्वीं कारणीभूत आहे. परंतु असंतोष हा नेहमीं वाईटच असतो असें नाहीं. "असंतोष श्रियो मूलम्।" या म्हणीप्रमाणें केव्हा केव्हा तो उत्कर्षालाहि कारणीभूत होतो. शिक्षणानें मनुष्याचे विचार

लॉर्ड मिंटो यांच्या भेटीनंतर महाराजांनीं मागील प्रकरणांत सांगितल्या-प्रमाणें सन १९१० व १९११ सालीं परदेशाच्या दोन सफरी केल्या. यानंतर सन १९११ च्या डिसेंबर महिन्यांत बादशाहा पंचम जॉर्ज यांच्या राज्यारोहणानिमित्त दिल्लीस भव्य दरबार भरणार होता व त्यासाठीं स्वतः बादशाहा हिंदुस्थानास भेट देणार होते, त्या दरबाराकरितां महाराज मोठा लवाजमा घेऊन दिल्लीस गेले. या वर्षी महाराजांच्या कारकीर्दीच्या मध्य-कालाचीं चोवीस वर्षें पुरीं होत असल्यानें, हा खंड येथेंच पुरा करणें योग्य होईल.



# दा. ना. आपटे यांच्या पुस्तकांवरील कांहीं अभिप्राय



**हिंदी-सुमेरी संस्कृति :**—प्रकाशक श न जोशी, चित्रशाळा प्रेस, पुणें, (सन १९२८) डेमी पृष्ठसंख्या १२९, किंमत रु १–०–०

"Some twenty years ago the late Lokamanya Tilak had expounded a theory of the Arctic region being the original home of the Aryans who thence migrated to India and settled here This theory has found corroboration lately in the excavations made by the Archaeological Department of the Government of India at Harappa and Mohenjo-Daro in Sind, where numerous articles have been found which go to establish the closest resemblance between the Sumerian and the Ancient Indian Civilisation, both having a common stock of inheritance in the Vedas. Mr Apte taking a clue from these discoveries, has pursued his studies of the Sumerian civilisation and as its result has produced this book which is brim ful of interesting information. The book will be found indispensable to research students of Indian antiquities"

*The Modern Review–Calcutta*

(December 1928)

* * *

या पुस्तकातील पहिल्या निबंधात एकंदर विषयाचें त्रोटक विवेचन असून, पुढील पाच निबंधात त्याच्याच एकेक अंगाचा विस्तारपूर्वक विचार केला आहे वेदातील इन्द्रदेवता आणि सुमेरी लोकाचा मर्दुक याच्या वर्णनांतील साम्य, जलप्रलयाच्या कथेची उभयत्र आढळणारी परंपरा, मित्र, वरुण इत्यादि देवाचीं वर्णनें, ज्योतिषविषयक माहिती

तसा उपयोग होत नाहीं रा आपटे याच्या लेखणींत शास्त्रीय विषय चटकदार स्वरूपात वठविण्याचें कौशल्य आहे व त्यामुळें कोणीहि वाचक त्याचें पुस्तक तन्मयतेनें वाचील यात सशय नाहीं हा विषय मतभेदाच्या पलीकडे गेला, किंवा त्याची मते पूर्ण सोळा आणे सत्य आहेत असें ते स्वत समजत नाहींत तथापि शक्य तितकी शास्त्रीय चिकित्सा, मार्मिक विवेचन व तार्किक अनुमान यात स्वीकारिलीं आहेत तेव्हा त्याच्या निष्कर्षांच्या ग्राह्यतेला प्रत्यवाय येऊ नये, ही गोष्ट पुस्तकाच्या अवलोकनानतर प्रत्येक निर्विकार बुद्धीचा वाचक मान्य करील असा भरंवसा आहे

नवा काळ,–मुबई ( ७–३–१९२९ )

* * *

रा आपटे याच्या लेखमालेपैकीं सर्वांत उद्‌बोधक भाग म्हणजे तिसऱ्या व चौथ्या लेखाकातील सुमेरी वाङ्मयातील गिलगमेश महा पुराण, ज्योतिषविषयक ज्ञान, जलप्रलयादि कथा इत्यादि सवधाची माहिती हा होय जागोजाग वैदिक व पौराणिक वाङ्मयातील उतारे देऊन तुलनात्मक विवेचन त्यानीं मार्मिक रीतीनें केलें आहे रा आपटे यानीं आपली लेखणी अतिशय महत्त्वाच्या व सामान्य लोकाना दुर्बोध अशा विषयाकडे वळविली आहे

लोकशिक्षण,–पुणें ( डिसेंबर १९२८ )

* * *

या १२९ पृष्ठाच्या निबधात वैदिक व सुमेरी सस्कृतीचें मूळ आर्यसस्कृतींत कसें होतें, सुमेरी सस्कृतीच व वैदिक सस्कृतीचें कसें साम्य आहे, त्याचें विशेष स्वरूप कोणतें, वगैरे गहन विषयाचें सशोधनपूर्वक व मार्मिक विवेचन केलेलें असल्यामुळें आपल्या प्राचीन हिंदी सस्कृतीचा अभिमान बाळगणारांना सदर पुस्तक वाचून नवें ज्ञान प्राप्त झाल्यासारखें वाटेल व आनद होईल

*आनद–पुणें ( आक्टोबर १९२८ )*

* * *

आणि आर्यवशनिदर्शक अशी शरीराची ठेवण इत्यादि प्रमाणावरून सुमेरियन लोक हे आर्य वशाचेच असून भारतीय आर्य व सुमेरियन आर्य या एकाच आर्यवंशाच्या दोन शाखा असाव्यात असें साधार विवेचन केलें आहे, आणि या अनुमानपद्धतींत योजिलेलीं बहुतेक प्रमाणें पाश्चात्य तज्ज्ञांनींच इतरत्र मान्य केलेलीं व उपयोजिलेलीं असल्यानें त्याना हा निर्णय कबूल करणें प्राप्त आहे

केसरी–पुणें ( ३०–४–१९२९ )

* * *

रा आपटे यानीं आपल्या सिद्धान्ताच्या समर्थनार्थ जीं प्रमाणें माडलीं आहेत, तीं अत्यत साधार, तर्कशुद्ध व असदिग्ध अशीं आहेत त्यांत लपडाव, लटपट, घोंटाळा अथवा विसगति कोठेंहि नाहीं हींच प्रमाणें पाश्चात्य विवेचकांनीं उपयोजिलीं आहेत रा आपटे यांच्या लेखात सशोधकता हा गुण उत्तम स्वरूपानें आढळत असून तो एकदर विवेचनांत अगदीं शुद्ध स्वरूपात दिसून येतो त्यांनीं माडलेल्या स्वरूपात त्याच्या सिद्धाताला सर्वमान्यत्वाचा नसला तरी बहुमान्यत्वाचा शिका मारण्याइतका तो माह्य आहे, असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं

विविधज्ञानविस्तार–मुबई ( सन १९२९ )

* * *

आर्यांचें मूळ वसतिस्थान कोणतें, त्याच्या शाखा कोठें कोठें पसरल्या हा विषय अद्यापि बराच वादग्रस्त वाटला, तरी त्यावर प्रस्तुत पुस्तक लिहिणारे रा आपटे यानीं पुष्कळसा निर्णयात्मक प्रकाश टाकलेला आहे, यांत मुळींच सशय नाहीं रा आपटे यांनीं आशियांतील संशोधनानें उजेडात आणलेली माहिती, हिंदुस्थानाच्या सशोधनाचीं फळें, वैदिक वाङ्मय, व त्याशिवाय साहाय्यकारक अशीं इतर शास्त्रें हीं सर्व जमेस धरून अगदीं स्वतत्रपणें प्रस्तुत विषयाचा सिद्धांतबोधक ऊहापोह केला आहे त्यांनीं ठिकठिकाणीं गोंविलेल्या उताऱ्यावरून त्याच्या विस्तीर्ण व्यासंगाची वाचकांना ओळख पटते शास्त्रीय ज्ञान सुगम होण्याकरितां लेखाजवळ सुबोध व मोहक लेखनशैली लागेल, तर तें ज्ञान अधिक अवघड वाटतें व त्याचा व्हावा

तत्त्वज्ञानांतील कूट प्रश्नः—श्रीसयाजीसाहित्यमाला, पुष्प ११२ वें, विज्ञानगुच्छ, प्रकाशक, म व पाळेकर, बडोदें (सन १९२६), क्राऊन पृष्ठसंख्या १५४, किंमत रु -१-०-०

रा आपटे यानीं आपल्या पुस्तकात विवेचनासाठीं जे प्रश्न घेतले आहेत, त्याचा विचार सहज सुचणाऱ्या व सर्वांस चटकन समजणाऱ्या शब्दानीं माडला असल्यामुळें हें कोणीहि वाचावें असें सुबोध झालें आहे अशा विषयात परिभाषा व संप्रदाय या दोन्हीला टाळा देऊन अगदीं साध्या सोप्या व साहजिक विवेचनाचीं पुस्तकें लोकाच्या हातीं पडणें अवश्य आहे रा आपटे याच्या पुस्तकाचा जर कोणता विशेष असेल तर हाच होय

नवा काळ–मुंबई (१७–३–१९२७)

* * *

Mr Apte has not only clearly given the outlines of modern philosophy but has in some places also shown the resemblance of the Western to the Eastern thought The language is simple and can easily be understood by men not previously acquainted with philosophical terminology

*The Modern Review—Calcutta*
(November 1927)

* * *

नरसिंह मेहता -श्रीसयाजीसाहित्यमाला, पुष्प २१७ वं, चरित्रगुच्छ–प्रकाशक दा सा यदे मुंबई (सन १९३३), क्राऊन पृष्ठसंख्या ८३, किंमत ०–६–०

पुस्तककर्त्यांनीं नरसिंह मेहताची बाल्यावस्था, लहानपणींच त्यांची भगवद्भक्तीकडे दिसून आलेली प्रवृत्ति, त्याच्या गृहस्थाश्रमांतील निरनिराळ्या घटना, त्याच्या भक्तपरीक्षेचीं उदाहरणें, त्यांच्या काव्याचें वैशिष्ट्य व गुणदोष, गुर्जरसाहित्यावर त्याची छाप, काव्य, कला व संगीतशास्त्र या विषयाचें त्यांचें ज्ञान, त्यांचे धार्मिक विचार वगैरेचें विवेचन सावतरण रीतीनं केलें आहे या गुर्जर सत कवीची महाराष्ट्र वाचकांना माहिती करून देण्याचे कामीं प्रस्तुत रा आपटे यांचा हा प्रयत्न चांगल्या रीतीनें उपयोगी पडण्यासारखा आहे

ज्ञानप्रकाश–पुणें (२२–९–१९३३)

* * *